

महाराष्ट्र शासन

# महाराष्ट्र राज्य गॅझेटिअर

# महाराष्ट्र : इतिहास - प्राचीन काळ

( खंड-१- भाग-२ )

## स्थापत्य व कला

( प्रारंभिक ऐतिहासिक काळ ते यादव काळ )

दर्शनिका विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई

# महाराष्ट्र राज्य गॅझेटिअर

## महाराष्ट्र : इतिहास - प्राचीन काळ

( खंड - १ भाग- २ )

## स्थापत्य व कला

महाराष्ट्र राज्य गॅझेटिअर




महाराष्ट्र शासन

# महाराष्ट्र : इतिहास-प्राचीन काळ

## (खंड - १ भाग - २)

# स्थापत्य व कला

(प्रारंभिक ऐतिहासिक काळ ते यादव काळ)

संपादक

डॉ. अ. शं. पाठक

लेखक

डॉ. अ. प्र. जामखेडकर



मुंबई

दर्शनिका विभाग

सांस्कृतिक कार्य विभाग, महाराष्ट्र शासन

२००२

(वाय) १७० (i)

# महाराष्ट्र राज्य गॅझेटिअर

**महाराष्ट्र : इतिहास – प्राचीन काळ (खंड - १ भाग - २)**

**स्थापत्य व कला**

प्रथम आवृत्ती (इंग्रजी) : १९६७

मराठी आवृत्ती (सुधारित) : २००२

**प्रकाशक :**

श्री. गोविंद स्वरुप,

अध्यक्ष, संपादक मंडळ, दर्शनिका

प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग,

महाराष्ट्र शासन, मुंबई.

(सर्व हक्क प्रकाशकाच्या स्वाधीन)

**मुद्रक :**

व्यवस्थापक,

शासकीय मुद्रणालय, औरंगाबाद.

**किंमत रु. २७५**

**ग्रंथ मिळण्याची ठिकाणे :**

१ शासकीय ग्रंथ भांडार, नेताजी सुभाष रोड,
मुंबई-४०० ००४.

२ शासकीय मुद्रणालय व ग्रंथ भांडार, सिव्हील लाईन्स,
नागपूर-४४० ००१.

३ शासकीय फोटोझिंको मुद्रणालय व ग्रंथ भांडार,
पुणे-४११ ००१.

४ शासकीय मुद्रणालय व ग्रंथ भांडार,
औरंगाबाद-४३१ ००१.

**(या ग्रंथातील मजकुराशी शासन सहमत असेलच असे नाही.)**

# अनुक्रमणिका

# आरेखनांची यादी

१२. वेरूळ, कैलास लेणे. खालच्या भागाचा तलविन्यास. जि. औरंगाबाद

१३. नेर येथील मंदिरे, ता. जि. उस्मानाबाद :-

(अ) त्रिविक्रम मंदिर (ब) उत्तरेश्वर मंदिर

(क) कालेश्वर मंदिर-तलविन्यास

१४. केवलनरसिंह मंदिर, रामटेक, जि. नागपूर

१५. भोगराम मंदिर-तलविन्यास, रामटेक, जि. नागपूर

१६. रामटेक येथील वेदी :-

(अ) रुद्र नरसिंह मंदिर, (ब) केवलनरसिंह मंदिर

(क) भोगराम मंदिर

१७. मार्कंड ऋषी मंदिर व नंदीमंडप, मार्कंड, तलविन्यास, ता. चामोरशी, जि. गडचिरोली

१८. अंबरनाथ शिवमंदिर-तलविन्यास, जि. ठाणे

१९. सिन्नर, गोंदेश्वर मंदिर-तलविन्यास, ता. सिन्नर, जि. नाशिक

२०. कोपेश्वर मंदिर-तलविन्यास, ता. शिरोळ, जि. कोल्हापूर

२१. मुखेड शिवमंदिर-तलविन्यास, जि. नांदेड

२२. बीड, कंकालेश्वर मंदिर-तलविन्यास, जि. बीड

२३. औंढा, नागनाथ मंदिर-तलविन्यास, ता. औंढा नागनाथ, जि. परभणी

२४. अन्वा, शिवमंदिर-तलविन्यास, जि. जालना

२५. उमरगा, शिवमंदिर-तलविन्यास, जि. उस्मानाबाद

२६. स्तूपांची विविधांगे

२७. मंदिराचे पीठ (अ)

२८. मंदिराचे पीठ (ब)

---

# छायाचित्रांची यादी

**परिचय** : डॉ. अरविंद प्र. जामखेडकर (१९३९), संचालक, पुरातत्त्व व वस्तुसंग्रहालये विभाग, महाराष्ट्र शासन या पदावर सन १९७७ ते १९९७ पर्यंत कार्यरत. **कुवलयमाला-अ कल्चरल स्टडी** (१९७४), **नैकुण्ड एक्सकॅवेशन** (१९८२), **वासुदेवहिंडी-अ कल्चरल स्टडी** (१९८३) इ. ग्रंथ प्रकाशित. जैन साहित्य, शिल्प, कला व स्थापत्य याचे एक जाणकार. काही काळ नागपूर व पुणे विद्यापीठात अध्यापक म्हणून कार्यरत. पन्नास पेक्षा अधिक शोध निबंध प्रकाशित. विविध उत्खननात सहभाग, भारत व परदेशातही कला व स्थापत्य विषयावर व्याख्याने.

# प्रस्तावना

**इतिहास : प्राचीन काळ** चा दुसरा भाग **स्थापत्य व कला** हा ग्रंथ प्रकाशित करीत असतांना मनस्वी आनंद होत आहे. गॅझेटिअर विभागाने ब्रिटिश कालखंडात बॉम्बे प्रेसिडेन्सी अंतर्गत असलेल्या भूभागासाठी "गॅझेटिअर ऑफ दि प्रेसिडेन्सी" (खंड १) हा ग्रंथ दोन भागात सन १८९४ मध्ये प्रकाशित केला, तर महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीनंतर गॅझेटिअर विभागाकडून **हिस्टरी : एन्शंट पिरीअड** हा इंग्रजी गॅझेटिअर ग्रंथ १९६७ मध्ये प्रकाशित करण्यात आला. तथापि मागील चार-पाच दशकात या क्षेत्रात झालेले सर्वांगीण संशोधन तसेच विविध उत्खनन व सर्वेक्षणाव्दारे प्राप्त झालेल्या माहितीच्या आधारे महाराष्ट्राचा प्राचीन इतिहास नव्याने लिहिण्याची गरज निर्माण झाली आहे, हे लक्षात घेऊन या विभागाच्या संबंधित प्रस्तावास शासनाने सन १९९१ मध्ये मान्यता दिली. राज्य गॅझेटिअर ग्रंथांच्या सुधारित मराठी आवृत्तीमधील, **महाराष्ट्र : भूमि व लोक** हा ग्रंथ प्रकाशित झालेला असून, **इतिहास**, खंड-१ या ग्रंथाचा भाग पहिला हा **प्राचीन काळ** या विषयास व भाग दुसरा हा **स्थापत्य व कला** या विषयास समर्पित केलेला आहे.

महाराष्ट्राच्या कला-इतिहासाचा विचार करता लेण्यांच्या संदर्भात जेम्स फर्ग्यूसन आणि जे. बर्जेस यांचा **दि केव्ह टेंपल्स ऑफ इंडिया**, हरिविष्णू सरकार यांचा **स्टडीज इन अर्ली बुद्धिस्ट आर्किटेक्चर ऑफ इंडिया**, विद्या दहेजिया यांचा **अर्ली बुद्धिस्ट रॉक कट टेंपल्स : ए क्रॉनॉलॉजिकल स्टडी**, नागराजू एस. यांचा **बुद्धिस्ट आर्किटेक्चर ऑफ वेस्टर्न इंडिया**, सौंदरराजन यांचा **दि केव्ह टेंपल्स ऑफ डेक्कन**, आणि डॉ. म. न. देशपांडे यांचे पितळखोरा लेणीवरील काम उल्लेखनीय आहे. वॉल्टर स्पिंक यांनी **अजिंठा टू एलोरा** ग्रंथात अजिंठा-लेणी निर्मितीच्या कालखंडाची नव्याने केलेली मांडणी ही महत्त्वपूर्ण बाब समजली जाते. पूर्व प्रकाशित संशोधनाच्या आढाव्याच्या मदतीने लयन स्थापत्याचा कालक्रम ठरवितांना त्यांचा उगम, तलविन्यास, सजावटीतील तपशील, रुपके, उपलब्ध शिलालेख व ताम्रपटातील नोंदी यांचा संकलित विचार स्पिंक यांनी केला आहे. महायान लेण्यांचा कालखंड ठरवितांना त्यांनी वाकाटक नृपति हरिषेण याचा अमात्य वराहदेव याच्या अजिंठा येथील शिलालेखास मुख्य आधार मानून या लेण्यांचा निर्मिती काळ इ. स. ४७५ ते ५०५ असा दिला आहे. याच पध्दतीने डॉ. ढवळीकर यांनी **कैलास : दि स्टायलिस्टीक डेव्हलपमेंट ॲण्ड क्रॉनॉलॉजी** या आपल्या ग्रंथात वेरूळच्या कैलास लेणीच्या निर्मितीबाबत प्रतिपादन

केले आहे. डेबोरा लेव्हाइन यांचाही औरंगाबाद लेणीवरील **औरंगाबाद : ए स्टायलिस्टीक ॲनॉलिसिस**, हा ग्रंथ उल्लेखनीय असून डॉ. म. न. देशपांडे यांनी पन्हाळे-काझी वर केलेले संशोधन (१९९१) या क्षेत्रात नवीन प्रकाश टाकणारे आहे. या सर्वांबरोबरच याच क्षेत्रातील डॉ. ए. घोष यांनी **अजिंठा म्युरल्स** या ग्रंथात चित्रकला व जातकांच्या केलेल्या नोंदी, तसेच जी. याजदाणी यांनी "अजिंठा" या विषयावर १ ते ४ भागात केलेले संशोधनात्मक काम (१९३०-५३) पाहता महाराष्ट्रातील एकूण लयन स्थापत्याचा एकत्रित आढावा घेण्याची जी गरज होती, ती या ग्रंथामुळे पूर्ण होईल असे वाटते. मंदिर स्थापत्याबाबत हेन्री कझिन्स यांच्या **मिडिवल टेंपल्स ऑफ दि डेक्कन** या महत्त्वपूर्ण ग्रंथाचा उल्लेख करता येईल. त्यांनी खानदेश, नगर व नाशिक विभागातील मंदिरांच्या अभ्यासावर भर दिला आहे. डॉ. ए. व्ही. नाईक यांनी **आर्किऑलॉजी ऑफ दि डेक्कन** (१९४७) या प्रबंधामध्ये अनेक वास्तूंचा विस्तृत तपशील नोंदविला आहे. मंदिर स्थापत्याच्या बाबतीत डॉ. ओ. पी. वर्मा यांचा **सर्व्हे ऑफ हेमाडपंती टेंपल्स ऑफ महाराष्ट्र**, डॉ. जी. बी. देगलूरकर यांचा **टेंपल आर्किटेक्चर ॲण्ड स्कल्पचर ऑफ महाराष्ट्र** हा महत्त्वपूर्ण ग्रंथ आहे; डॉ. प्रभाकर देव यांचा **टेंपल आर्किटेक्चर इन मराठवाडा** आणि एस. आर. देशपांडे यांचा **यादव स्कल्पचर** या ग्रंथांमधील उल्लेख सर्वेक्षण व त्यांच्या नोंदी या स्वरूपाचे असले तरी महत्त्वपूर्ण आहेत. डॉ. अ. प्र. जामखेडकर यांनी या गॅझेटिअरसाठी केलेले काम या संदर्भात उल्लेखनिय ठरावे. तथापि, महाराष्ट्रातील लयन व मंदिर स्थापत्याविषयी सखोल संशोधन झालेले असले तरी प्राचीन वास्तुशास्त्र विषयक ग्रंथातील नोंदींच्या संदर्भात त्याचा विचार होणे आवश्यक वाटते.

**वास्तूविद्या** नावाचा ग्रंथ दहाव्या शतकापासून उपलब्ध आहे. **मत्स्यपुराणामध्ये** (चौथे शतक) वास्तूशास्त्राची माहिती दिली असून तत्पूर्वी होऊन गेलेल्या २७ ग्रंथकारांची नावे दिली आहेत. या पुढील काळात या संदर्भात उपलब्ध असलेल्या अनेक ग्रंथांपैकी मयमत, मानसार, काश्यपीय अंशुमद्‌भेद, अगस्त्य-सकलाधिकार आणि श्रीकुमाराचे शिल्परत्न हे दक्षिण भारतामध्ये, तर विश्वकर्मप्रकाश-शिल्प, नवविश्वकर्मवास्तुशास्त्र, समराङ्गणसूत्रधार, अपराजितपृच्छा, प्रासादमण्डन हे ग्रंथ उत्तर भारतात सर्वमान्य होते.

वास्तुविद्या या शास्त्रात आज ज्ञात असलेल्या तीन टप्प्यांचा अंतर्भाव होतो. हे टप्पे म्हणजे आराखडा (तलविन्यास), अभियंत्रणा आणि रचना होत. रचनेच्या नागर, द्राविड आणि वेसर या स्वतंत्र शाखा किंवा शैली होत्या. रचित

शैलीनुसारही काही नावे रुढ दिसतात. उदा. कैलास म्हणजे वर्तुळाकार, पुष्पक म्हणजे काटकोन चौकोनी, वैराज म्हणजे चौरस इत्यादी. उत्तरेमध्ये इ. स. पूर्व चौथ्या शतकापर्यंत विश्वकर्मा मतानुसार बांधकाम होत असे. त्यात विटा व लाकूड यांचा वापर होत असे. बौध्द स्तूपावशेषाच्या स्वरूपात उपलब्ध झालेल्या काष्ठ व इष्टीकामधील प्रारंभिक स्थापत्यावशेषांचे तेर येथील त्रिविक्रम मंदिराच्या स्थापत्याशी साम्य दाखविता येईल. नंतरच्या काळात, साधारणपणे गुप्त काळात शुष्कसंधीचे ( dry masonry ) दगडी देवालय बांधण्याची पध्दत सुरू झाली. याबाबत उल्लेख असलेल्या **हयशीर्षपंचरात्र** ग्रंथामध्ये शुष्कसंधीतील नागर, लाट, वैराट या पध्दतीचा अंतर्भाव होतो. द्राविड आणि वेसर या पध्दतीतही दगडांचाच वापर करीत असत. इ. स. च्या ६ ते १० व्या शतकात या वास्तु-संस्कृति दक्षिणेत प्रचलित होत्या. साधारणपणे ७ व्या शतकानंतर, मुख्यतः दक्षिणेत द्राविड पध्दतीचा व उत्तरेत नागर पध्दतीचा प्रभाव जाणवतो. उत्तरेकडे नागर शैलीतील मंदिरांवर बांधलेल्या शिखरांचे लतिन नागर व शिखर-शेखरी असे दोन प्रकार दिसतात. कलिंग हा ही नागराचाच ओरिसातील प्रादेशिक शिखर प्रकार आढळतो. द्राविड प्रकारची शिखरे केरळ वगळता थोड्याफार फरकाने सर्व भारतात लोकप्रिय झाली. १० व्या ११ व्या शतकात दख्खनमधील माळवा व महाराष्ट्रात, भूमिज प्रकारची शिखरे असलेली मंदिरे तर उत्तर कर्नाटकात वेसर प्रकारची शिखरे असलेली मंदिरे बांधण्याची प्रथा रुढ झाली. भूमिज व वेसर शिखर शैली ही मूलतः उत्तरेत आणि दक्षिणेत प्रचलित असलेल्या नागर व द्राविड शैलीच्या शिखर व प्रासादभेदाच्या संगमातून उत्पन्न झाल्याचे मत डॉ. जामखेडकर यांनी व्यक्त केले आहे. प्राचीन वास्तूशास्त्र विषयक नोंदी सूत्रवाङ्मय तसेच आश्वलायन, गोभिल, खादिर, शंखायन, पारस्कर या गृहसूत्रांतूनही उपलब्ध आहेत. बौध्द वाङ्मयामध्येही चुल्लवग्ग, विनयपिटक, महावग्ग इ. ग्रंथात या विद्येची माहिती व प्रगती नोंदलेली आहे. कौटिल्याच्या अर्थशास्त्रानंतर बृहत्संहिता व पुराणग्रंथांतूनही या विषयीची माहिती येते. **समराङ्गण-सूत्रधार** या ग्रंथात "पुरनिवेश" म्हणजे शहर वसविणे हा विषय विस्ताराने वर्णन केलेला आहे. अशा वास्तुशास्त्रविषयक ग्रंथातून विविध वास्तु, त्यांचे आकार-प्रकार यांची नोंद मिळते.

या पार्श्वभूमिवर बौध्द वाङ्मयातील स्थापत्यविषयक शब्द व संज्ञांचा सखोल अभ्यास करून आनंदकुमार स्वामी यांनी सुरुवातीचे बौध्द स्थापत्य हे एतद्देशिय परंपरातून आल्याचे सिध्द केले, तर स्टेला क्रामरिश यांनी मंदिर स्थापत्याचा

सांगोपांग अभ्यास करून भारतीय मंदिर संकल्पनेचा उदय व विकास हा वैदिक कल्पनांचा दृष्य परिणाम असल्याचे स्पष्ट केले. या सूत्राआधारे उपलब्ध वास्तूशास्त्रविषयक ग्रंथ, विशेषतः **प्रासादमंडन** ह्या ग्रंथाआधारे मंदिर स्थापत्याचा अभ्यास करून त्याच्या अंगोपांगाचे स्पष्टीकरण करतांना ज्ञात संज्ञापेक्षा काही वेगळ्या संज्ञा नव्याने रुढ करण्याचा प्रयत्न या ग्रंथात प्रस्तुत लेखकाने केला आहे.

पश्चिम महाराष्ट्रातील लयन स्थापत्याचा कालानुक्रम देताना लेखकाने लयन निर्मितीचा सर्वमान्य कलानुक्रम स्वीकारूनही महाराष्ट्राच्या हीनयान लयन स्थापत्याबाबत गौतमीपुत्र सातकर्णीचा काळ (इ. स. १०० ते १२०) प्रमाण मानलेला आहे. त्यास अनुसरून त्याच्या पूर्वीची व नंतरही हीनयान लेणी असा कालानुक्रम निश्चित केला आहे. बौध्द विहार व चैत्य याबरोबरच मंडप, पोढी यांची व महायान लयनस्थापत्याची नोंद डॉ. एस. नागराजू यांनी सर्वप्रथम करून त्या आधारे विवेचन केले. ब्राम्हणी लेण्यांच्या बाबतीमध्ये बर्जेस यांनी केलेल्या वर्गीकरणानंतर आतापर्यंतच्या ज्ञात व नवीन बाबींच्या आधारे डॉ. जामखेडकर यांनी या ग्रंथात एकूण ब्राम्हणी लेण्यांची कालानुक्रमाने केलेली वर्गवारी निश्चित उल्लेखनीय आहे. मंदिर व शिल्प स्थापत्याबाबत राष्ट्रकूट व शिलाहार मंदिर शैलींचे वैशिष्ट्य स्पष्ट करण्याचा जसा यात प्रयत्न केला आहे, तसा महाराष्ट्रातील नागर, विशेषतः लतिन नागर आणि भूमिज शिखरे असलेल्या मंदिरांची तसेच फांसना व अन्य शिखर शैलींबाबतची नोंद प्रथमच घेण्याचाही प्रयत्न करण्यात आलेला आहे. शिल्पशैलीबाबत त्यांचे निरीक्षण विलक्षण असून महाराष्ट्रीय शिल्पशैलीवरील लगतच्या प्रादेशिक शिल्पशैलींचा जाणवणारा परिणाम तसेच यादवांच्या ताब्यातील विशाल भूप्रदेशातील शिल्पांवर लगतच्या परिसरात विकसित होणाऱ्या शिल्पशैलींचा पडलेला प्रभाव स्पष्ट करताना सोळंकी, कलचुरी आणि उत्तर चालुक्यांच्या शिल्पशैलीचे साधर्म्य निश्चित कोठे आहे हे दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. **प्रासादमंडना**सारख्या नंतरच्या शिल्पसंहितेमध्ये जंघांचे नागर, द्राविड, लाटी आणि वाराटी असे चार प्रकार वर्णिले आहेत. द्राविडी जंघेवर मंजरी येतात, लाटी जंघेवर निर्गमाच्या दोन्ही बाजूंवर नारीयुग्मे येतात तर वाराटी जंघेवर पानाची नक्षी येते यासारखा तपशील ते उदाहरणासह देतात. सारांश, महाराष्ट्रातील लयन स्थापत्य आणि मंदिर स्थापत्याचा प्रारंभिक ऐतिहासिक

काळापासून यादव काळापर्यंत एक विस्तृत परिचय करून देणारे हे गॅझेटिअर सर्व संशोधक, अभ्यासक आणि पर्यटकांनाही सारखेच उपयुक्त ठरेल असा विश्वास वाटतो. त्या दृष्टीने या ग्रंथात सर्वस्पर्शी आढावा घेण्याचा प्रयत्न केला आहे.

या पुढील कालखंडातील स्थापत्य व शिल्पावशेषावर स्वतंत्र ग्रंथ प्रकाशित करण्याचा या विभागाचा मानस आहे.

**अरुणचंद्र शं. पाठक**
कार्यकारी संपादक व सचिव

---

# ऋणनिर्देश

दर्शनिका विभागाकडून राज्य गॅझेटिअर मालिकेमध्ये यापूर्वी इतिहास या विषयावर **हिस्टरी : एन्शंट पिरिअड** हा इंग्रजी ग्रंथ १९६७ मध्ये प्रकाशित करण्यात आला. त्यानंतर मिडीवल पिरिअड, व मराठा पिरिअड या विषयांवर दोन स्वतंत्र राज्य गॅझेटिअर ग्रंथ प्रकाशित करण्यात आले. या व्यतिरिक्त बॉटनी या विषयांतर्गत तीन गॅझेटिअर्स, फौना तसेच बॉटनी अॅण्ड फ्लोरा ऑफ महाराष्ट्र, महाराष्ट्र: लॅण्ड अॅण्ड इटस् पिपल, लँग्वेज अॅण्ड लिटरेचर हे गॅझेटिअर ग्रंथ प्रकाशित करण्यात आले. तथापि, या सर्व विषयांवर गेल्या पाच दशकात झालेल्या वैशिट्यपूर्ण व सर्वांगीण संशोधनाच्या आधारे या गॅझेटिअर्सच्या सुधारित मराठी आवृत्ती प्रकाशित करण्याची गरज लक्षात घेऊन या विभागाच्या संबंधित प्रस्तावास शासनाने सन १९९१ मध्ये मान्यता दिली. त्यानुसार या मालिकेतील प्रथम खंड म्हणून **महाराष्ट्र : भूमी व लोक** हे मराठी भाषेतील पहिले राज्य गॅझेटिअर प्रकाशित करण्यात आले. प्रस्तुत खंड म्हणजे या मालिकेतील दुसरे पुष्प होय. या ग्रंथाच्या विषयाचे व्यापक स्वरूप लक्षात घेऊन त्याचे **इतिहास : प्राचीन काळ** आणि **स्थापत्य व कला** असे दोन भाग करण्यात आले आहेत. आज या ग्रंथांचे काम पूर्ण होतांना आनंद होत आहे. या दोन्हीही खंडांच्या इंग्रजी आवृत्तीही लवकरच प्रकाशित करण्यात येतील. **इतिहास : प्राचीन काळ** या ग्रंथाचे काम सुरू असतांना संपादक मंडळावर डॉ. म. के. ढवळीकर, डॉ. अ. प्र. जामखेडकर, डॉ. रा. श्री. मोरवंचीकर, डॉ. श्रीधर गुप्ते, डॉ. भा. ल. भोळे, डॉ. एस. व्ही. खांदेवाले, डॉ. सुधाताई काळदाते, डॉ. उषा देशमुख आणि ज्येष्ठ पत्रकार माधवराव गडकरी हे मान्यवर कार्यरत होते. या सर्वांचा मी त्यांनी केलेल्या सहकार्याबद्दल ऋणी आहे. डॉ. कि. का. चौधरी यांनी हे काम हाती घेतले होते. त्यांच्या दूरदृष्टीचा मी गौरवाने उल्लेख करू इच्छितो. आता हे गॅझेटिअर प्रकाशित होत असतांना नवीन संपादक मंडळ कार्यरत असून त्यात डॉ. जनार्दन वाघमारे, डॉ. श्रीधर गुप्ते, डॉ. कि. का. चौधरी, डॉ. जयसिंगराव पवार, डॉ. रामकृष्ण सोळंके, डॉ. राजेंद्र कुंभार, डॉ. यशवंत मनोहर, डॉ. फक्रुद्दिन बेन्नूर, डॉ. सुधीर गव्हाणे, डॉ. श्रीनिवास ओमनवार, डॉ. उत्तमराव रूद्रवार, श्री मधुकर भावे आणि श्रीमती उर्मिला पवार या मान्यवरांचा समावेश आहे. या सर्व मान्यवर सदस्यांचा मी ऋणी आहे. मंडळाचे अध्यक्ष, श्री गोविंद स्वरुप (प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन, सांस्कृतिक कार्य विभाग) यांनी या कामी वेळोवेळी मार्गदर्शनपर प्रोत्साहन दिले. त्यांचा मी आभारी आहे.

**स्थापत्य व कला** या विषयावर डॉ. अ. प्र. जामखेडकर (निवृत्त संचालक, राज्य पुरातत्व व वस्तुसंग्रहालये विभाग, महाराष्ट्र शासन) यांनी अतिशय परिश्रमपूर्वक लेखन केले असून या मूळ इंग्रजी गॅझेटिअर ग्रंथाचा मराठी अनुवाद करण्यास सहकार्य करणारे श्री. भा. वि. कुलकर्णी (पुरातत्व विभाग, मुंबई) यांचा विशेषत्वाने उल्लेख करणे मला आवश्यक वाटते. या ग्रंथ निर्मितीमध्ये ज्या मान्यवर संस्थांनी छायाचित्रे व आरेखने पुरविली आहेत त्या संस्था व व्यक्तींचे मी ऋण मी व्यक्त करतो. विशेषतः अमेरिकन इन्स्टिट्यूट ऑफ इंडियन स्टडीज् हरयाणा, या संस्थेचा खास उल्लेख करणे अगत्याचे आहे. तसेच सौंदरराजन, कृष्णदेव, डॉ. देगलूरकर, डॉ. प्रभाकर देव यांच्या ग्रंथांतून काही आरेखने आम्ही साभार स्वीकारली असून त्यांचा उपयोग या ग्रंथात करता आल्याबद्दल या सर्व मान्यवरांचाही मी आभारी आहे.

विद्यमान ग्रंथाच्या संकलन व प्रकाशन प्रक्रियेत मला ज्यांचे सहाय्य लाभले. त्यात श्री. प्र. नि. नारखेडे, सहसंपादक ; श्री. नि. रा. पाटील, श्री. रा. र. हनवतकर, श्री. त्रिं. मा. केंद्रे, श्री. प्र. रा. गवळी, संशोधन अधिकारी; सौ. मा. सु. मोदिखाने, श्री. के. झिं. राऊत, श्री. ध. जि. नावडकर, श्री. सु. श्री. गायकवाड, श्री. रा. स. कुंभार, श्री. ग. ना. परब, श्री. शा. का. मर्गज, श्री. अं. रा. पवार, श्री. तु. भा. सुकाळे हे सर्व सहायक संशोधन अधिकारी, श्री. प्र. सा. खोबरेकर, प्रशासनिक अधिकारी, तसेच लघुलेखक व सहायक आणि कार्यालयातील विविध स्तरावरील कर्मचारी यांनी केलेल्या सहकार्याचा उल्लेख करणे आवश्यक वाटते. त्या सर्वांचा मी आभारी आहे.

ग्रंथाची छपाई उत्तम व तत्परतेने करून दिल्याबद्दल श्री. प्र. शं. मोरे, संचालक, श्री. प. ज. गोसावी, उपसंचालक, शासन मुद्रण, लेखन सामग्री व प्रकाशने, मुंबई आणि श्री. म. शं. गायकवाड, व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय, औरंगाबाद व त्यांचे सर्व सहकारी यांनी केलेल्या कामाबद्दल तसेच या ग्रंथातील छायाचित्रांची छपाई उत्तम व तत्परतेने करून दिल्याबद्दल श्री. यू. एस. सोनवणे, व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय, मुंबई, यांचे मी मनःपूर्वक आभार मानतो.

माझ्या विभागाचे मा. ना. श्री. रामकृष्ण मोरे, (मंत्री, सांस्कृतिक कार्य व शिक्षण) व मा. ना. डॉ. विमलताई मुंदडा (राज्यमंत्री, सांस्कृतिक कार्य व राजशिष्टाचार विभाग) तसेच या विभागाचे प्रधान सचिव मा. गोविंद स्वरुप यांचेही ऋण व्यक्त करतो.

मुंबई
१ मे २००२

**अरूणचंद्र शं. पाठक,**
कार्यकारी संपादक व सचिव

# शुद्धिपत्र

| पृष्ठक्रमांक (१) | परिच्छेद (२) | ओळ (३) | चुकीची नोंद (४) | सुधारित नोंद (५) |
|---|---|---|---|---|
| मुखपृष्ठ | . . | शेवटी | राज्य | शासन |
| ६ | १ | ६ | लोमेश | लोमश |
| ८ | ३ | १ | वडगाव | मावळ |
| ९ | १ | १ | ७.६२ | १७.८ |
| ९ | ३ | १० | नर्तिकामूर्ती[३] कोरलेल्या | नर्तक मिथुने[३] कोरलेली |
| ९ | ४ | १ | चाळीसगाव | कन्नड |
| ९ | ४ | १ | जळगाव | औरंगाबाद |
| १२ | ३ | २ | या समूहात | जुन्नर परिसरात |
| १२ | ३ | २ | ३२४ लेणी | २०९ लेणी व ११५ कुंड |
| १५ | २ | १ | वडगाव | मावळ |
| १६ | ५ | १ | वडगाव | मावळ |
| २१ | ६ | १ | वडगाव | मावळ |
| २१ | १ | २ | हारीता | हारिती |
| २५ | २ | २ | ३.७० | २.७० |
| २५ | ४ | ६ | ७.५० | ०.७५ |
| २७ | २ | ७ | अनापिंडक | अनाथपिंडक |
| ३१ | १ | १ | १०.२० | ८.०५ |
| ३१ | १ | १ | १६.९० | ११.०० |
| ३१ | १ | ३ | एकूण | प्रत्येकी |
| ३२ | २ | ६ | कालखंडात | कालखंडानंतर |
| ३९ | १ | २५ | क्र. ७ | क्र. ८ |
| ४१ | १ | ४ | कलचुरी | या शब्दापूर्वी सातवाहन, असे वाचावे. |
| ४१ | १ | १६ | (५) पाचव्या दशकात या शतकाच्या १९४०-५० | या शतकाच्या ५ व्या दशकात (१९४०-५०) |
| ४२ | १ | २१ | अडीच | दीड |
| ४८ | ३ | ११ | उदाराम | उदाराम् |
| ४९ | २ | १२ | ( . . . . ) | (fluted) |
| ४९ | २ | १५ | देवी | देव |
| ५२ | २ | १७ | ( . . . . ) | (band) |
| ५२ | २ | २४ | औरंगाबाद | अजिंठा |
| ५७ | ८ | १ | भांदक | वरोरा |
| ९६ | १ | ८ | छाट्या | छोट्या |
| १०१ | ४ | ३ | आयताकृती | काटकोनाकृती |
| १०८ | २ | ८ | परिषराला | परिषहाला |
| ११२ | २ | १३ | बदामापूर | बदनापूर |
| ११३ | १ | ११ | tripel | triple |
| ११५ | १ | १ | निजामपूर | साक्री |
| ११५ | २ | १ | तळेगाव | मावळ |
| १२५ | ३ | ३ | प्रवरेश्वरसद्विंसति | प्रवरेश्वरषड्विंशति |
| १३३ | ३ | ७ | वरूळ | वेरूळ |
| १३५ | २ | १ | मोहाडी | हा शब्द वगळावा |

(शा.म.मु.) एचएफ १३११ (१,१००-८-२००२)

| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
|---|---|---|---|---|
| १३१ | २ | ३ | प्रांतामध्ये | प्रांताप्रमाणे |
| १३६ | ३ | ४ | त्रिजघ | त्रिजंघ |
| १४१ | २ | १२ | नांगर | नागर |
| १५१ | ३ | १ | ता. जि. | ता. नंतर पुसद असे वाचावे. |
| १५२ | ३ | १ | महागाव | हा शब्द वगळावा |
| १५६ | १ | २१ | सहस्त्रकाच्या | सहस्रकाच्या |
| १५८ | ३ | १ | मालेगाव | मूर्तिजापूर |
| १७६ | ३ | १ | कोरेगाव | कोपरगाव |
| १७७ | २ | ३ | उक्षेप | उत्क्षेप |
| १८५ | १ | ९ | इ.स. ११७५ | इ.स. ११७७ |
| १८६ | १ | २५ | पंढरपूर | माळशिरस |
| १८८ | १ | ७ | सरुवातीस | सुरुवातीस |
| १८८ | १ | ८ | इ.स. १२०९ | इ.स. १२०७ |
| १९४ | २ | १२ | चतुर्थकात | दशकात |
| २०१ | २ | ३ | ध्या | ह्या |
| २०६ | २ | २ | इ.स. १२०६ | इ.स. १२०७ |
| २०६ | ५ | ४ | शके ९९० | शके ९९१ |
| २१८ | ३ | १ | संगमनेर | पाचोरा |
| २१८ | ३ | १ | अहमदनगर | जळगाव |
| २३२ | २ | ६ | बैलाच्या | बुलैच्या (पदक) |
| २३५ | १ | १२ | Standar | Standard |
| २५७ | ३ | ६ | नंतरचा | नंतरच्या |
| २५७ | ३ | ७ | नंतरच्या | नंतरचा |
| २६५ | १ | ११ | प्रप्पा | प्रपा |
| २९९ | . . | २२ | टॉयलिस्टीक | स्टायलिस्टीक |
| २९९ | . . | २७ | फॉमर्स् | फॉर्मस् |
| ३०० | . . | ८ | टेंपल नंतरचा स्वल्पविराम् | स्वल्पविराम वगळावा. |
| ३०० | . . | १३ | "भूमिज टेंपल्स स्टडीज", **इंडियन टेंपल्स आर्किटेक्चर** | "भूमिज टेंपल्स", **स्टडीज इन इंडियन टेंपल्स आर्किटेक्चर** |
| ३०० | . . | २८ | एक्नॉग्राफी | आयकॉनॉग्राफी |
| ३०१ | . . | ५ | आट | आर्ट |
| ३०१ | . . | २४ | न्यू दिल्ली | कलकत्ता |
| ३०१ | . . | २७ | हिस्टरी | अर्ली हिस्टरी |
| ३०२ | . . | २२ | स्पिंक, वॉल्टर, एम. | सौंदरराजन, के. व्ही. |
| आरेखने | १९ नंबरचे आरेखन | . . | कोल्हापर | कोल्हापूर |
| छायाचित्रे | ४० नंबरचे छायाचित्र | . . | लोणाड | लोणार |

# प्रकरण १ : लयन-स्थापत्य

**प्रास्ताविक** : ऐतिहासिक महाराष्ट्राची सुरुवात मौर्यकालीन पुराव्यांपासून होते. ठाणे जिल्ह्यात सोपारा येथे सम्राट अशोकाचा शिलालेख सापडला असून अगदी तशाच प्रकारचा शिलालेख विदर्भातील चंद्रपूर जिल्हयात देवटेक येथेही सापडला आहे. लिखित साधने किंवा पुरावे मिळू लागले की इतिहासकाळ सुरू होतो. हे शिलालेख महाराष्ट्रात सापडणा-या लिखित पुराव्यांमध्ये सर्वात प्राचीन असल्याने त्यांच्याबरोबरच महाराष्ट्राने इतिहासकाळात प्रवेश केला असे म्हणता येईल. यावरून महाराष्ट्रातील स्थापत्यशास्त्राच्या आणि दृश्य-कलेच्या इतिहासाला मौर्यकाळात (अदमासे इ.स.पू. २७३ ते इ.स.पू. २३६) सुरुवात झाली असावी. पण यालाही अपवाद असलेले काही पुरावे आढळले आहेत. या पुराव्यांमुळे महाराष्ट्रातील धातूमूर्तीची प्राचीनता १५०० वर्षे मागे गेली आहे. दायमाबाद येथे सापडलेल्या ब्रॉंझमूर्तींचे कलेतिहासाच्या दृष्टीने अनन्यसाधारण महत्व आहे. मध्य प्रदेश व कर्नाटक राज्यात सापडतात त्याप्रमाणे प्रागैतिहासिक भित्तिचित्रे असलेल्या नैसर्गिक गुंफा जरी महाराष्ट्रात सापडत नसल्या, तरी प्रागैतिहासिक दफनस्थळे किंवा धार्मिक स्मारके मात्र आढळतात. या संदर्भात विदर्भातील महापाषाण - संस्कृतीच्या पाषाणवर्तुळ - दफनांचा येथे प्रामुख्याने उल्लेख केला पाहिजे. दक्षिण भारतातही अनेक प्रकारची दफन-स्मारके आढळतात. दगडी वरंड किंवा माठे गोटे वर्तुळाकार रचून त्यात असलेला पाषाणांचा ढीग या स्वरूपाची दफने विदर्भात मोठया प्रमाणावर आढळून आली आहेत. विदर्भातील भंडारा जिल्हयात अश्मनिवारेही* आढळलेले आहेत. अशा प्रकारच्या पाषाणवर्तुळांमधूनच बौध्द स्तूप निर्माण झाला असावा असा विद्वानांचा कयास आहे. मध्य प्रदेशातील पान गुडारिया (Pan Gudaria) येथे सापडलेले प्राचीन स्तूप या संदर्भात अत्यंत महत्वाचे आहेत. जर ही अश्मवर्तुळे स्तूपांचे पूर्व-नमुने असतील तर अश्मनिवारे पूर्व गुप्त काळातील माध्यमरहित सांध्यांच्या म्हणजेच शुष्कसांधी बांधीव मंदिरांची स्फूर्तिस्थाने ठरली असणार हे उघडच आहे. तीन उभ्या शीळा व एक आडवा सपाट पाषाण असे अश्मनिवाऱ्यांचे स्वरूप असल्याने स्थानिक भाषेत त्याला चूल-तवा म्हणतात. त्यामुळे अशा प्रकारे बांधलेल्या मंदिरांचे अश्मनिवारे हे पूर्वनमुने असले पाहिजेत. महाराष्ट्रात वर्धा जिल्हयातील खैरवाडा येथे सर्वाधिक (बहुधा १५०० हून अधिक) अश्मवर्तुळे आहेत, तसेच भंडारा जिल्हयातील पीपळगाव आणि ब्रांबी येथील अश्मनिवारेही प्रसिध्द आहेत.

---

* अश्मानिवारे :- तीन चार उभ्या शिळांवर मोठा सपाट पाषाण ठेऊन उभारलेले दगडी निवारे. इंग्रजीत अशा प्रकारच्या निवा-याला डॉल्मेन (Dolmen) म्हणतात.

भारतातील आजही अस्तित्वात असलेली सर्वात प्राचीन स्मारके म्हणजे कोरीव बौध्द लेणी. अशा सुमारे १००० गुंफांपैकी दोन-तृतियांश गुंफा दख्खनमध्ये आहेत.

विटांमध्ये आणि दगडांमध्ये बांधलेल्या वाकाटककालीन वास्तूंच्या अवशेषांचे थोडके अपवाद सोडले तर बांधीव मंदिरे आपल्याला यादवकाळातच बांधलेली आढळतात. तथापि यादवकाळापर्यंत बांधीव मंदिरे नव्हतीच असा त्याचा अर्थ नाही. तत्कालीन स्थापत्यापैकी लेणी किंवा गुंफा या डोंगरातच कोरलेल्या असल्यामुळे त्या ब-यापैकी टिकून आहेत, तर बांधीव मंदिरांचे केवळ अत्यल्प अवशेषच आज अस्तित्वात आहेत. एवढाच त्याचा अर्थ आहे. स्थापत्याच्या आजमितीस टिकून राहिलेल्या अवशेषांचे स्वरूप असे असल्यामुळे सातवाहनकाळातील काही उत्कृष्ट बांधीव नमुने उपलब्ध असूनही सातवाहन आणि राष्ट्रकूट-काळाच्या इतिहासाचा मागोवा कोरीव लेण्यांवरूनच घ्यावा लागतो.

महाराष्ट्रातील महत्त्वाचे बौध्द बांधीव स्थापत्याचे पुरावे किंवा नमुने पुढील प्रमाणे : १) पवनी येथील स्तूप, २) सोपारा येथील स्तूप, ३) तेर येथील स्तूप आणि इतर अवशेष, ४) कोल्हापूर येथील स्तूप व ५) कान्हेरी आणि महाकाली गुंफांमधील स्तूप.

प्राचीन महाराष्ट्रात किंवा मौर्य काळात फोफावलेल्या बौध्द धर्माचा सर्वात जुना पुरावा म्हणून पवनी येथील स्तूप महत्त्वाचा आहे. हा स्तूप किमान मौर्यकाळाइतका प्राचीन असावा, आणि स्तूपाचा घुमटाकार मातीचाच असून त्याच्या भोवती लाकडी कठडा असावा असे उत्खनकांचे मत आहे. त्यानंतरच्या काळात, उदा. शुंग आणि सातवाहन काळात (इ.स.पू. २ रे शतक) स्तूप विटांनी बनविले जात आणि त्याभोवती फरसबंदीयुक्त किंवा जमीन पिटून बनविलेला प्रदक्षिणा पथ असे. स्तूपाभोवतीचा दगडी कठडा त्यावर आकृति कोरून सुशोभित बनवला जात असे. स्तूपावर छत्री इत्यादि लांछने असत. हा स्तूप बहुधा ख्रिस्तोत्तर चौथ्या शतकापर्यंत पुजला जात असावा.

पवनीनजिकच सध्याच्या चांडकापूर गावात थोडया लहान आकारमानाचा आणखी एक स्तूप होता. हा स्तूप इतर स्तूपांपेक्षा वेगळा होता. त्यात अवशेषांची डबी (करंडा), दगड, रत्ने वा धातू यांचा नसून मृद्‌भांडयांच्या स्वरूपात होता.

बांधकाम तंत्राच्या दृष्टीनेही हे दोन्ही स्तूप वेगळे होते. बांधकाम साहित्याची बचत करण्यासाठी यामध्ये प्रथम विटांचे कप्पे बांधून ते नंतर माती आणि

फुटक्या विटा यांनी भरून स्तूपाचा अंड बनविण्यात आला होता. जतन करण्यास अतिशय कठीण असलेल्या मातीच्या स्तूपांच्या तुलनेत हा स्तूप तंत्रदृष्टया प्रगत होता असेच मानावे लागेल.

या पध्दतीत बांधकाम साहित्याचीही खूप बचत झाली. पवनीच्या स्तूपाच्या प्रदक्षिणापथाला दोन्ही बाजूला दगडी कठडे होते, तर नंतरच्या स्तूपाला शिल्पपट्ट आणि अलंकारिक आकृत्या होत्या. सांची येथील शिल्पे आणि हा शिल्पपट्ट एकाच प्रकारच्या दगडात बनविण्यात आले होते. हा प्रस्तर प्रकार "शुंग-शैली " म्हणूनही ओळखला जातो. या स्तूपाकरीता दान दिलेल्या लोकांचा उल्लेख करणाऱ्या शिलालेखांवरून हा स्तूप राजाश्रयातून नव्हे, तर समाजाच्या विविध स्तरांतील लोकांकडून प्राप्त झालेल्या देणग्यांमधून उभारण्यात आल्याचे स्पष्ट होते. सकृत्दर्शनी मगध साम्राज्याचा भाग असलेला आणि शुंगकाळात मगध साम्राज्यावर अवलंबून असलेला विदर्भातील जनसमुदाय हा महापाषाणी संस्कृतीतून बौध्द धर्मात आला असावा.

कोकणातील अशोकाचा शिलालेख असलेला ब-यापैकी विशाल स्तूपही इतिहासपूर्वकाळात अशाच प्रकारे बांधला गेला असावा. विटांनी बांधलेल्या या स्तूपाच्या काळाबाबत विद्वानांमध्ये मतभेद आहेत. परंतु त्याच्या नजिकच सापडलेले वसतिस्थळ, लिखित पुरावे, आणि त्याचप्रमाणे शिल्पशास्त्रीय पुरावे ( तिथे सापडलेली यक्षाची मूर्ती ) यावरून हया स्तूपाचा काळ ख्रिस्तपूर्व दुसरे ते पहिले शतक असावा असे मानण्यास जागा आहे.

एकोणीसाव्या शतकाच्या शेवटच्या दशकात आणखी एक बांधीव स्तूप कोल्हापूर येथे अनपेक्षितपणे सापडला. कोल्हापूर संस्थानाच्या तुरुंगातील कैद्यांना मातीचे ढिगारे काढून साफसफाई करण्याचे काम देण्यात आले होते. हे काम करीत असताना अचानकपणे अस्थिकरंडक ( Relic casket ) सापडले. हे अवशेष तात्काळ ब्रिटिश रेसिडेंटच्या निदर्शनास आणून देण्यात आले. त्याने या अवशेषांचे महत्त्व ओळखले. यानंतर प्रा. कुंदरगी यांच्या नेतृत्वाखाली एक उत्खनन करण्यात आले. या उत्खननात सापडलेल्या बौध्द धाटणीच्या ब्रॉंझमधील पूजासाहित्याच्या वस्तू या स्तूपाचा काळ ख्रिस्तोत्तर दुसरे शतक असल्याचे सूचित करतात.

उस्मानाबाद जिल्हयातील तेर जवळ म्हस्के यांच्या शेतात झालेल्या उत्खननात सापडलेले अवशेष उल्लेखनीय आहेत. या उत्खननात विटांत स्तूप असलेल्या बांधकामाचे अवशेष सापडले आहेत. हे मंदिर चापाकृति ( Apsidal ) आकाराचे असून त्याच्या वक्राकार बाजूत स्तूप होता. भाजा, कोंडाणे, पितळखोरे येथील

खोदीव चैत्यगृहे ही अशाच प्रकारच्या मंदिरांची नक्कल आहेत. हे मंदिर ९ मीटर लांब आणि ५.५ मीटर रुंद असून ते पक्क्या विटांनी बांधलेले होते. हे बांधकाम वैशिष्टयपूर्णपणे बनविलेल्या पीठावर करण्यात आले होते. मंदिराचे किंवा चैत्यगृहाचे प्रवेशद्वार लाकडी असून मागच्या अर्धवर्तुळाकार बाजूजवळ असलेल्या स्तूपाचा व्यास १.२५ मीटर आहे.

उत्खननात सापडलेला विटांचा स्तूप अधिक महत्त्वाचा आहे. हे उत्खनन पुरातत्त्व विभागाचे संचालक मो. गं. दीक्षित यांनी १९६८ साली केले. या स्तूपाचा आराखडा एकात एक असलेल्या आरेयुक्त चक्रांसारखा दिसतो. स्तूपाचा व्यास २६ मीटर होता. तथापि संपूर्ण स्तूप शिल्लक नव्हता, तर केवळ खालील २९ विटांचे स्तर उपलब्ध झाले. स्तूपाचे आतील भाग कप्प्यात विभागले असून ते विटांचे तुकडे आणि मातीने भरण्यात आले होते. स्तूपाभोवती ५.३० मीटर रुंदीचा प्रदक्षिणामार्ग होता. हा प्रदक्षिणामार्ग सुरुवातीला दगडांनी बनवलेला होता. अमरावती येथील स्तूपाप्रमाणेच चार मुख्य दिशांना चार पीठे असून त्यावर आयागस्तंभ होते आणि स्तूपाचा पृष्ठभागही शहाबादी फरशींच्या थराने बनविलेला होता.

पवनीच्या स्तूपाची आणि येथे वर्णिलेल्या स्तूपांची सर्व वैशिष्टये दक्षिण दख्खनमधील स्तूप-स्थापत्याशी साधर्म्य दाखवितात. विटांनी स्तूप बांधण्याचे हे नवे तंत्र सातवाहन साम्राज्याच्या अगदी गाभ्यातच विकसित होऊन नंतर त्याचा पूर्वेकडे प्रसार झाला असण्याची दाट शक्यता आहे.

अलिकडेच महाराष्ट्राच्या पुरातत्व व वस्तुसंग्रहालय संचालनालयाने तेर, जि. उस्मानाबाद येथे तेरणा नदीच्या काठावर उत्खनन केले. या उत्खननात विटांनी बांधलेल्या स्नानकुंडाचे अवशेष सापडले आहेत. या वास्तूच्या साहचर्यात सापडलेल्या हस्तिदंती फणी आणि इतर पुरावस्तुंवरून या कुंडाचे धार्मिक स्वरूप स्पष्ट होते. तसेच या परिसरातच विटांनी बांधलेल्या चापाकृती मंदिराच्या पायाची बाह्यरेषाही दृग्गोचर झाली.

तेर येथेच भगवान महादेवाला नमन करून प्रारंभ होणारा (नमो भगवतो महादेवस) वासिष्ठीपुत्र पुळुमावीचा सापडलेला शिलालेख (ख्रिस्तोत्तर दुसरे शतक) आणि गणेश आणि विष्णू यांच्या प्राचीन मूर्ती यांवरून येथे पौराणिक देवांची मंदिरेही उभारली गेली असावीत हे स्पष्ट होते. यादृष्टीने अधिक संशोधन केल्यास अनेक महत्त्वपूर्ण पुरावे प्रकाशात येतील.

वर विशद केलेल्या उदाहरणांवरून गुंफा स्थापत्याबरोबरच बांधीव स्थापत्यही विकसित झाले असावे हे स्पष्ट होते. पवनी येथे भिक्षूंचा विहार सापडण्याची शक्यता आहे. विद्यापीठ आणि डेक्कन कॉलेज यांनी संयुक्तपणे केलेल्या तेर येथील उत्खननात पाटलिपुत्र नगरीप्रमाणेच (विसाव्या शतकाच्या सुरुवातीला झालेली बुलंदीबाग उत्खनने) येथेही लाकडी प्राकार असावेत असे निदर्शनास आले आहे. अडम येथे मातीची तटबंदी असून त्याभोवती खंदक होता.

कोल्हापूर येथील ब्रह्मगिरी तसेच नेवासे, नाशिक, भोकरधन, पवनार, पैठण येथील उत्खननात, आणि नुकत्याच अडम (जि. नागपूर) येथे झालेल्या उत्खननात सर्वसामान्य माणसाच्या घराचे स्वरूप स्पष्ट झाले आहे. त्यातील अवशेषांवरून सातवाहन काळातील घरांचा आकार लक्षात येतो. दगडगोट्यांचा वापर करून भक्कम पाया बांधण्यात येत असे आणि घरातील जमिनीवर मुरमाचा थर घालून जमीन बनविण्यात येत असे. उत्तर सातवाहनकाळात तर (ख्रिस्तोत्तर ५० ते २५० वर्षे) लोखंडी खिळयांच्या सहाय्याने छपराच्या सांगाडयावर कौले बसविली जात असत. हया उत्खनीत अवशेषाच्या वस्तुस्थितीनंतर खोदीव स्थापत्याचा आढावा घेणे क्रमप्राप्त ठरेल.

## हीनयान लयन - स्थापत्य

हीनयान शैलस्थापत्यात प्रामुख्याने चैत्यगृहे आणि विहार आढळून येत असले तरी त्यात सभागृह, भोजनगृह, स्मशाने, न्हाणपोढी (आंघोळीच्या पाण्याची टाकी), पाणपोढी (पिण्याच्या पाण्याची टाकी), कोढी (पूजेचे कोनाडे), विश्रांतीचे बाकाच्या आकाराचे कट्टे यांचाही अंतर्भाव होतो. कान्हेरी, जुन्नर आणि भाजे यासारख्या विशाल शैलवसाहतींमध्ये हे इतर घटक अधिक प्रकर्षाने दिसून येतात.

या स्थापत्यप्रकाराच्या चर्चेला प्रारंभ करण्यापूर्वी त्याच्या उगमाची आणि तत्पूर्वीच्या वास्तुप्रकारांची माहिती घेणे उचित ठरेल. चिनी यात्रेकरु हयूएनत्संग ( Huien Tsang) आणि फाहीयेन ( Fahien ) यांच्या इतिवृत्तांतून, गुप्तोत्तर काळातील भिक्षुसंघांच्या पुरातत्त्वीय पुराव्यांवरून आणि विदर्भातील पवनी (जि. भंडारा), मराठवाडयातील तेर (जि. उस्मानाबाद) आणि पश्चिम महाराष्ट्रातील प्राचीन पुराव्यांवरून डोंगरात खोदण्यात आलेली शैलगृहे ही तत्कालीन विटा आणि लाकडाच्या सहाय्याने बांधलेल्या मंदिरांची नक्कल होती हे स्पष्ट होते. विटांनी बांधलेल्या अवाढव्य स्तूपांची माहिती यापूर्वी वर्णन केलेली आहे. याच स्तूपांची प्रतिकृती शैलगृहांमध्ये दगडात कोरण्यात आली. याआधी वर्णन केलेल्या

लाकूड आणि विटांच्या सहाय्याने बांधलेल्या स्थापत्यप्रकारांची या शैलस्थापत्यात नक्कल झाली असे त्यात आढळणा-या साधर्म्यावरून निश्चितपणे म्हणता येईल. या शैलस्थापत्याचे मुख्य प्रयोजन हा वास्तुप्रकार प्रदीर्घकाळ-अगदी शाश्वतकाळ- टिकावा हे होते. धार्मिक वस्त्यांकरिता अशा प्रकारे डोंगरात लेणी खोदण्याची पध्दत प्रथम मौर्यांनी सुरू केली. त्याचा सगळयात पूर्वीचा नमुना म्हणजे आधुनिक बिहार राज्यातील गयेजवळील बाराबर टेकडयांमधील लोमेश ऋषिची गुंफा आहे. चैत्यगृहे ही पूज्य वस्तूच्या उपासनेसाठी निर्माण झालेल्या बांधीव स्तूपमंदिराच्या प्रतिकृति आहेत, तर त्याच्या सभोवतालच्या भिक्षूंच्या वास्तव्यासाठी असणा-या छोटया कुटीरांची विहार हे प्रतिकृती आहेत. प्राचीन बौध्द ग्रंथांत विशद केल्याप्रमाणे बाकी वर्षभर फिरतीवर असणारे हे भिक्षू आणि भगवान बुध्द पावसाळयात वर्षावासासाठी तात्पुरती वस्ती उभारत. ही वस्ती नेहमीच गावाच्या किंवा शहराच्या सीमेच्या बाहेर असे. आणि म्हणूनच जेव्हा स्थायी स्वरूपाच्या वस्त्या बांधण्याची गरज भासली तेव्हाही जवळपासच्या, पण गावाच्या सीमेबाहेरील, टेकडयांमध्ये किंवा डोंगरांमध्ये गुंफा खोदण्यात आल्या. अशा प्रकारे शैलस्थापत्याची सुरूवात झाली. आज आपण ज्याला महाराष्ट्र म्हणतो त्या प्रदेशात मौर्य सम्राट अशोकाच्या काळात बौध्द भिक्षू हिरीरीने बौध्द धर्माचा प्रचार करू लागले, पण बौध्द परंपरेचा अभ्यास केल्यास याआधी गौतम बुध्दाच्या काळातच बौध्द धर्म महाराष्ट्रात येऊन दाखल झाला होता असे स्पष्ट होते.

मात्र आधीच उल्लेख केल्याप्रमाणे सम्राट अशोकाच्या काळातच पूर्व आणि पश्चिम महाराष्ट्रात बौध्द धर्माचा मोठया प्रमाणात प्रसार झाला. त्यामुळे मगधात ज्या काळात बौध्द स्थापत्याला सुरुवात झाली त्याच काळात महाराष्ट्रातही अशा प्रकारचा स्थापत्यप्रकार येण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. पवनीचा स्तूप अशोकाच्या काळात बांधला गेला हे जरी विद्वानांनी मान्य केलेले असले तरी पश्चिम महाराष्ट्रातील शैल स्थापत्याच्या काळाबद्दल मात्र विद्‌वानांमध्ये वेगवेगळे मतप्रवाह आहेत. गौतमीपुत्र सातकर्णी आणि क्षत्रप राजा नहपान खिस्तोत्तर पहिल्या शतकातील पहिल्या दोन दशकात होऊन गेले. याविषयी अनेक पुरावे मिळाल्यामुळे याच्या काळाबाबत विद्‌वानांची एकवाक्यता आहे. या आधारावरच नाशिक येथे खोदलेल्या लेण्यांची कालनिश्चिती करण्यात आली आहे. गौतमीपुत्र सातकर्णीच्या वंशजांबाबतही कमालीची सुसंगतता असल्यामुळे नाशिक, जुन्नर, कान्हेरी येथील काही लेण्यांची निर्विवाद कालनिश्चिती करणे शक्य झाले आहे. पण ज्या पुरावास्तू नंतरच्या काळातील आहेत त्यांच्या नेमक्या काळाबाबत

विद्वावानांमध्ये मतभेद आहेत. तरीही या पुरावास्तूंचा जो तौलनिक कालक्रम निश्चित करण्यात आला आहे तो थोडयाफार फरकाने सर्वमान्य झाला आहे. उदा. चैत्यगृहे भाजे, अजिंठा, कोंडाणे, पितळखोरे, नाशिक, बेडसा, कार्ले या क्रमाने खोदण्यात आली हे विद्वानांना मान्य आहे पण नेमकी कधी खोदली गेली याबाबत मात्र प्रचंड मतभिन्नता आहे. भाजे येथील चैत्यगृहाचा काळ ख्रिस्तपूर्व २५० ते ख्रिस्तपूर्व ११० असा निश्चित करण्यात आला आहे. जे विद्वान ते आधीच्या काळातील आहे असे प्रतिपादन करतात त्यांना बिहारमध्ये शैलस्थापत्याला सुरुवात झाल्यावर लगेचच हा स्थापत्यप्रकार महाराष्ट्रात आला असे वाटते, तर जे विद्वान त्याचा सांचीच्या स्तूपाच्या संदर्भात विचार करतात त्यांना हे चैत्यगृह ख्रिस्तपूर्व ११० पूर्वी खोदले गेले असणे अशक्य वाटते. सर्व तौलनिक कालक्रम, शैलगृहे ही तत्कालिन बांधीव स्थापत्याची प्रतिकृति आहेत या गृहीतकवजा निकषावर आधारलेला आहे.

या शैलस्थापत्याचा उगम आणि विकास यांचा काळ निश्चित करण्यामधील आणखी एक समस्या म्हणजे दख्खनमधील सातवाहन वंशाचा उदय आणि त्यातील राजांचा काळ होय. हीनयान प्रकारची जुनी, तौलनिकदृष्टया नंतरची आणि शेवटची लेणी ही सातवाहन काळाच्या उदयास्ताच्या काळाशी साधर्म्य दाखवितात असे दिसून येते. प्रदीर्घकालक्रमवादी विद्वान हीनयान लेणी ४०० वर्षांच्या काळात खोदली गेली असे मानतात. पूर्वहीनयान लेणी त्यांनी प्रस्तावित केलेल्या सातवाहन उदयकाळात (ख्रिस्तपूर्व २५० ते २००) खोदली गेली आणि कान्हेरी, कुडा आणि महाड या ठिकाणी आढळणारी उत्तरहीनयान लेणी सातवाहनअस्तकालात (इ.स. २०० ते २३०) खोदली गेली असे मानतात. याउलट लघुकालक्रमवादी विद्वान भाजा, नाशिक, अजिंठा ही पूर्व हीनयान लेणी ख्रिस्तपूर्व दुस-या शतकातील शेवटच्या चतुर्थकातील आहेत आणि उत्तरहीनयान लेणी इ.स. तिस-या शतकाच्या पहिल्या चतुर्थकातील आहेत असे मानतात. याबाबत बरीच मतभिन्नता असली तरी या दोन्ही मतप्रवाहातील विद्वानांमध्ये शेवटच्या सातवाहन राजाने अंदाजे इ.स. २३० पर्यंत राज्य केले असावे याबाबत एकवाक्यता आहे. सातवाहन राज्याचे पुनरूज्जीवन करणारा आणि नाशिक येथील क्रमांक ३ च्या लेण्यामधील शिलालेखात ज्याच्या मोहिमांची प्रशस्ती गायिली आहे असा गौतमीपुत्र सातकर्णी इ. स. पहिल्या शतकाच्या अखेरीस होऊन गेला याबाबतही आता मतभेद उरलेले नाहीत. नाशिक, जुन्नर, कान्हेरी, कार्ला, कुडा येथील काही नंतरच्या काळात खोदलेल्या लेण्यांमधील शिलालेखांत नंतरच्या सातवाहन राजांची किंवा त्यांचे मांडलिक असलेल्या

क्षत्रप राजांची नावे आढळतात. याउलट पूर्वीच्या लेण्यांमध्ये एक कण्ह सातकर्णीच्या शिलालेखाचा अपवाद वगळला तर अशा समकालीन क्षत्रप राजांची अथवा सातवाहनांचीही नावे आढळत नाहीत. यामुळेच महाराष्ट्रातील हीनयान लेण्यांचे गौतमीपुत्र सातकर्णीपूर्वीची लेणी आणि गौतमीपुत्र सातकर्णीनंतरची लेणी अशा दोन प्रकारात वर्गीकरण करता येते. गौतमीपुत्र सातकर्णीचा काळ इ. स. १०० ते इ. स. १२० असा मानला जातो. गौतमीपुत्र सातकर्णीपूर्व लेण्यांमध्ये राजांची किंवा मांडलिकांची नावे न येता समाजाच्या विविध स्तरांतील बौध्द दात्यांची नावे येत असली तरी सातकर्णीपूर्व लेण्यांचा कालक्रम सातवाहन राजवंशाच्या उदयाच्या संदर्भातच ठरविला जातो. काही विद्वानांच्या मतानुसार सातवाहन वंशाचा उगम ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकाच्या शेवटच्या चतुर्थकातीलच मानला आणि महाराष्ट्रातील बौध्द धर्माचा प्रसार खुद्द सम्राट अशोकाच्याच काळात झाला होता ही वस्तुस्थिती लक्षात घेतली तर सातवाहनपूर्व काळात लयननिर्मितीचा उद्योग नसण्याचे कोणतेही कारण संभवत नाही. यामुळेच जरी लघुकालक्रमाचा स्वीकार केल्यामुळे सातवाहनांचा काळ नंतरचा मानावा लागला तरी निदान तात्त्विकदृष्टया तरी सातवाहनपूर्व लेणी निर्माण झाली असली पाहिजेत. त्यामुळे यापुढील भागात गौतमीपुत्रपूर्व आणि गौतमीपुत्रोत्तर चैत्यगृहे आणि विहारांचे वर्णन त्यांच्या नेमक्या काळाच्या तपशिलाच्या चिकित्सेत फारसे न शिरता त्यांच्या तौलनिक कालक्रमानुसार करणे क्रमप्राप्त ठरते.

सुप्रसिध्द विदुषी श्रीमती विद्या दहेजिया यांनी (सन १९७०-१९८० या काळात) या सर्व लेण्यांचा काळजीपूर्वक अभ्यास करून कलेतिहासिक पुरावा (स्थापत्यशास्त्र, शिल्पे आणि चित्रे) आणि पुरभिलेखांचा पुरावा यामधील परस्पर संबंध शोधण्याचा प्रयत्न केला आहे.

**भाजे** (ता. वडगाव जि. पुणे) : सर्वसाधारणपणे भाजे येथील चैत्यगृह खडकात खोदलेले महाराष्ट्रातील सर्वात प्राचीन चैत्यगृह मानले जाते[१]. या चैत्यगृहाचे लाकडी स्थापत्याशी असलेले ब-यापैकी साधर्म्य, आतील बाजूस कललेले स्तंभ आणि शिल्पांची शैली या वैशिष्टयांमुळे दिसून येते. या चैत्यगृहाच्या गजपृष्ठाकार छपराच्या कमानी तर लाकडीच आहेत. त्यातील दोन कमानींवर प्राचीन ब्राह्मी लिपीतील लेख आहेत. यावरून हया कमानी मूळच्याच आहेत हे सिध्द होते. चैत्य कमानीच्या मुखाचा दर्शनी भाग आणि चैत्यगृहात जाण्याकरता असलेल्या द्वारांनी युक्त असलेली दर्शनी बाजू काष्ठशिल्पांनी अलंकृत केलेली होती. चैत्यगृहाच्या दर्शनी कमानीवर दिसून येणारे खिळे या कमानीवर लाकडी शिल्पालंकरण असल्याची साक्ष देतात. दुसरे महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे बरोबर गुंफेमधील कमानीपेक्षा या कमानीचा वक्र भाग (curve) अधिक सुबक आहे.

चैत्यगृह ७.९२ मीटर रुंद, ७.६२ मीटर खोल आणि ८.८३ मीटर उंच असून त्याचा आकार अजिंठा येथील नंतरच्या काळातील चैत्यगृहांच्या तुलनेत आटोपशीर आहे. चैत्यगृहाच्या कडेच्या मार्गिका १.०६ मीटर रुंद आहेत. स्तंभ साधे आणि अष्टकोनी आहेत. चापाकार टोकाजवळ उंच अंडाकृती स्तूप असून त्यावर लाकडी चौकोनी हर्मिका आहे. स्मृतिकरंडक स्तूपाच्या वरच्या बाजूत ठेवण्यात आला होता.

**कोंढाणे** : (ता. कर्जत, जि. रायगड) : रायगड जिल्हयातील कर्जत तालुक्यात कर्जत रेल्वे स्थानकापासून ६ कि. मी. अंतरावर कोंढाणे नामक एक महत्त्वाचा लयनसमूह आहे.

हा लयनसमूह लयनस्थापत्याच्या दृष्टीने भाज्याच्या पुढचा टप्पा असल्यामुळे महत्त्वाचा आहे. येथील चैत्यगृहाची कमान अधिक नेमकी आणि भक्कम आहे. परंतु चैत्यमुखावर भाजे येथील लेण्याच्या चैत्यमुखावर दिसतात तशी खिळयांकरिता छिद्रे काढलेली आढळून येत नाहीत. पुराभिलेखशास्त्रदृष्ट्या देखील येथील शिलालेख भाज्याच्या नंतरच्या काळातील आहेत. हे चैत्यगृह ८.०७ मीटर रुंद, २०.११ मीटर खोल आणि ८.५३ मीटर उंच आहे. शिल्पदृष्ट्याही हे चैत्यगृह महत्त्वाचे आहे. कारण चैत्यमुखावर यक्षमूर्ती कोरलेली आहे ( आजमितीस या मूर्तीचे फक्त डोकेच शिल्लक आहे). जवळच कोरलेल्या शिलालेखात[२] हे चैत्यगृह खोदणाऱ्या कलाकाराचे नाव व माहिती दिलेली आहे. त्याहीपेक्षा महत्वाचे वैशिष्टय म्हणजे चैत्यमुखावर नर्तिकामूर्ती[३] कोरलेल्या आहेत. ही सर्व आणि मुख्यत्त्वेकरून स्थापत्य आणि शिल्पविषयक वैशिष्टये कोंढाणे हे सोपा-याहून बोरघाटातून पुण्याला जाणा-या व्यापारी मार्गावरील एक महत्त्वाचे बौध्द केंद्र असल्याचे सूचित करतात.

**पितळखोरे** (ता. चाळीसगाव, जि. जळगाव) : पितळखोरे येथील लयनसमूह (लेणी क्र. ३, १०, ११, १२ आणि १३ ) हा हीनयान लयनसमूहांपैकी एक मोठा लयनसमूह आहे. लेणे क्र. १०, ११, १२, आणि १३ लेणे क्र. ३ च्या (चैत्यगृहाच्या) समोर एकमेकांशेजारी आहेत. लेणे क्र. ३ मधील चैत्यगृह १०.३६ मीटर रुंद, अदमासे १५.२४ मीटर खोल आणि ९.४४ मीटर उंच आहे. सध्या हे लेणे अत्यंत वाईट स्थितीत आहे. मुळातील स्तंभ काढून त्याजागी दुसरे आलेले स्तंभ, गळणारे पाणी एकत्र घेऊन बाहेर जाईल अशा

प्रकारची सांडपाण्याचा निचरा करणारी त्याच काळात करण्यात आलेली व्यवस्था लक्षात घेता, हे लेणे खोदल्यानंतर काही काळातच त्याची दुरावस्था होण्यास सुरुवात झाली असावी असे दिसते. तथापि कललेले अष्टकोनी स्तंभ, त्यावरील प्राचीन ब्राहमी लिपीतील शिलालेख, कमळातील लक्ष्मी आणि शिल्पे यावरून या लेण्याचा काळ भाज्यानंतरचा, पण लगेचाच असावा असे अनुमान निघते.[४]

**अजिंठा लेणे क्र. १०** (ता. सोयगाव जि. औरंगाबाद) : हे या प्रकारचे सर्वात मोठे चैत्यगृह असून १२.१९ मीटर रुंद ३०.४८ मीटर खोल (किंवा लांब) आणि १०.०५ मीटर उंच आहे. याचे चैत्यमुख पूर्णतः सुस्थितीत नसले तरी त्यावरील प्राचीन ब्राम्ही लिपीतील शिलालेख टिकून आहेत. पुराभिलेखीय पुराव्याबरोबरच संपूर्ण अजिंठा लेणी समूहातील या लेण्याची जागा. खाली वाहणा-या ओढयापासून (वाघुरा नदी) लेण्याची असलेली उंची या बाबीही हे लेणे या ठिकाणचे सगळयात आधीचे लेणे असल्याची ग्वाही देतात. काही स्थापत्यशास्त्रीय बाबी, उदा. स्तूपावरील पाय-यासदृश छत्री असलेली दगडी हर्मिका, लाकडाऐवजी दगडी कमानी आणि बाजूचे पाख या लयनकाराचे लेणीनिर्माणतंत्र भाज्याच्या लयननिर्माणतंत्रापेक्षा प्रगत असल्याचा निर्वाळा देतात.

**लेणे क्र ९**[५] : अजिंठा येथील लेणे क्र. ९ निश्चितच नंतरच्या काळातील आहे. आधीच्या काळातील गुंफांचे मुख लाकडी आवरणांनी किंवा लाकूडकामाची जोड देऊन झाकलेले असे. पण या लेण्याचे मुख मात्र पूर्णपणे दगडातच घडविलेले आहे आणि अशा प्रकारे हे लेणे लाकडी मंदिराची नक्कल या स्वरूपाचे न राहता पूर्णपणे स्वतंत्र दगडी खोदीव स्थापत्यशैलीचा प्रकार म्हणून साकार झाले आहे. या लेण्यातील स्तंभ अष्टकोनी आणि साधे असले तरी ते कललेले नाहीत. मुखाचे अलंकरण करणा-या कमानी आणि मुख्य कमानही आधीच्या साध्या कमानीपेक्षा अधिक अंतर्वलित झालेल्या आहेत.

**लेणे क्र. ९ व १० :** या दोन्ही लेण्यांमध्ये चित्रे आहेत. ही लेणी आणि येथील महायान काळातील लेणी चित्रांकरिता प्रसिध्द आहेत. कदाचित् याच दोन लेण्यांनी (लेणे क्र. ९ व १० ) कॅप्टन गिलचे लक्ष वेधून घेतले असावे. मात्र लेण्यांमधील चित्रे खूपच खराब झालेली आहेत. पण ही भारतीय चित्रकलेच्या, विशेषतः दख्खनमधील चित्रकलेच्या विकासाचा मागोवा घेण्याच्या दृष्टिकोनातून अत्यंत महत्त्वाचे पुरावे आहेत.

**औरंगाबाद लेणे क्र. ४** (ता. जि. औरंगाबाद) : हे लेणे चैत्यगृह असून ते ६.९ मीटर रुंद, ६.५ मीटर खोल आणि ६.२० मीटर उंच आहे. या लेण्याचे

उल्लेखनीय असाधारण वैशिष्टय म्हणजे त्याचे चौकोनी विधान आणि त्याच्या पाखांवर असलेले सपाट छत होत.

हे लेणे आणि त्याचप्रमाणे कोंढाणे, अजिंठा (लेणे क्र. ९), नाशिक (लेणे क्र. १८), जुन्नर मानमोडी (लेणे क्र. ४०), जुन्नर गणेश पहाड (लेणे क्र. ३४) ही लेणी स्थित्यंतराच्या टप्प्यातील आहे. आधीच्या लेण्यांमध्ये जे घटक लाकडी होते ते या टप्प्यात पूर्णतः दगडातच घडविलेले दिसून येतात. या लेण्याचे विधान चौकोनी आहे. दुहेरी खांबांच्या ओळीने तयार झालेल्या भागाचा आकार मात्र इंग्रजी यू अक्षराच्या आकारासारखा असून गजपृष्ठाकार छपराच्या कमानी दगडातच घडविलेल्या आहेत. स्तंभांवरील आडव्या अर्धस्तंभांवर असलेल्या भागावर चैत्यगवाक्षांसारखी नक्षी आहे. त्यामुळे लेणे द्वारयुक्त खोल्या असलेल्या चापाकार वास्तूच्या आतील भागासारखे भासते. हे नक्षीकाम पाहून अशाच प्रकारची रचना असलेला बेडसा येथील विहार नजरेसमोर येतो. या लेण्यातील स्तूप सध्या मोडकळीस आलेला असला तरी त्याच्यावरची पाय-या पाय-यांसारखी निमुळती, छत्रीला आधार देणारी दगडी हर्मिका अजूनही शिल्लक आहे.

**नाशिक लेणे क्र. १८** (ता. जि. नाशिक) : अजिंठा येथील नंतरच्या काळातील चैत्यगृहाप्रमाणेच नाशिक येथील पूर्वीच्या चैत्यगृहाचे (लेणे क्र. १८) मुखही कोणत्याही लाकडी आवरणांशिवाय असून, त्याचे सर्व घटक दगडातच घडविलेले आहेत. या लेण्यात असलेल्या शिलालेखांपैकी एका शिलालेखाच्या लिपीवरून त्याची प्राचीनता सिध्द होते. मात्र बाकीचे शिलालेख नंतरच्या काळातील आहेत. हे लेणे सध्याच्या मुंबई-नाशिक रस्त्याच्या खूपच जवळ आहे. हा लेण्याजवळून जाणारा रस्ता अगदी दोन हजार वर्षापूर्वीपासून अस्तित्वात असावा असा अंदाज आहे. या रस्त्यावरून आणि या लेण्यालगतच असलेल्या दक्खनमधील सर्वात प्राचीन विहारावरूनही या लेण्याचे प्राचीनत्व सिध्द होते.

**नाशिक येथील लेणे क्र. १९** : हे लेणे कण्ह सातवाहनाच्या काळात खोदलेला सुप्रसिध्द विहार आहे. औरंगाबाद येथील चैत्यगृहाच्या प्रवेशद्वाराचे स्वरूप मध्यभागी दरवाजा, त्याच्या दोन्ही बाजूस गवाक्षे आणि या सगळयांच्या वर एकूण पाच चैत्य-कमानी असे आहे. पण नाशिक येथील या लेण्याच्या प्रवेशद्वाराचे स्वरूप मात्र यापेक्षा निराळे आहे. या लेण्यात प्रवेशासाठी मुखाच्या दोन्ही टोकांजवळ लेण्यात जाण्यासाठी जिने आहेत. प्रवेश द्वाराच्या उजव्या हाताला पद्मधारी द्वारपाल असून त्याच्या मागे असलेल्या भिंतीतूनच मुख्य कमान निघालेली आहे. ही कमान आभासी (False) असून तिच्या मधल्या

भागावर फुलांची नक्षी कोरलेली आहे. द्वाराच्या तुळईवर पशुचित्रांनी युक्त असे तोरण कोरलेले आहे. कमानीच्या बाहय भागावर चैत्यगवाक्षे आणि जाल-वातायने कोरलेली आहेत. त्यामुळे या लेण्याला अनेक मजले असावेत असे वाटते. अजिंठा, जुन्नर यासारख्या अन्य ठिकाणच्या लेण्यांच्या मुख आणि मुख्य कमानीपेक्षा नाशिक येथील या लेण्याचे मुख आणि त्यावरील मुख्य कमान अधिक आल्हादकारक वाटते. कमानीच्या तळाजवळ असलेल्या कठडयासारख्या भागावर एकावर एक असे मजले दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. हा कठडयासारखा भाग घंटाशीर्ष आणि पशुशीर्ष असलेल्या अष्टकोनी स्तंभांवर दाखविण्यात आला आहे. पुष्पनक्षी कोरलेल्या भागावरील अशा दोन स्तंभामधील भागात स्तूप कोरलेले आहेत तर द्वारावरील किंवा कमानीखाली असलेल्या तुळईवर चैत्यगवाक्षे कोरली आहेत. घंटा आणि पशुशीर्षांनी युक्त असलेले हे अष्टकोनी स्तंभ सांची येथील स्तूपाच्या तोरणांवरील स्तंभांसारखे आहेत, आणि असे स्तंभ नंतरच्या काळातील बेडसे आणि कार्ले येथेही आढळतात ही बाब महत्त्वपूर्ण आहे. मुखावरील अशा त-हेच्या संतुलित कोरीवकामामुळे आणि त्यातील शिल्पांमुळे हे लेणे सुरुवातीच्या लेण्यांमधील एक देखणे आणि आल्हाददायक लेणे आहे असे म्हणता येईल.

चैत्यगृह ६.५० मीटर रुंद व १२ मीटर लांब आकाराचे आहे. आतील स्तूप मात्र काहीसा नंतरच्या काळातील स्तूपासारखा आहे. उंच वृत्तचितीसारखा मधला भाग वरच्या भागावर पाय-यांसारखे छत्र असलेली दगडी हर्मिका असे या स्तूपाचे स्वरूप आहे. चौरस स्तंभशीर्षे असलेले चापाकृती चैत्यगृह असा या लेण्याचा मूळ आराखडा असावा. परंतु लेण्यात काही ठिकाणी नंतरच्या काळातील काही वैशिष्टये दिसून येतात. यावरून सध्याच्या स्थितीत असलेले लेणे नंतरच्या काळात पूर्ण झाले असावे असा निष्कर्ष निघतो. चैत्यगृहाच्या स्तूपासमोरील खांबांच्या दोन रांगांच्या मधील भागात म्हणजेच आयतमध्यात कुंभाकार तळ असलेले खांब आढळतात. तुलापट्टात रांगेने बारीक चौकोनी खाचा आढळतात. याचा अर्थ तुलापट्टात काही लाकडी भाग जोडले जात असावेत.

**तुळजा लेणे क्र.** ३ (जुन्नर, ता. जुन्नर, जि. पुणे) : तुळजा येथे हीनयान लेण्यांचा एक समूह आहे. या समूहात एकूण ३२४ लेणी असून, त्यातील लेणे क्र. ३ या समूहातील सर्वात प्राचीन लेणे आहे. हे लेणे तुळजा गावापासून अर्ध्या किलोमीटर अंतरावर आहे. चैत्यगृहाचे विधान वर्तुळाकार असून त्रिज्या ८.२३ मीटर आहे. उंची ७.६२ मीटर आहे. मध्यभागी असलेल्या साध्या

स्तूपाभोवती १२ अष्टकोनी स्तंभ आहेत. हे स्तंभ तळाजवळ जाड असून किंचितसे आतल्या बाजूला कललेले आहेत. या स्तंभांच्या रांगेबाहेर प्रदक्षिणापथ आहे. घुमटाकार छताला रिपा आहेत. बाजूच्या भिंती आणि छतावर मातीचा गिलावा आहे. या गिलाव्यावर चित्रे रंगवलेली असावीत. आज ही रंगचित्रे फारशी शिल्लक उरलेली नसली तरी इथं रंगचित्रे होती असे ओळखता येण्याइतपत पुरावा उपलब्ध आहे. एका उभ्या स्त्रीचे चित्र आणि अस्पष्टपणे दिसून येणारी पुष्पनक्षी अजिंठा येथील लेणे क्र. १० मधील चित्रांच्या समकालीन असावी असे दिसून येते. ह्या चैत्यगृहाचे मुख आज अस्तित्वात नसल्यामुळे त्याचे संपूर्ण विधान ओळखणे कठीण आहे. तरीही या चैत्यगृहाची भाजे (लेणी क्र. २६) व कोंदिवटे येथील चैत्यगृहांशी तुलना करता येते. या लेण्याच्या एकंदरित स्वरूपावरून या चैत्यगृहाच्या स्तूपासमोर इतर चैत्यगृहात आढळतो तसा आयताकार सभामंडप नसावा असे दिसते. त्याच्या वास्तुशास्त्रीय वैशिष्टयांवरून हे चैत्यगृह दख्खनमधील प्रारंभीच्या लेण्यांपैकी असावे आणि ते भाजे येथील चैत्यगृहाच्या काळातच खोदले गेले असावे असे म्हणता येईल.

**कोंदिवटे गुंफा क्र. ९** (मरोळा, जि. मुंबई उपनगर) : मुंबई शहरातील अंधेरी रेल्वेस्थानकाजवळ कोंदिवटे लेणी आहेत. ही लेणी "महाकाली गुंफा" या नावानेही प्रसिध्द आहेत. या लेणींपैकी लेणे क्र. ९ चैत्यगृह आहे. या लेण्याचे विधान काही प्रमाणात प्राचीन राजगृह शहराजवळील बराबर टेकडयांमधील सुदामा लेण्यासारखे आहे. आज या लेण्याचे मुख पूर्णतः पडून गेले असले तरीही या चैत्यगृहातील गर्भगृहाचा दरवाजा आणि सभामंडप सरळ रेषेत असावा असा अंदाज आहे. हा एक फरक सोडला तर हे लेणे सुदामा लेण्यासारखे आहे. या चैत्यगृहाला ४.४० मीटर त्रिज्येचे वर्तुळाकार गर्भगृह असून मध्यभागी स्तूप आहे. या गर्भगृहाचे छत घुमटाकार आहे. उंची ४.५० मीटर आहे. गर्भगृहात प्रवेश करण्यासाठी सभामंडपातून आयताकार दरवाजा आहे. या दरवाज्याच्या दोन्ही बाजूला (Lattice windows) जलवातायने आहेत. सभामंडप अदमासे ५.३० मीटर रुंद, ७.६० मीटर खोल आणि २.७० मीटर उंच आहे. सभामंडपाच्या भिंती अगदी साध्या आणि सपाट आहेत. भिंतीत किंवा खुद्द सभामंडपात एकही स्तंभ नाही. मात्र सभामंडपाच्या पुढच्या भागात, म्हणजे प्रवेशभागात पूर्वी चार स्तंभ असावेत. पण आज केवळ त्यांचे अत्यल्प अवशेषच शिल्लक आहेत. या चार स्तंभांनीच सभामंडप आणि त्यापुढील मोकळी जागा यातील सीमारेषा स्पष्ट केली आहे. या चैत्यगृहाचे विधान, स्तूपाचे आणि सभामंडपाचे साधे स्वरूप या वैशिष्टयांवरून हे चैत्यगृह भाजे आणि अजिंठा

येथील चैत्यगृहांप्रमाणेच पश्चिम भारतातील प्रारंभीच्या चैत्यगृहांपैकी एक आहे असे अनुमान निघते. गर्भगृहात जाण्यासाठी असलेल्या आयताकार दरवाज्याच्या डाव्या बाजूच्या गवाक्षावर (Lattice windows) एक शिलालेख आहे. पण हा शिलालेख नंतर कधीतरी कोरला असावा असे विद्वानांचे मत आहे.

**मानमोडी-भूतलेणे (जुन्नर) लेणे क्र. ४०** : मानमोडी लयनसमूहात एकूण तीन चैत्यगृहे आहेत. त्यातील भूतलेणे या नावाने प्रसिध्द असलेले चैत्यगृह ( लेणे क्र. ४० ) लयननिर्मितीच्या प्रारंभीच्या टप्प्यातील एक उल्लेखनीय चैत्यगृह आहे. या लेण्याचे मुख ११ मीटर उंच असून त्याची काही प्रमाणात मोडतोड झालेली असली तरी, जर हे लेणे पूर्णावस्थेत असते तर ते पश्चिम भारतातील अत्यंत उल्लेखनीय आणि सुंदर मुख असलेले चैत्यगृह ठरले असते. मुखाचे दोन भाग पडतात. एका भागात प्रवेशद्वार, चैत्यकमान, या चैत्यकमानीच्या वरच्या कोप-यात दोन स्तूप आहेत तर दुस-या भागात एकावर एक चैत्य गवाक्षे दाखवून अनेक मजली वास्तूचा भास निर्माण केलेला आहे. चैत्यगृह ३.७. मीटर रुंद आणि ९.१० मीटर खोल आहे. मध्यायत आणि स्तूपाभोवती असणारे खांब ढोबळ आकारातच राहिलेले आहेत, म्हणजेच ते काहीशा अपूर्णावस्थेत आहेत. तथापि या ढोबळ आकारावरून मूळ योजनेत हे खांब अष्टकोनी होते हे सहज लक्षात येते. लयनकारांचा पाख खोदण्याचा विचार असावा. परंतु या कामाला सुरुवात होण्यापूर्वीच या लेण्याचे काम थांबले असे दिसते. यामुळे हे खांब किंवा स्तंभ पूर्णतः स्वतंत्र स्थितीत न राहता मागच्या भिंतीशी संलग्न आहेत. या लेण्याचे सर्वात महत्त्वाचे वास्तुशास्त्रीय वैशिष्टय म्हणजे त्याचे मुख विशेषतः द्वारावरील अर्धकमलाकार बंद कमान व त्यावर कोरलेले अर्धकमळ असून त्याच्या पाकळयांमध्ये उपासकांच्या सहा मूर्ती कोरलेल्या आहेत. मध्यभागी असलेल्या पाकळीत लक्ष्मी कोरलेली असून अन्य पाकळयात कोरलेले उपासक तिची पूजा करीत आहेत. कमानीच्या बाहेरील दोन भागात नागराज आणि गरूड कोरलेले आहेत. ते एकमेकांना सन्मुख असून अनुक्रमे आलीढासनात आणि प्रत्यालीढासनात आहेत. त्यांनी आपले उजवे हात आतील गर्भगृहाच्या दिशेने अत्यंत आदराने उंचावले आहेत. लेण्याचा मुखाचा खालचा भाग पडझड झालेल्या स्थितीत असल्यामुळे त्याच्या त्या भागातील वास्तुशास्त्रीय वैशिष्टयांचा अंदाज येत नाही. पण आधीच्या काळातील चैत्यगृहांमध्ये आढळतात तशा लाकडी कमानींचा अभाव व त्याऐवजी कोरण्यात आलेली बंद कमान आणि नंतरच्या काळातील कार्ले येथील लेण्याशी तुलना करता येईल अशी कलाशिल्पे व मूर्तिशिल्पे यावरून हे लेणे स्थित्यंतराच्या टप्प्यातील असावे असे वाटते.

**लेण्याद्री (जुन्नर) चैत्यगृह** : हे चैत्यगृह लेण्याद्री लयनसमूहाच्या पूर्व भागात असून त्याचे नाशिक (लेणे क्र. ९) या चैत्यगृहाशी साम्य आहे. ही तीन चैत्यगृहे, ज्यांना निश्चितपणे लाकडी भाग जोडलेले होते आणि ज्यांच्या मुखावरही कोरीव लाकूडकाम जोडलेले होते, अशा भाजे (लेणे क्र. १२,) कोंढाणे आणि अजिंठा (लेणे क्र. ९) या चैत्यगृहांपेक्षा निश्चितच नंतरच्या काळातील आहेत. त्यांच्या दर्शनी भागाचे सर्व घटक दगडातच कोरलेले आहेत. लेण्याद्री येथील चैत्यगृहाचा दर्शनी भाग ६.१० मीटर रुंद आणि ७.६२ मीटर उंच आहे. त्याच्या खालचा भागात मुख्य प्रवेशद्वार असून त्यावर मुख्य कमानीखाली एक बंद कमान आहे. या बंद कमानीमध्येच दोन उपकमानी असून त्यांच्याखाली अजिंठा येथील लेणे क्र. ९ प्रमाणे खिडक्या करण्याची लयनकारांची योजना असावी. मुखाच्या वरच्या भागात मोठया आकाराचे चैत्य - गवाक्ष असून या चैत्यगवाक्षाच्या दोन खालच्या कोप-यांमध्ये स्तूप असलेली दोन छोटी गवाक्षे कोरलेली आहेत. कमानीचा दर्शनी भाग आणि मागील भिंतीचा पृष्ठभाग अनेक पाकळया असलेल्या फुलांच्या नक्षीने अलंकृत करण्यात आला आहे. गवाक्षाच्या मध्यभागातील बाजूच्या भिंतीत, एकावर एक अशा कठडायुक्त कमानी कोरलेल्या असून गवाक्षात स्तूप दाखविला आहे. पण गजपृष्ठाकार छत असलेले हे चैत्त्यगृह अपूर्णावस्थेतच सोडून दिले आहे. चैत्यगृह २.५१ मीटर रुंद, ६.८० मीटर खोल आणि ५.५३ मीटर उंच आहे. हे लेणे अपूर्ण आहे. पाख स्पष्ट होतील अशा खोदखुणा या चैत्यगृहामध्ये नाहीत पण तुलावह (Architrave) मात्र व्यवस्थित कोरलेला आहे. जर हे लेणे पूर्ण झाले असते तर या तुलापट्टाखाली स्तंभ आले असते.

**बेडसा लेणे क्र.** ७ (ता. वडगाव, जि. पुणे): चैत्यगृहस्थापत्यातील नंतरचा एक महत्वाचा टप्पा विशद करणारे महत्त्वाचे स्थळ म्हणजे बेडसा होय. याठिकाणी तीन चैत्यगृहे आहेत. त्यापैकी लेणे क्र. ७ हे चैत्यगृह आकाराने सगळयात मोठे असून चैत्यगृहस्थापत्य विकासात अत्यंत उल्लेखनीय आहे.

आतापर्यंत वर्णन केलेल्या चैत्यगृहांपेक्षा हे चैत्यगृह काहीसे वेगळे आहे. हे वेगळेपण म्हणजे त्याचा अलंकृत असा दर्शनी भाग होय. हा भाग मधले दोन स्तंभ आणि दोन बाजूंचे दोन अर्धस्तंभ यांनी बनला आहे. या दोन्ही अर्धस्तंभांचा पाया कुंभाकार असून मधला भाग अष्टकोनी आहे. या अर्धस्तंभावर तथाकथित घंटाशीर्षे आहेत व त्यावर कोरलेले स्वार हे प्राण्यांवर बसलेले आहेत. दर्शनी भागामागे ९.१९ मीटर रुंद आणि ३.७० मीटर खोल व्हरांडा

आहे. या व्हरांडयाच्या दोन्ही बाजूंना दोन छोटया खोल्या आहेत. या व्हरांडया
किंवा मंडपातून आत गेल्यावर सभामंडप लागतो. सभागृहाची रुंदी मंडपापे
कमी आहे. सभागृहात जाण्याकरिता मध्यभागी असलेल्या मुख्यद्वाराव्यतिरि
त्याच्या उजव्या बाजूला छोटया दरवाज्याच्या आकाराचे जालवातायन अ
सभामंडप ६.२५ मीटर रुंद, १३.५४ मीटर खोल आणि ६.२५ मीटर उ
आहे.

सभामंडपाच्या प्रवेशद्वाराचा दर्शनी भाग अगदी साधा आहे. खालच्या भाग
कठडा कोरलेला आहे. दरवाजाची चौकट लाकडी चौकटीचीच नक्क
असल्यासारखी असून तिच्या दोन्ही बाजू आतमध्ये कललेल्या आहेत. दरवाजाव
कमान कोरली असून कमानीत जालवातायन आहे. सभामंडपाच्या दर्शनी भागाच
मुख्य कमानीवरही जालवातायन असून त्यापुढे कठडा कोरलेला आहे. आती
मध्यायताच्या दोन्ही बाजूला साधे अष्टकोनी स्तंभ असून या स्तंभांवर तुलाप
आहे. तुलापट्टावर गजपृष्ठाकार छत असून त्यावर एकेकाळी लाकडी रि
मारलेल्या होत्या.

मुख्य पूजावस्तू असलेला स्तूप आधीच्या काळातील स्तूपापेक्षा निराळा असू
तो वृत्तचितीवर आहे. त्यास तीन निराळया पातळयांवर तीन कठडे कोरल
असून त्याद्वारे तीन प्रदक्षिणापथ सूचित केले आहेत. हे कठडे आणि स्तूपावरील
हर्मिका दगडातच कोरली आहे. हर्मिकेवर लाकडी यष्टी आणि छत्र आहे.

एरवी अत्यंत साध्या पण सुबक असलेल्या या सभागृहातील उल्लेखनीय
बाब म्हणजे स्तंभशीर्षांवर असलेले स्वार. शिल्पांना लज्जत आणणाऱ्या मंडपातील
भिंतीही अशाच मोहक आहेत.

**कार्ले** (ता. वडगाव, जि. पुणे) : कार्ले येथील चैत्यगृह संपूर्ण पश्चिम
भारतातील लयनस्थापत्यातील सर्वोत्कृष्ट चैत्यगृह आहे. हे लेणे वापरात असताना
त्याच्या आसपास आणखी सोळा लेणी खोदली गेली. ही लेणी महायानकाळातही
वापरात होती असे दिसते. म्हणूनच हे ठिकाण महत्त्वाचे बौध्द केंद्र होते असे
मानण्यास जागा आहे.

सर्वोत्कृष्ट चैत्यगृह असलेले लेणे क्र. ८ हे १३.८० मीटर रुंद, ३७.८७
मीटर खोल आणि १४.०२ मीटर उंच आहे. या लयननिर्मितीचा भूतपाल
नामक एक आश्रयदाता हे लेणे सा-या जंबुद्वीपात सर्वोत्कृष्ट असल्याचा दावा
करतो. (जम्बुदीवम्मि उत्तमम्), पण या त्याच्या गर्वोक्तीमागे या लेण्याची

करणे आवश्यक आहे. बेडसे येथील लेण्याप्रमाणे दर्शनी भागाच्या दोन बाजूंना द्वारे असण्याऐवजी भिंतींच्या पृष्ठभागावर या प्रासादाचा आधार वाटणारे भव्य हत्ती कोरले आहेत. कुंभाकार तळखडा, अष्टकोनी खांब आणि त्यावर पशुशीर्षे असा घटकक्रम असलेले जे स्तंभ बेडसे येथील चैत्यगृहाच्या सभामंडपाच्या दर्शनी भागावर येतात तशा प्रकारचे स्तंभ या चैत्यगृहाच्या अंतर्भागात मध्यायताच्या दुतर्फा आढळतात. त्याचप्रमाणे प्रवेशद्वाराची म्हणजेच मुख भागाची भिंत साधी सपाट असण्याऐवजी त्यावर मिथुन शिल्पे आहेत. अत्यंत सुंदर मिथुनशिल्पे, हत्ती, मुखभागावर दाखविलेले प्रासादाचे मजले आणि त्याच्या बाजूच्या भिंती आणि जणू आत जायला निघाली आहेत अशी वाटणारी गंधर्वदांपत्ये या बाबींमुळे मुखमंडपाचा दर्शकावर आल्हादकारक परिणाम होतो. सभामंडपातील तुलापट्टावर पशूवर स्वार झालेल्या मनुष्याकृती दाखविल्या आहेत. हया लेण्याची फारशी झीज झालेली नाही. त्यामुळेही एकंदरित सौंदर्य ब-यापैकी टिकून राहिले आहे. अगदी स्तूपावरची लाकडी हर्मिकाही चांगल्या स्थितीत टिकून आहे.

सध्या लेण्याच्या बाहेर साधे अलंकरणरहित एकवीरा देवीचे मंदिर आहे. हे बहुधा उत्तर मध्ययुगात बांधले गेले असावे. चैत्यगृहासमोर सारनाथ येथील अशोकस्तंभाच्या धर्तीचा सिंहशीर्ष असलेला स्तंभ आहे. लेण्याच्या सुरुवातीस दोन बाजूंना शीर्ष असलेले अष्ठकोनी स्तंभ असून त्यावर सपाट पृष्ठभाग पेलण्यात आला आहे. या शीर्षयुक्त स्तंभांपैकी (ध्वजांपैकी) एक ध्वज सिंहध्वज आहे. हा सिंहध्वज सारनाथ येथील अशोकस्तंभाच्या धर्तीचा आहे. दुसरा ध्वज कोणता होता हे आज कळणे कठीण आहे. बहुधा दुसरा ध्वज चक्रध्वज असावा. पण कान्हेरी येथील चैत्यगृहाचे बरेच घटक कार्ले येथील चैत्यगृहांशी मिळतेजुळते आहेत आणि कान्हेरी येथील चैत्यगृहाला दुस-या बाजूला चक्रध्वज आहे यावरून कार्ले येथील दुसरा ध्वज वाङ्मयातील सर्वसाधारण चैत्यगृहाच्या वर्णनाप्रमाणे एकतर चक्रध्वज असावा किंवा कान्हेरीप्रमाणे सिंहध्वजच असावा असे अनुमान काढता येईल. ध्वजांलगतची भिंत अगदी सिंहाच्या पातळीपर्यंत उंच आहे. मुखभागावरील सपाट पृष्ठभागावर आणि त्याचप्रमाणे अष्टकोनी स्तंभांच्या वरच्या भागावर वेगवेगळया आकाराच्या खाचांच्या उत्सेधात्मक आणि भूमिसमांतर रांगा आहे. यावरून सभामंडपाचा सुंदर मुखभाग झाकणा-या या एरवी शुष्क किंवा नीरस वाटणा-या मुख्य मुखाच्या या भागावर लाकडी पृष्ठभाग बसवला जात असावा हे स्पष्ट होते.

**कान्हेरी** ( जोगेश्वरी, जि. मुंबई उपनगर) : चैत्यगृह असे स्वरूप असलेले कान्हेरी येथील लेणे क्र. ३ हीनयान शैलगृहस्थापत्याची सांगता दाखविते. हे

चैत्यगृह वेडसे येथे सुरू झालेल्या चैत्यगृहस्थापत्याचा तर्कशुध्द विकास
तरी ते या विकासाच्या परिपूर्णतेचा उत्कृष्ट नमुना मात्र नाही. उत्कृष्ट
म्हणून कार्ले येथील चैत्यगृहाचाच निर्देश करावा लागेल.

चैत्यगृहाला मुखमंडप असून त्याचा मुखभाग सपाट स्तंभरांगेने बनला
मुखमंडपाच्या मागे १३.६६ मीटर रुंद आणि २६.३६ मीटर खोल अ
सभामंडप आहे. चैत्यगृहापुढे प्रांगण असून त्यात दोन्ही बाजूस प्रत्येक
असे एकूण दोन ध्वज किंवा ध्वजस्तंभ आहेत. त्यापैकी एक ध्वज सिं
असून दुसरा चक्रध्वज आहे. या चक्रध्वजाच्या स्तंभावर कमळ पेलणारे
यक्ष दाखविले असून या कमळावर चक्र आहे. प्रांगणात जाण्यासाठी प
आहेत. प्रांगणाला स्तूपावर नागराज आणि द्वाराजवळ आढळणाऱ्या
प्रतीहारांसमवेत आढळणारा कठडा दाखविला आहे. याप्रकारचे कठड
प्रांगण कार्ले येथील चैत्यगृहाला नाही. कार्ले येथील सिंहध्वज कान्हेरी ये
सिंहध्वजापेक्षा अधिक सुबक आणि सुंदर आहे. कदाचित मुखभागावर
स्तंभ, त्यावर वामनभिंत आणि त्याहीवर चार वामनस्तंभ असे स्वरूप असत
स्तंभजालाच्या काही भागाच्या पडझडीमुळे कार्ले येथील चैत्यगृह कान्हेर
चैत्यगृहाच्या तुलनेत अधिक सुंदर दिसत असावे. पण मुखभागाची स
संकल्पना आणि ती प्रत्यक्षात आणण्याचे कसब, बाजूच्या भिंतीवरील कोरीव
या कार्ले चैत्यगृहातील बाबी निर्विवादपणे अधिक सुंदर आहेत. शिवाय क
येथील मुखमंडप कान्हेरी येथील मुखमंडपाच्या तुलनेत अधिक रुंद अ
कान्हेरी लेणे सातवाहन राजा यज्ञश्री सातकर्णी याच्या आश्रयाने आणि त्याच
काळात पूर्ण झाले असले तरीही लेण्याचा बराच भाग आधीच्या काळ
खोदला गेला असावा. याचाच अर्थ असा की, या लेण्याचे वेगवेगळे भ
निरनिराळ्या कालखंडात पूर्ण झाले असावेत. त्याचप्रमाणे या लेण्याच्या निर्मित
प्रक्रिया सरळसोट आणि सलग नव्हती. मध्यायताच्या बाजूच्या स्तंभांम
समरूपता नसणे हा याचा निर्विवाद पुरावा आहे. पशुस्वार प्रयोजनांची (घो
किंवा हत्तीवर बसलेली माणसे) शीर्षे कार्ले येथील अशा शीर्षांच्या तुलन
अधिक लहान आणि कमी आकर्षक आहेत. या लयननिर्मितीच्या शेवटच
टप्प्यात खांबाच्या तळाशी एक आणि सिंहध्वजाच्या तळाशी एक अशा एकू
दोन बुध्दमूर्ती खोदल्या गेल्या असून त्या हीनयानातून महायानात होणाऱ्
संक्रमणाची अवस्था किंवा टप्पा सूचित करतात.

अशा प्रकारे कान्हेरी येथील चैत्यगृहाबरोबर कोकणभागातील गजपृष्ठाका
छपरांच्या चैत्यगृहनिर्मितीची मोहीम संपली. जुन्नर, कुडे आणि महाड ही यानंतरच

शैलगृहस्थापत्याची केंद्रे बनली आणि पश्चिम भारतातील शैलगृहस्थापत्यविकासाच्या नवीन टप्प्याला सुरुवात झाली.

**जुन्नर आणि कुडे येथील नंतरच्या काळातील उदाहरणे** : इ. स. च्या पहिल्या शतकाच्या अखेरीस जुन्नर येथे खोदण्यात आलेल्या चैत्यगृहांबरोबर चैत्यगृहस्थापत्य विकासाच्या नव्या टप्प्याला प्रारंभ झाला. हा नव्या प्रकारचा विकास मानमोडी येथील लेणे क्र. २६ आणि गणेशपहाड येथील लेणे क्र. ६ या दोन चैत्यगृहांच्या स्वरूपात साकार झाला आहे. यातील मानमोडी लेणे क्र. २६ चा काळ इ. स. च्या पहिल्या शतकाचे शेवटचे चतुर्थक आणि गणेश पहाड लेणे क्र. ६ चा काळ इ. स. च्या दुस-या शतकातील पहिले चतुर्थक असा आहे. चैत्यगृहाचा सभामंडप आणि मुखभाग यावरील तपशीलवार बारीकसारीक कोरीवकाम मागे पडत जाणे, आणि या टप्प्याच्या सुरुवातीला जरी गजपृष्ठाकार छप्पर असले तरीही हळूहळू टप्प्याच्या नंतरच्या अवस्थेत पूर्णपणे नाहीसे होणे ही या टप्प्यातील स्थापत्याची प्रमुख वैशिष्टये म्हणून सांगता येतील. मानमोडी येथील लेणे क्र. २ च्या मुखभागावर चैत्यगवाक्षाद्वारे छत सूचित केले असले तरी प्रत्यक्ष छत मात्र पूर्णतः सरळ आणि सपाट आहे. हे वैशिष्टय पारंपारिक तंत्रज्ञान मागे पडल्याचेच द्योतक आहे. चैत्यगृहे वरून खाली आणि पुढून मागे खोदली जात हे सर्वश्रुतच आहे. चैत्यगवाक्ष खोदण्याचे बरेच व्यावहारिक फायदे होते. मुखाच्या वरच्या भागात खोदलेली बैलाच्या डोळयाच्या आकाराची खिडकी (गो + अक्ष = गवाक्ष) कोणत्याही ऋतूत संपूर्ण चैत्यगृहात प्रकाश आणत असे आणि प्रत्यक्ष लेणे खोदताना आधी चैत्यगवाक्ष खोदल्यामुळे आतील खोदकाम करणे कारागिरांना सुकर होत असे. या संदर्भात प्रचंड आकाराच्या आणि ब-यापैकी खोल असलेल्या अजिंठा येथील महायान गुंफा कशा खोदल्या गेल्या असा प्रश्न पडतो. गुंफेसमोरच्या मुखमंडपात पाणी साठवले जात असे आणि या पाण्यातून परिवर्तित होणा-या प्रकाशात गुंफा खुदाईचे काम केले जात असावे असा तज्ञांचा कयास आहे. अशी कोणतीही व्यवस्था नसल्यास दिव्यांचे किंवा मशालींचे सहाय्य न घेता खुदाईचे काम करणे अशक्यच होते. चैत्यगवाक्ष आधी खोदल्यास ही सर्वच यातायात सहजगत्या टळत असे. पण ही पध्दती गणेशपहाड येथील लेणे क्र. ६ खोदताना का अवलंबण्यात आली नाही हे समजू शकत नाही. त्यामागे नक्कीच कोणते तरी तांत्रिक कारण किंवा सोय असावी त्यामुळेच या लेण्याच्या कारागिरांनी नवीन पध्दतीचा अंगिकार केला असावा, पण हा लयननिर्माणतंत्रातील बदल निश्चितपणे चैत्यगृहस्थापत्यातील नवा टप्पा सूचित करतो. मानमोडी येथील २६ क्रमांकाचे लेणे अपूर्णावस्थेत आहे. या लेण्याची चैत्यकमान नुसती

विकसितच नाही तर तिला मागील बाजूस चौरस गोल छतही आहे. नेमक्या याच कारणामुळे या चैत्यगृहाचा आकारही तुलनेने लहानच आहे. या लेण्याला आधी मुखमंडप (६ मीटर रुंद आणि ७.६० मीटर उंच) लागतो. मुखमंडपाचा मुखभाग बेडसे येथील चैत्यगृहासारखा असून तो दोन स्तंभ आणि दोन भित्तिसंगत स्तंभांनी बनलेला आहे. मात्र या स्तंभांवर स्वारशीर्षे नाहीत. सभामंडपाच्या द्वाराची चौकट साधी आयताकार आहे आणि सभामंडपाचा मुखभाग साधा सपाट आहे. त्यावर कोणतेही अलंकरण नाही.

गणेश पहाड (जुन्नर) येथील लेणे क्र. ६ त्याहूनही थोडे अधिक विकसित झालेले चैत्यगृह आहे. या लेण्यालाही ६.३० मीटर रुंद, २.०३ मीटर खोल आणि ३.७६ मीटर उंच असा स्तंभमुखी (pillar fronted) मुखमंडप आहे. पाय-यांच्या चौकोनी शंक्वाकृती घटकावर कुंभाकार तळखडा, त्यावर अष्टकोनी स्तंभ, त्यावर घंटाशीर्ष, त्यावर आमलकयुक्त पेटीसारखा घटक, त्यावर पायऱ्यांचा उलटा चौकोनी शंक्वाकृती घटक आणि त्यावर पशुशीर्ष असा या स्तंभांचा घटकक्रम आहे. बाहेरची कमान आभासी (false) आहे आणि सभागृहाचे छत गजपृष्ठाकार आहे. सभागृहाचा तलविन्यास चापाकृती असून हे चैत्यगृह इ. स. च्या दुस-या शतकाच्या पहिल्या दशकात खोदले गेले असावे.

मानमोडी लेणे क्र. २ हे त्या प्रकारातील पहिले चैत्यगृह असून त्यास स्तंभमुखी मुखमंडप, सपाट छत, आयताकृती मंडप आणि त्यात स्तूप आहे. स्तूपावर सपाट छतातच छत्री कोरली आहे. हे लेणे अदमासे इ. स. च्या दुस-या शतकाच्या शेवटच्या चतुर्थकात कोरले गेले असावे.

मुख, तलविन्यास, छत आणि स्तूपाचे स्वरूप यासंदर्भात तशीच व्यवच्छेदक लक्षणे असलेली जुन्नर येथील इतर उदाहरणे म्हणजे शिवनेरी गटातील चैत्यगृह असे स्वरूप असलेले लेणे क्र. २, लेणे क्र. ६६ आणि लेणे क्र. ४३ आणि गणेशपहाड लयनसमूहातील लेणे क्र. १४ ही होत. अशीच वैशिष्ट्ये कुडे येथील लेण्यांमध्येही दिसून येतात. यावरून याप्रकारचा चैत्यगृहस्थापत्यविकास फक्त जुन्नरपुरताच मर्यादित नव्हता हे स्पष्ट होईल. कुडे येथील इ. स. च्या तिस-या शतकाच्या पूर्वार्धात कोरल्या गेलेल्या लेणे क्र. ९,२१ आणि १५ मध्येही तशीच वैशिष्ट्ये आढळून येतात.

या प्रकारच्या चैत्यगृहांमध्ये शिवनेरी लयनसमूहातील लेणे क्र. ४३ उल्लेखनीय असून इतर चैत्यगृहांप्रमाणेच याही चैत्यगृहाला स्तंभमुखी मुखमंडप आणि स्तूप असलेला सभामंडप आहे. दोन भित्तिसंगत स्तंभ आणि दोन स्तंभ असे स्वरूप असलेल्या स्तंभाजालाने सभामंडपाची सुरुवात आणि मुखमंडपाचा शेवट सूचित

केला आहे. अशा प्रकारचे अर्धस्फुट अंतराल उत्तर महायानकाळातील लेण्यांमध्ये आढळते. (अजिंठा येथील हारीता मंदिर : लेणे क्र. २ ). या लेण्याचे आणखी एक महत्त्वाचे वैशिष्टय म्हणजे मुखमंडपाच्या छताची पातळी सभामंडपाच्या छताच्या पातळीपेक्षा खाली आहे. मुखमंडपाचे छत सभामंडपाच्या द्वारावरील ललाटतुळईच्या केवळ एक फूट उंचीवर आहे. हे लेणे बहुधा इ. स. च्या पहिल्या शतकाच्या मध्यात तयार झाले असावे.

कुडे येथील लेणे क्र. १ आणि ६ (ता. मानगाव, जि. रायगड) ही या प्रकारचीच उदाहरणे होत. या चैत्यगृहांची वैशिष्टयेही अगदी अशीच असली तरीही ही लेणी नंतरच्या काळातील, म्हणजे इ. स. च्या तिस-या शतकाच्या शेवटच्या चतुर्थकातील आहेत. किंबहुना स्वतःला महाभोज म्हणवून घेणा-या स्थानिक प्रमुखांनी खोदलेली लेणी एकूण दोन शतकांच्या कालावधीत खोदली गेली असे नागराजू यांचे मत आहे. वास्तुशास्त्र, शिल्प आणि पुराभिलेखदृष्टया ही लेणी नंतरच्या काळातील हीनयान शैलगृहस्थापत्याचा विकास दर्शवितात.[६]

**महाड** (ता. महाड, जि. रायगड) : मुंबईपासून १५० कि. मी. अंतरावर, रायगड जिल्हयात महाड येथे सावित्री आणि धारी नद्यांच्या संगमाजवळ, मुंबई-गोवा द्रुतगती मार्गालगतच्या टेकडीच्या उतारावर एकूण २८ प्राचीन बौध्द शैलगृहे आहेत. मुबंई-गोवा मार्गावरून जाताना ही लेणी अगदी स्पष्टपणे दिसून येतात.

या लेण्यांपैकी ८, १५ आणि २१ या क्रमांकाची लेणी चैत्यगृहे आहेत. त्यापैकी क्र. ८ चे लेणे उल्लेखनीय आहे. मुखमंडप आणि त्याच्यामागे आयताकृती सभामंडप अशी या लेण्याची रचना आहे. आज या लेण्याचा मुखमंडप अस्तित्वात नाही. मात्र त्याच्या पुढील स्तंभांच्या वर असलेली शीर्षे मात्र छतालगत टिकून आहेत. या लेण्यातील स्तंभ शिवनेरी, मानमोडी, जुन्नर आणि कुडे येथील स्तंभयुक्त मुखमंडप आणि समतलवितानयुक्त सभामंडप असे स्वरूप असलेल्या चैत्यगृहांमध्ये आढळणा-या स्तंभांसारखेच आहेत.

सभामंडपाच्या खोलीपेक्षा त्याची रूंदी अधिक असून त्याच्या दोन्ही बाजूच्या भिंतींमध्ये प्रत्येकी तीन खोल्या खोदल्या आहेत. सभामंडपाच्या मागच्या भागात स्तूपाकरिता चौरस गर्भगृह असून या गर्भगृहाच्या दोन बाजूमध्ये प्रत्येकी एक खोली आहे. अशा प्रकारे हे लेणे आत चैत्य असलेला विहार आहे.

**शेलारवाडी** (ता. वडगांव, जि. पुणे) : शेलारवाडीतील लेणी तळेगावच्या नैऋत्येस ३ कि. मी. अंतरावर आहेत. ही लेणी मुंबई-पुणे महामार्गालगत

असलेल्या टेकडीत खोदली आहेत. यातील अकरा लेण्यांपैकी, लेणे क्र. ८ त्याच्या वास्तुशास्त्रीय वैशिष्ट्यांमुळे उल्लेखनीय आहे.

या लेण्याचा तलविन्यास बहुतांशी महाड येथील लेणे क्र. ८ शी मिळताजुळता आहे. या लेण्यातही सभागृहाच्या दोन्ही बाजूस प्रत्येकी तीन खोल्या आणि स्तूप असलेल्या गर्भगृहाच्या दोन्ही बाजूस प्रत्येकी एक खोली आहे. पण काही बाबतीत मात्र हे लेणे महाड येथील ८ व्या क्रमांकाच्या लेण्यापेक्षा निराळे आहे. या लेण्याच्या मुखमंडपाच्या दोन्ही बाजूस सकृतदर्शनी दोन खोल्या आहेत आणि गर्भगृह सभागृहाच्या बाजूच्या भिंतीत असलेल्या खोल्यांपेक्षा खूपच मोठे आणि अधिक खोल आहे. लेण्याची स्थापत्यशैली, लिपिशास्त्रीय पुरावा इत्यादी गोष्टी लक्षात घेता हे लेणे इ. स. च्या तिस-या शतकाच्या उत्तरार्धात खोदले गेले असावे असे दिसते.[७]

**पन्हाळे**[८] (ता. दापोली, जि. रत्नागिरी) : येथे विखुरलेल्या अनेक छोटया वाडयांनी बनलेले पन्हाळेकाझी हे गाव आहे. महाराष्ट्र शासनाच्या पुराभिलेख व पुरातत्त्व संचालनालयाला साफसफाईचे काम (clearance work) करत असता या ठिकाणी एकूण २९ शैलगृहे सापडली. हे साफसफाईचे किंवा गाळ काढण्याचे काम दोन वर्षे चालू होते. ही लेणी महाराष्ट्राच्या आणि विशेषत: कोकणाच्या धार्मिक इतिहासाच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाची आहेत. ही लेणी दोन दृष्टिकोनातून महत्त्वाची आहेत. यातील पहिली विशेष महत्त्वाची बाब म्हणजे या भागात अदमासे इ. स. च्या दुस-या शतकापासून लयननिर्मितीस प्रारंभ झाला आणि लेणी खोदण्याची परंपरा अगदी इ. स. च्या १३-१४ व्या शतकापर्यंत चालू राहिली. दुसरी महत्त्वाची बाब म्हणजे येथील स्थानिक जनतेने हीनयान ते वज्रयान आणि नंतरच्या काळात वज्रयान ते हिंदू आणि नाथपंथाकडे कशी वाटचाल केली हे आपल्याला या लेण्यांमुळे कळते. याची चर्चा स्वतंत्रपणे पुढे आलेली आहे.

येथे एकेकाळी प्रस्थापित असलेल्या वज्रयानमताची कान्हेरी येथील भिक्षुसंघाशी निकटतमपणे जवळीक होती आणि येथील व कान्हेरी भिक्षुसंघातील वज्रयानाचे आचरण हे पूर्व भारतातील आणि विशेषत: बिहारमधील वज्रयान संप्रदायाच्या आचरणासारखेच होते हे एम. एन. देशपांडे यांनी या लेण्यांचा साद्यंत अभ्यास करून दाखवून दिले आहे. त्याचप्रमाणे वज्रयान संप्रदायाचे उपासक नाथपंथाकडे कसे वळले हेही त्यांनी सविस्तरपणे विशद केले आहे. अशा सर्व अभ्यासातून त्याकाळात एका संप्रदायाकडून दुस-या संप्रदायात जाणे किती सोपे आणि

सहज होते हे स्पष्ट होत असल्याने या अभ्यासाला अनन्यसाधारण महत्त्व आहे.

कोकण भागात बौध्द धर्माची सुरुवात आणि त्याचा प्रसार तसा नंतरच्या काळातच झाला. हीनयान संप्रदायाचा जोर ओसरायला इ.स. च्या दुस-या शतकाची अखेर किंवा तिस-या शतकाची सुरुवात उजाडावी लागली. लेणी क्र. २, ४ ते ११, १४, १८ आणि २७ मुळात हीनयान होती आणि नंतर त्यांचा ताबा वज्रयान पंथीयांनी घेतला. त्यापैकी लेणे क्र. ५ अत्यंत महत्त्वाचे आहे. या लेण्यामध्ये मध्यम आकाराचे (३.६० x ३.६० मीटर) बिनखांबी सभागृह असून या सभागृहाच्या पूर्व व पश्चिंम भिंतींलगत बसण्याचे कट्टे आहेत. हे कट्टे काटकोनात वळून दक्षिणेकडील भिंतीलाही लागून आहेत. हे सभागृह उत्तराभिमुख आंहे. सभागृहाच्या मागे साधारणतः चौरसाकृती (२.६६ मीटर x २. ३० मीटर) गर्भगृह आहे. या गर्भगृहातील मागच्या भिंतीलगत कट्टा कोरला आहे. या कट्टयावर किंवा पीठावर बहुधा मूर्ती ठेवली जात असावी. परंतु या लेण्याचे सर्वात महत्त्वाचे वैशिष्टय म्हणजे सभागृहातील गर्भगृहाच्या द्वाराच्या पश्चिमेकडील भिंतीत बसण्याच्या कोरीव दगडी बाकाच्या पातळीच्या वरच्या भागात कमी उठावात स्तूप कोरला आहे. गर्भगृहाच्या द्वारालगतच्या पूर्वेकडील भिंतीतही असाच स्तूप कोरला असावा असा देशपांडे यांचा अंदाज आहे. या सर्व पुराव्यांवरून सभागृहातील मागील भिंतीत कमी उठावात कोरलेला स्तूप आणि गर्भगृहात मूर्ती अशा योजनेची प्रथा त्याकाळी असावी असे अनुमान निघते.

या चैत्यगृहात निवासाकरिता खोल्या नाहीत. त्यामुळे हे चैत्यगृह निवासाकरिता असलेल्या खोल्यांनी युक्त असलेल्या महाड (लेणे क्र. ८), शेलारवाडी (लेणे क्र. ८) आणि कदाचित अजिंठा (लेणे क्र. ८) यासारख्या समकालीन चैत्यगृहांपेक्षा खूपच वेगळे आहे. सभागृहातील मागील भिंतीत अल्प उठावात कोरलेला स्तूप किंवा दोन स्तूप हे नक्कीच पुजले जात. तसेच मुख्य पूजावस्तू मूर्ती असावी आणि ती बहुधा गर्भगृहातील पीठावर ठेवली जात असावी. घटोत्कच येथील महायान विहारातही सभागृहाच्या मागील भिंतीत कोरीव स्तूप आणि गर्भगृहात मूर्ती अशीच योजना आहे. या चैत्यगृहात वास्तव्यासाठीच्या खोल्यांचा अभाव असल्याने त्याचे स्वरूप " भिक्षूंचे निवासस्थान " असे नसून "मूर्तीचे मंदिर " असे आहे.

**कराड** (ता. कराड, जि. सातारा) : सातारा जिल्हयातील क-हाड हे ठिकाण एक महत्त्वाचे बौध्द केंद्र होते. महाभारतातही कराडचे उल्लेख सापडतात.

युधिष्ठिराचा सगळयात लहान भाऊ सहदेव याने दक्षिणेकडील मोहिमेत जिंकलेल्या शहरांच्या यादीत कराडचे नाव आहे. खुद्द कराड शहरात कोयना नदीच्या तीरावरील वसतिस्थानांचे अवशेष असलेल्या टेकडाचे उत्खनन करताना इतिहासकाळाच्या सुरुवातीच्या काळातील बरेच अवशेष प्राप्त झाले आहेत. हे उत्खनन पुण्याच्या भारत इतिहास संशोधन मंडळाने केले होते. या सर्व पुराव्यांवरून कराड हे शहर एक महत्त्वाचे व्यापारी व सांस्कृतिक केंद्र असल्याचे स्पष्ट होते. महाराष्ट्राच्या पश्चिम किनारपट्टीवरील चिपळूण शहरापासून कोल्हापूरकडे जाताना घाट ओलांडल्यानंतर लागणारे कराड हे पहिलेच मोठे शहर असल्यामुळेही त्याचे महत्त्व अधिक वाढले. लेणी खोदताना बहुतेक वेळा प्राचीन बंदरे आणि सहयाद्रीच्या पलीकडील दख्खनच्या पठारावरील महत्त्वाची व्यापारी केंद्रे यांना जोडणा-या महामार्गाजवळील डोंगराची वा टेकडीचीच निवड केली जात असे हे आता सर्वमान्य झाले आहे.

या ठिकाणी एकूण ७८ लेणी असून ही लेणी जखिणवाडीची लेणी या नावाने ओळखली जातात. ही लेणी जखिणवाडी जवळील टेकडीत तीन गटांमध्ये खोदण्यात आली आहेत. इतर ठिकाणच्या शिलालेखामध्येही ज्याचा करहाटक असा उल्लेख आढळतो ते कराड शहर खूप प्राचीन असले तरीही इथे आढळणारी लेणी मात्र महाराष्ट्रातील हीनयान शैलगृहस्थापत्याच्या खूप नंतरच्या टप्प्यातील आहेत. जखिणवाडी येथे अनेक चैत्यगृहे असली तरी त्यातील एकच चैत्यगृह उल्लेखनीय आहे. या चैत्यगृहाचा तलविन्यास चापाकृती, ३.९६ मीटर रुंद आणि १०.६६ मीटर खोल असून सभागृहात जाण्यासाठी एकच दरवाजा आहे. दरवाजाच्या वर एक खिडकी आहे. दरवाजाच्या एका बाजूला सिंहध्वज तर दुस-या बाजूला चक्रध्वज आहे. (सीह - चक्क - ज्झय) सभागृहाला काहीसे गजपृष्ठाकार वाटणारे पण फार उंच नसलेले छत असून स्तूपावरील छतभागातच (parasol) छत्र कोरले आहे. या लेण्यामध्ये एक शिलालेखही आहे. सिंह आणि चक्र असलेले खांब, खांबावर उलटा घट, त्यावर पाय-यांनी युक्त असलेला उलटा चौकोनी शंक्वाकृती घटक, त्यावर आमलक आणि त्याच्याही वर धार्मिक चिन्हे (सिंह अथवा चक्र) असा घटकक्रम असलेले ध्वज, शिलालेखातून निघणारा पुराभिलेखशास्त्रीय निष्कर्ष, चैत्यगृहाचा तलविन्यास आणि सपाट छतावर छत्र कोरण्याची पध्दती इत्यादी बाबी लक्षात घेता हे चैत्यगृह इ. स. २०० च्या सुमारास खोदले गेले असावे असे दिसते.

**पोहाळे** (ता. जि. कोल्हापूर) : कोल्हापूर शहरापासून ६ कि. मी. अंतरावरील पोहाळे गावानजिक जोतिबाच्या डोंगराच्या उतारावर सहा बौध्द शैलगृहे आहेत.

त्यापैकी चार लेणी- स्वरूप, तर दोन पाण्याच्या टाक्या स्वरूप आहेत. सातवाहन काळात कोल्हापूर हे बौध्द धर्माचे महत्त्वाचे केंद्र होते. तेथे गेल्या शतकात सापडलेल्या विटांनी बांधलेल्या स्तूपात स्मृतिकरंडक होता. त्याचप्रमाणे ग्रीक आणि रोमन प्रभाव असलेल्या ब्रॉंझमूर्तीचा निखातनिधीही कोल्हापूर येथे सापडला आहे. या गावाचे पोहाळे हे नाव (संस्कृत - पद्मालय. त्याचा शब्दशः अर्थ कमळाचे तळे असा होतो ) आणि तेथे असलेली चार लेणी आणि दोन पाण्याच्या टाक्या या बाबीं खूपच सूचक ठरतात.

पोहाळे येथील चैत्यगृहाचा तलविन्यास आयताकृती असून हे चैत्यगृह ३ मीटर रुंद, ३.७० मीटर खोल आणि ३.६० मीटर उंच आहे. चैत्यगृहासमोर प्रांगण आहे. आतील २.४० मीटर त्रिज्येचा स्तूप आज वाईट स्थितीत असला तरी त्यावरील छतात कोरलेले छत्राचे अवशेष आजही दिसून येतात. हर्मिका आणि छत्राची दांडी आज अस्तित्वात नाही.

येथील आणखी एक महत्त्वाचे लेणे म्हणजे विहार लेणे. समोर प्रागंण, प्रांगण ओलांडल्यानंतर १०.६० मीटर रुंद व १.२० मीटर खोल असा मुखमंडप व त्याच्यामागे ७.३० मीटर x ७.६० मीटर आकाराचे सभागृह अशी त्याची रचना आहे. मुखमंडपाला पुढच्या भागात सहा अष्टकोनी स्तंभ होते. त्याच्या मागील भिंतीत १.५० मीटर रुंद व २.७० मीटर उंच असे सभागृहात जाण्याचे द्वार आहे. या सभागृहाच्या प्रवेशद्वाराच्या दोन्ही बाजूस जालवातायने (४.८० मीटर x १ मीटर) आहेत. सभागृहाच्या द्वार आणि जालवातायने असलेल्या भिंतीव्यतिरिक्तच्या उरलेल्या तीन भिंतीत खोल्या खोदल्या आहेत. खोल्यांलगतच्या पुढच्या भागाला चौदा अष्टकोनी स्तंभांमुळे मार्गिकेचे स्वरूप आले आहे. या चौदा स्तंभांवर तुळई खोदली असून या तुळईवर छत विसावले आहे.

उरलेल्या दोन लेण्यांना प्रांगणालगतच काही खोल्या आहेत. या लेण्यांच्या समोरच दोन खोदीव पाण्याच्या टाक्या आहेत. त्यापैकी एक टाकी २.१० मीटर x २.१० मीटर या आकाराची असून तिच्या मुखाचा किंवा खुल्या भागाचा आकार २.१० मीटर x १.६० मीटर असा आहे. दुसरी टाकीही साधारणपणे त्याच आकाराची (२.४० मीटर x १.३० मीटर ) असून तिला दोन मुखे ( १.२० मीटर x ७.५० मीटर) आहेत.

पोहाळे येथील बौध्द लयनसमूह शैलगृहस्थापत्याच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचा असून पुढील कारणांमुळे तो इ. स. च्या तिसऱ्या आणि चौथ्या शतकात खोदला

गेला असे अनुमान काढता येथे. चैत्यगृहामध्ये स्तूपाचे छत्र छतातच कोरलेले आहे. विहाराचा स्तंभमुखी मुखमंडप आणि चौदा खांबांमुळे तीन भिंतींना लागून निर्माण झालेल्या तीन मार्गिका आणि त्यातील अष्टकोनी स्तंभ असा या विहाराचा तलविन्यास असून तो जुन्नर येथील लेण्याद्री लेण्यांच्या गटातील गणेशलेण्यासारखा आहे. म्हणूनच हा विहार हीनयान विहार आणि महायान विहारस्थापत्याला जोडणारी मधली अवस्था किंवा जोडणारा दुवा आहे असे म्हणता येईल.

**चंढाळा लेणी :** विदर्भात नागपूरपासून ५५ कि. मी अंतरावर चंढाळ्याच्या जंगलात इतिहासकाळाच्या प्रारंभीची काही लेणी सापडली आहेत. दुसऱ्या लेण्यांमध्ये अगदी सुरुवातीच्या ब्राह्मी लिपीतील शिलालेख आहेत. या लिपीच्या आणि अक्षरखुदाईच्या पध्दतीवरून (पुराभिलेखशास्त्रदृष्टया केलेल्या अभ्यासावरून) शां. भा. देव यांनी ही लेणी इ. स. पूर्व तिस-या शतकातील असावीत असा निष्कर्ष काढला. ही लेणी आकाराने खूपच लहान आहेत. या लेण्यांजवळ कोणतीही वस्ती (गाव किंवा वाडी) नाही. लेण्यावर कोणतीही धार्मिक प्रयोजने कोरलेली नाहीत की स्तूप अथवा स्मृतिकरंडकासारखे अवशेषही येथे आढळून येत नाहीत. या लेण्यांमध्ये हीनयान परिव्राजक राहत असावेत असा. प्रा. देव यांचा होरा आहे. चंढाळा अरण्य भंडारा जिल्हयातील पवनीपासून फारसे लांब नाही . पवनी हे एक महत्त्वाचे बौध्द केंद्र होते. तेथे एक मोठया आकाराचा स्तूप असून त्याच्या सभोवताली भिक्षूंच्या वास्तव्याचे विटांनी बांधण्यात आलेले मोठे संकुल होते. आज या संकुलाचे अवशेष अत्यंत विखुरलेल्या स्थितीत आढळतात. त्यामुळे देव यांनी काढलेला निष्कर्ष योग्य वाटतो. इ. स. पूर्वीची अशी लेणी फारच अत्यल्प प्रमाणात असल्यामुळे या लेण्यांचा येथे उल्लेख केला आहे. या लेण्यांमुळे शैलगृहे ही केवळ पश्चिम महाराष्ट्राचीच मक्तेदारी नव्हती हे स्पष्ट होईल.

**विहार :** यापूर्वी वर्णन केल्याप्रमाणे शैलगृहांचे चैत्यगृह, विहार, मंडप, पोढी, आसनपोढी आणि कोढी असे प्रकार पडतात. चैत्यगृह आणि विहार हे त्यातील मुख्य प्रकार असून विद्वानांनी या दोन प्रकारांचा विशेष बारकाईने अभ्यास केला आहे. वास्तविक प्रथम भिक्षूंच्या वास्तव्यासाठी विहार खोदण्यात आले आणि नंतर या विहारवासीयांच्या धार्मिक बाबींच्या सोयीसाठी चैत्यगृहे खोदण्यात आली. त्यामुळे अनेक ठिकाणी विहारांच्या बरोबरच चैत्यगृह आढळते. तद्वतच चैत्यगृह हा अधिक कलात्मक आणि वैशिष्टयपूर्ण वास्तुप्रकार असल्यामुळे त्याची संख्या इतर प्रकारच्या शैलगृहांच्या संख्येच्या तुलनेत कमी आहे.

यापूर्वी विहारांचे अगदी तपशीलवार विवेचन केले आहे. तथापि मुळात विहार हा शैलगृहप्रकार उपयुक्ततावादी दृष्टिकोनातून खोदण्यात आल्यामुळे आणि सर्वसंगपरित्याग करून आणि संन्यस्तवृत्तीने जीवन कंठणे हेच ध्येय असलेल्या भिक्षूंसाठी हा प्रकार खोदण्यात आला असल्याने हा शैलगृहस्थापत्यप्रकार साधा असणे गरजेचे होते. चैन आणि स्वयंपीडन या दोन्ही अतिरेकांपासून दूर राहण्याच्या भगवान बुध्दाच्या शिकवणुकीचे प्रतिबिंब या विहारस्थापत्यात दिसून येते. गावाच्या आणि नगरच्या धकाधकीपासून हे विहार दूर असले तरी ते फार दूर मात्र नव्हते. विहारांमुळे भिक्षूंचे ऊन, वारा आणि पावसापासून संरक्षण होऊन शुध्द हवा, पाणी आणि सूर्यप्रकाश या जीवनावश्यक सुविधा सहजगत्या उपलब्ध होतील अशीच त्यांची रचना होती. सगळयात महत्त्वाचे म्हणजे विरक्त जीवन जगू इच्छिणा-या भिक्षूंकरिता ते अत्यंत सोयीचे होते. विहार या स्थापत्यप्रकारामागे हा केवळ उपयुक्ततावादी दृष्टिकोन असल्यामुळे अगदी ३०० वर्षांच्या काळात या वास्तुप्रकाराचा फारसा विकास[१] झालेला आढळून येत नाही.

नागराजू यांनी या प्रकारच्या लयनस्थापत्याचा सखोल अभ्यास करून बरीच निरीक्षणे नोंद करून ठेवली आहेत. पावसाळयात भिक्षूंनी भ्रमंती न करता एकाच जागी राहावे अशी अपेक्षा असे. या अशा पावसाळयातील मुक्कामास वर्षावास असे नाव होते. या वर्षावास स्थापत्याचा विकास अभ्यासायचा असेल तर आपल्याला बुध्द आणि त्याचे शिष्य यांच्याकरिता बांधण्यात आलेल्या सुरुवातीच्या विहारांची माहिती असणे आवश्यक आहे. बुध्द आणि त्याच्या शिष्यांकरिता अनापिंडक या भक्ताने प्राचीन श्रावस्ती नगरीत, म्हणजे सध्याच्या उत्तर प्रदेशातील सहेथ-महेथ येथे जेतवन नामक विहार बांधला होता. विहार बांधण्यासाठीच जमीन विकत घेऊन त्यावर कायमस्वरूपी विहार बांधण्याचा हा खास प्रकार आहे. पण बौध्द वाङ्‌मयात भगवान बुध्द आपल्या शिष्यांसमवेत तात्पुरत्या निवासात राहिल्याचेही उल्लेख आहेत. हे असे तात्पुरते निवास किंवा निवारेदेखील विहार म्हणूनच ओळखले जात. असे विहार बहुधा नगराबाहेरील जुन्या उद्यानांमध्ये किंवा फळबाग (आराम) मध्ये असत. दगडात खोदलेला अशा प्रकारचा सर्वात प्राचीन विहार म्हणजे बिहारमधील गयेच्या परिसरातील बराबर टेकडीत खोदलेले विहार. दख्खनमधील शैलगृहांव्यतिरिक्त अन्य उल्लेखनीय उदाहरण म्हणजे भुवनेश्वरजवळील उदयगिरी लेणी होय. शिलालेखामध्ये लेणे हा शब्द विहार याअर्थी वापरला आहे. नागराजूंनी या “ लेण्यांचे ” एकच खोली असलेला विहार आणि अनेक खोल्या असलेले विहार अशा दोन प्रकारांमध्ये

वर्गीकरण केले आहे. पहिल्या प्रकारच्या लेण्यांचे खालीलप्रमाणे चार उपप्रकार पडतात.

१ : समोरचा भाग खुला असलेल्या चौरस आणि आयताकृती खोल्या,

२ : मुखभिंत आणि दरवाजाने युक्त असलेल्या खोल्या,

३ : अशाच प्रकारचा दरवाजा आणि ओसरी असलेल्या खोल्या,

४ : ओसरीयुक्त मोठ्या दालनाला लागून असलेली अरुंद व खोल खोली.

दुसऱ्या प्रकारच्या लेण्यांचे खालीलप्रमाणे तीन उपप्रकार पडतात.

१ : ओसरीच्या (पटांगणाच्या) मागे असलेली खोल्यांची ओळ,

२ : मोठ्या खुल्या दालनाभोवती खोल्या असणे आणि

३ : ओसरीयुक्त मोठ्या दालनाभोवती खोल्या असणे.

नागराजूंनी लेण्यांच्या (विहारांच्या) स्थापत्यविकासाचे चार टप्पे मानले आहेत. पहिला टप्पा मौर्यकाळातील (ख्रि.पू. ३०० ते २५०), दुसऱ्या टप्प्याचा काळ ख्रि.पू. २५० ते २००, तिसऱ्या टप्प्याचा काळ ख्रि.पू. २०० ते इ.स. १०० आणि चौथ्या टप्प्याचा काळ इ.स. १०० ते इ.स. ३००.

नागराजू यांच्या मते मुंबईजवळ विरारच्या परिसरातील जीवदन लेणी किंवा विहार हे पहिल्या टप्प्यातील स्थापत्याची उत्तम उदाहरणे आहेत. हे विहार मौर्यकालीन असून पुढे मोठे दालन किंवा सभागृह नसलेली एक छोटी खोली असे त्यांचे स्वरूप आहे. या खोल्यांमध्ये शयनपीठ (झोपण्याचा कट्टा) व पाणी साठवण्याची टाकी नाही. शिवाय हे विहार टेकडीवर बऱ्यापैकी उंचीवर खोदलेले आहेत. जुन्नर येथील तुळजा लयनसमूहातील लेणी क्र. १, ६, ७, १३, व १४ ही लेणीही याच टप्प्यातील स्थापत्याची उदाहरणे होत. धबधब्याजवळील लेणे क्र. ३ व ४ या लेण्यांच्या निरीक्षणानंतर वर्षावासाकरता खोदलेले भिक्षूंचे तात्पुरते निवास ते भिक्षूंचे कायमस्वरूपी निवासी संकुल हे स्थित्यंतर याआधीच होताना दिसते अशा निष्कर्षाप्रत नागराजू आले आहेत. हे स्थित्यंतर तत्कालिन भिक्षूंच्या बदलत्या दृष्टिकोनाशी संबंधित असून या बदलत्या दृष्टिकोनांची परिणती कधीकधी निराळ्या संप्रदायाच्या स्थापनेत झाली. भिक्षूंच्या संख्येतील वाढ आणि त्यामुळे लयनस्थापत्य प्रकारात झालेला बदल यासारख्या इतर बाबीही सखोल निरीक्षणातून उजेडात आल्या आहेत.

यापुढील विकासाच्या टप्प्यात भटक्या भिक्षुजीवनपध्दतीची जागा भिक्षुसंघाच्या मठातील जीवनपध्दतीने घेतली. अजिंठा, भाजे, नाशिक, कोंढाणे आणि पितळखोरे

येथील काही लेणी या बदललेल्या जीवनपध्दतीचे प्रतिनिधित्व करतात. याप्रमाणे आधीच्या लयनस्थापत्यप्रकाराच्या (अजिंठा लेणे क्र. १३ आणि भाजे येथील लेणे क्र. ११) मलग विकासातच मंडपाभोवती कक्ष असलेले (अजंठा लेणे क्र. १३ व भाजे लेणे क्र. ६, ७, १३, १५, १६) किंवा व्हरांडयामागे काही कक्ष किंवा छोटया खोल्या असलेले (नाशिक लेणे क्र. १९, जुन्नर, तुळजा लेणे क्र. २) किंवा समतल वितान (सपाट छत) आणि बिनखांबी मंडप असलेले विहार उदयास आले. (पितळखोरे लेणे क्र. ४ व भाजे लेणे क्र. २२ या दोन्ही लेण्यांना गजपृष्ठाकार छत आहे.) कोंढाणे लेणे क्र. २ काहीसे निराळे आहे. या लेण्यात स्तंभयुक्त मंडप असून त्याच्या छतावर, लाकडी मंडपावर असाव्यात तशा तुळया आणि त्यावरील पट्टया दाखवल्या आहेत. नाशिक व भाजे येथील अशा प्रकारचे नमुने असलेली लेणी मध्यम आकाराची आहेत. (नाशिक येथील लेण्याचा आकार ४.२७ मीटर x ४. २७ मीटर तर भाजे येथील लेण्याचा आकार ५.१८ मीटर x ५.१८ मीटर आहे). नाशिक येथील विहार (लेणे क्र. १९) अगदी साधा आहे. प्रथम स्तंभयुक्त व्हरांडा, व्हरांडयाच्या मागील भिंतीत मंडपाचे द्वार व मागे मंडप आणि मंडपाच्या भिंतीत खोदलेले कक्ष अशी त्याची रचना आहे. कक्षांच्या द्वारावरील कमानी कोरलेल्या असून त्या बंद आहेत. सर्वच्या सर्व म्हणजे सहाही कक्षांच्या द्वारावरील कमानीचे पाये कठडयासारख्या कोरीवकामाने जोडलेले आहेत. ह्या कठडयाची बाह्यरेषा कधीकधी अनियमित झालेली आढळते. मंडपाच्या द्वाराच्या दुतर्फा जालवातायने असून त्यातून मंडपात उजेड व वारा येतो. सर्वात पुढे असलेला व्हरांडा ६.६० मीटर रुंद आणि १.४० मीटर खोल आहे. व्हरांडयाच्या पुढच्या बाजूस स्तंभांची रांग असून त्यातील मधले दोन स्तंभ पूर्णस्तंभ तर टोकाचे दोन स्तंभ भित्तिसंगत आहेत. या विहारात कृष्ण-सातवाहनाच्या काळातील शिलालेख असल्यामुळे हे लेणे सुरुवातीच्या लेण्यांपैकी एक आहे असे निश्चितपणे म्हणता येईल.

या संदर्भातील आणखी एक महत्त्वाचा विहार म्हणजे भाजे येथील लेणे क्र. २२. (यापूर्वीच्या लेखनात ह्याच विहाराचा उल्लेख लेणे क्र. १९ असा केला आहे.) यात अदमासे ५.१८ मीटर चौरसाकृती मंडप असून (प्रत्यक्षात त्याचा आकार ४.९० मीटर रुंद आणि ५.०५ मीटर खोल असा आहे.) त्याचा तलविन्यास नाशिक येथील विहाराच्या (लेणे क्र. १९) तलविन्यासाशी साधर्म्य दाखविणारा असला तरी तो काहीशा निराळया त-हेने घडविण्यात आला आहे. मंडपाच्या पुढे असलेल्या व्हरांडयाच्या दोन बाजूंना प्रत्येकी एक असे एकूण दोन कक्ष आहेत. मात्र भाजे येथील विहाराच्या व्हरांडयाच्या डावीकडील (दर्शकाच्या

डावीकडील) भिंत पूर्णतः सपाट आहे. या बाजूला असलेल्या कक्षांच्या अभावाची भरपाई आणखी तीन कक्ष खोदून पूर्ण करण्यात आली आहे. त्यातील एक कक्ष व्हरांडयाच्या उजवीकडे तर बाकीचे दोन कक्ष व्हरांडयाच्या डाव्या बाजूकडील मार्गिकेमध्ये आहेत. व्हरांडयाच्या मुखभागात असलेले सहा पूर्ण आणि दोन भित्तिसंगत स्तंभ नाशिक येथील विहारात आढळणा-या स्तंभांसारखेच आहेत. कक्षांच्या द्वारावर असलेल्या कमानी तळभागाजवळ नाशिक येथील लेणे क्र. १९ प्रमाणेच कठडयाच्या नक्षीने जोडण्यात आल्या आहेत. तथापि या दोन लेण्यांमध्ये काही फरकही आहेत. भाजे येथील कक्षांच्या द्वारावरील कमानी नाशिक येथील कमानींप्रमाणे पूर्णतः बंद नसून त्यात जालवातायने आहेत. कमानीच्या स्पष्टपणे दाखविण्यात आलेल्या खांबांवर तोरणांच्या कमानी आहेत. त्याचप्रमाणे दोन द्वारांच्या मधल्या भागात देवकोष्ठे असून त्यावर चैत्यगवाक्षांच्या बाह्यरेषा कोरण्यात आल्या आहेत व त्याच्या तळभागावर कठडयाची नक्षी कोरण्यात आली आहे. ज्या भिंतीमध्ये कक्ष खोदलेले नाहीत अशा भिंतीवर आभासी द्वारे कोरण्यात आली असून या द्वारांमध्ये लढवय्ये अनुचर ( warrior attendents ) दाखविले आहेत. अशा आभासी द्वारांच्या खांबांवर पद्मलतेचे अलंकरण आहे.

यातील अधिक व्यवच्छेदक लक्षणे म्हणजे व्हरांडयाचे अर्धगजपृष्ठाकार छत आणि व्हरांडयातील प्रत्यक्ष शिल्पे, शिल्पपट्ट आणि सकृतदर्शनी कथापर पट्टासारखे भासणारे शिल्पपट्ट. व्हरांडयाच्या उजव्या भिंतीत असणा-या कक्षद्वाराच्या दुतर्फा शिल्पपट्ट आहे. या शिल्पपट्टांचा वर्ण्यविषय व त्याचप्रमाणे त्यातील आकृति शिल्पांची व अलंकरणात्मक शिल्पांची वैशिष्ट्यपूर्ण शैली यामुळे हे शिल्पपट्ट विद्वानांचे चर्चाविषय बनून राहिले आहेत. आणखी एक उल्लेखनीय वैशिष्टय म्हणजे लेण्याच्या व्हरांडयात घंटाशीर्ष असलेल्या स्तंभांची योजना. अर्धस्तंभाच्या अष्टकोनी खांबांवर घंटाशीर्षे[१०] आहेत. त्यावर उलटया पिरॅमिडसारखा घटक आहे. आधीच नमूद केल्याप्रमाणे व्हरांडयाचे छत अर्धगजपृष्ठाकार असून त्याच्या रिपा व तुळया एकमेकांना जोडलेल्या आहेत. व्हरांडयाच्या मागच्या भिंतीत अर्धस्तंभांची रांग असून हे अर्धस्तंभही आधी वर्णन केल्याप्रमाणेच आहेत. या अर्धस्तंभाच्या रांगांवर एकावर एक असे चार थर आहेत. स्तंभांच्या घटकात जर असे थर आले तर स्तंभघटकक्रम विशद करताना त्याचे वर्णन उलटा पिरॅमिड असेच करण्यात येते.

कोंढाणे येथील मंडप नाशिक, भाजे आणि अजिंठा (लेणे क्र. १२ व ३० )येथील आयताकार चतुःशाल विहारांपेक्षा निराळा आहे. पुढे व्हरांडा

आणि त्यामागे १०.२० मीटर रुंद आणि १६.९० मीटर खोल मंडप असे त्याचे स्वरूप आहे. या मंडपांच्या तिन्ही भिंतींना लागून लहान कट्टे आहेत. तसेच या तीन भिंतीत मिळून एकूण सहा कक्ष असून त्यांच्यासमोर असलेली मार्गिका स्तंभरांगानी सूचित करण्यात आली आहे. हे लेणे एखाद्या चतुःशाल तलविन्यास असलेल्या बांधीव विहाराची नक्कल असावी आणि म्हणूनच बांधीव विहाराच्या तलविन्यासाप्रमाणे तीन मार्गिका बनविणारे आणि या बाजू पेलणारे पंधरा स्तंभही या शैलगृह- विहारात आले. वास्तविक मंडपाचा उरलेला भाग बांधीव विहाराप्रमाणेच आकाशाकडे खुला असणे आवश्यक होते. तथापि सोयीच्या दृष्टीने, म्हणजे गिरिपृष्ठापर्यंतच्या खोदकामाचे कष्ट वाचवण्यासाठी हा भाग आकाशाकडे खुला न ठेवता लाकडी छताप्रमाणे कोरीवकाम केलेला आहे. व्हरांडा लेण्याच्या पुढच्या भागात असून तो पाच पूर्णस्तंभ आणि दोन अर्धस्तंभांवर पेललेला आहे. या विहारातील स्तंभ दोन प्रकारचे असून ते भाजे येथील लेणे क्र. २२ व नाशिक येथील लेणे क्र. १९ मधील स्तंभांसारखेच आहेत हे येथे नमूद करणे आवश्यक आहे. चौरसाकृती स्तंभाच्याच मधल्या भागाचे कोपरे छिनून अष्टकोनी खांब बनवण्यात आले आहेत.

पितळखोरे येथील लेणे क्र. ४ चे स्वरूप पुढे व्हरांडा आणि मागे मंडप असे आहे. मंडपाच्या मुखभागात एकेकाळी स्तंभांची रांग होती असे मानण्यास जागा आहे. बाजूच्या भिंतीमध्ये कक्ष असावेत असा अंदाज आता केवळ मंडपाच्या मागील भिंतीत खोदलेल्या व काहीशा शाबूत असलेल्या सात कक्षांवरून आणि उजव्या भिंतीत सहा कक्ष असल्याच्या लक्षणांवरून करता येतो. लेण्यातील स्तंभ नाशिक, भाजे व कोंढाणे येथील स्तंभांसारखेच म्हणजे मध्यभागी अष्टकोनी खांब असलेल्या चौरसाकृती स्तंभांसारखेच आहेत. कक्षांच्या द्वारावरील कमानी ब-याच प्रमाणात भाजे येथील कमानींच्या धाटणीच्या, म्हणजे द्वारमार्गावर जालनक्षीने युक्त असा अर्धवर्तुळाकार तुलापट्ट अशा स्वरूपाच्या आहेत. त्यातील तीन कमानी खांबासारख्या घटकांनी एकत्र जोडलेल्या आहेत. प्रत्यक्ष द्वारे वरच्या तुलापट्टापेक्षा काहीशी दूर असून द्वारांच्या उजव्या बाजूस चौकोनी जालवातायने असल्यामुळे वरील कमानींच्या एका बाजूस आहेत. कक्षांची द्वारे ज्या भिंतीत खोदली आहेत त्या भिंतीच्या पृष्ठभागावर आणि द्वारावर असलेल्या कमानींच्या मधल्या भागात अर्धस्तंभ दाखविले आहेत. या अर्धस्तंभांवर घंटाशीर्ष आणि उलटे पिरॅमिड या सर्वांवर पंख असलेल्या प्राण्यांच्या जोडया दाखविल्या आहेत. वरचे छत लाकडी छताचेच अनुकरण असून त्यावर तुळया व त्यावर असलेल्या पट्ट्या कोरण्यात आल्या आहेत. तथापि विहारातील कक्षांचे छत

मात्र गजपृष्ठाकार असून त्यावर दगडी रिपा किंवा कमानीच्या आकाराच्या तुळया व पट्टया कोरण्यात आल्या आहेत.

पश्चिम भारतातील सुरुवातीच्या बौध्द लयनस्थापत्याच्या (हा टप्पा हीनयान संप्रदायाशी आणि या संप्रदायानुकूल स्थापत्याशी संबंधित आहे) बाबतीत एक गोष्ट लक्षात येते आणि ती म्हणजे या लयनस्थापत्याच्या उपक्रमात ख्रिस्ताब्दाच्या आधीच्या आणि नंतरच्या काळात खंड पडलेला आढळून येतो. विद्वानांच्या मते राजकीय अस्थैर्यामुळे लयनस्थापत्याचे उपक्रम कमालीचे मंदावले, त्यात अक्षरश: खंडच पडला. या लयनस्थापत्यखंडित कालखंडात मात्र लयननिर्माण कार्याची गती वाढलेली दिसून येते. या खंड पडलेल्या काळातच संपूर्ण दख्खनवर राज्य करणा-या बलशाली सातवाहन सत्तेला गुजरात - राजपुताना येथील पार्थियन आणि शक राजांकडून मार खावा लागल्यामुळे ग्रहण लागले होते. विद्वान हेही दाखवून देतात की, नंतर जरी गौतमीपुत्र सातकर्णीच्या नेतृत्वाखाली सातवाहनांनी परत आपले प्रभुत्व प्रस्थापित केले असले तरी त्यांचे सत्ताकेंद्र पूर्वेला सरकल्यामुळे आणि खुद्द सातवाहन सत्ता अनेक शाखांमध्ये विभागली गेल्यामुळे त्यांचे सार्वभौमत्व प्रत्ययास येत नाही. तज्ज्ञांच्या मते या सर्व बाबी महाराष्ट्रातील लयनस्थापत्यात प्रतिबिंबित होतात. नागराजू यांच्या मते त्यांच्या कालनिर्णयानुसार ख्रि.पू. ७५ ते इ. स. ७५ या काळात खालील लयनप्रकार अधिक प्रचलित होते.

अ) पुढे व्हरांडा असलेले सुटे कक्ष (अ-३),

ब) सामायिक व्हरांडा असलेली कक्षांची ओळ (ब-१),

क) मंडपाभोवती असलेले कक्ष (ब-३) .

यातील पहिले दोन प्रकार जुन्नर मानमोडी (लेणे क्र. १९, २७, २८, ३०) आणि बेडसे (लेणे क्र. १० व १२) येथे आढळतात. त्याचप्रमाणे अजिंठा, औरंगाबाद, बेडसे, कोंदिवटे व नाणेघाट यासारख्या स्थळी लयनस्थापत्याला व येथील बौध्द केंद्रांना ओहोटी लागली. भाजे, कोंढाणे व पितळखोरे यासारख्या स्थळी हे सातत्य काही काळ टिकून राहिले, तर जुन्नर, नाशिक आणि कान्हेरी येथील लेण्यात मूर्ती आल्या व त्यांचा वापर चालूच राहिला.

शेवटच्या टप्प्यात, म्हणजे इ. स. १०० ते इ. स. ३०० या काळात टिकून राहिलेल्या बौध्द केंद्रांबरोबरच काही नवीन केंद्रे उदयाला आली आणि त्यांनी या टप्प्यातील लयनस्थापत्याला गती दिली. कोकण भागात उदयाला आलेली

ही नवी स्थळे या भागात झालेल्या बौध्द धर्माच्या प्रसाराची द्योतक आहेत. हा कालखंड एकंदरित बौध्द धर्माला मिळालेला आश्रयही दाखवितो.

शेवटच्या टप्प्यातील (इ. स. १०० ते इ. स.. २००) विहारांची चर्चा करण्यापूर्वी बेडसे येथील आगळयावेगळया विहाराचा (लेणे क्र. ११) उल्लेख करणे आवश्यक आहे. या लेण्याचा तलविन्यास फारच निराळा आहे. पुढचा भाग व त्यामागे चापाकृती मंडप असा त्याचा ढोबळ तलविन्यास आहे. पुढच्या भागाचा मुखभाग पडून गेलेला असला तरी त्याचे एकंदरित स्वरूप गजपृष्ठाकार छत असलेल्या चैत्यगृहाच्या व्हरांडयासारखे आहे असा निष्कर्ष काढण्याइतपत अवशेष टिकून आहेत. या व्हरांडयाच्या बाजूच्या दोन्ही टोकांना प्रत्येकी दोन असे एकूण चार कक्ष आहेत. मंडप ५.५० मीटर रुंद आणि ९.९० मीटर खोल आहे. मंडप बिनखांबी ( astyler ) असून त्याच्या बाजूच्या भिंतीमध्ये प्रत्येकी तीन क्रक्ष आहेत. चापाकार किंवा मागील अर्धवर्तुळाकार भागात तीन कक्ष आहेत. म्हणजेच मंडपात एकूण ९ कक्ष आहेत. सकृतदर्शनी प्रत्येक कक्षांत दोन भिक्षूंच्या राहण्याची सोय आहे. कक्षांची द्वारे नाशिक, भाजे, पितळखोरे येथील कक्षाच्या द्वारासारखीच आहेत. द्वारावर कमान असून कमानीच्या आतील भागावर जालनक्षी आहे. या जालभागावर एकावर एक अशा तीन कमानी आहेत. दरवाजावरील कमानी त्यांच्या तळभागाजवळ कठडयाच्या नक्षीने जोडलेल्या आहेत. त्याचप्रमाणे कमानीवरची टोकेही अशाच अर्धउठावात कोरलेल्या कठड्यांनी जोडलेली आहेत. या कमानींची वरची टोके जोडणारे कठडयाचे अलंकरण सोडले तर मंडपातील भिंतीचे दृश्य औरंगाबाद येथील लेणे क्र. ४ चा तुलापट्ट अलंकृत करणा-या स्थपतीच्या मनात असावे.

**इ. स. १०० नंतरचे विहार** : इ. स. च्या पहिल्या शतकाच्या अखेरीस महाराष्ट्राला राजकीय स्थैर्य लाभले. त्याकाळी पार्थियन, यवन आणि शक यांसारखे लोकही येथे स्थायिक झाले. त्याकाळातील विहार म्हणजे पुढे व्हरांडा असलेली छोटी खोली आणि एकाच व्हरांडयाभोवती असलेल्या काही खोल्या या प्रकाराबरोबरच छोटया मंडपाच्या मागे किंवा बाजूला असलेली छोटी खोली ( cell ) आणि तत्सम इतर प्रकारही आले. नाशिक येथील लेणे क्र. १० व ३ आणि जुन्नर (गणेश लेण) येथील विहार सर्वाधिक उल्लेखनीय आहेत.

नाशिक येथील लेणे क्र. १० चा मुखभाग अत्यंत सुंदर आहे. हा मुखभाग चार पूर्णस्तंभ आणि दोन भित्तिसंलग्न स्तंभ यांनी बनला आहे. हे स्तंभ काली

आणि भाजे येथील चैत्यगृहात आढळणाऱ्या स्तंभांसारखेच असून त्यांचा स्तंभघटकक्रमही तसाच आहे. पाय-यायुक्त पिरॅमिडसारख्या आकाराचा घटक, त्यावर तळखडा, त्यावर अष्टकोनी खांब, त्यावर घंटाशीर्ष, आमलकयुक्त चौरस, त्यावर पाय-यायुक्त उलटा पिरॅमिड आणि या सगळयाच्या वर हत्तीवर किंवा घोडयावर बसलेले स्वार (animal riders) असा हा घटकक्रम आहे. बाजूच्या दोन्ही टोकांवर प्रत्येकी एक कक्ष असलेला व्हरांडा ११.४० मीटर रुंद आणि २.८० मीटर खोल आहे. व्हरांडयाच्या मागील भिंतीत मंडपात जाण्यासाठी तीन द्वारे आहेत. मधल्या द्वाराच्या दुतर्फा, प्रत्येक बाजूस एक अशा दोन खिडक्या आहेत. मंडप साधारणतः चौरसाकृती असून (१३.६० मीटर रुंद आणि १३.९० मीटर खोल) त्याच्या तीन भिंतीमध्ये प्रत्येकी सहा अशा एकूण १८ छोटया खोल्या किंवा कक्ष आहेत. मंडपाच्या बाजूच्या भिंतीच्या वरच्या भागात आणि त्याचप्रमाणे व्हरांडयाच्या बाजूच्या भिंतीवर शिलालेख आहेत. या शिलालेखांमध्ये हे लेणे उषवदातची पत्नी आणि क्षत्रप नहपानाची कन्या दक्षमित्रा हिने खोदविले असे म्हटले आहे. त्याचप्रमाणे या लेण्याची निर्मिती (लेणे क्र. १०) नहपानाच्या ४२ व्या वर्षी झाली ही मौलिक माहितीही या शिलालेखामधून मिळते.

नाशिक येथील लेणे क्र. ३ चे स्वरूपही विहार असेच आहे. या लेण्याचा तलविन्यासही ढोबळमानाने लेणे क्र. १० सारखाच असला तरी त्यात काही फरक आहे. अ) मंडपात जाण्यासाठी तीन प्रवेशद्वारांऐवजी दोनच प्रवेशद्वारे ब) व्हरांडयातील तिसरे प्रवेशद्वार मंडपात न उघडता मंडपाच्या उजव्या भिंतीतील कक्षाला लागून असलेल्या कक्षात उघडणे, यासारख्या वास्तुशास्त्रीय वैशिष्टयांमुळे (किंवा लेणे क्र. १० च्या किंवा विहाराच्या सामान्यपणे आढळणाऱ्या तलविन्यासापेक्षा असलेल्या वेगळेपणामुळे) हे लेणे दोन टप्प्यात नव्हे तर किमान तीन टप्प्यात खोदले गेले असावे अशा निष्कर्षाप्रत विद्वान आले आहेत. गौतमीपुत्र सातकर्णी, त्याची माता गौतमी व त्याचा पुत्र वासिष्ठीपुत्र पुळुमावी या तिघांचेही वेगवेगळया वर्षी खोदलेले शिलालेख या अनुमानास पुष्टी देतात. या लेण्याच्या मुखभागाचे लेणे क्र. १० शी बरेच साम्य असून त्यातील स्तंभांचा घटकक्रमही अष्टकोनी खांब, घंटाशीर्ष, आमलकयुक्त चौरसाकृती घटक, त्यावर स्वारशिल्प आणि त्यावर कठडा असाच आहे. तथापि या लेण्यामध्ये आणि क्र. १० च्या लेण्यामध्ये काही फरकही आहेत. व्हरांडयाकडे जाणाऱ्या पायऱ्यांच्या दोन टोकांवर स्वतःच्या बाहूंवर तुळई पेलणाऱ्या कीचकमूर्ती आहेत. त्यावर आणि व्हरांडयाच्या वरच्या पातळीवर मुखस्तंभाना पेलणारे

कक्षासन आहे. कक्षासनाच्या बाह्यांगावर कठडयाची नक्षी कोरली आहे. कक्षासनाच्या कठडयाच्या स्तंभाच्या खालच्या भागावर अर्ध कमलपत्रांची नक्षी आहे. व्हरांडयातील स्तंभांना, कुंभांना पेलणारे पायऱ्यायुक्त पिरॅमिड नाहीत. तुळईच्या तळभागाचा समावेश असलेल्या व कठडयाचे कोरीवकाम असलेल्या पट्टावर तुळईभागाच्या वर पशुपट आहे. हा असा पट नंतरच्या सातवाहन राजांच्या काळात विकसित झालेल्या अमरावती येथील शिल्पात बऱ्याचदा आढळतो.

व्हरांडयाच्या मागील भिंतीत असलेल्या प्रवेशद्वाराच्या खांबांवर विसावलेले मोठे तोरण आहे. या तोरणावर आयताकार पट्टांमध्ये एकावर एक अशा मिथुनमूर्ती कोरल्या आहेत. द्वाराच्या खांबांवरील द्वारपालांचा एक हात वर असून त्यावर मकरतोरण पेलले आहे, तर दुसऱ्या हातात कमलपुष्पांचा गुच्छ आहे. उभे सिंह आणि स्त्रीमूर्तींच्या शिल्पांनी मकरतोरण अलंकृत करण्यात आले आहे. मंडपाच्या मागील भिंतीत मधोमध असणाऱ्या दोन कक्षांच्या द्वारांच्या मध्ये असलेल्या भिंतभागावर भक्तजन स्तूपाची पूजा करीत आहेत असे दृश्य अर्धउठावात कोरले आहे. हे वैशिष्टय लेणे क्र. ३ प्रमाणेच लेणे क्र. १० मध्येही आढळते. तथापि लेणे क्र. ३ चा अंतर्भाग लेणे क्र. १० पेक्षा पुढीलप्राणे दोन तऱ्हेने निराळा आहे. अ) लेणे क्र. ३ मध्ये कक्षद्वाराच्या पातळीवर सर्व भिंतींवर आणि मंडपाच्या मुखभागावर बसण्याची बाके आहेत. लेणे क्र. १० मध्ये अशी बाके नाहीत. ब) लेणे क्र. ३ मध्ये एकूण १८ छोटया खोल्या किंवा कक्ष आहेत (मंडपाच्या मागील भिंतीत सहा, डाव्या भिंतीत पाच आणि उजव्या भिंतीत सात), तर लेणे क्र. १० मध्ये फक्त १६ कक्ष आहेत (मंडपाच्या मागील भिंतीत सहा, डाव्या भिंतीत पाच आणि उजव्या भिंतीत पाच) यापूर्वी नमूद केल्याप्रमाणे लेणे क्र. ३ च्या व्हरांडयाच्या मागील भिंतीत तीन द्वारे असली तरी डावीकडचे द्वार मंडपात न उघडता या कक्षात उघडते. -याउलट लेणे क्र. १० च्या व्हरांडयाच्या दोन टोकांना प्रत्येकी एक असे समोरासमोर असलेले एकूण दोन कक्ष आहेत.

**मंडप**[११] : मंडप हे स्थापत्याचे आणखी एक स्वरूप आहे. मंडपाची संख्या अगदी अत्यल्प असली तरी ते या काळातील लयनस्थापत्यात आढळतात. तथापि, सध्या शिल्लक असलेल्या तत्कालीन मंडपांच्या संख्येवरून, तेव्हाच्या एकूण मंडपांच्या संख्येबाबत अंदाज बांधणे चुकीचे ठरेल. नंतरच्या काळातील (इ. स. चे तिसरे व चौथे शतक), व विशेषतः कान्हेरी येथील विहाराच्या

प्रांगणात आढळणा-या खांबांकरता असलेल्या खाचा किंवा खड्ड्यांवरून याविषयी अनुमान करता येते. लेण्यांच्या आवारात यात्रेकरूंच्या आणि प्रवाशांच्या निवा-यासाठी झावळ्या किंवा झाडांच्या फांद्यांची छते असलेले हे लाकडी खांबांचे मंडप गरजेनुसार वेळोवेळी उभारण्यात येत. अशा मंडपांचा उपयोग भोजनगृह म्हणूनही करण्यात येत असे. नागराजू यांनी मंडपांचे वर्गीकरण[१२] बसण्याचे कट्टे असलेले मंडप, आणि बसण्याचे कट्टे नसलेले मंडप अशा दोन प्रकारात केले आहे. सर्वात प्राचीन मंडपाचा एक नमुना नाशिक येथील प्राचीन विहाराजवळ असलेल्या लेणे क्र. २१ मध्ये आढळतो. नाणेघाटजवळील लेणे क्र. ११ लौकिक कामासाठी वापरले जात होते असे दिसते. काळाच्या गरजेमुळे इ. स. च्या पहिल्या शतकानंतर मंडप उभारणीच्या उपक्रमांना जोर आला असे नागराजू यांचे मत आहे. ह्या लेण्यांमध्ये वर्षभर राहणा-या भिक्षूंच्या संख्येत झालेली वाढ आणि त्या अनुषंगाने त्यांना अन्न वस्त्र व औषधे पुरविण्याची गरज या आवश्यक बाबींमुळेही मंडप उभारणीला चालना मिळाली असावी. जुन्नर येथील एका शिलालेखात (शिवनेरी लयनसमूहातील लेणे क्र. ६४), चित्ता येथील यवनाने भिक्षुसंघाकरता भोजनमंडप उभारल्याचा उल्लेख आहे. नागराजू यांच्या मते कान्हेरी येथील लेणे क्र. २३ यात आहे. तर गणेशपहाड येथील लेणे क्र. २१ व २३ चा वापर भोजनमंडप म्हणून केला जात होता. भाजे, बेडसे, कोंढाणे या लयनकेंद्रांमध्ये मंडप असून ते लयनसमूहाच्या अगदी टोकावर असत. असे मंडप खोदण्याचे उपक्रम इ. स. च्या दुस-या आणि तिस-या शतकापर्यंत चालू राहिले.

या काळातील लयनस्थापत्याशी संबंधित असलेली इतर वास्तुशास्त्रीय स्वरूपे सौंदर्यशास्त्रीय दृष्टिकोनातून फारशी महत्त्वाची नसली तरी ती बौध्द, भिक्षूंच्या धार्मिक रिवाजांवर आणि जीवनपध्दतीवर प्रकाश टाकतात. ही वास्तुशास्त्रीय वैशिष्टये त्या स्थळाच्या सर्वांगीण अभ्यासाची, उदाहरणार्थ ह्या लेण्यांमधील भिक्षुसंख्येचा अंदाज घेणे यासारख्या बाबींची उपयुक्त साधने ठरू शकत असल्याने त्यांचे महत्त्व कमी लेखता येणार नाही. ही इतर वास्तुशास्त्रीय स्वअंगे म्हणजे पोढी, आसनपिटीका आणि कोढी. लेण्याचाच भाग असलेली, दगडात खोदलेली बाके म्हणजे आसनपिटीका. अशा आसनपिटीका जुन्नर व कान्हेरी लेण्यांमध्ये आढळतात. (उदा. कान्हेरी येथील लेणे क्र. ९९ हे लेणे "सागरपलोकन" म्हणूनही ओळखले जाते.) लेण्यांमध्ये जमिनीपासून ६० ते ७० सें.मी. उंचीवर असलेली ६० सें.मी. ते १ मीटर उंच आणि रुंद ३८ ते ५० सें.मी. खोल आकाराची देवकोष्ठे म्हणजे कोढी. महाड येथील लेणे क्र. २७ मध्ये आत

कोरीव स्तूप असलेल्या अशा प्रकारच्या "चेतीय कोढीचा" उल्लेख आहे. म्हणजेच लेण्यांमधील जी देवकोष्ठे आज रिक्त आहेत त्यात एकेकाळी दगड, धातू, किंवा लाकडासारख्या नाशिवंत माध्यमात बनविलेल्या सुट्या पूजावस्तू असण्याची दाट शक्यता आहे. नागराजू यांना जुन्नर येथील शिवनेरी, मानमोडी आणि गणेशपहाड लयनसमूहांमध्ये आणि बेडसे, भाजे, महाड आणि कान्हेरी येथील लेण्यांमध्ये अशा कोढ्या आढळल्या आहेत.[१३] डॉ. म. गो. दीक्षित यांना कान्हेरी येथील लेण्यात पाल शैलीत कोरलेली एक प्रज्ञा पारमिता सापडली होती.[१४]

**पोढी** : पोढी म्हणजे पाण्याची टाकी. अशी पोढी विहाराच्या प्रवेशद्वाराजवळ किंवा लयनसमूहात स्वतंत्र जागी आढळते. सुरुवातीच्या बौध्द आणि ब्राह्मनी लेण्यांजवळ अशा त-हेच्या पोढया आढळतात. लेणी बहुधा पाण्याच्या झऱ्याजवळ किंवा टेकडीच्या घळीतील धवधब्याजवळ आढळतात. बौध्द धार्मिक ग्रंथांमधूनही आदर्श लेणी म्हणून अशाच लेण्यांचे उल्लेख आढळतात.[१५] किंबहुना सुरुवातीची लेणी केवळ वर्षावासासाठी (भिक्षूंच्या पावसाळयातील निवासासाठी) खोदली गेली असल्यामुळे त्यात पाण्याच्या टाक्या नव्हत्या. भिक्षूंचे वास्तव्य या लेण्यांमध्ये पावसाळ्यातच असल्यामुळे अशा पाण्याच्या टाक्यांची गरजही नव्हती. पोढ्यांचा उल्लेख अनेक शिलालेखांमध्ये आढळतो आणि अनेक ठिकाणी त्या आढळतातही. मात्र सुरुवातीच्या लेण्यांमध्ये त्यांचा अभाव अगदी तीव्रतेने जाणवतो. (अजिंठा येथील सुरुवातीची लेणी, विरार येथील जीवधन लेणी, जुन्नर येथील तुळजा लेणे, कोंढाणे आणि भाजे येथील लेणी). याउलट जुन्नर येथील शिवनेरी व गणेशपहाड लयनसमूह, कुडा व कान्हेरी यासारख्या नंतरच्या लयनकेंद्रांमध्ये पोढया मोठ्या संख्येने आढळतात. अ) पिण्याचे पाणी साठवण्याची टाकी, पाणिपोढी किंवा पाणपोढी. ब) अंघोळीचे पाणी साठवण्याची टाकी न्हाणपोढी. अर्थातच दुस-या प्रकारच्या टाक्या आकाराने खूपच मोठ्या म्हणजे १ ते २ मीटर खोली असलेल्या आणि लांबी १ ते १० मीटर असलेल्या आहेत. नागराजूंनी पाणपोढ्यांचे दोन प्रकार पाडले आहेत. अ) भूपृष्ठावर साधे चौरसाकृती तोंड असलेल्या पाणपोढया, व ब) आयताकार प्रवेश भागात चौरसाकृती तोंड असलेल्या पाणपोढया. प्रस्तरलेखीय पुराव्यासह इतर अनेक पुराव्यांवरून नागराजू अशा निष्कर्षाप्रत पोचले आहेत की "अ" प्रकारच्या पाणपोढया हीनयान टप्प्याच्या सुरुवातीच्या काळातील (हा काळ त्यांच्या मते इ.स.पू. पहिले शतक) ते इ.स.चे पहिले शतक असून त्यांची मूळ संकल्पना टेकडीवरून वाहणार पावसाचे पाणी गोळा करण्याची आहे तर "ब" हा प्रकार पाण्याचे प्रदूषण

टाळण्यासाठी आणि टाकीत पडण्याचा धोका टाळण्यासाठी इ. स. च्या दुस-या शतकात विकसित झाला.[१६]

## महायान लयन स्थापत्य

महत्त्वाच्या स्थळांमध्ये मिळणा-या पुराव्यांवरून बौध्द धर्माचे हीनयान पंथातून महायान पंथात आणि पुढे वज्रयान पंथात स्थित्यंतर घडून आले असल्याचे अगदी सहजपणे लक्षात येते. अगदी साध्यासोप्या भाषेत विशद करावयाचे झाल्यास पूजास्थळाशी निगडित असलेल्या काही विशिष्ट पूजनीय घटकांच्या किंवा पूजाविषयांच्या उपस्थितीवरून किंवा अगदी अभावावरूनही वरील मुद्दा स्पष्ट होतो. सुरुवातीच्या टप्प्यांमधील शैलगृहांमध्ये बुध्दाच्या मूर्ती आढळत नाहीत.[१७] याउलट नंतरच्या बौध्द शैलगृहांमध्ये अगदी विहारांमध्येही बुध्द आणि बोधिसत्त्वाच्या मूर्ती मोठया प्रमाणावर आढळतात आणि बौध्द धर्माच्या शेवटच्या टप्प्यात, म्हणजे वज्रयानपंथी लेण्यांमध्ये, सिध्दैकवीर आणि महाचंडरोषण यांसारखे वैशिष्टयपूर्ण देव आढळतात. कान्हेरी येथील लेणे क्र. ३ च्या प्रांगणातील स्तंभावर आढळणाऱ्या दोन बुध्दमूर्तीवरून महायान पंथाचे महाराष्ट्रात आधीच आगमन झाले होते असा निष्कर्ष काढल्यास वावगे ठरणार नाही. हे कान्हेरी येथील लेणे (क्र. ३) हीनयान संप्रदायाचे आहे असे विद्वानांचे मत आहे आणि ते बरोबरही आहे. तथापि महाराष्ट्रातील बौध्द धर्माच्या पहिल्या टप्प्यातील महाराष्ट्राभर आढळणाऱ्या लेण्यांमध्ये, अगदी स्तूपाच्या अंडभागावर नाही पण तुलनेने नगण्य महत्त्व असलेल्या स्थानी सापडलेली ही पहिली बुध्दमूर्ती आहे ही बाब निश्चितपणे महत्त्वाची आहे. स्थित्यंतराच्या प्रक्रियेला सुरुवात झाली होती एवढाच त्याचा अर्थ आहे. या मूर्तीव्यतिरिक्त इतर वास्तुशास्त्रीय घटकांमध्येही हे स्थित्यंतर सूचित झालेले आढळते. कान्हेरी येथील लेणे क्र. ५०, ७४ आणि ७९ या हीनयान टप्प्याच्या अखेरीस खोदण्यात आलेल्या लेण्यांमध्ये[१८] मुख्य प्रवेशद्वाराच्या समोरच मंडपातील मागच्या भिंतीत कमानयुक्त देवकोष्ठे आढळतात. कान्हेरी येथील लेणे क्र. ३१ व कार्ले येथील लेणे क्र. ४ येथे मिळणा-या पुराव्यावरून या देवकोष्ठांमध्ये बुध्दमूर्ती असाव्यात असे मानण्यास जागा आहे. हे स्थित्यंतर सूचित करणारी आणखी एक महत्त्वपूर्ण बाब म्हणजे विहार लयनस्थापत्यात घडून आलेला बदल होय. नाशिक येथील क्र. ३ व १० च्या लेण्यांचे आणि जुन्नर येथील लेण्याद्री समूहातील गणेश लेणे या लेण्यांचे व पोहाळे येथील विहाराचे अजिंठा येथील महायान लेण्यांशी खूपच साधर्म्य आहे. एकाअर्थी असे स्थित्यंतर अनपेक्षित नाही, कारण महाराष्ट्रामध्ये महायान पंथाच्या वाढीस अनुकूल असलेले अवरसेलीयासारखे उपपंथ हीनयान संप्रदाय[१९]

ते महायान संप्रदाय यामध्ये सुमारे २०० ते ३०० वर्षांचा खंड होता असे मानले जात असे. अजिंठा येथील महायान लेण्यांचे अभ्यासक प्रा. स्पिंक यांनी अजिंठा येथील लेण्यांवर अभ्यासपूर्ण लेख लिहिले आहेत. त्याच्या मते अजिंठा येथील प्रारंभीची लेणी (लेणे क्र. ८, ९, १०, १२, १३) आणि वाकाटक काळात खोदण्यात आलेली महायान लेणी यांमध्ये सुमारे पाच ते सहा शतकांचे अंतर आहे. प्रा. स्पिंक यांनी अजिंठा येथील महायान लेण्यामधील कला ही हीनयान काळातील उत्कृष्ट नमुना असलेल्या कार्ले लेण्यातील कलेपेक्षा खूपच निराळी कशी आहे हे पध्दतशीरपणे स्पष्ट केले आहे. कालदृष्ट्या सांगायचे तर शैलगृहस्थापत्य हे नेहमीच तत्कालिन बांधीव मंदिराचे अनुकरण होते. म्हणूनच अजिंठा आणि वेरूळ येथे लयनस्थापत्याला अचानक आलेल्या बहराचे श्रेय, या मधील काळात विटा आणि लाकूड यांच्या सहाय्याने बांधण्यात येणा-या बांधीव मंदिरस्थापत्यामध्ये घडून आलेल्या विकासास जाते. या विकसित बांधीव स्थापत्याचेच लेण्यांमध्ये अनुकरण झाले आहे. अर्थात हेही शक्य आहे की, सुमारे एक शतकभर लयनस्थापत्याच्या उभारणीस ओहोटी लागली असावी आणि या काळात लाकूड आणि विटांच्या बांधीव स्थापत्याची भरभराट होऊन हया विकसित झालेल्या बांधीव स्थापत्याचे अजिंठा येथील शैलगृहांमध्ये अनुकरण झाले असावे. किंबहुना उत्तर-हीनयान लयनस्थापत्य यज्ञश्री सातकर्णीबरोबर (अंदाजे काळ इ. स. २०० ) थांबले नाही तर कोकणातील स्थानिक प्रमुखांच्या आश्रयाखाली चालूच राहिले (कुडा आणि महाड येथील लेणी याची द्योतक आहेत) हे आता सर्वमान्य झाले आहे. अगदी आडमार्गास असलेले शेलारवाडीचे लेणे आणि कान्हेरीसारखे लयनसमृध्द स्थळ याबाबत भारंभार पुरावे देतात.[२०] खुद्द अजिंठा येथील, पुरावे प्रा. स्पिंक मानतात त्याप्रमाणे सर्वच महायान लयननिर्मितीचा प्रारंभ इ. स. ४६६ (किंवा इ. स. ४६२) ला झाला नाही याची साक्ष देतात. प्रा. ढवळीकर यांनी 'मधु' या ग्रंथातील त्यांच्या लेखात [२१] अजिंठा येथील लेणे क्र. ७ हे अजिंठा येथील पहिले महायान लेणे असून ते, हीनयान ते महायान या स्थित्यंतराचे प्रतिनिधित्त्व करते असे मत मांडले आहे. पुरातत्त्वीय दृष्टिकोनातून अद्यापही पुरेसे सर्वेक्षण न झालेले विदर्भातील लयनस्थापत्यही[२२] अजिंठा येथील महायान स्थापत्याच्या विकासावर प्रकाश टाकण्यासाठी पूरक ठरते. किंबहुना अकोला जिल्हयातील पातूर (हे ठिकाण हरिषेणाची राजधानी असलेल्या वत्सगुल्मपासून, म्हणजेच सध्याच्या वाशीमपासून फारसे दूर नाही) येथील लेणे हे निश्चितपणे हरिषेणपूर्वकालातील वाकाटक लेणे आहे.[२३]

महायान लेण्यांची मुख्य केंद्रे पुढीलप्रमाणे आहेत १) अजिंठा घटोत्कच आणि बनौती २) औरंगाबाद, ३) कान्हेरी, ४) नाशिक, ५) वेरूळ, ६) कोंदिवटे, ७) मागाठाणे व ८) भांदक येथील विंझासन (जिल्हा चंद्रपूर). या ठिकाणी महायानपंथी चैत्यगृहे आणि विहार खोदले गेले. मुळात हीनयानपंथी असलेल्या पण नंतर महायान प्रभावाखाली आलेल्या व नंतर महायानपंथी लोकांनीच वापरलेल्या लेण्यांचा किंवा स्थळांचा येथे आवर्जून उल्लेख केला पाहिजे. जुन्नर, कार्ले आणि पितळखोरे ही यापैकी काही स्थळे आहेत. या ठिकाणी शैलगृहांच्या व्हरांड्यांमध्ये, स्तंभांवर, मंडपाच्या भिंतीवर आणि बऱ्याचदा चैत्यगृहांमध्येही (उदा. पितळखोरे आणि अजिंठा) महायान तलविन्यासाशी असंगत असणारी फक्त मूर्तिशिल्पेच नाहीत तर लेण्यांमधील पाखभागात बुध्द आणि बोधिसत्त्वांची रंगीत चित्रेही आढळतात. लयनस्थापत्याच्या पध्दतशीर अभ्यासाचा ज्यांनी पाया घातला आणि सगळ्यात महत्त्वाचे म्हणजे, या प्रकारच्या स्थापत्याचे (लयनस्थापत्याचे) कालानुक्रम आणि विकासावर आधारित गोषवारावजा चित्र उभे केले त्या फर्ग्युसन आणि बर्जेस यांनी महाराष्ट्रातील महायान लयनस्थापत्याचा कालानुक्रम पुढीलप्रमाणे दिला आहे.

| | |
|---|---|
| १) अजिंठा आणि | - इ. स. २५० ते ६५० |
| घटोत्कच | - इ. स. ५०० ते ६०० |
| २) औरंगाबाद | - इ. स. ६०० ते ७०० |
| | इ. स. चे सातवे शतक |
| ३) वेरूळ | - इ. स. ४५० ते ७०० |
| ४) कान्हेरी आणि मागाठाणे | - इ. स. १५० ते ८५० |

महाराष्ट्रातील सर्वात आधीची आणि शेवटची महायान लयननिर्मिती कान्हेरी आणि कान्हेरीच्या परिसरात झाली असे फर्ग्युसन आणि बर्जेसचे मत आहे. महाराष्ट्राबाहेर असलेली पश्चिम भारतातील महायान लेणी असलेली स्थळे पुढीलप्रमाणे आहेत. अ) गुजरातमधील जुनागढ येथील अपर्क (इ. स. ३००), (ब) मध्य प्रदेशातील धार जिल्ह्यातील बाघ[२४] (इ. स. ३५० ते ४५०), (क) राजपुतान्यातील ढांक (इ. स. ७००) आणि धमनेर व (ड) मध्य प्रदेशातील खोलवी (इ. स. ७००).

नाशिक आणि कान्हेरी येथील लेणी हीनयान ते महायान टप्प्यांमधील लयननिर्मितीच्या सलगतेची साक्ष देतात[२५] मात्र पण महाराष्ट्रातील लेण्यांचा

कालानुक्रम ठरविण्याच्या दृष्टिकोनात मात्र मिराशी यांच्या प्रस्तरलेखांबाबतच्या संशोधनामुळे बदल घडून आला. प्रा. वा. वि. मिराशी यांनी महाराष्ट्राच्या इतिहासातील तीन महत्त्वाच्या राजवंशाच्या प्रस्तरलेखांवर मौलिक संशोधन केले. कलचुरी आणि वाकाटक ही तीन महत्त्वाची राजघराणी होत. वाकाटक नृपतींनी इ. स. च्या आठव्या शतकात राज्य केले असे या शतकाच्या तिसऱ्या दशकापर्यंत, मानले जात असे, आणि त्यामुळे अजिंठा येथील मुख्य लेणी (लेणी क्र. १६, १७ व १९ आणि जिंजाला किल्ल्याच्या नजिक असलेले घटोत्कच लेणे ही लेणी इ. स. च्या आठव्या शतकातील आहेत असा विद्वानांचा ग्रह झाला. साहजिकच ही लेणी भारताच्या सुवर्णयुगातील कला व स्थापत्यातून वगळली गेली[२६]. त्याचप्रमाणे लेणे क्र. १ मधील बदामीच्या पुलकेशी द्वितीयच्या दरबारात इराणचा सम्राट खुमरो याचा राजदूत आला आहे असे दाखविणारे पट आणि रंगचित्रामुळे लेणे क्र. १ व २ ही लेणीही पूर्वचालुक्यकाळातील आहेत असे मानले गेले होते. लेणे क्र. २६ मधील शिलालेख पुराभिलेखशास्त्रदृष्टया इ. स. च्या ८ व्या शतकातील ठरल्यामुळे ते लेणे आणि अजिंठा येथील शेवटचा टप्पा राष्ट्रकूटकालीन समजण्यात आला. प्रा. वा. वि. मिराशी यांनी त्यांचे वाकाटकांवरील संशोधन (५) पाचव्या दशकात या शतकाच्या १९४०-५० प्रसिध्द केले. त्यात त्यांनी अजिंठा येथील महत्त्वाच्या लेण्यांचा (लेणे क्र. १६, १७, १९ आणि घटोत्कच लेणे) कालखंड स्पष्टपणे दाखवून दिला आहे. त्याचप्रमाणे वाकाटक साम्राज्याच्या विघटनाचा इतिहास उभा करण्यासाठी व हरिषेणाच्या राज्याच्या सीमा शोधण्यासाठी संस्कृत कवी दंडीच्या "दशकुमारचरितम्" वर आधारलेला एक अभ्युपगमही मांडला आहे.

डॉ. मिराशी यांनी केलेल्या शिलालेखांच्या अभ्यासावर एक स्वतंत्र खंडच प्रसिध्द केला आहे. कलचुरी राजघराण्याची प्राचीनता इ. स. च्या सहाव्या शतकाच्या सुरुवातीपर्यंत जाते आणि विष्णुकुंडिन माधवसेनाप्रमाणेच या राजघराण्याच्या संस्थापकानेही वाकाटक राजकन्येशी लग्न केले होते असे अनुमान काढता येईल हे त्यांनी या अभ्यासाच्या आधारावर दाखवून दिले. या सर्व पुराव्यांवरून कलचुरी नृपति हे उत्तर आणि किनारपट्टीच्या भागात, महाराष्ट्रात वाकाटकांचे राजकीय वारस होते असा ते निष्कर्ष काढतात.

अजिंठा येथील लेणी ही तत्कालिन राजपुत्र, राजदरबारी आणि राजदरबारात वजन असलेले भिक्षू यांची निर्मिती आहे. या उल्लेखनीय व्यक्तींनी केलेले पवित्र कर्म शिलालेखांद्वारे अमर झाले आहे. हे सर्व अगदी काटेकोर कालखंडाच्या कालानुक्रमात बसल्याने त्याआधारेच महायान लेण्यांचा काल आणि कालानुक्रम ठरवण्यात आला आहे.

प्रा. वॉल्टर स्पिंक यांनी प्रा. वा. वि. मिराशींनी प्रस्तावित केलेल्या कालानुक्रमाचा आणि विशेषत्वाने वाकाटक साम्राज्याचे विघटन आणि कलचुरींचा उदय याबाबतच्या अभ्युपगमाचा काळजीपूर्वक अभ्यास करून मध्य प्रदेश आणि महाराष्ट्रातील महायान लेण्यांच्या कालानुक्रमाची पुनर्मांडणी केली. वाकाटक नृपति हरिषेण आणि त्याचा प्रधान वराहदेव यांच्या काळातील राजकीय घडामोडी, त्यानंतरच्या काळात त्याच्या पुत्राने केलेला सर्व राजवैभवाचा त्याग, अश्मक आणि कुंतल प्रांतांच्या राजांकडून त्याच्या दुबळया मुलाचा पराभव झाल्यामुळे त्याची सून, नातू आणि नात यांची झालेली दुर्दशा आणि त्यांचे महिष्मतीला पलायन, त्याच्या नातीचे महिष्मतीच्या राजपुत्राशी झालेले लग्न या सर्व घटना स्पिंक यांच्या मते इ. स. ४६२ ते ५१०.या काळात घडल्या. या राजकीय पार्श्वभूमीवर प्रा. स्पिंक घारापुरी, जोगेश्वरी, मंडपेश्वर आणि वेरूळ येथील पाशुपत लेण्यांचे स्पष्टीकरण देतात. त्यांनी अजिंठा, घटोत्कच, बाघ, औरंगाबाद आणि वेरूळ येथील पुराव्यावरून कलेतिहास उभारणीचा प्रयत्न केला आहे. वरील स्थळीं घडून आलेल्या महायान लयनस्थापत्य व कलेचा मागोवा घेऊन जोगेश्वरी, मंडपेश्वर, घारापुरी आणि वेरूळ येथील बौध्द लेणी, आणि उत्तरवाकाटककालीन महायान लेणी यांमध्ये कलेतिहासिक दृष्टया सलगता आहे असे मत त्यांनी मांडले आहे. त्याचप्रमाणे कलचुरींच्या बौध्द आणि हिंदू स्थापत्यकलेचा आणि एकंदरित कलचुरी कलेचा दख्खनमधील प्रारंभीच्या चालुक्य कलेवर प्रभाव पडला आहे असेही मत त्यांनी मांडले आहे. अशा रितीने, बर्जेसने " केव्ह टेंपल्स ऑफ इंडिया " या ग्रंथात महायान कलेचा साधारणपणे इ. स. १५० ते इ. स. ७५० हा प्रस्तावित केलेला कालखंड प्रा. स्पिंक यांनी अडीच शतकात म्हणजे सुमारे इ. स. ४६५ ते ६०० असा पुनर्घटित केला आहे.

प्रामुख्याने कान्हेरी आणि नाशिक येथे मिळणा-या पुराव्यावरून आपण जर हीनयान ते महायान हे स्थित्यंतर सावकाशपणे झाले असे मानले तर या कालखंडाच्या सुरुवातीचा काळ कमी होतो. थोडक्यात सांगायचे तर, सर्वात शेवटच्या महायान लेण्याचा काळ इ. स. ६०० ठरतो, तर नाशिक, कान्हेरी आणि लोणाड यासारख्या लेण्यांच्या लयनकारांना स्फूर्ती देणा-या अजिंठा आणि औरंगाबाद येथील महत्त्वाच्या वाकाटक लेण्यांचा कालखंड इ. स. ४६५ ते ५०० म्हणजे फक्त ३५ वर्षांचा, म्हणजेच फक्त दोन पिढयांचा ठरतो. यातून पुढील चित्र प्रगट होते :-

बौध्द भिक्षूंचा हीनयान स्वरूपाचा धार्मिक आचार नकळतपणे नव्या धार्मिक स्वरूपाच्या आचारात रूपांतरित होत गेला. हे आचाराचे नवे धार्मिक स्वरूप महायान स्वरूपाच्या धर्माचरणाशी मिळतेजुळते होते. हे चालू असलेले रूपांतर

कान्हेरी आणि नाशिक येथील पुराव्यांमध्ये प्रतिबिंबित झाले. इ. स. च्या ५ व्या शतकाच्या उत्तरार्धात हरिषेणाच्या राजाश्रयाखाली खोदण्यात आलेल्या विहार आणि चैत्यगृहांमध्ये हे स्थित्यंतरशील स्वरूप जाणवते. नंतर अजिंठा आणि औरंगाबाद येथे हेच महायान वास्तुशास्त्रीय स्वरूपांमध्ये आणि रंगचित्रांमध्ये बहरले. त्यांचे पडसाद नाशिक आणि कान्हेरी येथील समानधर्मी केंद्रांमध्ये उमटून त्याचा पुष्कळ विकासही झाला. त्यानंतर महाराष्ट्रामध्ये या पंथाला ओहोटी लागल्याचे दिसते. वेरूळ आणि कान्हेरी येथील महायानपंथाने वज्रयान पंथास वाट मोकळी करून दिली. रत्नागिरी जिल्हयातील पन्हाळे काझी येथे एक नवे वज्रयान केंद्र उदयाला आले. पण या केंद्राचा अपवाद वगळला तर महाराष्ट्रात वज्रयानपंथ फारसा फोफावला नाही.

कान्हेरी, नाशिक, मागाठाणे, अजिंठा, घटोत्कच, औरंगाबाद, बनौती या महायान केंद्रातील वास्तुशास्त्रीय निर्मितीचा आढावा घेणे आवश्यक आहे. त्याचप्रमाणे चंद्रपूर जिल्ह्यातील विंझासन आणि रत्नागिरी जिल्हयातील पन्हाळे काझी ही महाराष्ट्रातील दोन टोकांवर असलेली महायान लेणीही आपण विचारात घेणार आहोत.

**नाशिक** : नाशिक येथील त्रिरश्मी डोंगरावरील बौध्द स्थळ (पांडू लेणी) हे अत्यंत महत्त्वाचे महायानकेंद्र होते. तेथील विहार याची साक्ष देतात. मुळात पाच किंवा सहा भिक्षूंकरताच असलेल्या विहारांचे तलविन्यास बदलण्यात आले, आणि भिंतींवर अनेक मूर्तिशिल्पे आली. लेणे क्र. २, ४, १५, १६ लेणे क्र. ९ व १० यांच्या मधल्या भागात असलेले छोटे लेणे आणि कदाचित क्र. २१ चे लेणे (आज हेच लेणे क्र. २३ क्रमांकाचेही मानले जाते.) ही लेणी अशा विहार ते लयनमंदिर स्थित्यंतराची उदाहरणे आहेत. सध्याचे क्र. २३ चे लेणे काहीसे ओबडधोबड असून लेण्यासमोर पाण्याच्या टाक्या आहेत. एका भिंतीवर बरीच महायान शिल्पे कोरलेली असून या लेण्यात तलविन्यासाशी विसंगत अशी तीन-चार मंदिरे कोरलेली आहेत. अशाप्रकारे ही हीनयान भिक्षूंची वसाहत हळूहळू महायान वसाहत बनत होती असे दिसून येते किंवा हीनयान संप्रदायाच्या अनुयायांवर हळूहळू महायान सिध्दांतांचा प्रभाव पडत चालला होता असेही दिसून येते.

नाशिक येथे स्थित्यंतराची दोन स्पष्ट लक्षणे आढळतात. यातील पहिले लक्षण लेणे क्र. ३ व १० मध्ये आढळते. ही दोन्ही लेणी " विहार " यास्वरूपाची असून त्यामधील मागील भिंतीत पूजावस्तू असलेला स्तूप कोरला

होता. पुढे या स्तूपाचे अजिंठा येथील काही लेण्यांप्रमाणे मंदिरात रूपांतर होऊन त्यावर मूर्तिशिल्पही आले. वर उल्लेख केलेली ही दोन लेणी हे स्थित्यंतर किंवा रूपांतर स्पष्टपणे दाखवितात. या स्थित्यंतराचे दुसरे आणि अधिक महत्त्वाचे लक्षण लेणे क्र. २० मध्ये आढळते. यात मूळ तलविन्यासात केलेला बदल स्पष्टपणे जाणवतो. या लेण्याचा मूळ तलविन्यास लेणे क्र. ३ व १० सारखाच होता. लेण्याला ३ व १० क्रमांकाच्या लेण्यांप्रमाणे मध्ये व कडेला असे एकूण दोन दरवाजे असून लेण्यामधील बाजूच्या भिंतींमध्ये प्रत्येकी सहा छोटया खोल्या आहेत. मात्र ३ व १० क्रमांकाच्या लेण्यांमध्ये नसलेले आणि या लेण्यात नव्याने अंतर्भूत करण्यात आलेले वास्तुघटक म्हणजे दोन स्तंभ व दोन अर्धस्तंभ यांनी बनलेले अंतराल आणि त्यामागे असलेले गर्भगृह हे होत. या गर्भगृहात मागील भिंतीत मधोमध प्रलंबपादासनातील बुध्द असून त्याच्या प्रत्येक बाजूस एक असे एकूण दोन बोधिसत्त्व दाखविले आहेत. यापैकी एक पद्मपाणि बोधिसत्त्व आहे. हीनयान विहार महायान लेण्यामध्ये रूपांतरित करण्यात आल्याचे हे अगदी बोलके उदाहरण आहे.

त्याचप्रमाणे लेणे क्र. १७ या संदर्भात महत्त्वाचे आहे. हे लेणे "चैत्य लेणे" असे स्वरूप असलेल्या लेणे क्र. १८ नजिक असून स्तंभमुखी व्हरांडा, बाजूच्या दोन भिंतीपैकी एका भिंतीत चार तर दुस-या भिंतीत दोन खोल्या व कोढी असे स्वरूप असलेला मंडप आणि त्यामागे लेणे क्र. २० प्रमाणे दोन स्तंभ आणि दोन अर्धस्तंभांनी बनलेले अंतराल व सर्वात मागे गर्भगृह असा या लेण्याचा तलविन्यास आहे. हे लेणे व विशेषतः त्याचा गर्भगृहाचा भाग अपूर्णावस्थेत सोडून दिल्यामुळे लयनकारांचा गर्भगृहात स्तूप खोदण्याचा हेतू होता की मूर्ती कोरण्याचा हे केवळ तर्कानेच जाणावे लागते. शिवाय एका भिंतीत दोन छोटया खोल्यांच्या ऐवजी कोढी आहे. कोढीच्या लंबआयताकार देवकोष्ठामध्ये एक सुटी मूर्ती असण्याची शक्यता आहे. ही सुटी मूर्ती बहुदा निपण्णमुद्रेतील बुध्दाची असावी. या लेण्यातील शिलालेखनुसार हे लेणे " भिक्षूंचा चैत्ययुक्त आवास "आहे. लेण्यातील गर्भगृहात (अब्भिंतरम्) चेतीय म्हणजे स्तूप किंवा मूर्ती या स्वरूपाची पूजावस्तू होती. लेणे क्र. ३ व १० मधील पुराव्यावरून खुद्द विहारातच पूजावस्तू असण्याची प्रथा आधीपासूनच अस्तित्वात असल्याचे लक्षात येते. अशीच प्रथा बांधीव विहारातही दिसून येते. शिवराममूर्ती यांनी पूर्व दख्खनमधील अशा विहाराचे वर्णन केले आहे. या विहारातील प्रांगणात एकमेकाभिमुख असलेली चापाकार मंदिरे चतु:शाल प्रांगणात बसविलेली दाखविली आहेत.[२७]

**कान्हेरी :** कान्हेरी हे प्राचीन महाराष्ट्रातील एक महत्त्वाचे बौध्द केंद्र असून इथे भिक्षुसंघाची परंपराही प्रदीर्घ काळ, म्हणजे निदान इ. स. च्या दुस-या शतकापासून ते इ. स. च्या दहाव्या शतकापर्यंत होती. या ठिकाणी मृत भिक्षूंच्या स्मृतिप्रीत्यर्थ खोदीव स्तूपांच्या स्वरूपात स्मारके उभारण्याची पध्दत होती. या दृष्टिकोनातूनही कान्हेरी येथील बौध्द केंद्र उल्लेखनीय आहे. ज्याप्रमाणे भाजे येथे सुप्रसिध्द महा आचार्यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ खोदीव स्तूपांचा एक समूहच कोरण्यात आला. तद्वतच कान्हेरी येथेही " स्मारक "स्वरूपाचे अनेक स्तूप आढळतात. इथे खोदीव आणि बांधीव अशा दोन्ही प्रकारचे स्तूप आढळतात. डॉ. शोभना गोखले यांनी अलीकडेच प्रसिध्द केलेल्या संशोधनपर पुस्तकात इ. स. च्या चौथ्या आणि पाचव्या शतकातील बांधीव स्तूपांवर आणि येथे वास्तव्य केलेल्या बौध्द आचार्यांच्या ज्ञानक्षेत्रातील आणि आध्यात्मिक यशाच्या तपशिलांवर प्रकाश टाकला आहे. येथे असलेल्या शिलालेखांमधील बहुतांश शिलालेख पेटिकाशीर्ष ब्राह्मी लिपीत आहेत हे येथे आवर्जून नमूद केले पाहिजे. ही बाब महत्त्वाची आहे कारण अजिंठा येथील महायान लेण्यातील शिलालेखही याच प्रकारच्या ब्राह्मी लिपीत खोदले आहेत. हे शिलालेखांच्या लिपीतील साधर्म्य कान्हेरी येथील महायान भिक्षूंचा अजिंठासारख्या इतर महायान केंद्रातील भिक्षूंशी निकट संपर्क असल्याचे सूचित करते.[२८]

लेणे क्र. ९, १०, १२, २१ आणि ६६ (हे क्रमांक बर्जेसप्रणीत आहेत.) ही महायान शैलगृहे उल्लेखनीय आहेत. उदा. क्र. २१ च्या शैलगृहात अद्वितीय असे एकादशमुखी अवलोकितेश्वराचे शिल्प अवलोकितेश्वराच्या महाभयशिल्पपटासह कोरले आहे. क्र. ६४, ६६ आणि ६७ ही लेणीही मूर्तिशिल्पांनी समृध्द असून, त्यात अनेक महायान दृश्ये किंवा विषय कोरले आहेत. याच काळात क्र. ३ च्या चैत्यलेण्यात मूळ तलविन्यासाशी असंगत अशा बुध्द आणि बोधिसत्वाच्या मूर्ती कोरल्या गेल्या. या भागामध्ये प्रातिनिधिक स्वरूपाच्या काही महत्त्वाच्या महायान लेण्यांचेच विवेचन करावयाचे आहे. ही विवेचनार्थ निवडलेली लेणी इ. स. च्या ५-६ व्या शतकांमध्ये त्रैकूटक आणि कलचुरींच्या राजाश्रयाखाली खोदली गेली.

लेणे क्र. ७८ हे एक उल्लेखनीय शैलगृह आहे. दोन भित्तिसंगत स्तंभ आणि दोन पूर्णस्तंभ असलेला स्तंभमुखी व्हरांडा, मंडप आणि मागे मूर्तियुक्त खोली असा या लेण्याचा तलविन्यास आहे. हा तलविन्यास ब्राह्मणी लेण्याच्या तलविन्यासाशी साधर्म्य असणारा असल्याने लक्षणीय आहे. या लेण्यालगत असलेल्या लेण्याचा तलविन्यासही असाच आहे. त्यात प्रथम स्तंभमुखी व्हरांडा,

त्यामागे उजव्या भिंतीत एक खोली असलेला मंडप आणि त्यामागे स्तूपयुक्त विशाल गर्भगृह आहे. या लेण्याचे उल्लेखनीय वास्तुशास्त्रीय वैशिष्ट्य म्हणजे त्यातील स्तंभांवर असलेला १६ पन्हाळी ( flutes ) असलेला पट्ट. हे लेणे बहुधा इ. स. च्या ६ व्या शतकाच्या सुरुवातीस कोरले गेले असावे.[२९]

तलविन्यासदृष्ट्या आणखी एक महत्त्वाचे लेणे म्हणजे लेणे क्र. १४ सर्वात पुढे मंडप, त्यामागे अर्धस्फुट ( incepient ) अंतराल आणि त्यामागे गर्भगृह असा हया लेण्याचा तलविन्यास आहे. आजमितीला हे गर्भगृह रिकामे असल्यामुळे त्यात पूजावस्तू म्हणून स्तूप होता की मूर्ती होती हे सांगता येणे कठीण आहे. मंडपातील भिंतींवर बुध्दाची आणि बोधिसत्त्वांची उंच मूर्तिशिल्पे आहेत, त्यामुळे ही लेणी निश्चितपणे महायान आहेत. हे लेणे त्याच्या तलविन्यासामुळे उल्लेखनीय आहे. त्यात दोन स्तंभ आणि दोन अर्धस्तंभांद्वारे अंतराल मंडपापासून अलग केले आहे.[३०]

या काळातील लेण्यांपैकी सर्वात उल्लेखनीय लेणे म्हणजे लेणे क्र. १०. हे लेणे " दरबार लेणे " या नावाने प्रसिध्द आहे. पुढे व्हरांडा, त्यामागे खूपच मोठा मंडप आणि या मंडपाच्या मागील भिंतीत सात आणि डावीकडील भिंतीत तीन अशा एकूण दहा खोल्या असा या लेण्याचा तलविन्यास आहे. मंडपाच्या तीनही भिंतीत छोटया खोल्या असलेल्या इतर विहारांपेक्षा हे लेणे निराळे आहे. दोन कोरीव कट्टे आणि मागे असलेले गर्भगृह यावरून या लेण्याचा वापर नेहमीपेक्षा निराळया कारणासाठी अथवा उपासकांसाठी होत असावा हे उघड आहे. ठराविक कालावधीनंतर होणा-या भिक्षूंच्या सभेसाठी या लेण्याचा वापर होत असावा. वेरूळ येथील लेणे क्र. ५ हे अशाच प्रकारचे लेणे आहे. किंबहुना हे लेणे अजिंठा येथील लेणे क्र. २० शी खूपच मिळतेजुळते आहे असे बर्जेसचे मत आहे. लेण्याच्या व्हरांडयात आठ अष्टकोनी स्तंभ असून, बर्जेसच्या भाषेत सांगायचे तर "ते तळखडा आणि शीर्षविरहित आहे."आतील स्तंभ वर आणि खाली चौरसाकृती असून त्यालगत मध्ये पन्हाळी ( Fluted ) घटेचा आकार धारण करणा-या वर्तुळाकृती घटकांनी युक्त आहेत. सर्वात वर साधे सपाट हस्तशीर्ष आहेत.[३१]

**कोंदिवटे :** कोंदिवटे लयननिर्मितीच्या सुरुवातीच्या काळातील चैत्यगृहाकरिता प्रसिध्द असलेल्या कोंदिवटे येथे महायान संप्रदायाचे विहारही आहेत. चैत्यगृहाच्या दक्षिणेकडे एक लेणे आहे. हे लेणे ४.२७ मीटर रुंद व ७.३२ मीटर खोल आहे. पुढे व्हरांडा व त्यामागे कोरीव स्तूप असलेला मंडप असा त्याचा तलविन्यास आहे. व्हरांड्याला कक्षासन आहे तर मंडपातील स्तूप भिंतीतच कोरलेला आहे.

लेण्यालगत पाण्याचे टाके आहे. लेण्याच्या मागील भिंतीत पदस्थलावर असलेल्या कोरीव स्तूपाभोवती अर्धवर्तुळाकृती रेषेत खाचा खोदलेल्या आहेत.

आधी उल्लेखिलेल्या सुप्रसिध्द चैत्यगृहाच्या अगदी जवळच आणखी एक उल्लेखनीय विहार आहे. या विहाराला पुढच्या भागात चार स्तंभांवर पेललेला व्हरांडा असून, त्याच्या एका बाजूला भिंतीत एक छोटी खोली खोदलेली आहे. व्हरांड्याच्या मागील भिंतीत, त्यामागे असणा-या मंडपात प्रवेश करण्यासाठी तीन द्वारे आहेत. मंडपाची पुढची भिंत सोडल्यास उरलेल्या तीन भिंतीत प्रत्येकी एक दालन खोदले आहे. ही दालने प्रत्येकी दोन स्तंभांमुळे मंडपापासून अलग झाली आहेत. दोन बाजूंच्या भिंतींमध्ये दालनाव्यतिरिक्त एकूण तीन छोट्या खोल्या खोदलेल्या आहेत. आणखी एका विहाराचा आधी पीठ, पीठावरूनच थोडे पुढे गेल्यावर दोन स्तंभांचा स्तंभमुखी व्हरांडा व त्यामागे मंडप, व्हरांड्यातून मंडपात जाण्यासाठी व्हरांड्याच्या मागील भिंतीत तीन द्वारे असा तलविन्यास आहे. मंडपाच्या मधोमध चार स्तंभ किंवा चतुष्की आहे.

ह्या विहारांचा तलविन्यास याआधीच वर्णन केलेल्या इतर महायान विहारांच्या तलविन्यासांशी खूपच मिळताजुळता असून, हे विहार इ. स. ५ व्या ६ व्या शतकात खोदले गेले असावेत.[३२]

**अजिंठा, औरंगाबाद आणि वेरूळ** : येथील महायान टप्प्यातील सर्वात महत्त्वाची लयननिर्मिती निर्विवादपणे अजिंठा येथेच झाली. अजिंठा येथील २९ लेण्यांपैकी लेणे क्र. ८, ९, १०, १२ व १३ या शैलगृहांचा अपवाद वगळता बाकीची सर्व २४ लेणी महायान संप्रदायाची आहेत. या काळात इतर कोणत्याही स्थळी लयननिर्मिती इतक्या मोठया प्रमाणात बहरली नाही. हा बहर एका सलग कालखंडातच आला असण्याची दाट शक्यता असल्यामुळे विद्वानाना या लेण्यांचा एकंदरित लयनस्थापत्याच्या विकासाचा मागोवा घेण्यासाठी आणि विशेषत: तलविन्यास, गवाक्ष व स्तंभ, शिल्पात्मक आणि अलंकरणात्मक प्रयोजनांचा किंवा त्यांच्या विकासाचा मागोवा घेण्यासाठी खूपच उपयोग झालेला आहे.

येथे असलेल्या या लेण्यांपैकी काही लेणी अपूर्णावस्थेत आहेत हे खरे आहे. परंतु ही लेणी अभ्यासाच्या दृष्टीने अडचण न ठरता स्थपती आणि शिल्पकारांचे धोरण आणि पध्दती समजून घेण्याच्या दृष्टिकोनातून त्यांनी अभ्यासासाठी थोडा फार हातभार लावला आहे.

प्रा. स्पिंक यांनी या लेण्यांचा अनेक वर्षे अभ्यास केला आहे. त्यांनी कालानुक्रमाच्या अनेक अंगांचा साकल्याने अभ्यास करून व ही अंगे सर्व

दृष्टिकोनातून लक्षात घेऊन कलेतिहासिक, पुरातत्त्वीय, पुराभिलेखीय आणि लिखित पुराव्यांच्या आधारे अजिंठा येथील महायान लेणी, महत्त्वाच्या चार लेण्यांमधील (लेणे क्र. १, २, १६ व १७) रंगचित्रे, वरकरणी मूळ तलविन्यासाशी व मूर्तिस्थलयोजनेशी आगंतुक किंवा विसंगत वाटणारी मूर्तिशिल्पे, या सर्व बाबी इ. स. ४६५ ते इ. स. ५०० या ३५ वर्षांच्या काळात पूर्ण झाल्या असा निष्कर्ष काढला आहे. किंबहुना अगदी अलीकडेच अधिक संशोधन करून त्यांनी हा कालखंड इ. स. ४६२ ते इ. स. ४८० असा फक्त १८ वर्षांचा असल्याचा सिध्दांत मांडला आहे. सकृतदर्शनी हा अभ्युपगम जरी अस्वीकारार्ह वाटला तरी काही मर्यादेत आणि थोडे फेरफार करून हा शक्य मानता येते. अजिंठा येथील बहुतांशी महायान लेणी, म्हणजे लेणे क्र. १६, १७, १९ व २६ आणि अजिंठापासून फार दूर नसलेले घटोत्कच लेणे ही हरिषेणाचा मांडलिक आणि त्याचा प्रधान वराहदेव यांच्या निर्मिती आहेत हे लक्षात घेतले तर वरील अभ्युपगमातील तथ्यांश लक्षात येईल. निराळया शब्दांत सांगायचे तर ही लेणी अवघ्या दोन पिढयांच्या काळात कोरण्यात आली आहेत.

**अजिंठा :** प्रा. स्पिंक यांच्या मते लेणे क्र. ६ चा खालचा मजला, लेणे क्र. १७, २ व २१ तसेच घटोत्कच लेणे व औरंगाबाद येथील लेणे क्र. १ व ३ ही लेणी विहार स्थापत्यातील मुख्य टप्पे दाखवितात, तर अजिंठा येथील लेणे क्र. १९ व २६ महायान लयनस्थापत्यातील वाकाटककालीन चैत्यगृहांचा विकास स्पष्ट करतात.

लेणे क्र. १९ : अजिंठा येथील लेणे क्र. १९ आणि लेणे क्र. १७ एकाच वेळी खोदली गेली. १७ क्रमांकाचे लेणे ऋषीक प्रांताच्या राजाने खोदले आहे. हा राजा हरिषेणाचा मांडलिक असून सध्या खानदेश या नावाने ओळखल्या जाणा-या प्रदेशावर त्याचे राज्य होते. हा प्रदेश त्याकाळी ऋषिक या नावाने ओळखला जाई याचे स्पष्टीकरण मिराशी यांनी दिले आहे. सध्याचा खानदेश किंवा त्याकाळचा ऋषीक प्रदेश हरिषेणाने त्याच्या कारकीर्दीच्या सुरुवातीलाच जिंकला होता हे या संदर्भात नमूद केले पाहिजे. थाळनेर येथे सापडलेल्या हरिषेणाच्या कारकीर्दीच्या पाचव्या वर्षी कोरलेल्या ताम्रपटावरून ही माहिती मिळते. लेणे क्र.१७ मधील दान नमूद करणा-या शिलालेखात या लेण्याचा उल्लेख एकाश्मक मंडप असा केला असून त्यात गंधकुटीचा संदर्भ आहे. (गंधकुटीम् उदाराम) म्हणजे या चैत्यगृहाकरिता असलेली प्रशस्त गंधकुटी.

या चैत्यगृहाचा तलविन्यास उत्तर सातवाहनकालीन चैत्यगृहांच्या

तलविन्यासापेक्षा निराळा नाही. किंबहुना कान्हेरीतील अशा प्रकारच्या चैत्यगृहांप्रमाणे समोर प्रांगण, आणि चैत्यगृहालगतच्या प्रांगणाला लागून असलेल्या भिंतींमध्ये चैत्यगृहाच्या प्रत्येक बाजूस एक अशी एकूण दोन मंदिरे आहेत. या दोन्ही मंदिरांचा तलविन्यास सारखाच असून आधी एक दालन आणि त्याला लागून एक छोटी खोली असा या मंदिरांचा तलविन्यास आहे. चैत्यगृहाला चैत्यकमानीने युक्त असा भव्य मुखभाग आहे. चैत्यगवाक्षाच्या दोन्ही बाजूस एकावर एक मजले असल्याप्रमाणे कमानीच्या प्रतिकृती कोरल्या आहेत. त्यामुळे ही वास्तू अनेक मजली असल्याचा भास होतो. चैत्यगवाक्षाच्या दुतर्फा अनुचरांसमवेत असलेले यक्ष दाखविले आहेत. यक्षांच्या डोक्यावर छत्र आहे. ही मूर्तिशिल्पे आणि अर्धमडपाच्या वामनभिंतीवरील शिल्पे या मुखभागाला वेगळाच उठाव देतात. ही शिल्पे वाकाटक शैलीतील आहेत असे म्हणता येईल. मुखभागाच्या भिंतीच्या खालच्या भागावर चार शिल्पपट असून त्यात गौतम बुध्दाच्या जीवनातील प्रसंग दाखविले आहे. (यशोधरेच्या घरी भिक्षेसाठी गेलेला बुध्द, दीपंकर जातकातील दृश्य आणि स्तूपाखाली उभा असलेला बुध्द). या वर वर्णिलेल्या मूर्तिस्थलयोजनेमुळे हे चैत्यगृह आधीच्या टप्प्यातील चैत्यगृहांपेक्षा अनेक तऱ्हेने निराळे आहे.

हे चैत्यगृह ७.३२ मीटर रुंद, १४.०३ मीटर खोल आणि ७.४२ मीटर उंच आहे. १५ स्तंभांच्या रांगांनी मध्यायत बनला आहे. पुढे आणखी दोन जादा स्तंभ आहेत. चैत्यगृहाचा स्तूपयुक्त चापाकार भाग मंडपासारख्या भागापासून वेगळा दाखविण्यासाठी स्तूप भागाच्या आधी दुतर्फा येणाऱ्या स्तंभांवर खांबाला रेलून उभी असलेली भक्तांची शिल्पे आहेत. खुद्द स्तूप चौरसाकृती पीठावर असून पीठाला चारी बाजूंना निर्गम आहेत. या पीठावर वृत्तचितीच्या आकाराचा अंड आहे. वृत्तचितीसारख्या भागाभोवती वेदिका असून वेदिकेच्या स्तंभावर उष्णीष दाखविले आहे. (उष्णीषशीर्ष). या स्तूपाचा वृत्तचितीआकाराचा आणि अंडाचा भाग पूर्वीच्या हीनयान चैत्यगृहातील स्तूपाच्या वृत्तचिती व अंड भागापेक्षा वेगळा आहे. या स्तूपावर उभी बुध्दमूर्ती कोरली असून, तिच्या दोन्ही बाजूस अर्धउठावात कोरलेले स्तंभ असून त्यावर मकरतोरण पेललेले आहे. अंडभागावर चार पन्हाळयुक्त (fluted) स्तंभावर स्तूपिका असून या स्तूपिकेवर चार दिशांना चार अशा बसलेल्या बुध्दमूर्ती आहेत. स्तूपिकेवर हर्मिका आणि त्यावर कळस आहे. या हर्मिकेतील सर्वांत वरची दोन छत्र चार कीचकांनी पेलली आहेत तर सर्वांत खालची दोन छत्र वरदमुद्रेतील देवी मूर्तीवर पेललेली आहे. तुळयांच्या फासळयांनी युक्त असलेले गजपृष्ठाकार छत आणि तुलापट्ट आधीच नमूद

केल्याप्रमाणे मध्यायत बनवणा-या पंधरा स्तंभांवर पेललेले आहेत. हे स्तंभ गणांची शिल्पे असलेला चौरस तळखडा, त्याच्या वर आधी अष्टकोनाकृती व नंतर अलंकरणात्मक पट्टांनी युक्त असलेला गोल किंवा पन्हाळयुक्त खांब, त्यावर कुंभ आणि सर्वात वर हस्तशीर्ष असा घटकक्रम असलेले आहेत. तुलापट्टावर आयताकार व चौरस पट्ट आलटून पालटून आहेत. या पटांच्या मधल्या भागात लतेचे अलंकरण आहे. तुलापट्टावरील आयताकृती पटावर उभ्या, तर चौरसाकृती पटांमध्ये बसलेल्या बुध्दमूर्ती दाखविल्या आहेत. प्रदक्षिणापथाचे आणि मध्यायताच्या आधीच्या आयताकृत्ती भागाचे छत रंगचित्रांनी सजविण्यात आले होते.

कालानुक्रमदृष्टया स्तूपावरच भगवान बुध्दाचे शिल्प असलेला आणि तुलापट्टावर त्याच्या प्रतिकृती असलेले हे पहिले महायान चैत्यगृह आहे. स्तूपासमोर बुध्दमूर्तीची मिरवणूक काढणारे दाखविले आहेत. आणखी एक वैशिष्टयपूर्ण बाब म्हणजे या लेण्याचे मुखभागापासून ते गजपृष्ठाकार छताच्या फासळयांपर्यंतचे सर्व वास्तुघटक दगडातच कोरले आहेत. अशा प्रकारे लाकडी स्थापत्य ते दगडी स्थापत्य ही रूपांतराची प्रक्रिया या लेण्याच्या रूपाने पूर्ण झालेली आढळते.

**लेणे क्र. २६ :** या चैत्यगृहात एक प्रदीर्घ शिलालेख आहे. या शिलालेखातून हे लेणे अश्मक राजाच्या दरबारात खूप वजन असलेल्या बुध्दभद्र नामक भिक्षूने खोदले असून अश्मक राजाशी त्याची अनेक जन्मांची मैत्री होती अशी माहिती मिळते. हया चैत्यगृहाचे लेणे क्र. १९ या चैत्यगृहाशी ब-यापैकी साधर्म्य आहे. लेण्यासमोर प्रांगण असून प्रांगण ओलांडल्यावर खुद्द चैत्यगृहापेक्षा अधिक रुंद असलेला व्हरांडा लागतो. या व्हरांड्याच्या दोन बाजूच्या भिंतीत मंदिरे खोदली आहेत. व्हरांड्याला पुढच्या भागात एकेकाळी चार स्तंभ होते. म्हणजेच चार स्तंभांचा स्तंभमुखी व्हरांडा असे त्याचे स्वरूप होते. व्हरांड्याच्या छतावर भव्य चैत्यगवाक्ष आहे. त्याच्या दोन बाजूस प्रत्येकी एक छत्र होते. या प्रत्येक छत्राखाली बुध्दमूर्ती आहे. छत्रे ज्यावर विसावली आहेत ते स्तंभ आणि गवाक्षाच्या दोन्ही कडच्या बाजू यांच्या मधल्या भागात, गवाक्षाच्या प्रत्येक बाजूस एक अशा एकूण दोन यक्षमूर्ती आहेत. या सान्याच्या वर चैत्यकमानीच्या दोन्ही बाजूस मंडपांची रांग कोरलेली असून त्यात बुध्दमूर्ती आहेत. चैत्यगृहात जाण्यासाठी व्हरांडयाच्या मागील भिंतीत मधोमध एक मोठे आणि त्याच्या दुतर्फा दोन छोटी अशी एकूण तीन द्वारे आहेत. हे वैशिष्टय लेणे क्र. १९ पेक्षा निराळे आहे.

खुद्द चैत्यगृह ११.७८ मीटर रुंद, २०.६८ मीटर खोल आणि १०.१८ मीटर उंच आहे. म्हणजेच हे लेणे, लेणे क्र. १९ पेक्षा अधिक विशाल आणि आकर्षक आहे. चैत्यगृहातील मध्यायत पुढच्या दोन स्तंभांव्यतिरिक्तच्या २६ स्तंभांनी बनला आहे. या स्तंभांचा घटकक्रम थोडयाफार फरकाने लेणे क्र. १९ मधील स्तंभांच्या घटक - क्रमासारखाच आहे. फरक एवढाच की चौरसाकृती तळखडयाऐवजी त्यांचा तळखडा अनेक पृष्ठभाग असलेला आहे आणि पन्हाळयुक्त वर्तुळाकृती खांबांवर तीन आडवे पट्ट असून त्यातील एक पट्ट मौक्तिकजालाने तर उरलेले दोन पट्ट मरकतमाणिक्य, प्रयोजनाने अलंकृत करण्यात आले आहेत. खांबावर पन्हाळयुक्त पूर्णकुंभ असून त्यावर दोन हस्त असलेले शीर्ष आहे. या चैत्यगृहातील तुलापट्ट बुध्दमूर्तीयुक्त चौकटींचाच असला तरी त्याची पार्श्वभूमी मंदिराच्या मंडोवरासारखी, म्हणजे पुढे आलेला " निर्गम " भाग आणि त्याला लागून आत गेलेला भाग (प्रवेश) असे घटक आलटून पालटून येऊन बनलेली आहे. निर्गमभागावर उभे बुध्द तर प्रवेशभागावर बसलेले बुध्द दाखविले आहेत आणि या सर्व प्रवेश निर्गमयुक्त ओळीच्या वरच्या भागात वरवंडीची मालिका आहे.

खुद्द स्तूपाला वर्तुळाकृती पाया असून त्यावरील खालच्या भागात नेहमीचे थर आहेत. अंडाचा घुमटाकार भाग दोन भागांमध्ये विभागला गेला आहे. त्यावर छोटया स्तंभांची रांग असून दोन स्तंभांच्या मधील भागात बुध्द आणि बोधिसत्त्व दाखविले आहेत. स्तूपाच्या पुढच्या भागावर स्तंभावर पेललेले छत्र असून स्तंभांच्या मध्ये आणि छत्राच्या खाली सिंहासनावर प्रलंबपादासनात बसलेला बुध्द दाखवला आहे. त्याचे हात धर्मचक्रप्रवर्तन मुद्रेत असून त्याच्या पदासनाचे स्वरूप पुराणकथेतील दोन नागमूर्तींनी धारण केलेले कमळ असे आहे. घुमटाच्या गोलाकारावर हर्मिका व उत्तरोत्तर आकार कमी होणारी छत्रे आहेत. या छत्रांच्या मधल्या भागात हातात पुष्पगुच्छ घेतलेली गंधर्व- युगुले दाखविली आहेत. स्तूपाच्या खालच्या चौरसाकृती भागावर लेणे क्र. १९ प्रमाणेच बोधिसत्त्वाबरोबर असलेल्या बुध्दमूर्ती आहेत. लेणे क्र. १९ मधील स्तूपाप्रमाणेच याही स्तूपाच्या पायाजवळ एका बाजूवर तीन भक्तांच्या मूर्ती आहेत.

यावरून लेणे क्र. २६ आणि लेणे क्र. १९ यांमध्ये जरी वास्तुशास्त्रीय दृष्ट्या बरीच साम्यस्थळे असली तरीही स्थापत्यशास्त्रदृष्टया आणि अधिक ठळकपणे मूर्तिशास्त्रदृष्ट्या त्यात बरेच भेदही आहेत हे आपल्या लक्षात येईल. टेकून उभ्या असलेल्या बुध्दाचे महाकाय मूर्तिशिल्प आणि अनेक बुध्दपट असलेल्या

प्रदक्षिणापथाच्या भिंतींवरून हा मुद्दा अधिक स्पष्ट होईल. हे महाकाय मूर्तिशिल्प आणि बुध्दपट या बाबी नंतरच्या काळात अंतर्भूत केलेल्या म्हणजेच " फेरफाराच्या कालखंडातील " असण्याची शक्यता आहे.

**वेरूळ येथील चैत्यगृह** (ता. खुल्दाबाद, जि. औरंगाबाद) : वेरूळ येथील चैत्यगृह अजिंठा येथील महायान संप्रदायाच्या चैत्यगृह गटातच मोडते. पण इ. स. च्या ७ व्या शतकाच्या उत्तरार्धात खोदलेले हे शेवटचे उदाहरण चैत्यगृहाच्या वास्तुशास्त्रीय घटकांचा आणि मूर्तिशास्त्रीयदृष्ट्या झालेला विकास दाखवते. हे चैत्यगृह (वेरूळ येथील लेणे क्र. १०) अजिंठा येथील लेणे क्र. २६ पेक्षा आकाराने मोठे आहे. हे चैत्यगृह १३.११ मीटर रुंद, २६ मीटर खोल आणि १०.३७ मीटर उंच आहे. मुख्य जाणवण्याजोगा फरक म्हणजे या लेण्याचे सीमा-भिंतयुक्त प्रांगण आजही बऱ्यापैकी टिकून आहे.[३३] बर्जेसने त्यावर लेखन करून बराच कालावधी उलटून गेल्यानंतरही हा सुरुवातीचा किंवा प्रवेश भाग सूचित करणारे बरेच काही शिल्लक आहे. या प्रांगणाच्या तीन बाजूस बारा स्तंभावर पेललेला स्तंभमुखी व्हरांडा आहे. मुखभागालगत असलेल्या व्हरांडयाच्या बाजूला दोन्ही कडेला प्रत्येकी एक मंदिर खोदले असून या मंदिरालगतच बाजूला व्हरांडयाशी सलग असे आणखी एक दालन आहे. आतील चापाकार चैत्यगृह मध्यायत आणि पाख या वास्तुघटकात विभागले गेले आहे. सर्वात पुढे असलेले दोन स्तंभ वगळता एकूण २६ स्तंभांनी पाख मध्यायतापासून विभक्त केले आहेत. हे २६ स्तंभ साधे अष्टकोनी असून त्यांच्या वरच्या अंगावर एक पट्टा (ड्ड्वड्ड) असून त्यावर छत्रीखाली बसलेल्या बुध्दमुर्तीचा असलेला तुलापट्ट पेललेला आहे. त्या तुलापट्टाच्या वर आणि गजपृष्ठाकार छपराच्या दगडी फासळयांच्या रुंदीच्या पाया भागावर अंजली मुद्रा धारण केलेले भक्त दाखविले आहेत. मध्यायताच्या मागे ८.२३ मीटर उंचीचा स्तूप आहे. या स्तूपाच्या दर्शनी अंगावर असलेला बुध्दमूर्तियुक्त भाग ५.१८ मीटर उंच आहे. स्तूपाचा व्यास ४.७२ मीटर असून त्याचा वृत्तचितीसारखा भाग बराच उंच आहे. त्यावर अंडाचा अर्धगोलाकृती किंवा घुमटाकार भाग आहे. स्तूपावर असलेला यष्टिभाग आज शिल्लक नाही. हा स्तूप औरंगाबाद येथील लेणे क्र. १९ व २६ मधील स्तूपांपेक्षा निराळा आहे. यात स्तूपाखाली असणारा चौरसाकृती भाग त्यावरील निर्गम आणि प्रवेशांमुळे तारकाकृती बनला आहे. हा भाग समकालीन मंदिरांच्या मंडोवरासारखा असून त्यावर छज्जाही दाखविला आहे. स्तूपाच्या दर्शनी भागावर असलेल्या भागात खाली पीठ असून त्यावर सिंहासनावर बसलेला बुध्द दाखविला आहे. पीठावर आणि सिंहासनाखाली चंद्रशिला आहे.

बुध्दाच्या प्रत्येक बाजूस एक बोधिसत्त्व दाखविला आहे. बुध्दाच्या डोक्यावर कमान असून कमानीत वरच्या भागात बोधिवृक्ष दाखविलेला असून त्यावर आकाशात उडणारे गंधर्व-युगुल दाखविले आहे. खुद्द बुध्द सिंहासनावर प्रलंबपादासनात बसलेला असून त्याचे हात धर्मचक्रप्रवर्तन मुद्रेत आहेत.

या चैत्यगृहाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे त्याच्या पहिल्या मजल्यावरील कठड्याच्या मागे असलेला मुखभाग. तिथे जाण्यासाठी बाजूला व्हरांड्यातून जिना आहे. या मुखभागाचे चैत्यगवाक्ष इतर लेण्यांच्या चैत्यगवाक्षापेक्षा निराळे आणि लहान आकाराचे आहे. सकृतदर्शनी खालची दोन टोके अर्धस्तंभांवर पेलली गेली आहेत असे वाटणा-या चैत्यगवाक्षाला स्तंभांवर पेललेले प्रस्तरपाद (architrave) असून वरच्या वर्तुळाकृती झरोक्याचा आकार नंतरच्या काळातील बांधीव मंदिरांच्या शूरसेनकासारखा आहे. चैत्यगवाक्षाच्या दोन्ही बाजूस धार्मिक शिल्पपटाबरोबरच शिखरयुक्त मंडप दाखविले आहेत. या मंडपांची शिखरे उल्लेखनीय आहेत कारण त्यामुळे त्याकाळात दख्खनमध्ये समकाळात उभारण्यात येणा-या शिखरांचा मागोवा घेता येतो.

## विहार स्थापत्य

अजिंठा, औरंगाबाद आणि वेरूळ येथील विहारांमध्ये वास्तुशैलीदृष्टया खूपच साधर्म्य आहे. वेरूळ येथील विहार (विशेषतः "दो ताल" आणि "तीन ताल" या नावाने ओळखली जाणारी क्र. ११ व १२ ची लेणी) त्यात आढळणा-या वैशिष्टयपूर्ण वास्तुशास्त्रीय आणि मूर्तिशास्त्रीय विकासामुळे महत्त्वाचे आहेत. या लेण्यांचा सखोल अभ्यास करणा-या प्रा. स्पिंक यांच्या मते अजिंठा आणि वेरूळ येथील विहार-स्थापत्याचा विकास समजून घेण्याकरिता अजिंठा येथील लेणे क्र. ६ (खालचा मजला), आणि २१, घटोत्कच लयनसमूहातील विहार लेणे आणि औरंगाबाद येथील लेणे क्र. ७ या लेण्यांच्या तलविन्यासांचा अभ्यास अपरिहार्य आहे.

**अजिंठा लेणे क्र. ६ (खालचा मजला)** : तलविन्यास, मुखभाग, मंडपातील स्तंभांची रचना आणि त्यांचा घटकक्रम इत्यादी वास्तुघटकांवरून लेणे क्र. ६ चा खालचा मजला अजिंठा येथील प्रारंभीच्या लेण्यापैकी एक आहे असे म्हणता येईल. या लेण्याचा तलविन्यास पुढीलप्रमाणे आहे.

प्रथम अरूंद खुले प्रांगण असून, त्यानंतर मंडपात जाण्यासाठी असलेले द्वार लागते. या द्वाराच्या दुतर्फा स्तंभ असून स्तंभांच्या खालच्या भागावर गण दाखविले आहेत. या स्तंभभागांवरच ठेंगू, यक्ष आणि सेविकांसमवेत असलेल्या मगरीवर उभ्या असलेल्या देवतामूर्ती आहेत. उत्तरांगावरील जागा रिक्त असून दगडात किंवा लाकडात कोरलेल्या गंगायमुनांच्या स्वतंत्र मूर्ती इथे बसविण्यात आल्या असाव्यात हे सहज लक्षात येते. ही योजना आणि इतर काही वैशिष्टये

हे लेणं आधीच्या काळातील असल्याचे सूचित करतात. मंडपाच्या तीन भिंतींमध्ये गर्भगृहाव्यतिरिक्त एकूण १६ छोटया खोल्या खोदलेल्या आहेत. मंडप साध्या सोळा अष्टकोनी स्तंभांनी पेललेला असून त्यात पुढे एक, मागे एक, दोन बाजूंना प्रत्येकी एक असे एकूण चार पाख आहेत. पुढचा आणि मागचा पाख दोन टोकांकडे विस्तारित झाला असल्यामुळे बाजूच्या दोन भिंतींचा या विस्तारित पाखांव्यतिरिक्तचा भाग पुढे आलेला असून पाखांच्या विस्तारित टोकांना असलेल्या छोटया खोल्या बाजूच्या भिंतींमधील खोल्यांपेक्षा काहीशा मागे आहेत. मंडपात जाण्यासाठी एकच द्वार आणि त्याच्या प्रत्येक बाजूस एक अशा एकूण दोनच खिडक्या असल्यामुळे मंडपाच्या मागच्या भिंतीतील खोल्यांमध्ये आणि आधी वर्णिलेल्या पाखांच्या विस्तारित भागामध्ये पुरेसा प्रकाश येत नाही. खोल्यांची भिंतनिहाय रचना पुढीलप्रमाणे आहे. मंडपाच्या मागील भिंतीत दहा आणि बाजूच्या भिंतींमध्ये एकूण आठ खोल्या आहेत. मागील भिंतीत मधोमध अंतराल आणि त्यामागे गर्भगृह असून अंतराल दोन स्तंभ व दोन अर्धस्तंभाद्वारे मंडपापासून विभक्त करण्यात आले आहे.

**अजिंठा लेणे** क्र. १७ : स्थपतींनी आतापर्यंतच्या अनुभवांचा वापर करून निर्मिलेल्या सुव्यवस्थित, पण अधिक साध्या, तलविन्यासाच्या लेण्याचे उत्तम उदाहरण म्हणजे लेणे क्र. १७. या लेण्यात बाहेरचा पाख आणि आतील पाख अधिक सुसूत्र, सुस्पष्ट, परिपक्व आणि एका रेषेत आलेले दिसतात. मंडपाच्या भिंतींमध्येही खोल्या अशा प्रकारे खोदण्यात आल्या आहेत की, ज्यायोगे प्रकाशकिरण सर्वत्र पोहोचतील. त्यामुळे खोल्यांच्या भिंतपरत्वे विभागणीचे स्वरूप आता बदललेले आढळते. या लेण्यात व्हरांडयाच्या बाजूस दोन खोल्या खोदलेल्या आहेत. पूर्वी मंडपामध्ये बाजूच्या पाखालगत किंवा बाजूच्या भिंतींमध्ये प्रत्येकी पाच खोल्या आणि मागील भिंतीत किंवा मागील पाखालगत गर्भगृह वगळता सहा खोल्या खोदलेल्या असत, पण या लेण्यामध्ये बाजूच्या दोन भिंतीत प्रत्येकी सहा खोल्या आणि मागील भिंतीत, गर्भगृहाव्यतिरिक्त, चार खोल्या खोदलेल्या आहेत. लेणे क्र. ६ मध्ये स्तंभांवर पेललेला व्हरांडा नाही, पण या लेण्यामध्ये सहा अष्टकोनी स्तंभांवर पेललेला व्हरांडा आहे. या लेण्यातील स्तंभयोजनाही लेणे क्र. ६ मधील स्तंभयोजनेपेक्षा निराळी आहे. लेणे क्र. ६ मध्ये चार स्तंभांची एक रांग अशा चार स्तंभरांगा आहेत तर या लेण्यामध्ये प्रत्येक कोप-यात एक चतुष्की आणि प्रत्येक दोन चतुष्कींमध्ये पाख दाखवणारा एक स्तंभ असे एकूण वीस स्तंभ आहेत. या लेण्यातील गर्भगृहामध्ये, लेणे क्र. ६ मधील गर्भगृहाप्रमाणेच, प्रदक्षिणापथासाठी जागा असून बाकीची अलंकरणात्मक वैशिष्टयेही काहीशी लेणे क्र. ६ प्रमाणेच आहेत.

**अजिंठा लेणे क्र. २** : हे लेणे क्र. १७ पेक्षा आकाराने लहान आहे. व्हरांडा, मंडपातील मागील पाख आणि स्तंभयोजना या बाबींमधील काही फेरफार वगळता तलविन्यास सर्वसाधारणपणे लेणे क्र. १७ प्रमाणेच आहे. या लेण्याच्या गर्भगृहात प्रदक्षिणापथ नाही.

या लेण्याला प्रथम आयताकृती व्हरांडा असून त्याच्या दोन बाजूच्या भिंतीत प्रत्येकी दोन खोल्या खोदल्या आहेत. कदाचित या व्हरांड्याच्या आकारामुळे स्थपतीने त्यात फक्त चार स्तंभ आणि चार अर्धस्तंभ ठेवले आहेत. मंडपात २० स्तंभाऐवजी फक्त बारा स्तंभ आहेत. मागच्या भिंतीत खोदण्यात येणा-या खोल्यांच्या पध्दतीत झालेला लक्षणीय बदल म्हणजे येथे मागील भिंतीत गर्भगृहाच्या दुतर्फा खोल्यांऐवजी प्रत्येक बाजूस एक अशी एकूण दोन उपगर्भगृहे आहेत.

**अजिंठा लेणे क्र. २१** : तलविन्यासदृष्टया लेणे क्र. २१ लेणे क्र. २ पेक्षा अधिक प्रगत आहे. एकामागे एक असलेल्या दोन खोल्यांचे गर्भगृह आणि व्हरांडयाच्या बाजूच्या भिंतीत असलेल्या एकमेकांना जोडलेल्या दोन खोल्यांप्रमाणे येथे गर्भगृहालगतच्या दोन उपगर्भगृहांचे स्वरूपही एकामागे एक अशा दोन खोल्या असे आहे. त्याचप्रमाणे बाजूच्या पाखांमधील मधल्या खोल्यांच्या मागेही एक खोली आहे. यावरून या एकामागे एक असलेल्या जोडखोल्यांच्या निर्मितीमागील हेतू भिक्षूंचे शयनगृह किंवा वास्तव्यस्थान हा नसून धार्मिक असावा असे दिसते. हे जर खरे असेल तर या लेण्यात किंवा लयननिर्मितीच्या काळात लेण्यांमध्ये "उपमंदिरे " या स्वरूपाच्या अधिकाधिक खोल्या खोदल्या जाऊ लागल्या असे अनुमान निघते.

या लेण्यातील स्तंभांचा घटकक्रम लेणे क्र. २ मधील स्तंभांच्या घटकक्रमासारखाच असून या स्तंभांवरही तितकेच अलंकरण आहे हे या संदर्भात नमूद केले पाहिजे.

**घटोत्कच** (ता. सोयगांव, जि. औरंगाबाद) : घटोत्कच विहार अजिंठा येथील लयनसमूहापासून दूर असला तरीही तो अजिंठा येथील लयनसमूहाचाच भाग मानला जातो. याला दोन कारणे आहेत. पहिले म्हणजे हा विहार आकाराने मोठा असला तरीही त्याचा तलविन्यास लेणे क्र. २१ सारखाच आहे, त्यातील व्हरांडयाच्या दोन बाजूच्या टोकांमध्ये असलेली जोडखोल्यांची उपगर्भगृहे, मंडपाच्या मागील भिंतीत मधोमध असलेले जोडखोल्यांचे गर्भगृह आणि मंडपाच्या बाजूंच्या पाखांच्या भिंतींच्या मधोमध असलेली जोडखोल्यांची उपगर्भगृहे यासारखे महत्त्वाचे वास्तुशास्त्रीय घटक सारखेच आहेत. दुसरे कारण म्हणजे अजिंठा येथील लयनसमूहातील लेणे क्र. १६ व घटोत्कच लेणे यांचा आश्रयदाता हरिषेण राजाचा प्रधान वराहदेव हाच होता.

**औरंगाबाद येथील लयनसमूह :** जरी औरंगाबाद येथील विहारलेण्यांमधील स्तंभांचा घटकक्रम, लेण्यांच्या मंडपातील तुळयांच्या आतील व बाहेरील अंगांवर आणि त्याचप्रमाणे स्तंभांवर असलेले अलंकरणाचे प्राचुर्य ही लेणी (लेणे क्र. ७ व ३) अजिंठा येथील लेण्यांच्या नंतरची निर्मिती आहे हे स्पष्टपणे दाखवित असली तरीही या लेण्यांमध्ये विहाराच्या तलविन्यासाचा अधिक विकास झालेला दिसत नाही.

औरंगाबाद येथे एकूण तीन लयनसमूह आहेत. पहिला लयनसमूह टकडीच्या पश्चिम टोकावर असून त्यात पाच लेणी आहेत. या लयनसमूहापासून काही अंतर सोडून चार लेण्यांचा दुसरा समूह आहे. तिसऱ्या लयनसमूहातील लेणी एकतर साधी सपाट तरी आहेत, किंवा अपूर्णावस्थेत तरी आहेत.

लेणे क्र. २, ३ व ७ ही येथील उल्लेखनीय लेणी आहेत. पुढे व्हरांडा (६.३० मीटर रुंद X ३.९१ मीटर खोल), एकमेकांना छेद देणारे पाख (cross aisles) (६.४० मीटर रुं X २.७० मीटर खोल) आणि प्रदक्षिणापथयुक्त गर्भगृह असा लेणे क्र. २ चा तलविन्यास आहे. लेणे क्र. ३ मध्ये पुढे चार स्तंभांवर पेललेला व्हरांडा (९.३० मीटर X ३.१९ मीटर), चार पाख सूचित करणाऱ्या बारा स्तंभांवर पेललेला मंडप, मंडपाच्या बाजूच्या भिंतींमध्ये प्रत्येकी एक अशी एकूण दोन मंदिरे आणि मंडपाच्या मागील भिंतीत अंतरालयुक्त गर्भगृह आहे. गर्भगृहामध्ये प्रदक्षिणापथ नाही. लेणे क्र. ७ आणि लेणे क्र. ६ या लेण्यांच्या तलविन्यासामध्ये बऱ्यापैकी साधर्म्य आहे.व्हरांडासदृश अंतराल आणि मागे मंदिर असे या तलविन्यासाचे सर्वसाधारण स्वरूप आहे. लेणे क्र. ७ मध्ये व्हरांड्याचा उपयोग अंतरालासारखा करण्यात आला आहे. या व्हरांडासदृश अंतरालाच्या मागे मंडप असून या मंडपाच्या मधोमध गर्भगृह आहे. व्हरांडा १८.१२ मीटर रुंद आणि ३.०५ मीटर खोल आहे. व्हरांड्याच्या बाजूच्या दोन्ही टोकांमध्ये मंदिरे खोदली आहेत. ही मंदिरे प्रत्येकी दोन स्तंभांनी व्हरांड्यापासून अलग करण्यात आली आहेत. मंडपाच्या मधोमध गर्भगृह असून मंडपाच्या मागील भिंतीत दोन मंदिरे खोदण्यात आली आहेत आणि मंदिराच्या बाजूच्या भिंतींमध्ये असलेल्या खोल्या भिक्षूंच्या वास्तव्यासाठी वापरण्यात येत होत्या.

लेणे क्रमांक ९ दुसऱ्या लयनसमूहाच्या शेवटी असून ते या लयनसमूहातील सर्वात उल्लेखनीय आहे. या लेण्यात २५.९२ मीटर रूंद आणि ४.५७ मीटर खोल आकाराचा मंडप असून या मंडपाच्या मागील भिंतीत तीन गर्भगृहे आहेत. लेणे आयताकार असून त्याला पुढे व्हरांडा आहे. या भागाचा प्रस्तर सदोष असल्यामुळे यातील बराच भाग कोसळलेला आहे (एक प्रकारची भूमिसमांतर पडझड). आग्नेयभिमुख व्हरांड्याच्या दक्षिणेस निपण्ण बुध्द असून त्याच्या दक्षिणेस लेणे क्रमांक १० मध्ये जाण्यासाठी असलेली द्वारे आहेत.

व्हरांड्याच्या मागील भिंतीत दोन टोकांकडे प्रत्येकी एक अशी दोन उपमंदिरे असून मधोमध मुख्य गर्भगृह आहे. दोन उपमंदिरांमध्ये पद्मपाणी आणि मैत्रेय बुध्द आहेत. मुख्य गर्भगृहाचे द्वार आणि उपमंदिरांची द्वारे यांच्यामधील भिंतीवर बोधिसत्त्वांच्या शक्ती (consorts) कोरलेल्या आहेत.

बाजूच्या उपमंदिरांमध्ये किंवा उपगर्भगृहांमध्ये प्रलंबपादासनातील बुध्द आहेत. उत्तरेकडील उपगर्भगृहाच्या द्वारावर नाग द्वारपाल आहेत. बाजूच्या भिंतींमध्ये प्रत्येक भिंतीत एक असे एकूण दोन बसलेले बुध्द दाखविले आहेत.

मुख्य गर्भगृह आयताकार असून त्यात दोन बोधिसत्त्व दाखविले आहेत. बोधिसत्त्वांच्या दुतर्फा त्याच्या शक्ती दाखविल्या आहेत. अंतर्भागात द्वाराच्या दुतर्फा नाग आणि दोन निधी दाखविले आहेत (शंखनिधी आणि पद्मनिधी).

हा तलविन्यास आपल्याला तीनताल लेण्याच्या (वेरूळ येथील लेणे क्रमांक १२) वरच्या मजल्याच्या तलविन्यासाची आठवण करून देतो.

लेणे क्रमांक ८ च्या पूर्वेस लेणे क्रमांक ११ आहे. लेणे क्रमांक ९ आणि १० हे लेणे क्रमांक ६ व ७ पेक्षा अधिक उंचीवर आहेत. लेणे क्रमांक ९ व १० यांचा शोध उशीरा लागल्यामुळे त्यांना नंतरचे क्रमांक दिले गेले असावेत.

लेणे क्रमांक ९ हे बौध्द लेण्याचे ब्राह्मणी लेण्यात रूपांतर झाल्याचे वैशिष्ट्यपूर्ण उदाहरण आहे.

**विंझासन** (तालुका भांदक, जिल्हा चंद्रपूर) : येथील विंझासन लेण्यांचा विचार केल्याखेरीज महायान लयनस्थापत्याचे विवरण पूर्ण होणार नाही. भांदक

गावाच्या आग्नेयेस दोन कि. मी. अंतरावर हे लेणे असलेली टेकडी आहे. या लेण्यात जाण्यासाठी टेकडीवरील एका अरुंद खिंडीतून जावे लागते. या लेण्याचा तलविन्यास ख्रिश्चन क्रूसासारखा आहे. यातील मुख्य प्रवेशद्वारापासून त्यासमोरील टोकदार कमानीमधील लांबट भाग २२.५७ मीटर लांब असून त्याच्या डावीकडील आणि उजवीकडील भाग अनुक्रमे १०.६७ मीटर आणि १४.३३ मीटर लांब आहेत. पूर्व-पश्चिम जाणाऱ्या मुख्य मार्गिकेची रुंदी ढोबळ मानाने ७.६२ मीटर आहे. त्याच्या उत्तरेकडील भागात (क्रूसाकारतलविन्यासाचा उत्तरेकडील भाग)आणि प्रवेशद्वाराच्या वरच्या भागात बऱ्यापैकी उठावात कोरलेले स्तूप आहेत. प्रवेशद्वाराने आत गेल्यावर २.७४ मीटर × १.२२ मीटर आकाराचे सपाट छताचे दालन लागते. या दालनामागे १०.६ मीटर लांब आणि २.४४ मीटर ते ३.०५ मीटर रुंदीचे आणि टोकदार कमानीच्या आकाराचे छत असलेले आणखी एक दालन लागते. या दालनाच्या डावीकडे २.५८ मीटर × २.५८ मीटर आकाराची खोली असून उजवीकडे दोन छोट्या खोल्या (आकार : अनुक्रमे २.४१ मीटर × ०.९८ मीटर आणि १.६९ × १.०६ मीटर) आहेत. या खोल्यांमध्ये असलेल्या ४५ सें. मी. उंचीच्या झोपण्याच्या कट्ट्यांवरून या खोल्या भिक्षूंच्या निवासासाठी वापरल्या जात असणार हे उघड आहे. या शयनकट्ट्यांच्या एका बाजूस दगडातच खोदलेला उशीचा उंचवटा आहे. काही अंतर पुढे गेल्यानंतर १.४१ मीटर उंचीचे आणि ३.४२ मीटर × ६.४२ मीटर आकाराचे गर्भगृह लागते. गर्भगृहाचे छत सपाट असून त्यात सिंहासनावर बसलेल्या बुद्धाची मूर्ती आहे. गर्भगृहाच्या द्वाराच्या उजव्या खांबावर एक शिलालेख असून त्यात कुणा एका रुद्राचे नाव आहे. क्रूसाकार तलविन्यासाचा उजवा भाग किंवा उत्तरेकडील फाटा १४.३२ मीटर लांब आणि २.४३ मीटर उंच आहे. या फाट्याच्या टोकावर ३.०५ मीटर लांबीचे गर्भगृह असून या गर्भगृहाचे छत कमानीच्या आकाराचे आहे. हे गर्भगृह रिक्त आहे. या कमानदार छताच्या मध्यरेषेची किंवा सर्वात वरील टोकाची जमिनीपासूनची उंची ३.१७ मीटर आहे. क्रूसाकार तलविन्यासाच्या डाव्या भागाचे किंवा दक्षिणेकडील बाजूचे छतही कमानदार आहे. मात्र त्यांच्या मध्यरेषेची जमिनीपासूनची उंची २.९१ मीटर आहे. या दक्षिणेकडील बाजूच्या उजव्या भिंतीत १.९२ मीटर × २.४८ मीटर आकाराची छोटी खोली आहे. या खोलीचा उपयोग भिक्षूंच्या वास्तव्यासाठी केला जात असावा. या बाजूच्या शेवटी १.९३ मीटर × १.५२ मीटर आकाराचे गर्भगृह असून त्यात बसलेल्या

बुध्दाची मूर्ती आहे. वर उल्लेख केलेला शिलालेख गुप्त काळातील असून तो इ. स. ५०० च्या सुमारास खोदला गेला असावा असे विद्‌वानांचे मत आहे.

## वज्रयान लयन स्थापत्य

**पन्हाळेकाझी :** रत्नागिरी जिल्ह्यातील दापोली तालुक्यात पन्हाळेकाझी हे ठिकाण आहे. शिलाहार काळातील दोन शिलालेखांमध्ये (इ. स. चे बारावे शतक) या ठिकाणचा उल्लेख आहे. यावरून शिलाहार काळात हे एक महत्त्वाचे ठाणे असावे असे दिसते. पुराभिलेख व पुरातत्त्व विभागाच्या प्रयत्नांमुळे १९७३ साली या ठिकाणी असलेली २९ लेणी उजेडात आली.

या लेण्यांना महाराष्ट्राच्या लयनस्थापत्याच्या इतिहासात फार निराळ्या कारणासाठी महत्त्व आहे. यातील प्रमुख कारण म्हणजे ही लेणी, या ठिकाणी एके काळी वज्रयान संप्रदाय प्रचलित होता याची साक्ष देतात. ही लेणी उजेडात येण्यापूर्वीच मूर्ती आणि शिलालेखांच्या पुराव्यावरून वेरूळ व कान्हेरी येथे वज्रयान संप्रदाय प्रचलित होता हे संशोधकांना माहित होते. एका शिलालेखामध्ये शिलाहार कपर्दीच्या राजवटीत आणि राष्ट्रकूट नृपती पहिला अमोघवर्ष याच्या काळात, इ. स.च्या नवव्या शतकाच्या मध्यात (शके ७७५) गौडदेशीय गोमिन अविघ्नाकराने कृष्णगिरी येथे ध्यानधारणेसाठी लेणे खोदविले असे म्हटले आहे. या शिलालेखावरून कोकणातील बौध्दांचा बंगालमधील बौध्दांशी निकटतम संपर्क होता आणि त्यामुळेच पूर्व भारतातील वज्रयान संप्रदाय महाराष्ट्रात आणि विशेषतः कोकणात पोचला असे मानले जाते. वेरूळ येथील बौध्द मूर्तींचा सखोल अभ्यास केल्यानंतर जे. व्ही. माल्हान्द्रा या विदुषी, भारताच्या निरनिराळ्या भागातील बौध्दकेंद्रे एकमेकांच्या बऱ्यापैकी संपर्कात होती अशा निष्कर्षाप्रत आल्या. या संदर्भातील ठळक पुरावा पन्हाळेकाझी येथे मिळतो. या ठिकाणी अक्षोभ्याच्या पाच सुट्या आणि दोन काम्य किंवा अर्पित मूर्ती आणि महाचंडरोषण व सिध्दैकवीर यांची प्रत्येकी एक मूर्ती सापडली आहे. या ठिकाणी अक्षोभ्य आणि त्याची शक्ती मामकी यांच्या मूर्तींचे प्राचुर्य आणि इतर पुरावे यांमुळे पन्हाळेकाझी येथे इ. स. च्या दहाव्या शतकात वज्रयान संप्रदायाचे आचरण मोठ्या प्रमाणावर होत असावे अशा निष्कर्षाप्रत म. न. देशपांडे आले आहेत. बौध्द धर्मातून विकसित झालेल्या या वज्रयान संप्रदायाची प्राचीनता असंगाच्या काळापर्यंत (इ. स. चे चवथे शतक) मागे जाते. असंगाने भविष्यातील बुध्दमैत्रेय यांच्या कृपेने काही निवडक शिष्यांना वज्रयान संप्रदायाची दीक्षा दिली. बंगालमध्ये पाल राजांच्या राजवटीत (इ. स. चे ८ वे

ते १२ वे शतक) हा संप्रदाय चांगलाच फोफावला. या संप्रदायाच्या आचारामध्ये काही धर्ममतांचा, विधींचा, यंत्रपूजेचा (काही तांत्रिक आकृत्यांच्या पूजेचा) आणि काही मंत्रांचा समावेश होतो. या बाबींनी महायान संप्रदायाच्या आध्यात्मिक आणि धार्मिक स्वरूपात बदल घडवून आणला. किंबहुना अक्षोभ्य ह्या बौध्द देवाचा वज्रयान संप्रदायाशी अगदी निकटचा संबंध आहे. परिणामतः या संप्रदायाला अक्षोभ्याच्या चिन्हाचे, म्हणजे वज्राचे (अक्षोभ्याच्या मूर्तीवर, अक्षोभ्य ज्या पीठावर बसलेला दाखविला जातो त्या पीठावरच हे चिन्ह दाखविलेले असते) नाव पडले. वज्रयान संप्रदायाच्या अक्षोभ्य कुलातील आणखी दोन महत्त्वाची दैवते म्हणजे महाचंडरोषण आणि सिध्दैकवीर. या दैवतांच्या अशा प्रकारच्या मूर्ती पन्हाळेकाझी सोडल्यास महाराष्ट्रातील अन्य बौध्द केंद्रामध्ये आढळत नाहीत. यावरून पन्हाळेकाझी येथे वज्रयान संप्रदाय प्रचलित होता हे स्पष्टपणे दिसून येते. पन्हाळेकाझी येथील महाचंडरोषणाची मूर्ती डी. व्ही. भट्टाचार्य यांनी संपादित केलेल्या ''साधनमाला'' ग्रंथात दिलेल्या महाचंडरोषणाच्या मूर्तिशास्त्रीय वर्णनाशी तंतोतंत मिळतीजुळती आहे. या मूर्तीचे रत्नागिरी येथील महाविहारातील काम्य स्तूपावरील मूर्तीशी कमालीचे साम्य आहे.

पन्हाळेकाझी येथे बौध्द आणि ब्राह्मणी अशा दोन्ही संप्रदायाची लेणी आहेत. येथील २९ लेण्यांपैकी क्रमांक १७, १९, २०,२२, २३, २४, २५, २८, २९ ही लेणी ब्राह्मणी लेणी आहेत. क्रमांक २१ आणि १४ ही लेणी मुळात ब्राह्मणी नव्हती. परंतु नाथसिध्दांनी ती स्वतःच्या वापराकरता अनुरूप करून घेतली. एकंदरित पाहता या ठिकाणी असलेली लेणी इ. स. चे तिसरे शतक ते इ. स. चे चौदावे शतक या काळात खोदली गेली. इ. स. च्या ११-१२ व्या शतकाच्या सुमारास बौध्द धर्माचे या भागातून उच्चाटन झाले. आधीच्या प्रकरणांमध्ये बौध्द लयनस्थापत्याचे विवेचन करताना आपण ज्या प्रकारची लेणी पाहिली त्या लेण्यांसारखी उल्लेख करावा अशी कोणतीही वैशिष्ट्ये या लेण्यांमध्ये नाहीत. ही लेणी अगदी साधी आहेत. मंडप आणि त्यामागे गर्भगृह अशी त्यांची रचना आहे. काही लेण्यांमध्ये मंडपाआधी व्हरांडा येतो. सर्व लेण्यांसमोर खुले प्रांगण आहे. ज्यामुळे ही लेणी इतर संप्रदायांच्या लेण्यांपासून वेगळी म्हणून ओळखता येतील किंवा ती अमुक एका संप्रदायाची म्हणून ओळखता येतील अशी कोणतीही वास्तुशास्त्रीय वैशिष्ट्ये या लेण्यांमध्ये नाहीत. फक्त स्तंभच काहीसे उल्लेखनीय आहेत. हे स्तंभ चौरसाकृती आणि अष्टकोनाकृती असून त्यावर नागहस्तशीर्ष आहेत. निराळ्या शब्दात सांगायचे तर ज्यात स्थपतींनी वज्रयान संप्रदायाच्या पूजाविधींच्या गरजा भागविण्यासाठी

नवीन वास्तुशास्त्रीय घटक आणल्याचे किंवा त्या घटकांमध्ये फेरफार केल्याचे स्पष्टपणे जाणवते अशा औरंगाबाद लयनसमूहातील लेणे क्रमांक ७ व ९ किंवा वेरूळ येथील लेणे क्रमांक २, ५, ११ व १२ या लेण्यांशी ज्यांची तुलना करता येईल असे कोणतेही वास्तुशास्त्रीय घटक या लेण्यांमध्ये नाहीत.

श्री. देशपांडे यांच्या मते लेणे क्रमांक ४, ५ व ६ ही लेणी इ. स. च्या तिसऱ्या शतकात खोदण्यात आली आणि लेणे क्रमांक २, ७, ११, १४, १५, १७, १८ व २७ ही लेणी इ. स. च्या ४-५ व्या शतकात खोदण्यात आली. इ. स. च्या १० व्या शतकात ही सर्व लेणी वज्रयान संप्रदायींनी त्यांना अनुरूप करून घेतली. याउलट लेणे क्रमांक १, ३, १२ व १३ ही लेणी वज्रयान संप्रदायाच्या अनुयायांनी खोदली. लेणे क्रमांक १ व ३ ही साधी लेणी असून एकच दालन किंवा एकच खोली असे त्यांचे स्वरूप आहे. लेणे क्रमांक १ चा आकार ३.७० मीटर × १.९७ मीटर आहे. तर लेणे क्रमांक ३ चा आकार २.३५ मीटर × २.४८ मीटर × १.८० मीटर आहे. या लेण्यांमधील मागील भिंतींत संप्रदायाची पूजावस्तू आहे. लेणे क्रमांक १३ चे स्वरूप ४.२३ मीटर × ३.८६ मीटर आकाराचा मंडप असे असून त्याच्या मागील भिंतीत अर्धवर्तुळाकार देवकोष्ठ आहे. लेणे क्रमांक १२ काहीसे मोठे आहे. या लेण्याला व्हरांडा असून व्हरांड्याच्या दोन टोकांना गर्भगृहे आहेत. श्री. देशपांडे यांच्या मते हा व्हरांडा वज्रयान संप्रदायाकरता अनुरूप करण्यात आला. मागील मंडपात अधिष्ठान असून त्यावर एकेकाळी अक्षोभ्याची मूर्ती असावी. वास्तुशास्त्रीय दृष्ट्या या लेण्यांचे औरंगाबाद आणि वेरूळ येथील लेण्यांशी काहीही साम्य नाही.

**माहीम येथील काम्यस्तूप :** वज्रयान संप्रदायाच्या स्थळी आढळणाऱ्या वृत्तचितीच्या आकाराच्या काम्यस्तूपांची चर्चा केल्याखेरीज वज्रयान टप्प्याचे विवेचन अपूर्ण राहील. हे काम्यस्तूप एकतर लेण्यांच्या प्रांगणात तरी आढळतात किंवा ते टेकडीच्या शिखरावर तरी असतात. रत्नागिरी येथे महाचंडरोषणाची प्रतिमा कोरलेल्या काम्यस्तूपाचा उल्लेख याआधी आलेलाच आहे. श्री. देशपांडे यांच्या मते असे काम्यस्तूप हे वज्रयान बौध्द केंद्राचे वैशिष्ट्य असून बोधगया, रत्नागिरी आणि सांची येथे असे स्तूप शेकड्यांनी आढळतात. ते कोंदिवटे (महाकाली गुंफा) येथे असलेल्या काम्यस्तूपाचाही उल्लेख करतात. या स्तूपावर कमानाकार तोरणाखाली एक बसलेले दैवत दाखविले आहे. कान्हेरी येथेही

गुंफांकडे जाणाऱ्या रस्ता क्रमांक १ वर मोडतोड झालेला अशा प्रकारचा स्तूप आहे. मुंबईतील माहीम भागात शिवाजी पार्ककडे जाणाऱ्या ले. दिलीप गुप्ते मार्गावर सापडलेल्या काम्यस्तूपावरून असे काम्यस्तूप बनविण्याची प्रथा अगदी मध्ययुगीन काळातही चालू होती असे दिसते.

## ब्राह्मणी लयन स्थापत्य

### बर्जेसकृत वर्गीकरण

भारतामध्ये बौध्द लेण्यांनंतर ब्राह्मणी शैलगृहांची निर्मिती झालेली आढळते. निराळ्या शब्दात सांगायचे तर बौध्द शैलगृहनिर्मितीच्या कालखंडानंतर ब्राह्मण शैलगृहनिर्मितीचा कालखंड येतो. ही ब्राह्मण शैलगृहे बौध्द शैलगृहांपेक्षा आकाराने मोठी आणि अधिक अलंकरणात्मक असली तरी या लयननिर्मितीची आखणी ज्या वापराच्या हेतूने झाली तो हेतू बौध्द लयननिर्मितीच्या हेतुपेक्षा निराळा होता असे बर्जेसचे निरीक्षण आहे. बर्जेस पुढे म्हणतो की, निदान सुरूवातीच्या काळापुरते म्हणजे जेव्हा ब्राह्मण शैलगृहे बौध्द विहारांचीच नक्कल होती त्या काळापुरते तरी त्याचे मत वैध होते. बौध्द भिक्षुसंघ आणि ब्राह्मणी मठ यांचे स्वरूपच एकमेकांपासून भिन्न असल्यामुळे अशा स्थापत्यविषयक अनुकरणाच्या मर्यादा झटकन लक्षात येतात. ब्राह्मण पंथामध्ये मठाची किंवा संन्याशांची संघटना इतकी लक्षणीयपणे महत्त्वाची नव्हती. त्यात भिक्षुसंघागारखा संघ तर नव्हताच नव्हता. शैव आणि वैष्णवपंथी लेणी ही पूजेअर्चेची ठिकाणे होती. बर्जेसच्या मते या सर्व बाबींमुळेच नंतरच्या शैव आणि वैष्णव शैलगृहांमध्ये काही बदल आढळून येतात. छोट्या राहण्याच्या खोल्यांचा अभाव, उठावातील कथात्मक दृश्ये असलेल्या दर्शनी भिंती आणि प्रदक्षिणापथ हे त्यातील मुख्य बदल असून हे बदल नंतरच्या शैलगृहांमध्ये दिसून येतात.

बौध्द शैलगृहांच्या तुलनेत ब्राह्मण शैलगृहांमध्ये फारच कमी शिलालेख आढळतात. बर्जेसच्या मते हा शिलालेखांचा तौलनिकदृष्ट्या अभाव ही ब्राह्मण शैलगृहस्थापत्याच्या अभ्यासातील एक मोठी अडचण आहे, आणि म्हणूनच शैव आणि वैष्णव शैलगृहांचा फक्त तौलनिक कालक्रम देता येईल अशी त्याची धारणा आहे.

त्याच्या मते दख्खनमधील या शैलगृहांचा काळ इ. स. ५०० ते इ. स. ८०० हा आहे. तसेच कर्नाटकातील अय्यावोळे येथील शैलगृह सर्वात आधीचे असून महाराष्ट्रातील वेरूळचे कैलास लेणे सर्वात नंतरचे आहे.

(अय्यावोळे इ. स. ५०० ते इ. स. ५५० आणि कैलास इ. स. ७२५ ते इ. स. ८००). महाराष्ट्रातील शैलगृहांचा बर्जेसप्रणीत कालक्रम पुढीलप्रमाणे आहे.

| शैलगृह | ठिकाण | जिल्हा | काळ |
| --- | --- | --- | --- |
| शैव आणि जैन लेणी | खरूसा | लातूर | इ. स. ५००-७०० |
| शैव लेणी | आंबेजोगाई | बीड | इ. स. ५५०-६०० |
| ढोकेश्वर | टाकळी-ढोकेश्वर | अहमदनगर | इ. स. ५०६-६०० |
| रामेश्वर | वेरूळ | औरंगाबाद | इ. स. ६००-६५० |
| रावण की खाई आणि दशावतार | वेरूळ | औरंगाबाद | इ. स. ६००-७०० |
| धुमार लेणे आणि रामेश्वरच्या उत्तरेकडील लेणे | वेरूळ | औरंगाबाद | इ. स. ६५०-७२५ |
| एलिफंटा किंवा घारापुरी | घारापुरी बेट | रायगड | इ. स. ७२५-७७५ |
| जोगेश्वरी व मंडपेश्वर | मुंबई | बृहन्मुंबई | |
| पातूर लेणी | पातूर | अकोला | |
| रुद्रेश्वर | जिंजाला | औरंगाबाद | इ. स. ७००-८०० |
| शृंगारचावडी | पाटणे | जळगाव | |
| सातारा जिल्ह्यात विखुरलेली शैलगृहे | | सातारा | |
| कैलास | वेरूळ | औरंगाबाद | इ. स. ७२५-८०० |

याप्रमाणे बर्जेसच्या मते महाराष्ट्रातील लयननिर्मिती बदामीचे चालुक्य आणि वेरूळचे राष्ट्रकूट यांच्या कारकिर्दीतही चालूच राहिली. सौंदरराजन यांनीही मंदिरांच्या स्थापत्यशास्त्रीय सर्वेक्षणाचा भाग असलेल्या "द केव्ह टेंपल्स ऑफ

द डेक्कन'' या त्यांच्या ग्रंथात नव्याने उजेडात आलेल्या एका लेण्याची टाकलेली भर वगळता असाच दृष्टिकोन स्वीकारलेला आढळतो. हे नव्याने उजेडात आलेले लेणे, म्हणजे गोव्यातील अरवळे येथील शैलगृह. सौंदरराजन यांच्या मते हे शैलगृह चालुक्य नाही. सौंदरराजन यांनी महाराष्ट्रातील सर्व ब्राह्मण शैलगृहांचे वर्गीकरण केलेले असून त्यांच्या मते दख्खनमधील ही शैलगृहे चालुक्य आणि राष्ट्रकूट शैलीची असून ती चालुक्य आणि राष्ट्रकूट राजांच्याच आश्रयाखाली खोदली गेली. त्यांचा काळ इ. स. ५०० ते इ. स. ८०० आहे. पण अगदी अलीकडेच झालेली संशोधने आणि याबाबत विद्वानांनी केलेली चर्चा आपल्याला केवळ या शैलगृहाच्या काळाबद्दलच नाही तर त्यांच्या राजाश्रयाबद्दलही पुनर्विचार करायला लावते हे या संदर्भात नमूद केले पाहिजे. जोगेश्वरी, घारापुरी आणि मंडपेश्वर या लेण्यांचा काळ वेरूळ येथील किंवा पश्चिम महाराष्ट्र आणि विदर्भातील अनेक लेण्यांच्या आधीचा आहे असा एक जोरदार युक्तीवाद केला जातो आणि तो बरोबरही आहे. स्पिंक यांची स्वतंत्र कारणमीमांसा असून त्यानुसार ही लेणी कलचुरी राजाश्रयाखाली इ. स. ५००-५५० या काळात खोदली गेली. डॉ. खंडालवाला आणि गोरक्षकर हाच काळ मान्य करतात, पण त्यांचा राजाश्रय मात्र कोकणातील मौर्यांचा मानतात. अलीकडेच भटाळा (जिल्हा चंद्रपूर) येथे सापडलेल्या वैष्णव शैलगृहावरून आणि भांदक (जिल्हा चंद्रपूर) येथे पुन्हा उजेडात आलेल्या शैलगृहावरून वाकाटक काळातही वैष्णव व शैवपंथी शैलगृहे कोरली गेली होती हे स्पष्ट होते. भांदकमधील पुरावा शैव आणि वैष्णव शैलगृहांची प्राचीनता अगदी वाकाटक काळापर्यंत जाते हे दाखवून देतो. त्याचप्रमाणे पातूर येथील शैलगृहांचा, प्राचीन शिलालेखांचा (हे शिलालेख बहुधा वाकाटककालीन आहेत) आणि पातूर येथे सापडलेल्या पार्वतीच्या मूर्तीच्या संदर्भात केलेला पुनर्विचार ही शैलगृहे वाकाटककालीन असावीत या निष्कर्षाप्रत आणतो. लेण्याच्या मुखभागावर कृष्णलीला दाखवणारा वाकाटक धाटणीतील शिल्पपट्ट असलेल्या धाराशिव येथील शैलगृहाबाबतही असेच म्हणता येईल.

कोल्हापूर जिल्ह्यात पळसांबे येथे सापडलेली चालुक्यपूर्व काळातील तीन शैवपंथी एकाश्मक मंदिरे अत्यंत महत्त्वाची आहेत. यावरून असे लक्षात येते की, महाराष्ट्रातील या शैलगृहांना राष्ट्रकूट आणि चालुक्य राजाश्रय होता असे ढोबळ विधान करता येणार नाही. त्यामुळे कोणत्या लेण्याला कोणत्या राजघराण्याचा आश्रय होता याबाबतच्या मतभेदात फारसे न शिरता या लेण्यांचे

कालपरत्वे पाडलेल्या पाच गटात वर्गीकरण करण्यात आले. हे पाच गट खालीलप्रमाणे आहेत.

(सामान्यतः केलेले वर्गीकरण) :

| | लेणे | ठिकाण | जिल्हा | काळ/राजाश्रय |
|---|---|---|---|---|
| गट-१ | | | | |
| (१) | वैष्णव लेणे | भांदक | चंद्रपूर | इ. स. ४०० ते इ. स. ५०० |
| (२) | वैष्णव लेणे | भटाळा | चंद्रपूर | वाकाटक |
| (३) | शैव लेणे | पातूर | अकोला | ,, |
| (४) | धाराशिव येथील वैष्णव लेणे | उस्मानाबाद | उस्मानाबाद | ,, |
| (५) | शिऊर | शिऊर | नांदेड | ,, |
| गट-२ | | | | |
| (१) | जोगेश्वरी (शैव लेणे) | बृहन्मुंबई | बृहन्मुंबई | इ. स. ५०० ते इ. स. ६०० |
| (२) | मंडपेश्वर (बोरिवली) | बोरिवली | बृहन्मुंबई | मौर्य कलचुरी (त्रैकूटक) |
| (३) | शैव लेणी (घारापुरी) | घारापुरी बेट | रायगड | ,, |
| (४) | धुमार लेणे (लेणे क्रमांक २९) | वेरूळ | औरंगाबाद | कलचुरी |
| (५) | अंकाई-टंकाई (शैव लेणे) | अंकाई-टंकाई किल्ला | नाशिक | ,, |
| (६) | माहूर | माहूर | नांदेड | ,, |
| (७) | टाकळी ढोकेश्वर | पारनेर | अहमदनगर | |
| (८) | शैव लेणी व एकाश्मक मंदिरे | पळसांबे | कोल्हापूर | |

| | लेणे | ठिकाण | जिल्हा | काळ/राजाश्रय |
|---|---|---|---|---|
| | **गट-३** | | | |
| (१) | लेणी क्रमांक १४, १७, १८, १९, २०, २१, २२, २६, २७, २८ | वेरूळ | औरंगाबाद | |
| (२) | घाट नांद्रा (देवी लेणे) | घाट नांद्रा | औरंगाबाद | सुरूवातीचे राष्ट्रकूट |
| | **गट-४** | | | |
| (१) | लेणी क्रमांक २५, २३, २४ आणि २३ व २४ क्रमांकाच्या लेण्यांवरील लेणी आणि वेरूळ येथील गणेश लेणे व जोगेश्वरी लयनसमूहातील लेणी | वेरूळ | औरंगाबाद | |
| (२) | लेणे क्रमांक १५ (दशावतार लेणे) | वेरूळ | औरंगाबाद | राष्ट्रकूट कलचुरी |
| (३) | भोकरधन | भोकरधन | औरंगाबाद | |
| (४) | पातालेश्वर | पुणे | पुणे | |
| (५) | रूद्रेश्वर | जिंजाला | औरंगाबाद | |
| (६) | आंबेजोगाई येथील शैव लेणी | आंबेजोगाई | बीड | |
| (७) | खरुसा येथील शैव लेणी | | | |
| (८) | भांदक येथील शैव लेणी | भांदक | चंद्रपूर | |

| लेणे | ठिकाण | जिल्हा | काळ/राजाश्रय |
|---|---|---|---|
| गट-५ | | | |
| (१) शृंगार चावडी | पाटणे | जळगाव | |
| (२) नाथपंथी आणि इतर लेणी | पन्हाळेकाझी | रत्नागिरी | शिलाहार यादव |
| (३) नाथपंथी लेणे | हरिश्चंद्रगड | अहमदनगर | |
| (४) भामेर किल्ल्यातील लौकिक शैलगृहे | भामेर | धुळे | |

**गट–१ :**

**भांदक येथील शैलगृहे :** कनिंगहॅमने त्याच्या मध्यप्रांतातील गवेषण अहवालात[३४] भांदक येथील लेण्यांचा समावेश केला आहे. या ठिकाणी कनिंगहॅमला निदान चार लेणी तरी आढळली. त्यापैकी विंझासन येथील बौध्द लेणे वाकाटककालीन असून त्याचे विवरण बौध्द शैलगृहस्थापत्याच्या प्रकरणात या आधीच केलेले आहे. या ठिकाणी काही ब्राह्मण शैलगृहेही आहेत. दोन शैलगृहे राष्ट्रकूट/कलचुरी काळातील असून ती खुद्द गावातच आहेत आणि इतर काही लेणी किंवा शैलगृहे भांदकच्या दक्षिणेस दोन किलोमीटर अंतरावर असलेल्या गौरारा (गौराळा)[३५] या ठिकाणी आहेत. गावात असलेली दोन लेणी "मोठा खुराडा" आणि "लहान खुराडा" या नावाने ओळखली जातात. सध्या ही दोन्ही शैलगृहे रिकामी आहेत, पण "मोठा खुराडा" या नावाने ओळखल्या जाणाऱ्या लेण्यात भिंतीवर शेषशायी विष्णू आणि इतर मूर्ती कोरल्या आहेत. या मूर्ती मूळ शैलगृहयोजनेत नसून त्या राष्ट्रकूट काळात कोरल्या गेल्या असाव्यात. "मोठा खुराडा" हे १.०९ मीटर रुंद, १.५७ मीटर खोल आणि २.१३ मीटर उंच आकाराचे अगदीच लहान लेणे आहे. या लेण्याला १.०९ मीटर रुंदीचा खुजा दरवाजा आहे. यापुढे मुळात अर्धमंडप असावा. कनिंगहॅमने बांधीव अर्धमंडपाचे अवशेष आढळल्याचे नमूद करून ठेवले आहे. लेण्याच्या अंतर्भागात तिन्ही भिंतींना लागून सलग कट्टा असल्यामुळे जेमतेम दोन किंवा तीनच व्यक्ती उभ्या राहू शकतील एवढीच जागा आहे. या कट्ट्याला किंवा पीठाला तळाशी खुर आणि कुंभ आणि वर वर्तुळाकार थर आहे. हे पीठ[३६] रामटेक येथे आढळलेल्या बांधीव मंदिराशी खूपच

मिळतेजुळते आहे. या पीठावर एकूण आठ खाचा (मूर्ती बसवण्याच्या खाचा) आहेत. त्यापैकी चार खाचा शैलगृहातील मागील भिंतीत असून बाजूच्या दोन भिंतीलगतच्या पीठांमध्ये प्रत्येकी दोन खाचा आहेत. जेव्हा कनिंगहॅमने या ठिकाणाची पाहणी केली तेव्हा तेथे एकूण पाच मूर्ती होत्या. त्यात एका शिवलिंगाचाही समावेश आहे. आज या ठिकाणी खाचा रिक्त आहेत. या शैलगृहाच्या बाह्यांगावर दोन मूर्ती आहेत. यातीत एक मूर्ती हात वर केलेल्या यक्षाची, तर दुसरी मूर्ती केवल नरसिंहाची आहे. या दोन्ही मूर्तींच्या शैलीचा विचार करता या मूर्ती वाकाटककालीन असाव्यात असेच अनुमान निघते.

टेकडीच्या पायथ्यापासून टेकडीवर असलेल्या गणेश मंदिराकडे जाताना मध्यावरच लेणे लागते. या टेकडीवरील गणेश मंदिराकडे जाणाऱ्या आधुनिक काळात बांधलेल्या पायऱ्यांजवळ वाकाटक धाटणीतील एक पुरुष उंचीच्या मूर्ती आहेत. या मूर्ती आज सिमेंट कॉंक्रीटमध्ये घट्ट बसविल्या असल्यामुळे जरी यदाकदाचित मूर्तीच्या तळभागात खाचेत बसवण्याचा खुंटा असला तरी तो आज दिसून येत नाही. परिणामी या मूर्ती लेण्यातील प्रतिमासमूहातील आहेत किंवा नाहीत हे सांगता येणे कठीण आहे. पीठाचे थर आणि देवकोष्टांमध्ये स्थित असलेल्या यक्ष आणि नरसिंहाच्या मूर्ती यावरून हे शैलगृह इ. स. ५ व्या शतकात खोदले गेले असावे असे दिसते.

''छोटा किंवा लहान खुराडा'' या नावाने ओळखले जाणारे दुसरे शैलगृह अत्यंत लहान आकाराचे आहे. त्याची लांबी १.६५ मीटर व रुंदी ०.९९ मीटर आहे.

**पातूर येथील शैव लेणी** (ता. पातूर, जि. वाशिम) : पातूर गावाच्या पश्चिमेस बोर्डी नाल्याच्या पलीकडे हे द्विदल लेणे आहे. हे लेणे एका टेकडीत कोरले असून त्याच्यासमोर मोकळे प्रांगण आहे. ही दोन्ही लेणी (किंवा लेण्यातील दले) पूर्वाभिमुख असून त्याला एकामागे एक असे दोन मंडप आहेत. त्यांच्यामागे गर्भगृह असून गर्भगृहात जाण्यासाठी पायऱ्या आहेत. निराळ्या शब्दात सांगायचे तर ही दोन्ही गर्भगृहे मंडपांपेक्षा वरच्या पातळीवर आहेत.

शैलगृहातील दक्षिण बाजूकडील दलात किंवा लेण्यात जाण्यासाठी प्रथम दोन चौरसाकृती स्तंभ आणि अर्धस्तंभांवर उभ्या असलेल्या मंडपात प्रवेश करावा लागतो. हा मंडप नऊ फूट खोल आहे. या मंडपानंतर एक पायरी अधिक उंचीवर असलेला अंतर्मंडप आहे. हा अंतर्मंडप ३.९६ मीटर खोल असून तोही दोन स्तंभ आणि दोन अर्धस्तंभांवर उभा आहे. गर्भगृह चौरसाकृती असून (३.३५ चौ. मीटर) त्याच्या मागील भिंतीला लागून एक पीठ आहे. त्यावर बहुधा शिवलिंग असावे. उत्तर बाजूकडे असलेले गर्भगृह याच आकाराचे पण

थोडे अधिक उंचीवर आहे. सध्या तिथे नुसतेच पीठ आहे, पण मुळात या पीठावर पार्वतीची मूर्ती[३७] असावी.

तपस्येत असलेल्या पार्वतीची मूर्ती ही अद्वितीय आणि खुद्द पातूरमध्ये सापडलेली एकमेव मूर्ती असून सध्या ही मूर्ती नागपूर येथील मध्यवर्ती संग्रहालयात आहे. या मूर्तीचा खुंटा उत्तरेकडील गर्भगृहातील पीठाच्या खाचेत व्यवस्थित बसतो. या मूर्तीच्या शैलीवरून ही मूर्ती इ. स. ४५० च्या काळातील असावी असे दिसते. त्याचप्रमाणे येथे असलेल्या अनेक शिलालेखांपैकी शैलगृहाच्या दक्षिणेकडील तुलापट्टाच्या बाहेरील बाजूवर असलेल्या शिलालेखाची अक्षरे वाकाटककालीन पेटिकाशीर्ष ब्राह्मीत आहेत.

स्तंभाची रचना, तलविन्यासातील साधेपणा, पातूर येथे सापडलेल्या पार्वतीच्या मूर्तीचा या लेण्यांशी संबंध असण्याची शक्यता आणि पेटिकाशीर्ष ब्राह्मी लिपीतील शिलालेख इत्यादी पुरावे लक्षात घेता या शैलगृहाचा काळ इ. स. ४५० च्या सुमाराचा असावा असे दिसते. निराळ्या शब्दात सांगायचे तर, हरिषेण आणि त्याच्या प्रधानांनी अजिंठा येथे विहार आणि चैत्यगृहे खोदण्याच्या किमान एक पिढी आधीच्या काळात वत्सगुल्महून (सध्याचे अकोला जिल्ह्यातील वाशिम) राज्य करणाऱ्या वाकाटकांच्या राजधानीजवळ हे शैव शैलगृह खोदले गेले होते.

**धाराशिव लेणे** (ता. जि. उस्मानाबाद) : उस्मानाबाद शहराच्या ईशान्येस ५ किलोमीटर अंतरावर सात लेण्यांचा समूह आहे. हा शैलगृह समूह धाराशिव लेणी म्हणून ओळखला जातो. त्यातील सहा लेणी जैन मानली जातात आणि त्यांच्या शैलीवरून ती लेणी अजिंठा येथील महायान लेण्यांच्या समकालीन, म्हणजे इ. स. च्या पाचव्या शतकाच्या उत्तरार्धातील आहेत असे दिसते. ही सात लेणी टेकडीच्या दोन बाजूंवर आहेत, चार लेणी दरीच्या उत्तरेकडे असणाऱ्या टेकडीच्या भागात खोदली आहेत, तर उरलेली तीन त्यालगतच्या बाजूवर ईशान्याभिमुख आहेत. त्यातील शेवटचे म्हणजे क्रमांक ७ चे लेणे अपूर्णावस्थेतील असून सध्या त्यात दहा स्तंभ आणि दोन कोपऱ्यात प्रत्येकी एक असे दोन अर्धस्तंभ असलेल्या १८.२८ मीटर रुंदीच्या मुखमंडपाचा समावेश होतो. दगडाचा दर्जा अत्यंत निकृष्ट असल्याने स्तंभघटकक्रम ओळखणे कठीण आहे. परंतु या स्तंभांवरील भागात या टोकापासून त्या टोकापर्यंत पसरलेला कृष्णलीला दाखवणारा शिल्पपट्ट मात्र तुलनेने चांगल्या स्थितीत टिकून आहे. कृष्णलीलेच्या प्रत्येक दोन दृश्यांमध्ये आणि स्तंभाच्या वरच्या भागात व्याल प्रयोजने आहेत. या पट्टाचा दगड एकसंघ असला तरी काही ठिकाणी त्याचा निराळा दर्जा असल्याने व परिणामी तेथील झिजेमुळे कृष्णलीलेतील काही दृश्यांची हानी झाली असली तरी या शिल्पपट्टावरील बरीच दृश्ये ओळखता

येतात. या शिल्पपट्टाला किंवा निराळ्या शब्दात सांगायचे तर या पट्टावर दाखविलेल्या कृष्णकथामालेला उजव्या कोपऱ्यापासून सुरुवात होते. पहिल्या दृश्यात वसुदेव नवजात कृष्णाला घेऊन जात आहे असे दाखवले आहे. कथावर्णनपर पट्टाच्या शिल्पशैलीवरून आणि अधेमधे कोरलेल्या व्यालांवरून हे लेणे अजिंठा येथील उत्तर वाकाटककाळातील लेण्यांच्या समकालीन असून त्यांचा अदमासे काळ इ. स. ४५० ते इ. स. ५०० आहे असे म्हणता येईल.[३८]

**भटाळा येथील शैलगृहे** (ता. वरोरा, जि. चंद्रपूर) : चंद्रपूर जिल्ह्यातील भटाळा गावात राष्ट्रकूट-कलचुरी काळातील एक बांधीव मंदिर आणि गावाजवळच्या तलावाच्या काठावरील मोठ्या शिळांमध्ये कोरलेली काही छोटी शैलगृहे आहेत. ही शैलगृहे जेमतेम एक मीटर उंच, एक मीटर खोल आणि एक मीटर रुंद आहेत. या त्यांच्या आकारावरूनच ही शैलगृहे नवसाच्या पूर्ततेसाठी खोदलेली म्हणजेच ''अर्पित'' स्वरूपाची आहेत हे स्पष्ट होते. यातील काही शैलगृहांमध्ये शिवलिंग आहे, तर काही शैलगृहांमध्ये नरसिंहाची मूर्ती आहे. नरसिंह मूर्तीच्या शिल्पशैलीवरून ही शैलगृहे वाकाटककालीन आहेत हे स्पष्ट होते. पण शिवलिंग असलेल्या शैलगृहांच्या काळाबाबत निश्चित विधान करता येत नाही.

**गट–२ :**

या गटातील लेण्यांचे किंवा शैलगृहांचे एक खास वैशिष्टय म्हणजे ही सर्व शैवपंथी आहेत आणि त्यांचा काळ इ. स. ५०० ते इ. स. ६०० असा आहे. ही लेणी बऱ्याच मोठ्या क्षेत्रात, म्हणजे मुंबईपासून दक्षिणेकडे कोल्हापूरपर्यंत आणि पूर्वेस नांदेड आणि मराठवाड्यापर्यंत पसरली आहेत. या लेण्यांचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे ही शैवपंथातील पाशुपत संप्रदायाची आहेत. इ. स. च्या सुरुवातीच्या शतकांमध्ये लकुलीशाने स्थापन केलेला हा पाशुपत संप्रदाय दुसऱ्या चंद्रगुप्ताच्या काळात मथुरा भागात चांगलाच लोकप्रिय झाला होता; आणि लिखित, ऐतिहासिक पुराव्यांवरून लकुलीश हे ऐतिहासिक व्यक्तिम-त्व असण्याची शक्यता जाणवते. इ. स. च्या पाचव्या शतकात पश्चिम भारतात या संप्रदायाचे प्राबल्य चांगलेच वाढले होते ही बाब लकुलीश ज्या ठिकाणी सदेह प्रगटला त्या प्राचीन कायावरोहण, किंवा सध्याच्या कारवण (जिल्हा बडोदा), गावातील विटांनी बांधलेल्या मंदिराच्या अवशेषांवरून स्पष्ट होते. या संप्रदायाने बौध्दधर्माला मागे टाकून स्वतःचे प्राबल्य कसे काय वाढविले हे अजून पूर्णपणे समजलेले नाही. तथापि महाराष्ट्रातील बौध्द भिक्षूंच्या वसतिस्थानांना लागूनच या संप्रदायाची स्थाने आढळतात. पाशुपत संप्रदायाच्या

शैलगृहांची तात्काळ आठवणारी नावे म्हणजे मुंबई परिसरातील जोगेश्वरी, घारापुरी आणि मंडपेश्वर आणि वेरूळ येथील काही लेणी. या संप्रदायाच्या शैलगृहांना कोणत्या राजांचा आश्रय लाभला याबाबत आजही मतभेद आहेत.[३९]

**जोगेश्वरी लेणे** (ता. जोगेश्वरी, जि. मुंबई उपनगर) : जोगेश्वरी लेण्यामध्ये आज जरी जोगेश्वरी या दुर्गादेवीच्या एका रूपाची पूजा होत असली तरी मुळात हे शैव किंवा शंकराचे लेणे होते. हे लेणे अनेक दृष्टिकोनातून अद्वितीय आहे. इतर लेण्यांहून असलेले याचे पहिले वेगळेपण म्हणजे ते भूमिगत आहे. या लेण्याला पूर्वेकडे एक आणि पश्चिमेकडे एक अशी दोन मुख्य प्रवेशद्वारे आहेत. ही प्रवेशद्वारे भूमिपातळीवर असून खुद्द लेण्याच्या जमिनीच्या पातळीवर येण्यासाठी या प्रवेशद्वारांमधून सुमारे वीस ते चाळीस फूट खाली उतरावे लागते. घारापुरी येथील लेणे क्रमांक १ आणि वेरूळ येथील धुमारलेणे (लेणे क्रमांक २९) या दोन लेण्यांचे तलविन्यासही जोगेश्वरी लेण्यासारखे असून त्यात इतरही अनेक साधर्म्ये आहेत. यातील एक महत्त्वाचे साधर्म्य म्हणजे लेण्याची एक बाजू बंद असणे. या तिन्ही लेण्यांमधील मुख्य मंदिर चारही दिशांना दरवाजे असणारे, किंवा सर्वतोभद्र प्रकारचे आहे, पण सर्व लेण्यांना फक्त तीन बाजूनेच बाहेरची द्वारे आहेत व एक बाजू बंद आहे. तथापि कोणत्या दिशेची बाजू बंद असावी याबाबत कोणतेही संकेत नसावेत असे दिसते. कारण जोगेश्वरी लेण्यामध्ये उत्तरेची बाजू न खोदलेली म्हणजेच बंद आहे, घारापुरीच्या लेणे क्रमांक १ ची दक्षिण बाजू बंद आहे; तर धुमारलेण्याची पूर्व बाजू बंद आहे. या तिन्ही लेण्यांमध्ये या प्रकारचा शैलगृह आराखडा प्रथम जोगेश्वरी लेण्याच्या स्वरूपात दिसून आला, घारापुरीचे लेणे क्रमांक १ ही त्याची पहिली सुधारित आवृत्ती, तर वेरूळ येथील धुमारलेणे ही या सुधारित आवृत्तीची नक्कल होय. लेण्यांवर असलेले शैव कथनात्मक शिल्पपट आणि मातृदेवता, स्कंद कार्तिकेय आणि गणेश यांच्या मूर्ती असलेल्या छोट्या देवकुलिकाही या सिध्दांतास पुष्टी देतात. ही मूर्तियोजना जोगेश्वरी येथे बनण्याच्या अवस्थेत आहे, तर वेरूळ येथील धुमारलेण्यात ती दृढ झालेली आढळते.

आधीच वर्णन केल्याप्रमाणे टेकडीच्या साधारणतः मध्यभागी तिन्ही बाजूने आकाश दिसेल असे मोकळे प्रांगण असलेले लेणे आणि या प्रांगणयुक्त लेण्यात जाण्यासाठी टेकडीच्या बाह्यतम भागातून बोगद्याच्या स्वरूपात असलेले दोन महाद्वारमार्ग असे या लेण्याचे स्वरूप आहे. प्रांगणयुक्त लेण्यात तीन बाजूच्या प्रांगणातून जाणारे तीन प्रवेशमार्ग आहेत. लयनभागात जाण्यासाठी पूर्व आणि पश्चिमेकडून पायऱ्या असून, या पायऱ्या चढून गेल्यानंतर एक लंबचौकोनाकृती

मंडप लागतो. या मंडपाला दोन बाजूला दोन मंदिरे आहेत. तिसऱ्या म्हणजे दक्षिण बाजूला अधिक महत्त्व देण्यात आलेले असून तेथे ३६.५७ मीटर लांबीचा (दहा स्तंभावर पेललेला) मुखमंडप आहे. या मुखमंडपातून त्यालगतच्या मुख्य दालनात जाण्यासाठी तीन दरवाजे असून त्यातील मधला दरवाजा सर्वाधिक अलंकृत आहे. पूर्वेकडून असलेला प्रवेशमार्ग अधिक लांब असून त्याला छतयुक्त मार्गिका आणि मोकळे प्रांगण लाभलेले आहे. दोन्ही बाजूस मंदिरे असलेल्या छतयुक्त मार्गिकेवर शैव संप्रदायाची, आणि कदाचित मातृदेवतांचीही शिल्पे आहेत.

मुख्य दालनात जाण्यासाठी पूर्व, दक्षिण आणि पश्चिम या तिन्ही दिशांकडून प्रवेशमार्ग आहेत आणि दक्षिणेकडील बाजू बंद आहे. हे मुख्य दालन चौरसाकृती (२४.९९ चौ. मी.) असून ते वीस खांबांवर पेललेले आहे. या मुख्य दालनाच्या मधोमध सर्वतोभद्र प्रकारचे (चारही बाजूने दरवाजे असलेले) ७.३१ मीटर × ७.३१ मीटर असे चौरसाकृती गर्भगृह आहे. अर्धमंडपांतील (पूर्व आणि दक्षिण बाजूस अर्धमंडप आहेत) स्तंभ एकाच प्रकारचे म्हणजे चौरसाकृती तळखडा, पन्हाळयुक्त वरचा भाग, लसुणसदृश घटक आणि पीठाकृती शीर्ष असा घटकक्रम असलेले आहेत. पूर्वेकडील अर्धमंडपाच्या मुखभागावर आणि मुख्य मंदिराच्या प्रवेशमार्गावर चौरसाकृती वरचा भाग असलेले अर्धस्तंभ आढळतात. पूर्वेकडील बोगदा असे स्वरूप असलेल्या महाद्वारमार्गाव्यतिरिक्तही लंबचौकोनाकृती अर्धमंडपाच्या समोरील प्रस्तरात मंदिर किंवा मंदिरे खोदण्याचा स्थापत्यकाराचा हेतू असावा.[७] मुख्य अर्धमंडपाच्या समोरील खोदकाम अपूर्ण आहे. प्रांगणाच्या पश्चिम टोकाकडे फक्त एक खोली खोदलेली आहे. आणि या दोन्हींच्या मध्यभागी दोन स्तंभ आणि दोन अर्धस्तंभांवर उभा असलेला अर्धमंडप आणि त्याच्या मागे चौरसाकृती गर्भगृह असे स्वरूप असलेले मंदिर खोदण्यात आले आहे. या मंदिराच्या जमिनीची पातळी मोकळ्या प्रांगणातील जमिनीच्या पातळीच्या काहीशी वर असल्याने मंदिरात जाण्यासाठी पायऱ्यांची योजना आहे. अर्धमंडपातील स्तंभ, औरंगाबाद येथील लेणे क्रमांक १ व २ मध्ये आढळणाऱ्या उत्तर वाकाटककालीन स्तंभांसारखे असल्यामुळे, उल्लेखनीय आहेत.

या लेण्यातील आणखी उल्लेखनीय स्थापत्यशास्त्रीय वैशिष्ट्य म्हणजे या लेण्यातील दरवाजे. यातील काही द्वारांवर मकरतोरणे कोरलेली आहेत. अशा मकरतोरणांकित द्वाराचे उत्तम उदाहरण म्हणजे पूर्वेकडील अर्धमंडपाच्या मागील भिंतीत असलेला मंदिराच्या मुख्य दालनाचा दरवाजा होय.

या दरवाजाच्या दोन्ही बाजूस महाकाय शैव द्वारपाल खोदलेले असून त्यांच्या सोबत सेवकही दाखविले आहेत. दरवाजावरील ललाटबिंबाच्या जागी आणि

मकरतोरणाच्या खाली लकुलीशाचा उठावदार शिल्पपट आहे. यात लकुलीश त्याच्या चार शिष्यांसह दाखविलेला आहे. मकरतोरणयुक्त कमानीवर दोन देवता कोरलेल्या आहेत. लकुलीशाच्या शिल्पपटाच्या दोन्ही बाजूस अर्धस्तंभ आहेत व या पटाच्या दोन्ही बाजूस प्रत्येकी एक असे दोन पट आहेत. यातील एका पटावर कल्याणसुंदरमूर्ति शिव, तर दुसऱ्या पटावर शिवपार्वतीची द्युतक्रीडा दाखविली आहे. या दरवाजाच्या साध्या चौकटीच्या खांबांवर स्तंभशाखा ठळकपणे दिसतात व या खांबावरच मकरतोरण आहे. हे चौकटीचे खांब किंवा अर्धस्तंभ अजिंठा आणि औरंगाबाद येथील उत्तर-वाकाटककालीन लेण्यांमध्ये आढळणाऱ्या स्तंभांशी मिळतेजुळते आहेत. याशिवाय आणखी एक उल्लेखनीय द्वार म्हणजे दक्षिणेकडील अर्धमंडपाकडून मुख्य दालनात जाणारे इंग्रजी "टी" या अक्षराच्या आकाराचे द्वार. या दरवाजात स्तंभ शाखा, त्यावर कूटहार असलेले उत्तरांग आणि त्या "टी" च्या दोन टोकांवरील देवता इत्यादी सर्व उत्तर-वाकाटककालीन द्वाराची वैशिष्ट्ये आहेत. द्वारशाखांमध्ये चौकटची नक्षी आणि प्रत्येक चौकटात मधोमध दाखविलेला मोती असलेली शाखा आहे. स्तंभशाखेजवळील व सर्वाधिक आतील शाखेवर मिथुने तर एका शाखेवर मुक्तहार कोरला आहे. उत्तरांगावरील मध्यभागी असलेल्या कूटामध्ये शिवलिंग दाखविले आहे. चार दिशांना चार द्वारे असलेल्या गर्भगृहाची द्वारे मात्र त्या ठिकाणच्या निकृष्ट प्रतीच्या दगडांमुळे आणि या ठिकाणी नुकत्याच करण्यात आलेल्या जतन कामामुळे चांगल्या स्थितीत शिल्लक नाहीत. गर्भगृहाचे पूर्वाभिमुख द्वार अलंकरणात्मक नसले तरी त्याला स्तंभशांखावर पेललेले व कपोतावर विराजमान झालेले कूटहारयुक्त उत्तरांग आहे. सर्वाधिक बाहेरच्या स्तंभशाखेवर असलेली चौकटची नक्षी हे तर अगदी खास वाकाटककालीन कलेचे वैशिष्टय आहे. स्तंभशाखेच्या खालच्या काही भागाच्या पातळीवर आणि दरवाजाच्या चौकटीच्या बाहेरील अंगास काही गण दाखविले आहेत. गर्भगृहातून बाहेर जाण्याच्या एका दरवाजाच्या वर लकुलीशाची मूर्ति आहे. या शैलगृहाची द्वारे आज जरी फारशा चांगल्या स्थितीत नसली तरी त्यातल्या त्यात पूर्वेकडील अर्धमंडपात जाण्याचे द्वार उल्लेखनीय आहे. या द्वाराच्या द्वारशाखेच्या खालच्या भागात सिंहावर विराजमान झालेले द्वारपाल दाखविले आहेत. त्यांच्यासोबत आयुधपुरुषही दाखविले आहेत. मधल्या उत्तरांगावर गणांसमवेत असलेला नटराज दाखविला आहे. असा नटराज दुसऱ्या बाजूवरील शिल्पपटातही दाखविण्यात आला आहे. स्तंभशाखेव्यतिरिक्त टोकाच्या शाखेवर उभ्या चौकटीची नक्षी दाखविण्यात आली आहे. छेद आरेखनात चौरसाकृती आणि पन्हाळयुक्त (fluted) अर्धस्तंभाच्या वर लसुन आणि कुंभ हे घटक असून त्यावर पीठाकृती शीर्ष आहे. या अर्धस्तंभाला आतील बाजूस, दक्षिणेकडील

अर्धमंडपाच्या स्तंभांप्रमाणेच, व्यालहस्त आहे. पूर्वेकडील अर्धमंडपाच्या दरवाजावर, ज्याप्रमाणे लकुलीशाचे शिल्प आहे त्याचप्रमाणे, पश्चिमेच्या अर्धमंडपावर रावणानुग्रह शिल्प आहे. आज हे शिल्प खूपच झीज झालेल्या अवस्थेत आहे. दक्षिणेकडील अर्धमंडपाच्या अलंकृत प्रवेशमार्गाच्या बाजूला आणखी दोन शिल्पपट आहेत. त्यातील एक पट अंधकासुरवधमूर्तीचा तर दुसरा दुर्गेचा आहे.

या लेण्याची वास्तुशास्त्रीय वैशिष्ट्ये, त्यातील शिल्पांची शैली आणि दक्षिणेकडील अर्धमंडपाच्या पूर्वेकडील टोकाजवळ असलेला त्रोटक शिलालेख या बाबी लक्षात घेता हे लेणे इ. स. च्या पाचव्या शतकाच्या शेवटी अथवा सहाव्या शतकाच्या पहिल्या चतुर्थकात खोदले गेले असे दिसते.

**मंडपेश्वर लेणे** (ता. जोगेश्वरी, जि. मुंबई उपनगर) : बोरिवली (पश्चिम) भागातील मंडपेश्वर लेणे हा एक स्वतंत्र वास्तु प्रकार आहे. हा प्रकार नंतरच्या काळात. म्हणजे इ. स. च्या सहाव्या शतकाच्या उत्तरार्धात लोकप्रिय झालेला आढळतो. स्पिंक यांच्या मते (मार्ग, खंड क्रमांक २०, १९६७ पृष्ठ २१) या प्रकारची उद्‌भवचिन्हे किंवा प्राथमिक स्वरूपाचा आरंभ अजिंठा आणि औरंगाबाद (लेणे क्रमांक १ व ३) येथे झालेला आढळतो.

पोर्तुगिजांच्या काळात मंडपेश्वर येथील शैव लेण्याचे रोमन कॅथलिक चर्चमध्ये रूपांतर करण्यात आले. हे चर्च 'नोत्र दाम द ला मिसीकॉर्ड' याला अर्पित करण्यात आले होते. या लेण्याचे चर्चमध्ये रूपांतर करताना. केवळ वास्तुशास्त्रीय घटकांची आणि मूर्तिशिल्पांची मोडतोड झाली एवढेच नाही तर इतर काही नवीन वास्तुघटक उभारले गेले. असे बदल घडलेले असूनही या नव्याने बांधणी करण्यात आलेल्या वास्तुघटकांचे निर्मूलन केल्यानंतर मूळ लेण्याचा तलविन्यास स्पष्टपणे उजेडात आला. मुख्य गर्भगृह, त्यानंतर अंतराल, त्यानंतर हे अंतरालयुक्त गर्भगृह आणि दोन बाजूंची दोन मंदिरे यांना सामायिक असलेला मंडप आणि मंडपापुढे मोकळे प्रांगण असे या लेण्याचे स्वरूप आहे. मंडपाच्या पातळीपर्यंत जाण्यासाठी पायऱ्यांची योजना आहे. या पायऱ्यांच्या दोन्ही बाजूस बसलेले सिंह आहेत. आज या लेण्याच्या मुख्य गर्भगृहात नव्याने बसविलेल्या लादीवर एक शिवलिंग आहे. या लेण्यात काही शैव कथनात्मक शिल्पपटही आहेत. हे शिल्पपट बाजूच्या उपमंदिरांमधील मागील भिंतींमध्ये आहेत. दक्षिणेकडील उपमंदिराच्या भिंतीत नटराजाची मूर्ती आहे तर दुसऱ्या उपमंदिरात व्याख्यानमुद्रेतील लकुलीश दाखविला आहे. मुखभाग, मंडप, अंतराल आणि उपमंदिरांमधील स्तंभ यांची रूपांतर प्रक्रियेत अशी मोडतोड झाली आहे की, त्यांची वास्तुशास्त्रीय वैशिष्ट्ये स्पष्ट होत नाहीत. तथापि उपमंदिरांच्या

मुखभागातील अर्धस्तंभांवरून स्तंभघटकक्रमाची साधारण कल्पना येते. काही स्तंभ जोगेश्वरी येथील स्तंभांप्रमाणे सपाट चौरसाकृती खांब आणि त्याच्यावर लसूण आणि कुंभ घटक असलेले होते. काही स्तंभांच्या वरच्या टोकाखाली सपाट पट असलेला अष्टकोनी घटक, या दोहोंच्या मध्ये वर्तुळाकृती घटक आणि या सगळ्यांच्या वर पूर्णकलश असे स्वरूप असलेल्या अजिंठा आणि औरंगाबाद येथील उत्तर वाकाटककालीन लेण्यांमधील स्तंभांशी साधर्म्य आहे. उत्तर वाकाटककालीन स्तंभांप्रमाणेच या स्तंभांवरील अष्टकोनी घटकांवर मिथुने व व्याल दाखविण्यात आले आहेत.

मंडपेश्वर लेण्याची वास्तुशास्त्रीय वैशिष्ट्ये व मूर्ती पूर्णपणे शिल्लक नाहीत; तरीही या लेण्याचा तलविन्यास आणि मूर्तिशिल्पांची शैली यावरून हे लेणे उशिरात उशीरा इ. स. च्या सहाव्या शतकाच्या पहिल्या चतुर्थकात खोदले गेले असे म्हणता येईल.

**घारापुरीची लेणी उर्फ एलिफंटा** (ता. उरण, जि. रायगड) : घारापुरीचे लेणे हे महाराष्ट्रात इ. स. च्या सहाव्या शतकात विकसित झालेल्या पाशुपत शैलस्थापत्याचा उत्कृष्ट अविष्कार आहे. आधीच विवेचन केल्याप्रमाणे ज्या स्थापत्यकारांनी जोगेश्वरीच्या लेण्याची योजना आणि निर्मिती केली त्याच स्थापत्यकारांनी या योजनेत सुधारणा करून घारापुरी येथील हे थक्क करून सोडणारे लेणे खोदले. हे लेणे तीन बाजूंकडून खुले असून सध्या त्यात उत्तरेकडील अर्धमंडपामधून प्रवेश केला जातो. तलविन्यासदृष्ट्या जरी पूर्वेकडील अर्धमंडप हा मुख्य प्रवेशमार्ग वाटला तरीही प्राचीन काळातही मुख्य प्रवेशमार्ग म्हणून उत्तरेकडील अर्धमंडपाचाच वापर होत असे. जोगेश्वरी लेण्यामध्ये सर्वतोभद्र प्रकारचे (चार दिशांना चार दरवाजे असलेले) गर्भगृह मंडपाच्या मध्यभागी आहे, पण घारापुरी लेण्यात ते पश्चिमेकडील भिंतीकडे सरकलेले आढळते. म्हणूनच तलविन्यासदृष्ट्या पूर्वेकडील अर्धमंडप हाच मुख्य प्रवेशमार्ग ठरतो. पूर्वेकडील अर्धमंडप आणि मुख्य मंदिर यांच्यामध्ये दोन चतुष्की आहेत. या लेण्यातील दक्षिण बाजू बंद असून त्या बाजूला इतर तीन बाजूंना अर्धमंडप न येता मधोमध अंतरालसदृश काहीसा आत गेलेला भाग आहे. या अंतरालसदृश खोलगट भागाच्या दोन्ही म्हणजे पूर्व आणि पश्चिम बाजूस शिल्पपट आहेत. मधल्या अंतरालसदृश खोलगट भागात तथाकथित महेशमूर्ती आणि या भागाच्या पूर्वेस पण ज्या भिंतीत हा अंतरालसदृश भाग खोदला आहे त्याच भिंतीत अर्धनारीश्वर, तर पश्चिमेकडे गंगाधरमूर्ति शिव दाखविला आहे. म्हणजेच पश्चिम, उत्तर आणि पूर्व बाजूस अर्धमंडप असलेला आणि पश्चिम बाजूस आतील टोकास २७.४३ ते २८.६५ मीटर चौरसाकृती गर्भगृह असलेला

असे या लेण्याचे स्वरूप आहे. या तिन्ही अर्धमंडपांपुढे प्रांगण असून प्रत्येक अर्धमंडपात दोन बाजूंच्या टोकाला कथनात्मक शिल्पपट आहेत. हे अर्धमंडप अदमासे १०.३६ मीटर रुंद आणि ४.५७ मीटर खोल आकाराचे आहेत. लेण्याची दक्षिण बाजू आधीच विशद केल्याप्रमाणे बंद आहे. यावरून आपल्या असे लक्षात येईल की, द्वारांच्या मुखभागात मंडपाच्या मागील भिंतीत, उपमंदिरात आणि अर्धमंडपाच्या मुख भागात व अन्य ठिकाणी विखुरलेल्या कथनात्मक शिल्पपटांना या लेण्यात निश्चित असे वास्तुशास्त्रीय स्थान प्राप्त झाले आहे.

या मुख्य लेण्याच्या पूर्व आणि पश्चिम प्रांगणात प्रत्येकी एक मंदिर आहे. पश्चिमेकडील प्रांगणातील मंदिर पूर्वाभिमुख असून त्याचा आकार १०.३६ मीटर × ९.७५ मीटर आहे. या मंदिराला दोन स्तंभ आणि दोन अर्धस्तंभ असलेला मुखमंडप असून त्याच्या भिंतीवर मूर्तिशिल्पे आहेत. अर्धमंडपाच्या मागे गर्भगृह असून त्यात शिवलिंग आहे. या प्रांगणात दक्षिण बाजूस पाण्याचे टाके आहे.

पूर्वेकडील प्रांगणात असलेले मंदिर बहुधा शैलगृहयोजनेचाच , भाग असावा. कारण या मंदिरासमोरील, म्हणजेच मुख्य लेण्याच्यां पूर्वेकडील प्रांगणात एक वर्तुळाकार रंगशिला आहे. या रंगशिलेवर एकेकाळी सुटा एकाश्मक नंदी बसविलेला असण्याची शक्यता आहे. हा नंदी मुख्य लेण्याला आणि पूर्वेकडील प्रांगणात असलेल्या उत्तराभिमुख मंदिराला सामायिक असावा. तलविन्यासदृष्ट्या हे मंदिर बोरिवली येथील (मंडपेश्वर) शैलगृहासारखे असून पूर्व आणि पश्चिम बाजूस उपमंदिरे असलेला मंडप आणि मंडपाच्या मागील बाजूस गर्भगृह अशी त्याची रचना आहे. मंडपेश्वर लेण्यामध्ये आणि मुख्य लेण्याच्या पूर्वेकडील प्रांगणालगत असलेल्या या शैलगृह-मंदिरामध्ये फरक इतकाच की, या मंदिरात २.७४ मीटर रुंदीचा प्रदक्षिणापथ आहे. मंदिरात जाणाऱ्या पायऱ्यांचा कठड्यावर मंडपेश्वर लेण्याप्रमाणेच बसलेले सिंह दाखविले आहेत. या मंदिराचा मंडप १७.६७ मीटर रुंद × ७.३१ मीटर खोल असून त्यातील उपमंदिरे ३.४७ मीटर खोल आणि ८.३५ मीटर रुंद आहेत. गर्भगृह ४.२६ मीटर रुंद आणि ४.८७ मीटर खोल आहे. मंदिरामध्ये सप्तमातृका, गणेश आणि कार्तिकेयाच्या मूर्ती आहेत. पूर्वेकडील प्रांगणाला लागून असणारे हे लेणे जोगेश्वरी लेण्यातील बोगद्यासारख्या भागातून येणाऱ्या आणि दोन बाजूस दोन मंदिरे असलेल्या पूर्वेकडील महाद्वारमार्गाची सुधारित आवृत्ती आहे असे म्हणता येईल. या लेण्यात वास्तुशास्त्रीय आणि शिल्पशास्त्रीय योजना अधिक पध्दतशीर बनलेली आहे. म्हणूनच एलिफंटा येथील लेणे हे जोगेश्वरीच्याच लयनयोजनेची सुधारित आवृत्ती मानली जाते.

जोगेश्वरी आणि घारापुरी या लेण्यांमधील स्तंभांचा स्तंभघटकक्रम सारखाच आहे. चौरस तळखडा, त्यावर अष्टकोनी घटक, त्यावर लसूण, त्यावर पीठाकृती शीर्ष आणि त्याच्याही वर चौरस स्तंभशीर्ष (abacus) आणि हस्त असा स्तंभघटकक्रम आहे. घारापुरीच्या लेण्यातील स्तंभांमध्ये एक किंचितसा फरक करण्यात आला आहे, आणि तो म्हणजे खांबाच्या वरच्या भागात, मंडपेश्वर येथील किंवा उत्तरवाकाटककालीन स्तंभांप्रमाणे गण आणि वादक दाखविलेले आहेत. यावरून जोगेश्वरी लेण्याची निर्मिती आणि घारापुरी येथील लेण्यांची निर्मिती यांच्यामधील काळाचे अंतर फार मोठे नसावे असे दिसते. पूर्वेकडील प्रांगणालगतच्या मंदिराच्या दरवाजाची चौकट जोगेश्वरी प्रमाणेच आहे, पण इंग्रजी "टी" या अक्षरासारखा आकार आणि त्याच्या टोकांवर दाखविलेल्या देवता आणि कथनात्मक शिल्पपट मात्र येथे दिसून येत नाहीत. जोगेश्वरी लेण्याच्या पूर्वेकडील मंडपात दिसून येणारे "आयुधपुरुषांसमवेत असलेले महाकाय द्वारपाल" हे वैशिष्ट्य मात्र घारापुरी येथे विकसित झालेले आढळते. हे असे महाकाय द्वारपाल पूर्वेकडील प्रांगणालगतच्या लयनमंदिरात आढळतातच, पण ते सर्वतोभद्र प्रकारच्या मुख्य मंदिरावरही आढळतात. येथे या आठही महाकाय द्वारपालांजवळ प्रत्येकी एक स्त्री चवरीधारक दाखविली आहे.

वास्तुशास्त्रीय योजना, त्यातील विकसितपणा कथनात्मक पटांचे आणि मूर्तिशिल्पांचे पध्दतशीर आयोजन, शिल्पशास्त्रीय शैली आणि इतर परिस्थितीजन्य पुराव्यांवरून घारापुरीतील हे महान लेणे इ. स. ५५० च्या सुमारास खोदले गेले असावे असे दिसते.

**धुमार लेणे** : वेरूळ येथील लेणे क्रमांक २९ हे "सीतेची न्हाणी" किंवा धुमारलेणे म्हणून प्रसिध्द आहे. हे लेणे जरी येथील ब्राह्मणी शैलगृहांच्या ओळीत शेवटचे लेणे असले तरीही ते सर्वात आधी खोदले गेले असण्याची शक्यता आहे. या लेण्याचे बृहन्मुंबईतील जोगेश्वरी लेण्याशी आणि घारापुरी येथील मुख्य लेण्याशी साधर्म्य आहे. आधीच नमूद केल्याप्रमाणे जोगेश्वरी लेणे हे पाशुपत संप्रदायाच्या लयननिर्मितीच्या ज्ञात प्रयत्नांपैकी पहिला प्रयत्न किंवा आविष्कार आहे. घारापुरी किंवा एलिफंटा येथील मुख्य भव्य लेणे ही त्याची सुधारित आवृत्ती आहे. याच लयनस्थापत्य प्रकाराचा इथे असलेला नवा आविष्कार या दोन ठिकाणांपासून दूर असला, तरी कालदृष्ट्या या लेण्यामध्ये आणि त्या दोन लेण्यांमध्ये फारसे अंतर नाही. परंतु या संदर्भात उस्मानाबाद जिल्ह्यातील तेर या गावी असलेल्या उत्तरेश्वर मंदिरात मिळणारा पुरावा येथे नमूद करणे आवश्यक आहे. हे विटांनी बांधलेले मंदिर त्याच काळातील, म्हणजे

इ. स. च्या सहाव्या शतकातील असून, त्यातील आजही टिकून असलेल्या दरवाज्याच्या चौकटीवर पाशुपत संप्रदायाचा प्रभाव दिसून येतो. यावरून सुवर्ण युगोत्तर काळातही (post classical period) पाशुपत संप्रदायाचा प्रभाव अगदी तेर पर्यंत होता हे सिध्द होते.

तलविन्यासदृष्ट्या हे लेणे साधारणपणे जोगेश्वरी आणि घारापुरीच्या लेण्यासारखेच आहे. त्यामुळे ह्या इतर दोन लेण्यांप्रमाणेच धुमारलेण्याचीही एक बाजू बंद आहे; आणि इतर तीन बाजूंकडून प्रवेशमार्ग आहेत.

या लेण्याची पूर्व बाजू बंद आहे; आणि मंडपातील सर्वतोभद्र प्रकारचे गर्भगृहही मंडपाच्या पूर्व बाजूजवळ आहे. घारापुरीतील गर्भगृह नेमके याच्या विरुध्द दिशेला आहे. आकाराच्या दृष्टीने हे लेणे इतर दोन लेण्यांपेक्षा मोठे आहे. ते ४५.११ चौरस मीटर असून ५.३८ मीटर उंच आहे. तीन बाजूना असलेले अर्धमंडप १०.७६ मीटर रुंद आणि ७.६२ मीटर खोल आहेत. या लेण्याच्या उत्तर प्रांगणात घारापुरी लेण्याच्या पूर्व प्रांगणात असलेल्या लयनमंदिरासारखेच मंदिर खोदण्याचा प्रयत्न झाला होता. मूर्तींची स्थानयोजनाही तशीच आहे. या मूर्ती अर्धमंडपातील दोन बाजूंच्या देवकोष्टांमध्ये आणि पूर्वेकडील मागच्या भिंतीत कोरल्या आहेत.

या मूर्तींचा क्रम पश्चिमेकडील अर्धमंडपाच्या दक्षिण बाजूकडून १) रावणानुग्रह, २) गजासुरसंहार, ३) शिवपार्वतीची द्यूतक्रीडा, ४) कल्याणसुंदर, ५) लकुलीश, ६) तांडवनृत्य करणारा शिव आणि ७) गंगाधरशिव असा आहे. या मूर्तिस्थान योजनेतील वाढीव वैशिष्ट्य म्हणजे मंदिर आणि उत्तरेकडील बाजूवर दाखविलेल्या गंगा आणि यमुना होत.

**माहूर येथील पांडू लेणी** (ता. किनवट, जि. नांदेड) : माहूर गावातच टेकडीच्या उत्तर कोपऱ्यात पांडू लेणी आहेत. या ठिकाणी एकमेकांलगत अशी दोन लेणी असून त्यातील मुख्य लेणे पूर्वाभिमुख तर दुसरे लेणे उत्तराभिमुख आहे. पूर्ण झालेल्या लेण्याच्या गर्भगृहाच्या मध्यभागी शिवलिंग असून त्याभोवती प्रदक्षिणापथ आहे. या मंदिराच्या प्रवेशमार्गाचे स्वरूप साधे द्वार असे असून त्याची चौकट अगदी साधी आहे. मधली शाखा स्तंभशाखा असून त्यावर लघुमंदिरांची रांग कोरलेले उत्तरांग आहे. आणखी एक महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे प्रत्येक बाजूस एक असे दोन महाकाय द्वारपाल असून त्यांच्या वरच्या अंगास विद्याधर, तर खालच्या अंगास सेवक दाखविले आहेत. गर्भगृहात जाण्यासाठी एकामागे एक असे दोन व्हरांडे ओलांडावे लागतात. गर्भगृहालगत असलेला व्हरांडा काहीसा अरुंद आहे. सहा स्तंभ आणि दोन अर्धस्तंभांनी हे व्हरांडे विभक्त केले आहेत. सर्वात पुढील

व्हरांड्याला देखील दोन अर्धस्तंभ आणि सहा स्तंभ आहेत. सर्वात पुढील व्हरांड्यासमोर मोकळे प्रांगण आहे. या प्रांगणात सध्या उत्तरेकडील भिंतीत दोन लयनमंदिरे आणि मुख्य लेण्यांच्या समोर एक लयनमंदिर आहे.

अपूर्णावस्थेत असलेल्या लेण्यातही एकामागे एक असे दोन व्हरांडे आणि त्याच्यामागे गर्भगृह असले तरीही त्याचा तलविन्यास काहीसा निराळा आहे. या उत्तराभिमुख लेण्यामध्ये प्रथम आयताकृती व्हरांडा लागतो. त्यात प्रवेश करण्यासाठी चार स्तंभ आणि दोन अर्धस्तंभांनी बनलेली स्तंभांची ओळ ओलांडून पुढे जावे लागते. आयताकृती सभागृहाच्या (पुढच्या व्हरांड्याच्या) उजव्या आणि डाव्या बाजूस प्रत्येकी एक गर्भगृह आहे. ही गर्भगृहे प्रत्येकी दोन स्तंभांमुळे सभागृहापासून विभक्त झाली आहेत. ह्या मंडपाच्या किंवा पुढच्या व्हरांड्याच्या मागील बाजूस भिंत आहे. या भिंतीच्या मागे दुसरा मंडप किंवा व्हरांडा आहे. या भिंतीत मागील व्हरांड्यात जाण्यासाठी मध्यभागी द्वार असून या द्वाराच्या दोन्ही बाजूस गवाक्षे आहेत. मागच्या आयताकृती व्हरांड्यात पूर्व आणि पश्चिम टोकांमध्ये प्रत्येकी एक छोटे मंदिर आहे. व्हरांड्याच्या मागील भागात मधोमध मुख्य गर्भगृह आहे. दुसरा व्हरांडा आणि गर्भगृह यांच्यामध्ये चार स्तंभ आणि दोन अर्धस्तंभ आहेत.

या शैलगृहाचा तलविन्यास, पूर्ण झालेल्या शैलगृहाचा द्वारमार्ग, येथे आढळलेले शिवलिंग व त्यातील रुद्रभागाखाली असलेला चौरसाकृती भाग आणि मूर्तिशिल्पांची (शिव गंगाधर, अर्धनारी शिव, तांडवमूर्ति, त्रिपुरारि शिव आणि नायिका) शैली यावरून हे शिल्पगृह इ. स. च्या सहाव्या शतकाच्या मध्यात खोदले गेले असावे असे अनुमान काढता येईल.

**अंकाई-टंकाई** (ता. येवला, जि. नाशिक) : नाशिक जिल्ह्यातील मनमाड शहरापासून ८ कि. मी. अंतरावर अंकाई नावाचा किल्ला (गिरिदुर्ग) आहे. या टेकडीच्या ईशान्य बाजूलगत आणखी एक टेकडी असून त्यावरही एक किल्ला आहे. या दोन एकमेकांलगत असलेल्या किल्ल्यांकडे जाणाऱ्या मार्गावर टेकडीच्या पायथ्यापासून अगदी थोड्याच उंचीवर, दूरूनही दिसणारा जैन लयनसमूह आहे. त्याहून अधिक उंचीवर आणि किल्ल्याच्या बाह्य तटबंदीच्या आतील बाजूस तीन शैव लेणी आहेत. हा किल्ला चढताना दुसरा दरवाजा ओलांडल्यानंतर जवळच मुख्य शैलगृह लागते. हे शैलगृह अपूर्णावस्थेत असून त्याची बरीच झीज झाली आहे. या शैलगृहाला २४.३० मीटर रुंद व ४.०८

मीटर खोल आयताकृती व्हरांडा आहे. या व्हरांड्यात सेवकांसमवेत असलेली स्त्रीशिल्पे आहेत. या व्हरांड्याच्या मागे गर्भगृह आहे. गर्भगृहाच्या द्वाराच्या दोन बाजूस याच काळातील इतर शैलगृहांमधील गर्भगृहांप्रमाणेच महाकाय द्वारपाल आहेत. परंतु या चौरसाकृती गर्भगृहाभोवतीचा प्रदक्षिणापथ मात्र अपूर्णावस्थेत आहे. या शैलगृहाच्या मागच्या भिंतीत वेरूळ येथील अन्य शैलगृहांत आढळते तशी महेश मूर्ती आहे. या शैलगृहाचा तलविन्यास, त्यातील अलंकरणात्मक घटक, महाकाय द्वारपाल आणि मूर्तिशिल्पांची शैली लक्षात घेता हे शैलगृह इ. स. च्या सहाव्या शतकाच्या मध्यात खोदले गेले असे दिसते.

**टाकळी ढोकेश्वर** (ता. पारनेर, जि. अहमदनगर) : अहमदनगर जिल्ह्यातील अहमदनगर शहरापासून ५० कि. मी. अंतरावरील पारनेर तालुक्यातील ढोके या गावी असलेले शैलगृह ढोकेश्वर या नावाने ओळखले जाते. गर्भगृहाचा आकार, प्रदक्षिणापथातील काही भाग आणि त्यातील उपगर्भगृहे पाहता हे लेणे काहीसे अपरिपक्व किंवा ओबडधोबड पध्दतीने खोदल्यासारखे वाटते. या लेण्याचा तलविन्यास काहीसा इतर तत्कालिन लेण्यांसारखाच आहे. प्रथम आयताकार व्हरांडा आणि त्यामागे प्रदक्षिणापथाने युक्त असलेले गर्भगृह असे तलविन्यासाचे सर्वसाधारण स्वरूप आहे. हे शैलगृह आणि त्यातील गर्भगृह पश्चिमाभिमुख आहे. आयताकार व्हरांड्याच्या द्वाराच्या एका बाजूस गंगेची तर दुसऱ्या बाजूस यमुनेची मूर्ती आहे. या मूर्ती वेरूळ येथील क्रमांक २१ च्या शैलगृहाच्या द्वारालगत असलेल्या गंगा-यमुनांच्या मूर्तींची आठवण करून देतात. आयताकृती व्हरांड्याच्या उत्तरेकडील भिंतीत स्तंभयुक्त मंदिर किंवा उपगर्भगृह असून त्यात नृत्य करणारा शिव दाखविला आहे. या उपगर्भगृहाच्या प्रदक्षिणापथाच्या दक्षिण भिंतीतील वाहनांसह असलेल्या सप्तमातृका, गणेश आणि भैरवासह दाखविल्या आहेत. या शिल्पातील एक उल्लेखनीय बाब म्हणजे या शिल्पाच्या पार्श्वभूमीवर कोरलेली झाडे बहुधा ''पवित्र वृक्ष'' या सदरात मोडणारी असावीत. या शैलगृहाचे आणखी एक उल्लेखनीय वैशिष्ट्य म्हणजे मुख्य गर्भगृहाच्या प्रदक्षिणापथाच्या उत्तर भिंतीत नंदिमंडप कोरलेला असल्यामुळे गर्भगृहाला मुख्य द्वाराव्यतिरिक्त उत्तरेला आणखी एक दरवाजा आहे. मुख्य गर्भगृहाच्या मुख्य दरवाजाच्या दोन्ही बाजूस आयुधपुरुष आणि गणांसमवेत असलेले महाकाय द्वारपाल आहेत. त्यांच्या वरच्या अंगास उडणारे विद्याधर दाखवले आहेत.

**पळसांवे** (ता. गगनबावडा, जि. कोल्हापूर) : कोल्हापूर जिल्ह्यातील गगनबावडा तालुक्यात कोल्हापूर-गगनबावडा मार्गावरील अळसागे गावापासून ५ कि. मी. अंतरावर पळसांबे हे अगदी छोटे गाव आहे. या गावानजीकच्या ओढ्याच्या

पात्रातच रामलिंगेश्वर या नावाने ओळखले जाणारे एक शिवमंदिर आहे. महाशिवरात्रीच्या दिवशी येथे मोठा उत्सव होतो. या मंदिराच्या भिंतीवर आणि बाह्य भागावरही देवकोष्ठे कोरलेली आहेत.

परंतु याहूनही महत्त्वाची बाब म्हणजे या ओढ्याच्या पात्रामध्येच अवाढव्य शिळांमध्ये कोरलेली तीन एकाश्मक मंदिरे आहेत. या शिळांचे अदमासे आकारमान आठ घन मीटर आहे. ही तीन एकाश्मक मंदिरे तीन वेगवेगळ्या स्थापत्यशास्त्रीय स्वरूपाची आहेत. ही तीन स्वरूपे म्हणजे १) सर्वतोभद्र मंदिर, २)मंडप किंवा सभागृह नसलेले मंदिर, आणि ३) अर्धमंडप आणि मंडप असलेले मंदिर. या ठिकाणी आणखी एक मंदिर आहे. पण हे मंदिर उंच उठावात कोरलेले असून "शाला" स्वरूपाचे आहे.

सर्वतोभद्र मंदिर अत्यंत साधे असून चार दरवाजे असलेले आणि प्रत्येक दरवाजापुढे एक अर्धमंडप असलेले गर्भगृह असे त्याचे स्वरूप आहे. यातील मुखमंडप दोन स्तंभांवर पेललेले असून मुखमंडपाच्या वरच्या अंगाला चैत्य-गवाक्षे आहेत. मंदिराच्या बाह्यांगावर कोणतेही अलंकरण नाही.

या वर्णन केलेल्या मंदिरापासून काही अंतरावर आणि ओढ्याच्या खालच्या अंगाला आणखी एक एकाश्मक मंदिर आहे. हे मंदिर एकाच बाजूने खुले असून दोन स्तंभांनी प्रवेशद्वार बनले आहे. स्तंभांच्या एका बाजूस, म्हणजे या द्वाराच्या दोन्ही बाजूस वामनभिंती आहेत. मुखभागावर चैत्य-गवाक्ष कोरलेली असून त्यावर शिखर आहे. आज या शिखराचे केवळ दोन तलच शिल्लक आहेत. मंदिराचा अंतर्भाग आयताकृती असून त्याच्या मागील भिंतीलगत पूजेची मूर्ती किंवा 'पूजावस्तू' होती असे दिसते. आज ती अस्तित्वात नाही. या मंदिराचे वैशिष्टय म्हणजे या मंदिराच्या पायालगतच्या भागात दाखविलेली दोन लघु कोरीव मंदिरे. ही मंदिरे मुख्य मंदिराच्याच कोरीव प्रतिकृती असल्या तरी ती या मुख्य मंदिराची वास्तुशास्त्रीय घटक नाहीत. मंदिराच्या बाह्यांगाला चिकटवल्यासारख्या वाटणाऱ्या या लघुमंदिराचे स्वरूप अर्ध-खुले गर्भगृह, त्यावर शाला शिखरे आणि कूटशिखरे असलेले विमानाचे दोन तल आणि या सगळ्याच्या वर स्तूपिका आणि सर्वात वर कळस असे आहे.

शेवटचे आणि या अशा दोन मंदिरांच्या तुलनेत ओढ्याच्या सर्वात वरच्या अंगाला असलेले मंदिर सर्वाधिक उल्लेखनीय आहे. मुखमंडप, उतरते छप्पर असलेला मंडप आणि नेहमीचे दाक्षिणात्य पध्दतीचे शिखर असलेले गर्भगृह

असे या मंदिराचे स्वरूप आहे. चार कोपऱ्यात चार कूटशिखरे, स्तूपिकेचे छप्पर, त्यावर अष्टकोनी स्तूपिका असे या शिखराचे स्वरूप आहे. या अष्टकोनी स्तूपिकेवर एकेकाळी कळस असावा. मंडप चौरसाकृती असून दोन बाजूंनी अर्धखुला आहे. म्हणजेच या मंडपाच्या दोन बाजूंना वामनभिंती आहेत. या मंडपाच्या वरकरणी सपाट वाटणाऱ्या छतावर छताच्या फळ्या कोरल्या आहेत. या फळ्या किंवा रिपा पूर्व पश्चिम असून टोकांना बाहेरच्या भागाच्या उताराच्या समप्रमाणात तिरप्या झालेल्या आहेत. गर्भगृहाच्या अंतर्भागाची रुंदी खोलीपेक्षा अधिक आहे. गर्भगृहामागच्या भिंतीलगत पीठ आहे. या पीठावर पूजेची मूर्ती ठेवलेली असावी. पण आज या पीठावर काहीही नाही. मंडपाचे छप्पर तिरप्या उताराचे असून त्याच्यावर चार कळस आहेत. शिखराच्या तळांच्या कोपऱ्यात कूटशिखरे असून दोन कूटशिखरांच्या मधल्या भागात कमानीच्या आकाराचे दरवाजे कोरलेले आहेत. हे दरवाजे शाला शिखरांचेच संकोच झालेले स्वरूप आहे.

भिंतीवर अर्धउठावात कोरलेली मंदिरे असणारी गुंफा, शिलापृष्ठावर खोल उठावात कोरलेले शाला-शिखरसदृश मंदिर आणि ओढ्याच्या प्रवाहात असलेली तीन एकाश्मक मंदिरे असे हे महाराष्ट्रातील एक अद्वितीय मंदिर संकुल आहे. या संकुलात अजूनतरी कोणताही शिलालेख आढळलेला नाही. शिवाय या संकुलात मूर्तिशिल्पेही नाहीत. त्यामुळे ह्या मंदिराचा काळ केवळ त्यांच्या स्थापत्यशैलीवरूनच ठरवावा लागतो.

दुसऱ्या, म्हणजे ओढ्याच्या सर्वात उतारावर असलेलल्या मंदिराच्या बाह्यांगावर कोरलेल्या छोट्या मंदिराच्या विमानाच्या शाला-शिखरावर कोरलेल्या लकुलीशाचा अपवाद वगळला तर या संकुलात कोणत्याही मूर्ती कोरलेल्या नाहीत. ओढ्याच्या पात्रातील सर्वात वरच्या पातळीवर असलेल्या एकाश्मक मंदिराच्या गर्भगृहाच्या पीठावर एके काळी मूर्ती असावी. पण आज ती मूर्ती तिथे नाही. एकाश्मक मंदिरांच्या अर्धस्तंभांवर कोणतेही अलंकरण नाही. केवळ या मंदिराच्या शिखराचे स्वरूप, मंडपावरील त्रिकोणाकृती उतरते छप्पर आणि वाकाटककालीन स्तंभांची आठवण करून देणारे स्तंभप्रकार इत्यादी बाबींवरून ही मंदिरे इ. स. सहाव्या शतकाच्या उत्तरार्धात घडविली गेली असावीत असे दिसते.

**गट–३**

या तिसऱ्या गटातील लेण्यांचा काळ सर्वसाधारणपणे इ. स. ६०० ते इ. स. ७०० असा आहे. या गटातील सर्व लेणी औरंगाबाद जिल्ह्यात आणि एक घाटनांद्रा लेण्याचा अपवाद वगळता बाकीची सर्व लेणी वेरूळ येथेच

आहेत. ही लेणी तलविन्यासातील सातत्य, काही अंशी त्यात घडून आलेला विकास आणि गर्भगृहाच्या दुतर्फा असलेले महाकाय द्वारपाल, कथनात्मक पट व सेवक देवदेवता दाखविण्याच्या परंपरेतील सातत्य दाखवतात. या लेण्यांना प्रत्यक्षपणे वा अप्रत्यक्षपणे चालुक्य राजघराण्याचा आश्रय लाभला असे मानले जाते.[४१] सौंदरराजन यांनी भोकरधन येथील लेणी, माहूर आणि टाकळी-ढोकेश्वर येथील लेणी एकाच गटात टाकून त्यांची भूमिका अधिक स्पष्ट केली आहे.

वेरूळ येथील या पूर्वराष्ट्रकूट लेण्यांचे दोन प्रकार पडतात आणि ते म्हणजे १) गर्भगृहाभोवती प्रदक्षिणापथ असलेली लेणी, आणि २) गर्भगृहाभोवती प्रदक्षिणापथ नसलेली लेणी. वेरूळ येथील लेणे क्रमांक १४, १७, १९ ते २१ आणि २६ ही लेणी पहिल्या प्रकारात मोडतात; तर लेणे क्रमांक १८, २२, २७ व २८ ही लेणी दुसऱ्या प्रकारात मोडतात. सर्वसाधारणपणे असे मानले जाते की, सुरुवातीच्या लेण्यांमध्ये स्वतंत्र प्रदक्षिणापथ नव्हता आणि पूजेची मूर्ती गर्भगृहाच्या मागच्या भिंतीला लागून असे; आणि हिंदू धर्मातील मूर्तिपूजेच्या विधींच्या विकासामुळे (आणि त्यातील काही विधी बौध्दांनी स्वीकारल्यामुळे) विहारांमधील मंदिरामध्ये प्रदक्षिणापथ आला. म्हणूनच गर्भगृहाभोवती प्रदक्षिणापथ असलेली लयनमंदिरे कालदृष्ट्या असा प्रदक्षिणापथ नसलेल्या लयनमंदिरांच्या निर्मितीकाळाच्या नंतरच्या काळातील मानली जातात. ब्राह्मणी शैलगृहे बौध्द विहारांची नक्कल आहेत असे गृहीत धरल्यामुळे या गृहीतकानुसार सुरुवातीच्या किंवा तौलनिकदृष्ट्या आधीच्या काळातील लेण्यांमध्ये असा प्रदक्षिणापथ नव्हता. कालमापनाच्या दृष्टिकोनातून हे गृहीतक अजून अंतिमतः मान्य झालेले नाही. तथापि विवेचनाच्या सोयीकरता इतर सर्व घटक सारखे असतील तर प्रदक्षिणापथ नसलेली, म्हणजेच निरंधार प्रकारची लेणी सांधार (प्रदक्षिणापथ असलेल्या) लेण्यांच्या आधीच्या काळातील आहेत असे मानण्यात आले आहे.

## निरंधार लयनमंदिरे

**वेरूळ लेणे क्रमांक २८ :** हे लेणे कालदृष्ट्या या गटातील सर्वात प्राचीन लेणे नसेलही, परंतु या लेण्याचा तलविन्यास अगदी साधा आहे. अर्धस्फुट व्हरांडा, मंडप आणि गर्भगृह असे या शैलगृहाचे स्वरूप आहे. मंडपाच्या आणि गर्भगृहाच्या प्रवेशद्वाराच्या दुतर्फा महाकाय प्रतिहार किंवा द्वारपाल त्यांच्या सेवकांसह दाखविले आहेत.

हे लेणे आटोपशीर आकाराचे असून त्याच्या मंडपाचा आकार ४ मीटर × ६ मीटर आणि गर्भगृहाचा आकार २ मीटर × २ मीटर आहे. गर्भगृहाच्या मध्यभागी एक पीठ असून त्यावर शिवलिंग आहे.[८]

**वेरूळ लेणे क्रमांक १७ :** हे लेणे बऱ्यापैकी मोठे असून खुला व पुढच्या भागात स्तंभ असलेला व्हरांडा, त्याच्या मागे तितक्याच रुंदीचा पण दुप्पट खोलीचा किंवा लांबीचा मंडप, मंडपाच्या मागे अंतराल व त्यांच्या मागे गर्भगृह असे त्याचे स्वरूप आहे. हे लेणे गौळणींची गुंफा म्हणून प्रसिध्द आहे. व्हरांड्याच्या मागील भिंतीत मधोमध दरवाजा असून या दरवाजाच्या प्रत्येक बाजूस दोन अशा एकूण चार खिडक्या आहेत. त्याचप्रमाणे दरवाजाच्या प्रत्येक बाजूस एक असे दोन मूर्तित्रय आहेत. दरवाजाच्या दक्षिण अंगाला बलराम, कृष्ण आणि नहुष आहे, तर दरवाजाच्या उत्तर अंगाला ब्रह्मा, विष्णू आणि महेश आहे. व्हरांड्याच्या मागील भिंतीच्या उत्तरेकडील अर्धांगावर असलेल्या दोन खिडक्यांच्या मध्ये महिषमर्दिनीची मूर्ती आहे. हे लेणे वैष्णव असून खुल्या व्हरांड्याच्या दक्षिणेकडील भिंतीत शेषशायी विष्णू दाखविला आहे. मंडपामागील भिंतीच्या दक्षिणेकडील अर्धांगात आणखी छोटी खोली खोदली आहे. ही रचना तलविन्यासाच्या समरूपतेचा भंग करणारी आहे. मंडपाच्या दक्षिण आणि उत्तरेकडील भिंतीत प्रत्येकी एक उपगर्भगृह आहे. मंडपाच्या मागे अंतराल असून ते गर्भगृहाच्या तुलनेत बऱ्यापैकी मोठे आहे. वेरूळमधील बहुतांशी ब्राह्मणी लेणी शैव आहेत. याला अपवाद फक्त दोनच लेण्यांचा. लेणे क्रमांक १७ हे वैष्णव आहे, तर क्रमांक १४ चे लेणे देवीचे लेणे आहे.

**वेरूळ लेणे क्रमांक १८ :** हे वेरूळ येथील निरंधार प्रकाराचे आणखी एक लयनमंदिर आहे. समोर प्रांगण, पुढच्या भागात स्तंभ असलेला म्हणजेच स्तंभमुखी मंडप आणि दोन बाजूंना प्रत्येकी एक अशी एकूण दोन उपगर्भगृहे असलेला मंडप, मंडपाच्या मागे गर्भगृहापेक्षा मोठे असलेले अंतराल आणि त्याच्यामागे गर्भगृह असे या लेण्याचे स्वरूप आहे. प्रांगणात आणखी काही वास्तुघटक आहेत. त्यातील मुख्य घटक म्हणजे प्रांगणातील नंदीमंडप होय. प्रांगणात दोन कोपऱ्यात दोन उपमंदिरे आहेत. ही बहुधा परिवारदेवतांकरिता असावीत.[९] मंडपाच्या जमिनीची पातळी प्रांगणापेक्षा बऱ्यापैकी उंच असल्याने मंडपात जाण्यासाठी पायऱ्यांची योजना आहे. या लेण्यात मंडपापेक्षा अंतराल आणि अंतरालापेक्षा गर्भगृह वरच्या पातळीवर आहे.

**वेरूळ लेणे क्रमांक २२ :** हे नीलकंठ लेणे म्हणून ओळखले जाते. हे लेणे अशा प्रकारच्या तलविन्यासाचे पूर्ण विकसित स्वरूप आहे. यात अशा प्रकारच्या

लेण्यांची सर्व वैशिष्टये आढळतात. १२.८० × १२.८० मीटर आकाराचे प्रांगण, प्रांगणाच्या बाजूच्या भिंतीमध्ये प्रत्येकी एक अशा एकूण दोन खोल्या, प्रांगणाच्या मधोमध ठळकपणे नजरेत भरेल असा नंदीमंडप, नंदीमंडपाच्या समोर स्तंभमुखी मंडपाकडे जाणाऱ्या पायऱ्या, मंडपाच्या दोन बाजूंमध्ये प्रत्येकी एक अशी दोन उपगर्भगृहे आणि काहीशा लहान आकाराचे अंतराल आणि गर्भगृह असलेले हे लयनमंदिर निश्चितपणे अधिक विकसित असून ते तलविन्यास आणि मूर्तिस्थलयोजनेच्या दृष्टीने परिपूर्ण आहे. ही परिपूर्णता पुढील गोष्टींनी स्पष्ट होते. लेणे क्रमांक १८ मध्ये मंडपाकडे जाणाऱ्या पायऱ्यांच्या दुतर्फा देवकोष्ठे नाहीत. त्याचप्रमाणे उपगर्भगृहातील देवतांची पीठे नेमकी आणि ठळकपणे दाखविलेली नाहीत. याउलट या लेण्याला प्रांगणाच्या बाजूला असलेली खोली सप्तमातृकांकरिता आहे हे लेण्यातील त्यांच्या चित्रणावरून पुरेपूर स्पष्ट होते. अंतरालाच्या दक्षिणेकडील भिंतीत कार्तिकेय तर उत्तरेकडील भिंतीत गणेश आणि गौरी आहेत.[११] अंतरालाच्या मागील भिंतीच्या उत्तरेकडील अर्धांगावर सरस्वती आणि दक्षिणेकडील अर्धांगावर गजलक्ष्मी असून मधल्या भागात गर्भगृहाकडे जाणारे द्वार आहे. ही सर्व मूर्तिशिल्पे लक्षात घेता मंडपातील उपगर्भगृहांमध्ये ब्रह्मा आणि विष्णूच्या मूर्ती असाव्यात असा कयास सहजपणे करता येतो. थोडक्यात नंतरच्या काळातील "त्रैपुरुष देवालय" ही संज्ञा या लयनमंदिरास लागू होते.

## सांधार लयनमंदिरे

**वेरूळ लेणे क्रमांक २६ :** हे सांधार लयनमंदिर असून जानोसा लेणे म्हणून प्रसिध्द आहे. प्रथम प्रांगण, स्तंभमुखी (pillar fronted) आयताकृती मंडप, दोन स्तंभ आणि दोन अर्धस्तंभ यांमुळे मंडपापासून अलग झालेले अर्धस्फुट अंतराल आणि त्याच्या मागे सांधार गर्भगृह असे ह्या लेण्याचे स्वरूप आहे. अंतरालही प्रदक्षिणापथाचाच भाग बनून गेले आहे. आयताकृती मंडपाची बाजूच्या दोन उपगर्भगृहांसह लांबी ३४.१३ मीटर असून मंडपाच्या पुढील भागापासून प्रदक्षिणापथाच्या मागील भिंतीपर्यंतची खोली २०.४२ मीटर आहे. गर्भगृहाच्या दुतर्फा आयुधपुरुषांसमवेत असलेले महाकाय द्वारपाल आहेत. या आयुधपुरुषांपैकी एकजण शूलपुरुष आहे. दोन स्तंभांच्या मागच्या बाजूस असलेल्या अर्धस्तंभांवर स्त्री चौरीधारक खुज्या सेवकांसमवेत दाखविल्या आहेत. गर्भगृहाच्या मधोमध असलेल्या चौरस पीठावर शिवलिंग आहे. मंडपाच्या बाजूच्या दोन भिंतीत असलेली उपगर्भगृहे मंडपेश्वर लेण्यातील उपगर्भगृहांप्रमाणेच आहेत. या उपगर्भगृहांमध्ये आज कोणतीही शिल्पमूर्ती अस्तित्वात नाही.[१२]

**वेरूळ लेणे क्रमांक २१** : हे रामेश्वर लेणे म्हणून ओळखले जाते. लेणे क्रमां
२६ चीच ही विकसित आवृत्ती आहे. आधी प्रांगण, प्रांगणाच्या उत्तरेकडी
भिंतीत एक स्तंभमुखी (Pillar Fronted) खोली असून या खोलीच्या पूर्वेस आ
या खोलीलगतच आणखी एक छोटी खोली, प्रांगणाच्या मागे चार स्तंभ आ
दोन अर्धस्तंभ असलेला आणि बाजूच्या दोन भिंतींमध्ये स्तंभमुखी उपगर्भग
असलेला मंडप, या मंडपामागे प्रदक्षिणापथाचाच एक भाग बनून गेले
अर्धस्फुट अंतराल आणि गर्भगृह असा या लेण्याचा तलविन्यास आहे.

मंडपाची उंची लेणे क्रमांक २६ च्या मंडपाएवढीच म्हणजे ४.७२ मीटर अस
हा मंडप १७.९८ मीटर रुंद आणि ८.८३ मीटर खोल आहे.

अलंकरणात्मक शिल्पे आणि मूर्तिस्थान योजनेमुळे रामेश्वर लेणे अधिक परिपू
आणि अलंकरणात्मक बनले आहे. या लेण्यात गंगा-यमुनेच्या मूर्ती लयनमंदिराच
व्दारात दुतर्फा असण्याऐवजी प्रांगणाच्या भिंतीच्या टोकावर व्यक्तीच्या प्रत्य
आकाराएवढया आहेत. वामन भिंतीला रेलून उभ्या असलेल्या स्तंभांवर सुरसुंद
दाखविल्या आहेत. भिंतीच्या पृष्ठभागावर शैव कथनात्मक शिल्पपट आहे
बाजूच्या उपगर्भगृहांमध्ये नेहमीच्या सप्तमातृका आणि शिव-पार्वती विवाह सोह
दाखविला आहे. रावणानुग्रह, नृत्य करणारा शिव, शिवपार्वतीची द्यूतक्री
यासारखे कथनात्मक पट आणि कार्तिकेय व गणेशासमवेत असलेल्या सप्तमातृका
पट घारापुरी येथे आढळणा-या पाशुपत संप्रदायाशी साधर्म्य आणि सलग
दाखवितात. लेण्याच्या मुखभागावरील तुलापट्टावर कोरलेला लकुलीश
सलगता आणि साधर्म्य अगदी ठळकपणे दाखवून देतो.[४६]

**वेरूळ लेणे क्रमांक २०** : हे जरी सांधार लेणे असले तरी आतापर्यंत व
केलेल्या सांधार लेण्यांपेक्षा हे वेगळे आहे. प्रांगणात नंदिमंडप आहे, पण
नंदिमंडप लेण्यापासून केवळ दोन स्तंभ आणि दोन अर्धस्तंभांनी विभक्त झा
आहे. एरव्ही प्रांगण संपल्यानंतर लागणारा स्तंभमुखी आयताकार मंडप
लेण्यात नाही. तथापि मंडपाच्या दोन बाजूंच्या भिंतींमध्ये आढळणारी उपगर्भ
या लेण्यात प्रदक्षिणापथाच्या बाजूच्या भिंतीमध्ये खोदण्यात आली आहेत.
लेण्याचा १६.१५ मीटर रुंद आणि ९.१४ मीटर खोल तलविन्यास नेह
आढळणा-या तलविन्यासाचे अधिक साधे आणि सुटसुटीत रूप आहे असे म्हण
येईल. प्रांगणाच्या उत्तरेकडील भिंतीत गणेश, तर दक्षिणेकडील भिंतीत महिषमर्दि
कोरली आहे. मुख्य गर्भगृहाच्या मधोमध चौरसाकार पीठ असून त्या
शिवलिंग आहे.[४७] लयनमंदिराच्या व्दाराला पाच शाखा आहेत. दरवाजा

एका बाजूस गंगा तर दुस-या बाजूस यमुना माणसाच्या आकारापेक्षाही मोठ्या आकाराच्या दाखविल्या आहेत. त्याचप्रमाणे दरवाजाच्या दुतर्फा सेवकांसमवेत असलेले व्दारपाल आहेत.[४८]

**वेरूळ लेणे क्रमांक १४ :** या लेण्यामध्ये असलेल्या शैव कथनात्मक शिल्पपटांमधील रावणानुग्रह पटामुळे हे लेणे 'रावण की खाई' म्हणून ओळखले जाते. स्तंभयुक्त मुखभाग, त्याच्या मागे थोडी जागा सोडून पुन्हा स्तंभांची आडवी रांग, त्याच्या मागे मंडप आणि मंडपाच्या मागे सांधार गर्भगृह असा ह्या लेण्याचा तलविन्यास आहे. स्तंभयुक्त मुखभागापासून ते सांधार गर्भगृहाची सर्वात मागील भिंत एवढा भाग एकत्रितपणे पाहिला तर १६.४५ मीटर रुंद आणि २५.९० मीटर खोल असा काटकोन चौकोन तयार होतो. स्तंभयुक्त मुखभाग आणि बारा स्तंभ असलेला मंडप यांच्यामधील चिंचोळया भागाच्या भिंतीवर महिषमर्दिनी पट आहेत. मंडपाच्या दक्षिण आणि उत्तर भिंतीत एकूण चार शैव आणि वैष्णव कथनात्मक शिल्पपट आहेत.[४९] प्रदक्षिणापथाची संपूर्ण दक्षिण भिंत सप्तमातृकांच्या पटाने व्यापलेली आहे. गर्भगृहाच्या व्दाराच्या दुतर्फा गंगा, यमुना आणि भव्य व्दारपाल दाखविले आहेत. गर्भगृह चौरस असून त्याच्या मागील भिंतीलगत एक पीठ आहे. या पीठावर बहुदा मूर्ती ठेवलेली असावी. यावरून हे लेणे लिंगाच्या स्वरूपात पूजल्या जाणा-या शिवाचे नसण्याची शक्यता आहे. मुखभाग आणि मंडप यांच्यामधील चिंचोळया भागांमध्ये महिषमर्दिनीला देण्यात आलेले प्राधान्य, मंडपातील तुलापट्टावर फक्त महिषमर्दिनीच कोरलेली असणे इत्यादी बाबी हे लेणे देवीचेच असल्याचे स्पष्टपणे सूचित करतात.

**वेरूळ लेणे क्रमांक १९ :** हे लेणे काही अंशी लेणे क्रमांक १४ सारखे आहे. मंडप आणि त्याच्यामागे प्रदक्षिणापथ असलेले गर्भगृह असे त्याचे स्वरूप आहे. हा मंडप १२ ऐवजी १६ स्तंभांचा असला तरी याला लेणे क्रमांक १४ सारखा चिंचोळा भाग नाही. या लेण्याच्या मंडपात सहा स्तंभाची एक अशा दोन दक्षिणोत्तर रांगा आणि चार स्तंभांची एक अशा दोन पूर्व-पश्चिम रांगा आहेत. एकूण गर्भगृहभाग देवी लेण्याच्या (लेणे क्रमांक १४) तुलनेत कमी रुंद आहे आणि लेण्यासमोरील प्रांगणही ब-यापैकी लहान आहे. प्रांगणाच्या बाजूच्या आणि पुढच्या भिंती चांगल्या स्थितीत टिकून आहेत. गर्भगृहाच्या व्दाराच्या दुतर्फा महाकाय व्दारपालाच्या मूर्ती आहेत.[५०]

मुखभागाच्या तुलापट्टावर लकुलीश त्याच्या शिष्यांसमवेत दाखविला आहे. शिवाचा हा अंशावतार बसलेल्या स्थितीत दाखविला असून त्याच्या हातात जपमाळ

व दंड आहे. मूर्तीस्थलयोजनदृष्ट्या या लेण्याचे त्याच काळातील लेणे क्रमांक २१(रामेश्वर लेणे) व लेणे क्रमांक २९ (धुमार लेणे) यांच्याशी खूपच साधर्म्य आहे.

**लेणे क्रमांक १७ :** हे लेणे सांधार तलविन्यासाचा पूर्ण विकास दाखविते. या लेण्याला भिंतयुक्त प्रांगण असून प्रांगणासमोर मंडप व मंडपाच्या मागे गर्भगृह आहे. मंडपाच्या आधी मुखमंडप असून मुखमंडपात जाण्यासाठी पायऱ्या आहेत. मुखमंडप चार स्तंभ आणि दोन अर्धस्तंभांनी मंडपापासून विलग झाला आहे. आयताकार मंडप स्तंभांच्या दोन चतुष्कीवर उभा आहे. मंडप १९.५० मीटर रुंद आणि ११.२७ मीटर खोल आहे. मंडपातील अंतरालासारखी वापरली जाणारी चिंचोळी जागा प्रदक्षिणापथालाही जोडलेली आहे. प्रदक्षिणापथ आणि गर्भगृह यांचा एकूण आकार १२.१९ x १२.१९ मीटर आहे.

गर्भगृहाच्या मध्यभागी असलेल्या चौरसाकृती पीठावर शिवलिंग आहे. सौंदर-राजन यांच्या मते हे आर्प शिवलिंग आहे. गर्भगृहाच्या द्वारशाखा साध्या, सपाट प्रकारच्या असून मधली शाखा स्तंभशाखा आहे. या स्तंभशाखेवर उत्तरांग पेललेले असून उत्तरांगावर पाच लघुमंदिरे दाखविली आहेत. मुखभागावर आणि मंडपाच्या भव्य स्तंभाच्या पीठशीर्षाच्या चारही बाजूंवर सुरसुंदरी आणि देवतामूर्ती कोरलेल्या आहेत. या मूर्तीची संकल्पना आणि कोरीवकाम लेणे क्रमांक २१ मध्ये आढळणाऱ्या स्त्रीमूर्तीसारखेच आहे. या लेण्यातील स्तंभ चौरसाकृती असून त्यांच्या चारही बाजूस अर्धमंडपासारखे भाग दाखविले आहेत. या कोरलेल्या अर्धमंडपसदृष्य भागावर शालाशिखरे आहेत. स्तंभांच्या निर्गमांवर आणि कोपऱ्यांवर द्वारपाल आणि सुरसुंदरींच्या मूर्ती कोरल्या आहेत. स्तंभांचा घटकक्रम पूर्वराष्ट्रकूटकालीन स्तंभांसारखा आहे.[५१]

या लेण्यातील मूर्तिस्थानयोजनेत मंडपाच्या उत्तर आणि दक्षिणेकडील भिंतीच्या सुरुवातीच्या कोपऱ्यात अनुक्रमे गणेश आणि महिषमर्दिनी दाखविली आहे. ब्रह्मा आणि विष्णूच्या मूर्ती लेणे क्रमांक २२ प्रमाणे बाजूच्या उपगर्भगृहात नसून प्रांगणातील बाजूच्या भिंतीवरील देवकोष्ठात आहेत.

पीठावर अनेक थर असलेल्या मुखमंडपाने युक्त असलेल्या मुखभागावर आणि पुढच्या भिंतीवर उत्तर वाकाटक शैलीची आठवण करून देणाऱ्या अर्धस्तंभयुक्त देवकोष्ठांमध्ये नृत्य करणारे गण दाखविले आहेत. वरच्या जागेतही नृत्य करणाऱ्या ठेंगू मूर्त्यांचा पट्ट आहे.

प्रांगणातील पडसाळ (Peristyle) , मुख भागाची धाटणी, सभामंडप आणि सांधार गर्भगृहाचा अंतर्भाव इत्यादी सर्व वैशिष्ट्ये ब्राह्मणी लयनमंदिरांना "बौध्द विहारांची नक्कल" असे संबोधता येणार नाही, तर "परिपूर्ण शैव लयनमंदिरे" असेच त्यांचे वर्णन करावे लागेल हे स्पष्टपणे दाखवून देतात. ही लयनमंदिरे विटा, लाकूड किंवा दगडात बांधलेल्या तत्कालीन शैव, वैष्णव किंवा शाक्त मंदिरांची नक्कल असण्याची शक्यता आहे.

**गट–४**

लेणे क्रमांक २३ (यात सुमारे ८ शैलगृहे आहेत) व २४ (५ शैलगृहे) च्या वर असलेली लेणी, त्याचप्रमाणे गणेशलेणेसमूह (१९ शैलगृहे), जोगेश्वरी लयनसमूह (सुमारे ३ शैलगृहे) ही लेणी किंवा लयनसमूह लयनस्थापत्याच्या अभ्यासाच्या सुरुवातीच्या काळात म्हणजे अगदी एकोणिसाव्या शतकाच्या शेवटपर्यंतही तपशीलवार अभ्यासली गेली नव्हती. कारण त्यातील साठलेला गाळ काढून टाकण्याचे काम पूर्ण झाले नव्हते. नंतरच्या काळातही सौंदरराजन यांनी त्यांची काळजीपूर्वक तपासणी करून देखील त्यांचा पूर्ण अभ्यास झाला असे म्हणण्याजोगी परिस्थिती आली नाही. या सर्व काहीशा कमी महत्त्वाच्या वाटणाऱ्या लेण्यांचा मूर्तिशास्त्रीय, शिल्पशास्त्रीय आणि वास्तुशास्त्रीय दृष्टिकोनातून काळजीपूर्वक तपशीलवार अभ्यास करून त्यांचा निश्चित असा तौलनिक कालक्रम प्रस्थापित करण्याचे काम अजून व्हावयाचे आहे. या गटातील बहुसंख्य लेणी, याच गटातील दशावतार लेणे आणि कैलास लेणे या लेण्यांच्या तुलनेत अगदीच अनाकर्षक असल्यामुळे आणि राष्ट्रकूट काळाचा आणि त्या काळातील वास्तू व कलेचा अभ्यास करणाऱ्या विद्वानांचे लक्ष प्रामुख्याने कैलास व दशावतार लेण्यांवरच केंद्रित झाल्याने हे काम दुर्लक्षित राहिले असावे.

**वेरूळ लेणे क्रमांक २३ :** मधोमध प्रांगण आणि या प्रांगणाच्या तीन बाजूंमध्ये एकूण आठ शैलगृहे असे या लयनसमुहाचे स्वरूप आहे. "केव्ह टेंपल्स ऑफ द डेक्कन" या ग्रंथात २२४ पृष्ठावरील आकृती क्रमांक ४३ मध्ये सेक्शन अे अे खाली या लयनसमुहातील जे लेणे दाखविले आहे ते उल्लेखनीय[५२] आहे. शैलगृहाच्या समोरच्या भागात एक पीठ (या पीठावर बहुधा नंदी असावा), मुखभागावर दोन स्तंभ आणि दोन अर्धस्तंभ असलेला आयताकार मंडप आणि या मंडपाच्या मागे शिवलिंग असलेले गर्भगृह अशी या शैलगृहाची रचना आहे. सौंदरराजन यांच्या मते हे शैलगृह इ. स. च्या नवव्या शतकात खोदले गेले.[५३]

**वेरूळ लेणे क्रमांक २४ :** या लयनसमुहात एकूण पाच लेणी आहेत. ही लेणी डोंगराच्या दोन बाजूंमध्ये आहेत. चार लेणी दक्षिणोत्तर रेषेत ओळीने आहेत, तर टोकावर या भागाशी काटकोन करून जाणाऱ्या बाजूत एक उत्तराभिमुख लेणे आहे. पीठाधिष्ठित नंदीने युक्त असलेले प्रांगण, दोन स्तंभ व दोन अर्धस्तंभांवर पेललेला मंडप आणि त्याच्यामागे गर्भगृह असा या शैलगृहांचा सर्वसाधारण तलविन्यास आहे. या लयनसमूहातील एकाही लयनमंदिरात अंतराल नाही.

क्रमांक २४ च्या लयनसमूहाकडे जात असतानाच वाटेत आणखी दोन शैलगृहे असून त्यांचा तलविन्यासही क्रमांक २४ च्या लयनसमुहातील शैलगृहांसारखाच आहे. यातील एका शैलगृहात असलेली उल्लेखनीय बाब म्हणजे या शैलगृहात जाण्याच्या पायऱ्यांच्या कठड्यांवर असलेले गज-प्रयोजन होय.

**वेरूळ गणेश लेणे :** गणेश लेणे या नावाने ओळखला जाणारा लयनसमूह एका ओढयाच्या काठी आहे. या लयनसमूहामध्ये एकूण १९ शैलगृहांचा तलविन्यास आधी वर्णन केलेल्या लेण्यांप्रमाणेच, म्हणजे प्रांगणात नंदीकरिता जागा, मुखभागात स्तंभ आणि अर्धस्तंभ असलेला आकारमंडप आणि त्याच्या मागे गर्भगृह असा साधा आहे. लेणे किंवा शैलगृह क्रमांक ३ या अशा तलविन्यासाच्या लेण्याचा उत्तम नमुना आहे.[५४] लेणे क्रमांक १ हे या लयनसमूहातील उल्लेखनीय शैलगृह असून ते त्रैपुरुपक या प्रकारचे आहे. हे लेणे उत्तराभिमुख असून प्रथम प्रांगण नंतर दोन स्तंभांवर पेललेला आणि तीन गर्भगृहांना सामायिक असलेला मंडप असा त्याचा तलविन्यास आहे. मंडपातून गर्भगृहात जाण्याकरिता दोन स्तंभांच्या मधून जावे लागते. ही दोन स्तंभामधील जागा सोडली तर या लेण्यात स्वतंत्र असे अंतराल नाही.

**वेरूळ जोगेश्वरी :** गणेश लेण्याजवळून वाहणाऱ्या ओढयाचाच पुढे पायथ्याशी धवधवा बनतो. याच ओढयाच्या तीरावर, पण गणेश लेण्यापेक्षा अधिक उंचीवर जोगेश्वरी लयनसमूह आहे. या लयनसमूहातील दोन लेणी उल्लेखनीय आहेत. सौंदरराजन[५५] यांनी त्यांचा उल्लेख पूर्वेकडील लेणे (ईस्टर्न) आणि पश्चिमेकडील लेणे (वेस्टर्न) असा केला आहे. पुढे प्रांगण, त्यामागे स्तंभमुखी आणि मागील भिंतीत देवकोष्ठे असलेला मंडप, मंडपाच्या मागे गर्भगृह असा या पूर्वेकडील लेण्यांचा तलविन्यास[५६] आहे. हा मंडप त्यातील स्तंभांचा स्तंभघटकक्रम, दोन स्तंभांवर विसावलेले मकरतोरण यामुळे कैलास-मंदिरसंकुलातील पश्चिम कोपऱ्यातील जलदैवतांच्या मंदिराची आठवण करून देतो. तथापि या लेण्याची आज बऱ्यापैकी झीज झाली आहे.

पश्चिमेकडील लेणे कमालीच्या दुरावस्थेत आहे[५७]. या लेण्याचे स्वरूप सामायिक मंडप असलेले त्रैपुरुषक देवालय असे आहे. मंडपाचा मुखभाग पूर्णत: पडून गेला असल्यामुळे मंडपाची नेमकी खोली किती होती याचा बोध होऊ शकत नाही. मंडपाच्या बाजूच्या भिंतीत प्रवेशद्वारे असलेली दोन्ही बाजूंची गर्भगृहे मंडपाच्या मागील भिंतीतून प्रवेशद्वार असलेल्या मुख्य गर्भगृहाच्या तुलनेत खूपच लहान आहेत. मंडपाच्या मागील भिंतीवर मुख्य गर्भगृहाच्या द्वाराच्या दुतर्फा प्रत्येक बाजूस एक अशी बऱ्यापैकी मोठया आकाराची एकूण दोन देवकोष्ठे आहेत. साध्या सपाट दरवाजाच्या दोन्ही बाजूला महाकाय द्वारपाल आहेत. आणखीही दोन देवमूर्ती अर्धउठावात कोरण्याची योजना असावी; परंतु या मूर्तींची फक्त बाह्यरेषाच दिसून येते. या लेण्यातील सर्वाधिक उल्लेखनीय बाब म्हणजे या लेण्यात कमळात बसलेली चतुर्भुज लकुलीशाची मूर्ती. या लकुलीशाच्या वरच्या भागात दोन उडणारे विद्याधर दाखविले आहेत.[५८] या लेण्यातील एका गर्भगृहात शिवलिंग, तर एका देवकोष्ठात घारापुरीच्या लेण्यात आहे तशी महेशमूर्ती आहे.

**कैलास लेणे :** वेरूळ येथील क्रमांक १६ चे लेणे म्हणजेच कैलास लेणे. या लेण्यावरील विविध अलंकरणात्मक भाग वेगवेगळया रंगात रंगविले असल्यामुळे आणि भिंतीच्या सपाट पृष्ठभागावर चुन्याचे हात दिल्यामुळे मध्ययुगात हे लेणे रंगमहाल म्हणून ओळखले जात असे. कैलास लेणे वेरूळ येथील सर्वात मोठे लेणे आहे; एवढेच नव्हे तर स्थापत्यदृष्टयाही ते या ठिकाणी असलेल्या इतर लयनमंदिरांपेक्षा भिन्न आहे. हे कळसापासून पायापर्यंत एकाच प्रस्तरात खोदलेले (एकाश्मक) साक्षात् मंदिरच आहे; गुंफा असे त्याचे स्वरूप नाही. हे लेणे कोरण्यास सुरुवात कळसापासून तर शेवट पायाजवळ करण्यात आला. त्यामुळे या लेण्याला चारही बाजूंना बाह्यांगे आहेत. आधीची लयनमंदिरे मुखभागापासून खोदली जात. त्यामुळे या लेण्यांना समकालीन असलेली बांधीव मंदिरे कशी दिसत असावीत याचा अंदाज केवळ मुखभागावरूनच येत असे. बाकीच्या तीन बाजूंची कोरीव अंतर्भागावरून केवळ कल्पनाच करावी लागते. कैलास मंदिर संकुलात उत्तरेकडील भिंतीत खोदलेल्या तथाकथित लंकेश्वर लयनमंदिरावरून हा मुद्दा अधिक स्पष्ट होतो.

हे लयनमंदिर शैलगृहनिर्माणतंत्राच्या दृष्टिकोनातूनही अद्वितीय आहे. या शैलगृहाकरिता वापरण्यात आलेल्या निर्माणतंत्रामुळे ज्या बांधीव मंदिराच्या आराखड्याची येथे नक्कल करण्याचे योजले होते त्याची तंतोतंत नक्कल करता आलेली नाही. प्रस्तर खुदाईचा व्याप शक्य तितका कमी करण्यासाठी टेकडीच्या

पश्चिम उतारावर हे लयनमंदिर खोदण्यात आले. गोपूर, नंदीमंडप, सभामंडप, शिखर आणि इतर वास्तुघटकांच्या उंचीची प्रमाणे अगदी तंतोतंत पाळता आलेली नाहीत. कदाचित या अशा योजनेमुळेच मंदिराच्या सभामंडपाच्या आणि गर्भगृहाच्या अधिष्ठानाची उंची वाजवीपेक्षा जास्त आहे. ह्या वाजवीपेक्षा जास्त उंच अधिष्ठानामुळेच या भागावर हत्ती आणि महाकाय व्याल दाखविले गेले असावेत. प्रांगणाचा पुढचा आणि मागचा भाग वेगवेगळया उंचीवर असल्यामुळे नंदिमंडपाच्या पीठाचा प्रस्तर साधा सपाटच ठेवलेला आहे. हे पीठ अक्षरशः एक मजल्याइतके उंच आहे.

गोपूर, गोपूरला जोडूनच मुख्य मंदिराच्या तिन्ही बाजूला असलेली तटबंदी, नंदीमंडप, मुखमंडप आणि दोन बाजूंना प्रत्येकी एक असे दोन अर्धमंडप असलेला सभामंडप, त्यामागे अंतराल आणि सर्वात मागे गर्भगृह असा कैलास मंदिराचा तलविन्यास आहे. मंडपात जाण्यासाठी एक समोरून आणि दोन बाजूंना प्रत्येकी एक असे एकूण तीन मार्ग आहेत ( बाजूचे दोन मार्ग वापरता येत नाहीत). मंडपाच्या मागील भिंतीत दोन बाजूस प्रत्येकी एक अशी एकूण दोन द्वारे आहेत. ही द्वारे गर्भगृहाभोवतालच्या प्रदक्षिणापथात उघडतात. या प्रदक्षिणापथातील गाभाऱ्याला सामायिक असलेल्या तीन भिंतींत तीन आणि प्रदक्षिणापथाच्या चार कोपऱ्यात चार अशी एकूण सात उप-गर्भगृहे किंवा उप-मंदिरे आहेत. यामुळेच या मंदिराचे वर्णन "अष्टपरिवार शिवालय" असे केले जाते.[५१] लयनसंकुलाच्या उत्तरेकडील भिंतीत खोदलेले तथाकथित लंकेश्वर लेणे, दक्षिणेकडील भिंतीत खोदलेली यज्ञशाळा आणि तिच्या पूर्वेकडील भागात असलेला दुसरा मजलाही एकाच स्थापत्ययोजनेचा भाग असण्याची शक्यता आहे. येथे नंदिमंडपाच्या दोन टोकांवर असलेल्या स्तंभांचा आणि वरच्या मजल्यावर जाणाऱ्या पायऱ्यांच्या दुतर्फा असणाऱ्या हत्तींचा आवर्जून उल्लेख केला पाहिजे. गोपुरातून आत प्रवेश केला की, नंदिमंडपाच्या तळमजल्याची बाजू लागते. या दर्शनी बाजूवर गजलक्ष्मी कोरलेली आहे. या बाजूच्या नेमक्या मागच्या बाजूवर गजासुरसंहारमूर्ती आहे. उरलेल्या दोन बाजूही बंदच असून `त्यांना लागूनच प्रांगणाच्या वरच्या पातळीवर जाण्याकरिता पायऱ्या आहेत. आत ४३.९२ x ८४.१८ मीटर आकाराचे प्रांगण आहे. दुतर्फा वास्तवाकार हत्ती असलेल्या पायऱ्या चढून गेल्यानंतर प्रत्येक बाजूस एक असे दोन स्तंभ लागतात. उत्तरेकडील स्तंभांच्या वरच्या भागावर त्रिशूळ दाखविला आहे. या चौरसाकार स्तंभांची उंची १२.७ मीटर आहे. प्रांगणाच्या मागील भागात म्हणजेच प्रांगणाच्या अधिक उंच पातळीवरील भागात मुख्य मंदिर आहे. मुख्य मंदिराची लांबी ४९.६९

मीटर, सर्वाधिक रुंदी ३३.०३ मीटर आणि उंची २९.२८ मीटर आहे. नंदिमंडपाच्या जमिनीची पातळी मंडपाच्या जमिनीच्या पातळीच्या थोडीशी खाली आहे. मंदिराच्या मुख्य दरवाज्यात जाण्यासाठी पीठाला लागूनच दोन्हीकडून पायऱ्या आहेत. मुखभागाच्या, म्हणजेच गजासुरसंहारमूर्ती पट्टाच्या समोरील भिंतीवर दक्षिणामूर्ति शिवाचा पट आहे. मुखमंडपाच्या पीठाच्या पायऱ्यांव्यतिरिक्त उरलेल्या भागावर रामायण आणि महाभारतातील दृश्ये दाखविणारे कथनात्मक पट्ट आहेत. मुखमंडपातून मंडपात जाण्याच्या द्वाराच्या दुतर्फा शैव द्वारपाल आहेत. सभामंडप १७.३८ मीटर x १६.७७ मीटर आकाराचा आहे. सभामंडपाचे समान चार भाग कल्पिले, तर प्रत्येक भागाच्या मधोमध एक चतुष्की आहे. निराळया शब्दात वर्णन करावयाचे तर मंडपात एकूण चार चतुष्क्या, म्हणजेच एकूण १६ स्तंभ आहेत. त्यामुळे आपोआपच एकमेकास मधोमध छेदणाऱ्या दोन मार्गिका तयार झाल्या आहेत. त्यापैकी एक मार्गिका गर्भगृहाची भिंत ते मुखमंडप अशी आहे तर दुसऱ्या मार्गिकेच्या दोन टोकांवर बाजूचे अर्धमंडप आहेत. दक्षिणेकडील अर्धमंडपातून बहुधा तीन मजली शैलगृहाकडे जाणारा रस्ता असावा. अर्धमंडपाची अशी स्थिती असल्यामुळे त्यांचा उपयोग सज्जासारखा (balcony) होतो; बाजूच्या प्रवेशद्वारांसारखा होत नाही. आधीच वर्णन केल्याप्रमाणे प्रदक्षिणापथाच्या भिंतीमध्येच सात उपगर्भगृहे खोदलेली आहेत. या उपगर्भगृहांमध्ये आज मूर्ती शिल्लक नसल्याने ही उपगर्भगृहे नेमक्या कोणत्या देवांची अथवा देवतांची आहेत याचा बोध होत नाही. मुख्य गर्भगृहाच्या द्वारावर एका बाजूस गंगा आणि दुसऱ्या बाजूस यमुना आहे. गर्भगृहातील भिंतीवर शिव आणि पार्वती आहेत. छतावर लक्ष्मी असून तिच्या एका बाजूस ब्रह्मदेव तर दुसऱ्या बाजूस विष्णू आहे. गर्भगृहाचा अंतर्भाग चौरसाकृती (४.५७ मीटर x ४.५७ मीटर ) आहे.

मुख्य मंदिर आणि उपमंदिरांवरील शिखरे, मुख्य मंदिराच्या अधिष्ठानावरील थर, गोपूर, नंदिमंडप आणि सभामंडपांवरील शिखरे यांचे स्वरूप लक्षात घेता या मंदिराचे वर्णन द्राविड* मंदिर असे करता येईल. मुख्य मंदिराच्या शिखराला तीन तल असून त्यावर अष्टकोनी स्तूपिका आहे. त्यावरील कळस किंवा कलश भाग आज शिल्लक नाही. तलांच्या मधोमध शालाशिखरे असून टोकांवर

---

* या उपरोक्त वर्णिलेल्या कैलास लेण्याच्या द्राविड घटकांमुळे हे लेणं अहिवळे येथील लोकमहादेवी मंदिराची नक्कल आहे असे मानले जाते. पण अहिवळे येथील लोकमहादेवी मंदिर कांजीवरम् येथील एका शैव मंदिराची नक्कल आहे असा तज्ज्ञांचा कयास आहे.

कूटशिखरे आहेत. चोळ काळात द्राविड मंदिरांवरही दिसून येणारा एक घटक या मंदिरावर आढळतो आणि तो म्हणजे अंतरालावर असणारे शुकनास[६०] होय. मंदिराच्या तीन बाजूंना सीमाभिंतीसदृश भासणाऱ्या कातळावर पट्ट असून उत्तरेकडील अर्ध्या आणि पूर्वेकडील मागील भिंतींच्या बहुतेक भागावर कथनात्मक शैव शिल्पपट, तर दक्षिणेकडील भिंतीवर वैष्णव कथनात्मक शिल्पपट आहेत. या मंदिरसंकुलात आणखीही छोटी मंदिरे आहेत. उदाहरणार्थ, नैर्ऋत्य कोपऱ्यात असलेल्या तीन पवित्र नद्यांचा मंडप.

सप्तमातृकांच्या मूर्तींनी युक्त असलेली तथाकथित यज्ञशाळा, तथाकथित लंकेश्वर मंदिर, प्राकारावरील मूर्तिशिल्पे आणि मुख्य मंदिर उल्लेखनीय आहेत. लंकेश्वर लयनमंदिराचे विवरण हे लेणे परिपूर्ण सांधार लेणे असल्यामुळे स्वतंत्रपणे केलेले आहे. गोपुराच्या मुखभागावरील भिंतीत दाखविलेल्या अष्टलोकपालांचा आणि गोपुरच्या द्वाराच्या दोन्ही बाजूस असलेल्या निधींचा उल्लेख केल्याखेरीज या मंदिरातील मूर्तिस्थलयोजनाच्या विवरणाची सांगता होणार नाही.

**लंकेश्वर :** कैलास मंदिरसंकुलाच्या उत्तरेकडील भिंतीत कोरलेले सांधार प्रकारचे शैव लेणे लंकेश्वर या नावाने ओळखले जाते. कैलास मंदिरसंकुलाच्या उत्तर भिंतीत कोरलेल्या जिन्यावरून या लेण्यात जाता येते. हे लेणे कैलास मंदिराच्या जमिनीच्या पातळीवर आहे.

नंदिमंडप, मंडप आणि प्रदक्षिणापथाने युक्त असलेले गर्भगृह असा या लयनमंदिराचा तलविन्यास[६१] आहे. मंडप आणि नदिमंडप एकाच पातळीवर असून खालून येणारा जिना नदिमंडप आणि मंडप यांच्या मधील भागात येतो. मंडप (१८.३० मीटर x १८.३० मीटर) चौरसाकृती असून त्याच्या चार कोपऱ्यात चार चतुष्क्या आहेत. या चार चतुष्क्यांमुळे निर्माण झालेला चौरस रंगमंडप त्यांच्यामधील जागेपेक्षा आकाराने मोठा आहे. मंडपाच्या दक्षिण बाजूस चार स्तंभ आणि एक अर्धस्तंभ असून दुसऱ्या बाजूस पाच स्तंभ आणि एक चतुर्थक स्तंभ (quarter pillar)आहे. उजव्या बाजूकडील मंडपात उजवीकडील चिंचोळया भगाच्या काटकोनात दोन, बाजूचे चिंचोळे भाग आहेत. अर्धस्तंभ असलेल्या उत्तरेकडील भिंतीवर देवकोष्ठांमध्ये व स्तंभ असलेल्या दक्षिणेकडील भिंतीत स्तंभांच्या पृष्ठभागावर कथनात्मक शैव शिल्पपट कोरलेले आहेत. मंडपानंतर दोन स्तंभ आणि दोन अर्धस्तंभ लागतात. मधले स्तंभ अंतरालाची हद्द सूचीत करतात तर स्तंभ आणि अर्धस्तंभ यांच्यामधील भागातून प्रदक्षिणापथात जाता येते.[६२]

गर्भगृहाच्या दरवाज्याच्या एका बाजूस गंगेची तर दुसऱ्या बाजूस यमुनेची मूर्ती आहे. खुद्द गर्भगृहात घारापुरी लेण्यात आहे तशी महेशमूर्ती आहे. उत्तरेकडील भिंतीच्या मध्यभागी ब्रह्मा, विष्णू आणि महेश दाखविले आहेत, तर देवकोष्ठे आणि स्तंभाच्या पृष्ठभागांवर शैव, वैष्णव आणि देवी संप्रदायातील शिल्पे अर्धउठावात कोरली आहेत.

या लयनमंदिरातील स्तंभांचा स्तंभघटकक्रम, देवकोष्ठांवरील तोरणे आणि शिल्पशैली लक्षात घेता हे लेणे इ. स. च्या नवव्या शतकात कोरले गेले असावे असे दिसते.

राष्ट्रकूटांच्या उदयकाळात आणि त्यांच्या कारकिर्दीत म्हणजे इ. स. च्या आठव्या शतकाच्या पूर्वार्धापासून ते इ. स. च्या दहाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत केवळ वेरूळ येथेच नाही तर त्यांच्या साम्राज्याचा प्रभाव होता अशा ठिकाणीही शैलगृह-निर्मितीचे उपक्रम मोठया प्रमाणात सुरू झाले. अशाप्रकारची वेरूळ परिसराबाहेरील लेणी पुढीलप्रमाणे आहेत. (१) भोकरदन आणि रुद्रेश्वर (औरंगाबाद जिल्हा), (२) पुणे शहरातील पाताळेश्वर (पुणे जिल्हा), (३) आंबेजोगाई (बीड जिल्हा), (४) खरूसा (लातूर जिल्हा), (५) भांदक येथील लेणी (चंद्रपूर जिल्हा).

**पाताळेश्वर लेणे** : पुणे शहरातील शिवाजी नगर भागात म्हणजेच जुन्या भांबुर्डे भागात हे लेणे आहे. आंबेजोगाई येथील लेण्याप्रमाणेच हे लेणेही जमिनीपेक्षा खालच्या पातळीवर खोदण्यात आले आहे. या वैशिष्ट्यामुळेच या लेण्याला पाताळेश्वर हे नाव पडले आहे.

शैलगृहासह संपूर्ण खोदकाम ३०.५० मीटर रुंद आणि ४८.८० मीटर खोल असे आहे.३०.५० मीटर x ३०.५० मीटर आकाराच्या चौरसाकृती प्रांगणाच्या मधोमध १२ स्तंभांवर पेललेला, उतरत्या छपराचा वर्तुळाकार नंदीमंडप आहे. नंदीमंडपासमोरच आयताकार मंडप असून त्यात तीन स्तंभांची एक अशा एकूण आठ स्तंभरांगा आहेत. यातील टोकाच्या दोन रांगांना जादा दोन स्तंभ असून ते प्रदक्षिणापथात येतात. मंडपाच्या मागे मधोमध एकाला एक जोडून असलेली एकूण तीन गर्भगृहे आहेत. सर्वात मधल्या गर्भगृहात शिवलिंग आहे. मंडपाच्या बाजूच्या भिंतीमध्ये शैव आणि वैष्णव कथांमधील दृश्ये आहेत.[६३]

**आंबेजोगाई** (ता. आंबेजोगाई, जि. बीड) : आंबेजोगाई येथील लेणी आंबेजोगाई गावाच्या अगदी जवळच आहेत. या लेण्यांपैकी दोन ब्राह्मणी लेणी जमिनीच्या पातळीपेक्षा खालच्या पातळीवर आहेत. या दोन लेण्यांपैकी मोठया लेण्यांचा तलविन्यास पुढे प्रांगण, प्रांगणात मधोमध नंदीमंडप, मंडप, छोटया खोल्या आणि

गर्भगृह असा आहे. प्रांगण २७.४५ मीटर x २५.९२ मीटर आकाराचे असून त्याच्या मधोमध नंदीमंडप (१०.५२ मीटर x १०.५२ मीटर) आहे. नंदिमंडपाचे पीठ अंडाकार असून त्यावर उताऱ्याचे छप्पर आहे. प्रांगणात प्रवेश करतानाच दुतर्फा अगदी धडक देण्यास सज्ज आहेत असे वाटणारे हत्ती आहेत. आणखी दोन हत्ती मंडपाजवळ लेण्यांकडे तोंड करून उभे आहेत. प्रांगण ओलांडून गेल्यानंतर ३२ स्तंभावर पेललेला २७.७५ मीटर रुंद आणि १३.७२ मीटर खोल असलेला मंडप लागतो. मंडपाच्या मागील भिंतीत तीन छोट्या खोल्या आणि गर्भगृह खोदलेले आहे. तिसऱ्या छाट्या खोलीच्या डाव्या टोकाला आणखी एक गर्भगृह आहे. मंडपाची मागची भिंत सप्तमातृका, महिपासुरमर्दिनी आणि शैव संप्रदायातील शिल्पांनी भरलेली आहे. मुख्य गर्भगृहाच्या मागील भिंतीत महेशमूर्तीचे पुसट अवशेप लक्षात घेता हे लेणे पाशुपत संप्रदायाचे असल्यावद्दल कोणतीही शंका उरत नाही.

नदीच्या पलीकडे असलेल्या काही लेण्यांजवळ आणखी एक उल्लेखनीय ब्राह्मणी लेणे आहे. हे लेणे ३०.५० मीटर रुंद आणि १२.०५ मीटर खोल आहे. या लेण्याचे छत पूर्णतः पडून गेलेले असले तरी भिंतीवरील शैव आणि वैष्णव शिल्पपट आजही दिसून येतात.[६४]

**खरूसा लेणी** (ता. औसा, जि. लातूर) : खरूसा येथे जांभा दिसणाऱ्या प्रस्तरात लेणी खोदलेली आहे. डोंगर उतारावरील अनेक शिलांमध्ये एकाश्मक मंदिरे खोदण्यात आली आहेत. त्यामध्ये लेणी या स्वरूपाची दहा लेणी आहेत. त्यापैकी वर्जेसने क्रमांक ५ चे लेणे म्हणून ज्याचे विवरण केलेले आहे, ते जैन लेणे आहे. हा खडक कमालीचा ठिसूळ आणि सच्छिद्र असल्यामुळे वास्तुशास्त्रीय, शिल्पशास्त्रीय आणि वर्गीकरणाकरिता उपयुक्त ठरणारी व्यवच्छेदक वैशिष्टयेही नष्ट पावली आहेत किंवा त्यांची झीज व मोडतोड तरी झाली आहे. येथे फक्त तीन महत्त्वाच्या लेण्यांचे विवरण करावयाचे आहे. मोठया लेण्यांच्या समूहातील तिसरे लेणे मुख्य लेणे असून ते दुमजली आहे. हे लेणे २१.३५ मीटर रुंद आणि १५.२५ मीटर खोल असून त्यात प्रत्येक मजल्यावर एकमेकांना लागून असलेले दोन मंडप आहेत. लेण्यासमोरील प्रांगणात अष्टकोनाकृती स्तंभ असून त्याच्या वरच्या अंगाला एक खाच आहे. कैलास लेण्यातील स्तंभांप्रमाणे याही स्तंभांवर त्रिशूळ असावा. हा त्रिशूळ स्वतंत्रपणे कोरून या छिद्रात वसविला गेला होता असा कयास करता येईल. तळमजल्यावरील उत्तरेकडील मंडपात २६ चौरसाकृती स्तंभ असून मंडपाच्या मागे गर्भगृह आहे. मूळ योजनेत असलेला प्रदक्षिणापथ अपूर्णावस्थेत आहे आणि आयताकार गर्भगृहात विष्णू आणि ब्रह्माच्या मूर्तीच्या दुतर्फा शिवमूर्ती आहेत.

तळमजल्यावरील दक्षिणेकडील मंडप हा आधी वर्णन केलेल्या मंडपापेक्षा खालच्या पातळीवर असून त्यात जाण्यासाठी सात-आठ पायऱ्या खाली उतरावे लागते. या पायऱ्यांच्या बाजूस प्रत्येकी एक असे एकूण दोन स्तंभ आहेत. मंडपाच्या मागील भिंतीत शिवमूर्ती कोरली असून तिच्या दुतर्फा ब्रह्मा आणि विष्णूच्या मूर्ती आहेत. या लेण्याला बौध्द चैत्यगृहांप्रमाणे फासळया असलेले गजपृष्ठाकार छत आहे. लेण्याच्या पुढील टोकांवर प्रत्येकी एक अशी एकूण दोन मंदिरे आहेत.

वरच्या मजल्यावर जाण्यासाठी जिना आहे. मंडपामध्ये तीन स्तंभांची एक अशा दोन स्तंभरांगा आहेत. छत गजपृष्ठाकार असून त्यावर फासळया दाखविल्या आहेत. या लेण्याचे पाख अरुंद व कमी उंचीचे आहेत. गर्भगृह चार स्तंभांनी सूचित केले आहे. पुढच्या दोन स्तंभांवर द्वारपाल आहेत; तर पुढचे स्तंभ आणि मागचे स्तंभ यांच्यामधील जागेत शिवलिंग आहे.

वरच्या मजल्यावरील दक्षिणेकडील मंडप ९.१५ मीटर रुंद आणि १२.२० मीटर खोल आहे. या मंडपात चार स्तंभांची एक अशा दोन स्तंभरांगा आहेत. त्यामुळे मंडपाची मध्यायत आणि पाख अशी विभागणी झाली आहे. मंडपाचे छत सपाट असून ते मागच्या बाजूच्या दिशेने वर कललेले आहे.

मागच्या भिंतीत प्रदक्षिणापथ असून प्रदक्षिणापथाच्या दोन मुखभागांच्या मधल्या जागेत ब्रह्मा, विष्णू आणि शिवाच्या वास्तवाकार मूर्ती आहेत.

या लेण्याच्या उत्तरेस सुमारे ५० मीटर अंतरावर महादेव लेणे (लेणे क्रमांक ४) म्हणून ओळखले जाणारे आणखी एक लेणे आहे. ८.३० मीटर रुंद आणि १९.५२ मीटर खोल असणाऱ्या या लेण्याचे स्वरूप पुढे नंदीमंडप, मागे मंडप आणि मंडपाच्या मागे सर्वतोभद्र प्रकारचे गर्भगृह (४.८८ मीटर x ३.३५ मीटर) असे आहे. मंडपात प्रवेश करताना दुतर्फा वामनभिंत असून त्यावर चार स्तंभ आहेत. मंडपामध्ये तीन स्तंभांच्या सहा रांगा आहेत. शेवटच्या रांगेत दोन स्तंभ जास्त असून ते अगदी प्रदक्षिणापथाच्या टोकावर आहेत. म्हणजेच मंडपात पुढे चार, सर्वात मागे दोन स्तंभांच्या दोन जोडया आणि मध्ये १८ असे एकूण २६ स्तंभ आहेत.

गर्भगृहाच्या द्वाराच्या दुतर्फा द्वारपाल आहेत. इतर द्वारांवर मूर्तिशिल्पांच्या जोडया असून त्यात स्त्रीमूर्तीही आहेत. गर्भगृहामध्ये तीन फूट उंचीचे शिवलिंग आहे.

लेणे क्रमांक १६ वेरूळ येथील कैलास लेण्याच्या पडसाळेत आहेत त्याप्रमाणे याही लेण्याच्या दक्षिणेकडील भिंतीवर वैष्णव तर उत्तरेकडील भिंतीवर शैव कथनात्मक शिल्पपट आहेत.

कथनात्मक वैष्णव पटामध्ये वराह, नरसिंह या अवतारांचा त्याचप्रमाणे गोवर्धनगिरिधारी, कालियामर्दन, घोडयाचे रूप घेऊन आलेल्या केशीचा वध यांसारख्या कृष्णलीलांचा समावेश होतो; तर शैव पटामध्ये रावणानुग्रह, उमामहेश्वर, तांडव, लिंगोद्‌भव आणि समुद्रमंथनाच्या शिल्पांचा समावेश होतो.

या लयनसमूहातील सहावे लेणे "लाकोलाचे लेणे" म्हणून ओळखले जाते. हे लेणे १४.९४ मीटर रुंद आणि १७.६९ मीटर खोल आहे. मंडप आणि त्याच्यामागे गर्भगृह असे या लेण्याचे स्वरूप असून याही लेण्यात पायऱ्या चढून प्रवेश करताना दुतर्फा वामनभिंत लागते. या वामनभिंतीच्या आतील अंगाला चिकटून एकूण चार स्तंभ आहेत, तर आतील मंडपात चोवीस स्तंभ आहेत. मंडपाच्या मागे गर्भगृह असून त्यात चतुर्भुज विष्णू आहे. या विष्णूच्या मागील दोन हातात गदा आणि चक्र असून पुढच्या दोन हातात शंख आणि गोलाकार वस्तू आहे ही बाब उल्लेखनीय आहे.

या लयनसमूहातील शैव आणि वैष्णव लेण्यांना, त्यांचे तलविन्यास, वास्तुशास्त्रीय वैशिष्टये, निरनिराळया देव आणि देवतामूर्तींची मूर्तिशास्त्रीय वैशिष्टये इत्यादी बाबींमुळे ब्राह्मणी लयनस्थापत्यात महत्त्वाचे स्थान आहे, तथापि प्रस्तराच्या ठिसूळ आणि सच्छिद्र स्वरूपामुळे या लेण्यांच्या स्थपतींवर आणि शिल्पकारांवर अनेक मर्यादा पडल्या असल्याचे दिसून येते. या लेण्यांचा काळ साधारणपणे ८ वे ते ९ वे शतक किंवा त्याहून किंचित आधीचा आहे असे म्हणता येईल.[६५]

**भांदक येथील शैव लेणी** : भांदक येथे अनेक बौध्द आणि ब्राह्मणी लेणी आहेत. त्यापैकी वाकाटककालीन लेण्यांची चर्चा याआधीच केली आहे.

भांदक गावातच बदरीनाग मंदिराच्या परिसरात एक लेणे आहे. प्रथम १०.६७ मीटर रुंद आणि ५.५३ मीटर खोलीचे प्रांगण लागते. (प्रांगण पश्चिमाभिमुख आहे) या प्रांगणातून दोन शैलगृहांमध्ये जाता येते. यापैकी एक शैलगृह प्रांगणाच्या दक्षिणेस, तर दुसरे प्रांगणाच्या पूर्व बाजूस आहे. दक्षिण बाजूस असलेले शैलगृह ४.८९ मीटर खोल व ४.७४ मीटर रुंद आहे. या लेण्यांच्या साधारण मध्यभागी असलेल्या पीठाचा आकार ०.९० चौ. मीटर आहे. या पीठावर एकेकाळी शिवलिंग असावे. प्रांगणाच्या मागील भिंतीत म्हणजे प्रांगणाच्या पूर्वेकडील लेण्यात प्रथम १०.०६ मीटर रुंद आणि ३.१६ मीटर आकाराचा मंडप

लागतो. या मंडपाच्या वाह्यतम भिंतीच्या उत्तरेकडील अर्धांगात मंडपात जाण्यासाठी दोन द्वारे आहेत. मंडपातील देवकोष्ठकात लक्ष्मी आहे. मंडपाच्या मागील भिंतीत दोन खोल्या आहेत. डावीकडील खोलीत दशभुजा दुर्गा-महिषमर्दिनी आहे, तर उजवीकडील खोलीत चतुर्भुज शिव आहे. या लेण्याच्या भिंतीवर आणखीही काही मूर्तिशिल्पे आहेत. पण ती इतकी झिजली आहेत की, त्यांचे तपशील ओळखता येत नाहीत. शिल्पशैलीवरून ही लेणी इ. स. च्या दहाव्या शतकातील आहेत[६६] असे दिसते. तथापि ही लेणी इ. स. च्या ११-१२व्या शतकातील असावीत असे वेगलरचे मत आहे.

## गट–५

**लयननिर्मिती प्रक्रिया :** इ. स. च्या दहाव्या शतकानंतर शैलगृहनिर्मितीला बऱ्यापैकी ओहोटी लागलेली दिसते. या ओहोटीला नेमके कोणते सांस्कृतिक घटक कारणीभूत ठरले हे आज तरी स्पष्ट झालेले नाही. पण जर लयनमंदिराच्या स्वरूपाचा आणि लयनउपक्रमामागे असलेल्या प्रबल घटकांचा आढावा घेतला, तर असे लक्षात येईल की, सुरुवातीच्या काळात फक्त बौध्दांकरिताच लयननिर्मिती होत असे. त्यामुळे तेथे राहणाऱ्या बौध्द भिक्षूंकरिता विहार या स्वरूपाचा लयनसमूह आणि त्यांच्या दैनंदिन धार्मिक उपक्रमांसाठी चैत्यगृह असे या लेण्यांचे स्वरूप होते. इ. स. च्या सुरुवातीच्या एक-दोन शतकानंतर लेणी ही बौध्द भिक्षूंची निव्वळ वर्षावासाची (पावसाळयात राहण्याची) ठिकाणे न उरता महत्त्वाच्या भिक्षूंची कायमस्वरूपी वास्तव्य असलेली धार्मिक केंद्रे बनली. त्यातूनच भाजे आणि कान्हेरीसारखी शिक्षणकेंद्रे विकसित झाली. ही दोन लयनसमूहांमधली शिक्षणकेंद्रे काही शतके अगदी सहजपणे चालली. वज्रयान संप्रदाय मूळ धरू लागल्यानंतर लेण्याचे स्वरूप निवासस्थान न उरता पूजेअर्चेची किंवा धार्मिक विधींची ठिकाणे असे बनले. नेमक्या याच स्थित्यंतरकाळात ब्राह्मणी लयनमंदिराच्या निर्मितीस प्रारंभ झाला. ब्राह्मणी लयनमंदिरामधील बहुतांशी लयनमंदिरे शैव आहेत, तर काही लयनमंदिरे वैष्णव आणि देवीची आहेत. असे दिसते की, इ. स. च्या सहाव्या शतकाच्या मध्यात अगदी जोमाने सुरू असलेली लयननिर्मिती इ. स. च्या दहाव्या शतकात अचानकपणे थंडावली. महाराष्ट्रातील जैन लेणी इ. स. च्या ५ व्या शतकापासून सापडतात हे सर्वमान्य असले, तरी जैन लयनस्थापत्याची प्राचीनता इ. स. च्या पहिल्या शतकापर्यंत जाते. जैन लयननिर्मिती पुढे यादव आणि अगदी सुलतान काळातही चालू राहिली असली, तरी तिचा गौरवशाली कालखंड प्रथम वेरूळ येथेच दिसतो. जैनांनी यानंतरच्या काळापर्यंत ह्याच स्थापत्यप्रकारचा का अंगिकार केला याचा उहापोह नंतरच्या

प्रकरणात केलेला आहे. तथापि हे नंतरच्या काळातील जैन लयननिर्मितीचे उपक्रम संख्यात्मक दृष्टया अगदी थोडे आहेत आणि ही शैलगृहे वास्तुशास्त्रीय आणि सौंदर्यदृष्टया आधीच्या लेण्यांच्या तुलनेत फारशी आकर्षक नाहीत हे मान्य करावेच लागेल. निराळ्या शब्दात सांगायचे तर इ. स. पूर्व दुसऱ्या शतकापासून महाराष्ट्रातील प्रमुख उपक्रम म्हणून गौरवशालीपणे सुरू असलेली लयननिर्मिती इ. स. च्या दहाव्या शतकात पूर्णपणे थंडावली. त्यानंतर बांधीव मंदिरांच्या युगाला प्रारंभ झाला. या काळातील ब्राह्मणी शैलगृहाचे वैशिष्ट्य म्हणजे शैलगृह-निर्माणतंत्राचा धार्मिक स्थापत्याव्यतिरिक्त अन्य उपयोगी स्थापत्यनिर्मितीसाठी (लौकिक स्थापत्यनिर्मितीसाठी) केलेला वापर. याचे अगदी ठळक आणि सुप्रसिध्द उदाहरण म्हणजे देवगिरीचा किल्ला आणि दुसरे फारसे प्रसिध्द नसलेले उदाहरण म्हणजे खानदेशातील भामेर येथील लौकिक शैलगुंफा.

पहिल्या उदाहरणात टेकडीवरील किल्ला अभेद्य बनविण्यासाठी टेकडीचा तटबंदीखालचा पूर्ण उतारच उभा छिनून काढलेला आहे. या किल्ल्यातील प्रवेश आणखी बिकट करण्यासाठी आणि वरच्या पातळीवर असलेल्या तटबंदीच्या अंतर्भागातील टेकडीच्या खालच्या भागात जाण्यासाठी या तासलेल्या पृष्ठभागातूनच दरवाजा व पायऱ्या खोदलेल्या आहेत. दुसऱ्या ठिकाणी, म्हणजे धुळे जिल्ह्यातील भामेर येथे किल्ल्याच्या मुख्य दरवाजाजवळ लौकिक कारणासाठी दालने खोदण्यात आली असून तटबंदीतच पाण्याच्या टाक्या खोदण्यात आल्या आहेत. या टाक्यांमध्ये पावसाचे पाणी साठवले जात असे. यावरून दगडात खोदाई करून स्थापत्य करण्याचे तंत्र जरी नंतरच्या काळातही वापरले गेले असले, तरी त्याचा उद्देश धार्मिक स्थापत्यउभारणीचा न राहता अन्य उपयुक्त घटकांची निर्मिती करणे हा बनला हे सहजपणे लक्षात येईल. परंतु सकृतदर्शनी समज होतो त्याप्रमाणे प्रस्तरखुदाईचे तंत्र आणि त्याचा अवलंब पूर्णतः थांबला नाही.

**हरीश्चंद्रगड येथील लेणी** (ता. अकोला, जि. अहमदनगर) : या ठिकाणी असलेला गिरिदुर्ग म्हणजे हरीश्चंद्रगड. या गडापासून सुमारे १५२.४० मी. खाली एक लयनसंकुल आहे. या लयनसंकुलात एकूण तीन लयनसमूह आहेत व या तीन लयनसमूहात एकूण नऊ लेणी आहेत. या लेण्यांचे मुख्य वैशिष्ट्य म्हणजे त्यात एकही मूर्ती नाही.

डोंगराच्या पूर्व टोकाकडील पहिल्या लेण्यासमोर प्रांगण असून प्रांगणाच्या पश्चिमेस छोटी पाण्याची टाकी आहे. ५.०३ मीटर लांबी असलेल्या या चौरसाकृती लेण्यात तीन बाजूंना काहीसे ठेंगणे असे सलग कट्टे आहेत. हे वैशिष्ट्य वज्रयान संप्रदायात दिसून येते. या लेण्याचे प्रवेशद्वार केवळ १.२० मीटर उंचीचे असून लेण्यावर कोणतेही उल्लेखनीय थर नाहीत.

या लेण्यांपासून सुमारे ८ ते ९ मीटर अंतरावर दुसरे लेणे आहे. हे लेणे मात्र मोठे आहे. या लेण्यासमोरही प्रांगण असून प्रांगण संपल्यावर ७.१६ मीटर रुंदीचा मुखमंडप लागतो. या मुखमंडपाला पुढे दोन स्तंभ असून मागील भिंतीत एक छोटे द्वार आहे. या द्वारातून आत गेल्यावर मुख्य मंडप लागतो. या मुख्यमंडपाच्या मागील भिंतीत त्यामागे असलेल्या ७.६२ मीटर रुंद x ६.१० मीटर खोल असलेल्या मंडपात जाणारे द्वार आहे. या मागील मंडपाच्या उजव्या भिंतीत एक आणि मागील भिंतीत दोन अशा एकूण तीन खोल्या लागतात. या तीनही खोल्यांमध्ये इतरत्र आढळतात तसे झोपण्यासाठीचे कठडे आहेत.

मुखमंडपाच्या डाव्या भिंतीत एक द्वार असून त्यातून आत गेल्यावर एक दालन लागते. या दालनाचे काय प्रयोजन असावे ते अजूनही स्पष्ट झालेले नाही. मुखमंडपालगतच्या उजवीकडील प्रस्तरात प्रांगणातून प्रवेश असलेली आणखी एक खोली आहे. या खोलीतही झोपण्याचा कट्टा आहे. द्वाराचे किंवा स्तंभाचे स्वरूप कालनिर्णयास फारसे उपयुक्त नसले, तरी या लेण्यातील गणेशाचे शिल्प आणि खुजी द्वारे यावरून हे लेणे इ. स. च्या १२ व्या शतकात खोदले गेले असावे असे दिसते.

हे लेणे सोडून पुढे गेल्यावर लागणारा सहा लेण्यांचा समूह लेण्यांच्या स्थापत्यवैशिष्ट्यामुळे नव्हे, तर प्रांगणाच्या मधोमध असलेल्या बांधीव मंदिरामुळे उल्लेखनीय आहे. हे बांधीव मंदिर लयनसमुहातील लेण्यांच्या पूर्व व उत्तर दिशेस आहे. (निराळया शब्दात सांगायचे तर यातील काही लेणी पूर्वाभिमुख तर काही लेणी उत्तराभिमुख आहेत.) या प्रांगणालगतच्या गिरीप्रस्तरात अंतरालयुक्त छोटी दालने आणि काही ठिकाणी अनियमित आकाराची मोठी दालने आहेत. ही लेणी प्रांगणात असलेल्या बांधीव मंदिराच्या समकालीन असावीत आणि त्यांचा उपयोग या मंदिरात येणाऱ्या यात्रेकरूंना विश्रांती घेण्यासाठी करण्यात येत असावा असे बर्जेसचे अनुमान आहे. यातील काही मोठया दालनांचे, लेणे क्रमांक २ शी असलेले साधर्म्य लक्षात घेता ही लेणी नाथपंथीय असावीत असेही अनुमान निघते. या लेण्यात सापडलेले शिलालेखही या अनुमानास पुष्टी देतात.

**शृंगारचावडी-पाटणे** : जळगाव जिल्ह्यातील चाळीसगाव तालुक्यामध्ये पाटणे येथे विज्जलगड किल्ल्याच्या परिसरात हे वैष्णव लेणे आहे. आधी प्रांगण, त्यापुढे २.१३ मीटर रुंदीचा आयताकृती व्हरांडा आणि त्यामागे ५.७९ मीटर x ५.२३ मीटर आकाराचे गर्भगृह असा या लेण्याचा तलविन्यास आहे. व्हरांडा कक्षासनयुक्त असून कक्षासनाच्या खालच्या भागावर विविध थर आहेत. वेदीबंधावर

लघुमंदिरांचा पट्ट आहे. या व्हरांड्याला यादव प्रकारचा स्तंभघटकक्रम असलेले दोन स्तंभ आणि दोन अर्धस्तंभ आहेत.[६७] गर्भगृहाच्या दरवाजाला अलंकरण असलेला उंबरा आहे. द्वाराला सहा शाखा असून शाखांच्या खालच्या भागावर चौरीधारक आणि इतर सेवक दाखविले आहेत. मधली शाखा स्तंभशाखा असून ती साधी म्हणजे अलंकरणरहित आहे. द्वाराच्या ललाटभागावर गणेशमूर्ती कोरली आहे. या लेण्याचे वास्तुशास्त्रीय स्वरूप, कक्षासनावरील अलंकरण, गर्भगृहाचे द्वार इत्यादी बाबी लक्षात घेता हे लेणे इ. स. च्या १२ व्या शतकात खोदले गेले असावे असे दिसते.

**पन्हाळेकाझी येथील नाथपंथी आणि इतर लेणी** : पन्हाळेकाझी येथील वज्रयान संप्रदायाच्या लेण्यांचे वर्णन याआधीच केलेले आहे. एम. एन. देशपांडे यांच्या मते येथे असलेल्या २९ लेण्यांपैकी १४ लेणी इ. स. च्या तिसऱ्या ते पाचव्या शतकात खोदली गेली. दहाव्या शतकाच्या सुमारास हीच लेणी किंचित फेरफार करून वज्रयान संप्रदायाकरिता अनुरूप बनविली गेली. याच सुमारास वज्रयान संप्रदायाच्या लोकांनी या लयनसमूहात आणखी चार लेण्यांची भर टाकली (लेणे क्रमांक १, ३, १२ व १३ ). इ. स. च्या बाराव्या शतकात ब्राह्मणी लयननिर्मितीस प्रारंभ झाला. या संप्रदायाने आधीच्या काही वज्रयान लेण्यांचा स्वतःकरिता उपयोग करून घेतला. लेणे क्रमांक १७ व २१ ही त्याची उदाहरणे होत. लेणे क्रमांक १९, २० व २३ ही लेणी खास ब्राह्मणी लेणी निर्माण करण्याच्याच हेतूने खोदली गेली. तेराव्या शतकाच्या या लयनसमूहात लेणे क्रमांक २४, २५ व २६ ची भर पडली. १३-१४ व्या शतकात येथे मूळ धरलेल्या नाथ संप्रदायाने लेणे क्रमांक २९ खोदले व लेणे क्रमांक १४ व २१ स्वतःकरिता अनुरूप करून घेतले.

लेणे क्रमांक १९, २०, २२ व २५ या लेण्यांमध्ये शिवलिंगाकरिता असलेले पीठ आहे. वास्तुशास्त्रदृष्ट्या आणि शिल्पदृष्ट्या क्रमांक १९ व क्रमांक २९ ही दोनच लेणी महत्वाची असल्यामुळे बाकी लेण्यांच्या तपशिलात न शिरता फक्त या दोन लेण्यांच विचारात घ्यावयाच्या आहेत. या सर्व लेण्यांमधील स्तंभांचा घटकक्रम आणि शिल्पांची शैली कालनिश्चितीस हातभार लावतात. चौरसाकृती तळखडा, प्रथम अष्टकोनाकृती आणि नंतर वर्तुळाकृती होणारा खांब, त्यानंतर पूर्णकलश प्रयोजन असलेला चौरसाकृती घटक व त्याहीवर कीचकहस्त असा घटकक्रम असलेले हे स्तंभ यादवकालीन स्तंभांशी साधर्म्य दाखवतात.

**लेणे क्रमांक १९** : समोर प्रांगण असलेला मंडप व त्यामागे सांधार गर्भगृह अशी या लेण्यांची रचना आहे. प्रांगणात जाण्यासाठी पायऱ्या आहेत. खुद्द

प्रांगणात दगडात खोदलेल्या तीन खाचा किंवा छिद्रे आहेत. त्यांचा उपयोग लाकडी मंडप उभारण्यासाठी केला जात असावा. प्रांगण संपल्यावर मंडपात जाण्यासाठी असलेल्या पायऱ्या लागतात. या पायऱ्यांच्या दुतर्फा गिड्डा कठडा आहे. पायऱ्या संपल्या की प्रवेश भागाच्या दुतर्फा असलेले स्तंभ लागतात. या स्तंभांपासून लेण्याच्या रुंदीच्या टोकापर्यंत वामनभिंत लागते. या वामनभिंतीवर जाळीदार दगड (जालवातायन) बसवले असून त्यांचा उपयोग लेण्यात हवा खेळती राहण्यासाठी होतो. खुद्द मंडपात दोन भिंतींलगत दोन कट्टे असून मधल्या भागात चार स्तंभ आहेत. या चार स्तंभांमुळे पुढच्या बाजूस एक आणि कडेच्या दोन बाजूंना प्रत्येकी एक असे तीन आयताकार भाग तयार होतात. या चार स्तंभांपैकी मागच्या दोन स्तंभांच्या ओळीमागे गर्भगृहे आहे. या मागच्या ओळीतील स्तंभांच्या वरच्या भागावर चौरसाकृती घटक असून त्यावर आमलक आहे. गर्भगृहाच्या द्वाराला नजरेत भरेल अशी ठळक स्तंभशाखा असून उत्तरांग अगदी साधे आहे. द्वाराच्या दुतर्फा शैव द्वारपाल दाखवले आहेत. या लेण्यात आणखी चार देवकोष्ठे असल्याने हे लयनमंदिर पंचायतन प्रकारचे आहे. या मंडपाचे अगदी उल्लेखनीय वैशिष्ट्य म्हणजे त्याचे छत. छताच्या मधल्या भागात उत्तरोत्तर निमूळते होत जाणारे वलयांकित वर्तुळाकृती घटक (उत्क्षिप्त वितान) असून उरलेला छताचा भाग सपाट (समतल वितान) आहे. हा सपाट भाग अनेक चौरसांमध्ये विभागलेला असून त्यात शैव आणि वैष्णव शिल्पे आहेत. यातील बारा चौरसांमध्ये रामायणातील दृश्ये चौदा चौरसांमध्ये कृष्णलीला आणि उरलेल्या ९ चौरसांमध्ये किरातार्जुन युध्दाची दृश्ये दाखविली आहेत.

**लेणे क्रमांक २९ :** लेण्यासमोर ५.२० मीटर x ७.२० मीटर आकाराचे प्रांगण आहे. लेण्याच्या दर्शनी भागाची उत्तरेकडील भिंत खोदीव (एकाश्मक) तर दक्षिणेकडील भिंतीचा भाग बांधीव आहे. लेणे क्रमांक १९ प्रमाणेच याही लेण्यासमोर एकेकाळी लाकडी खांबांवर पेललेला तात्पुरता मंडप उभारला जात असावा असे मानण्यास जागा आहे. प्रांगणाच्या पूर्वेकडील टेकाडाच्या प्रस्तरात तीन खोल्या खोदलेल्या आहेत. यातील मधल्या खोलीच्या द्वाराच्या चौकटीच्या खालच्या अंगावर गंगा आणि यमुना यांच्या मूर्ती आहेत. प्रांगणाच्या दक्षिणेकडील भिंतीत गणपतीची महाकाय मूर्ती कोरलेली असून त्याच्या डावीकडे सरस्वती तर उजवीकडे महालक्ष्मी दाखविली आहे. प्रांगणाच्या उत्तरेकडील भिंतीत २.८० मीटर x ४.९० मीटर आकाराचे मुख्य लेणे आहे. या लेण्याच्या दुतर्फा पूर्णकलशधारी स्त्रीमूर्ती कोरल्या आहेत. या मूर्ती देवकोष्ठकामध्ये असाव्यात असा कयास आहे. दरवाज्याच्या प्रत्येक अंगाला चार असे एकूण आठ झरोके

आहेत. लेण्याचा अंतर्भाग चौरसाकृती तवकांनी अलंकृत केला आहे. हे पट्ट एकतर एका रांगेत आहेत किंवा काही ठिकाणी मुख्य पट्टांना लागून चौकटीसारखे आहेत. स्वतंत्र चौरसाकृती तवकांमध्ये (असे एकूण ८५ पट्ट आहेत.) वेगवेगळे नाथसिध्द दाखविले आहेत. मुख्य तबकांमध्ये आदिनाथ आणि गिरिजा हे मच्छिंद्रनाथ, त्रिपुरसुंदरी व गोरक्षनाथांवरोबर दाखविले आहेत.

## जैन लयनस्थापत्य

**प्रास्ताविक** : जैन धर्माची दक्षिणेतील प्राचीनता ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकापर्यंत मागे जाते. जैन लोकांमध्ये असे सांगितले जाते की, चंद्रगुप्त मौर्य हा जैन इतिहासातील सुप्रसिध्द मुनी भद्रवाहूचा शिष्य होता. त्याने आपल्या आयुष्याचा अखेरचा काळ दक्षिण कर्नाटकातील श्रवणवेळगोळ येथे घालविला. पालित्तय हा आणखी एक सुप्रसिध्द जैन मुनी. हा सालाहणाचा (शालिवाहन/सातवाहन) समकालीन होता. पालित्तयाच्या आख्यायिकेनुसार तो सातवाहनांच्या दरवारातील महान ज्योतिर्विद होता आणि त्याच्याकडे महान आध्यात्मिक शक्ती होत्या. या प्राचीनतेचे कोणतेही भौतिक पुरावे न आढळल्यामुळे त्या काळी महाराष्ट्रात जैन धर्म खरोखरीच पोचला होता का ? अशी शंका विद्वानांना भेडसावत होती. चंद्रगुप्ताची आणि अशोकाचा नातू दशरथ मौर्याची आख्यायिका जैन धर्माचा महाराष्ट्रात आधीच शिरकाव झाला होता याची साक्ष देते. म्हणूनच पाले येथील साध्या लहान लेण्यात जेव्हा 'नमो अरिहंताणं' हा जैन शिलालेख आढळला, तेव्हा पुरातत्त्वज्ञांना खूप आनंद झाला. या शिलालेखाच्या अक्षरांच्या घाटणीवरून हा शिलालेख ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकातील असावा असे डॉ. सांकलिया व डॉ. शोभना गोखले यांचे मत[६८] आहे. हा शिलालेख महाराष्ट्रातील जैन शिलालेखांमध्ये सर्वाधिक प्राचीन असण्याची शक्यता आहे. त्याचप्रमाणे डाव्या अंगाला छोटा निवासी कक्ष (१.२७ मीटर x १.०२ मीटर x १.२७ मीटर) असलेले हे साधे शैलगृह (२०.७५ मीटर खोल, ५.६७ मीटर रुंद व ७.२७ मीटर उंच ) महाराष्ट्रातील जैन शैलगृहामधील पहिले किंवा सर्वाधिक प्राचीन शैलगृह असण्याची शक्यता आहे. महाराष्ट्रात अशी काही लेणी आहेत, जी अमुक एक धर्मसंप्रदायाची आहेत असे सांगता येत नाहीत. मथुरेतील जैन मूर्तीप्रमाणेच ही लेणीही वौध्द मानली गेली असण्याची शक्यता आहे. अत्यंत काटेकोरपणे परीक्षण केल्यानंतरच ही जैन लेणी 'जैन' म्हणून उजेडात येऊ शकतील.

महाराष्ट्रात वाकाटक काळातील ताम्रपटाच्या किंवा शिलालेखाच्या स्वरूपात जैन धर्माच्या अस्तित्वाचे आणि त्याच्या प्रसाराचे कोणतेही पुरावे न मिळणे ही

काहीशी बुचकळ्यात टाकणारी बाब आहे. तथापि याला अपवाद म्हणजे उस्मानाबाद जिल्ह्यात धाराशिव येथे आढळलेल्या जैन लेणी होत. हेन्री कझिन्सने जरी या लेण्यांचा काळ इ. स. चे ७ वे शतक मानलेला असला, तरी या लेण्यांचा तलविन्यास आणि स्तंभांचे स्वरूप व इतर वास्तुशास्त्रीय वैशिष्ट्ये लक्षात घेता ही लेणी वाकाटक काळाच्या उत्तरार्धातील असावीत असे मानण्यास जागा आहे.[६९]

उस्मानाबाद शहरापासून ६ कि. मी. अंतरावरील धाराशिव येथील टेकडीवर एकूण सहा लेणी आहेत. या लेण्यांपैकी चार लेणी टेकडीच्या एका बाजूवर दक्षिणाभिमुख आहेत तर उर्वरित दोन लेणी या बाजूशी काटकोनात असलेल्या टेकडीच्या दुसऱ्या बाजूवर पश्चिमाभिमुख आहेत. यातील अत्यंत ठळकपणे नजरेत भरणारे लेणे म्हणजे पश्चिमेकडून दुसरे असलेले क्रमांक २ चे लेणे आकाराने बऱ्यापैकी मोठे असलेले लेणे होय. पुढे व्हरांडा त्यामागे चौरसाकृती मंडप व या मंडपाच्या तीन भिंतीत, म्हणजे बाजूच्या दोन भिंतीत प्रत्येकी आठ आणि मागील भिंतीत सहा अशा एकूण २२ लहान आकाराच्या खोल्या आहेत. मागील भिंतीत मधोमध मुख्य गर्भगृह आहे. पुढचा व्हरांडा २३.८९ मीटर रुंद आणि ३.१५ मीटर खोल आहे. व्हरांड्याच्या मागील भिंतीत त्यामागे असलेल्या मोठ्या मंडपात जाणारा मार्ग आहे. मंडपाचा आकार अदमासे २५.०१ मीटर x २५.०१ मीटर असा चौरसाकृती आहे. मंडपात जाण्यासाठी व्हरांड्याच्या मागील भिंतीत बहुधा पाच दरवाजे होते. सध्या फक्त दोन टोकांकडचे प्रत्येकी एक असे एकूण दोनच दरवाजे शिल्लक आहेत. या दोन दरवाज्यांजवळील भिंतीचा भाग वगळता संपूर्ण मुखभाग एकसंधपणे खाली कोसळला आहे. हे असे असले तरीही लेण्यातील आतील भिंतीत खोदलेल्या कक्षांजवळून जाणाऱ्या मार्गिकेतून आणि मंडपाच्या मधल्या भागातून व्यवस्थित फिरता येते.

बर्जेसने अनुमान[७०] केल्याप्रमाणे मंडपात जाण्यासाठी शिल्लक असलेल्या दोन दरवाज्यांव्यतिरिक्त आणखी तीन दरवाजे असावेत असे मानण्यास जागा आहे. मुखभागावर तीर्थंकरांच्या मूर्ती असलेल्या चैत्य-गवाक्षांचा पट्ट होता. मंडपात एकूण ३२ स्तंभ असून या स्तंभांमुळे चार उभे आणि चार आडवे असे एकमेकांना छेदणारे पाख तयार झाले आहेत. मंडपाच्या मध्यभागी बारा स्तंभ आहेत. या बारा स्तंभांना जोडणाऱ्या रेषा काढल्या तर चौकोन तयार होतो. या काल्पनिक चौकोनाची प्रत्येक बाजू चार स्तंभांनी बनलेली असून कोपऱ्यातील प्रत्येक स्तंभ दोन रांगांना सामायिक आहे. मंडपातील बहुतांशी स्तंभ चौरसाकृती व हस्तशीर्ष असलेले आहेत, तर लयनमंदिराच्या पुढच्या भागात असलेले चार स्तंभ वर्तुळाकृती असून या स्तंभांवर पीठाकार शीर्ष आहेत. या दोन्ही स्तंभप्रकाराचे

अजिंठा येथील तशाच प्रकारच्या स्तंभांशी साम्य आहे. व्हरांड्याच्या पश्चिम टोकाकडे पाण्याचे टाके असून पुढील पाखावर असलेल्या पन्हाळयुक्त छताला या टाक्यावर छिद्र आहे.[७१]

या लयनसमूहातील आणखी एक उल्लेखनीय लेणे म्हणजे लेणे क्रमांक ३. सहा सपाट अष्टकोनी स्तंभांवर पेललेला व्हरांडा, व्हरांड्याच्या मागील भिंतीत भिंतीमागे असलेल्या मंडपात जाण्यासाठी असलेली पाच द्वारे, त्यामागे २६ स्तंभ असलेला मंडप व मंडपाच्या तीन भिंतीत मागील भिंतीतील गर्भगृह वगळता एकूण १२ छोट्या खोल्या किंवा कक्ष असा ह्या लेण्यांचा तलविन्यास आहे. मंडपातील स्तंभांची मांडणी चौरसाकार असून या चौरसाच्या प्रत्येक बाजूत एकूण सहा स्तंभ आहेत.

ही दोन्ही लेणी वैशिष्ट्यपूर्ण आहेत. या दोन्ही लेण्यांमध्ये सिंहासनस्थ पार्श्वनाथाच्या मूर्ती असून त्याच्या दुतर्फा प्रतीहार आहेत. अजिंठा येथील भद्रासन-सिंहासनाप्रमाणेच याही सिंहासनांवर धर्मचक्र (wheel of law) आणि हरिणे (antelope) ही प्रयोजने आहेत. सिंहासनाच्या दुतर्फा किंचित मागच्या बाजूस चौरीधारक आणि आकाशात विहरणाऱ्या ठेंगू यक्षमूर्ती दाखविल्या आहेत. या मूर्तीभोवती अर्धउठावात ढगांसारख्या आकृती दाखविल्या आहेत. फरक इतकाच की, या लेण्यात तीर्थंकराच्या डोक्यावर नागाचा फणा दाखविला आहे.

**वेरूळ लेणे क्रमांक ३०-ए :** छोटा कैलास (वेरूळ लेणे क्रमांक ३०) लेण्याच्या वायव्येला एक अर्धवट खोदलेले लेणे आहे. आधी मुखमंडप, त्यामागे दोन बाजूंच्या टोकांना प्रत्येकी एक छोटी खोली असलेला व्हरांडा आणि त्यामागे अपूर्णावस्थेत असलेला मंडप असा याचा तलविन्यास आहे. या मंडपामागे गर्भगृह खोदण्याची योजना होती. पण हे काम पूरे होऊ शकले नाही.

मुखमंडपावर, व्हरांड्याच्या वरच्या भागावर त्याचप्रमाणे मंडपावर जैन देव-देवतांच्या मूर्ती मोठ्या प्रमाणावर आहेत. यातील बहुसंख्य मूर्ती देवतांच्याच आहेत. मुखभागाच्या वरच्या अर्धांगात अनेक मजली शिखर उठावात कोरले आहे. अपूर्णावस्थेतील मंडपाच्या मध्यभागी एक मोठा स्तंभ असून त्याच्या चारही बाजूंवर तीर्थंकरांच्या मूर्ती आहेत. निराळ्या शब्दात वर्णन करावयाचे तर मंडपाच्या मध्यभागी असलेली ही "सर्वतोभद्र प्रतिमा" आहे. ही सर्वतोभद्र प्रतिमा हा नव्यानेच आलेला घटक किंवा नवीन वैशिष्ट्य आहे. ह्या अपूर्णावस्थेतील लेण्यानंतर एकमेकालगत असलेली तीन दुमजली जैन लेणी लागतात. या तीन लेण्यांपैकी एक लेणे (लेणे क्रमांक ३२) इंद्रसभा या नावाने, तर दुसरे लेणे (लेणे

क्रमांक ३३) जगन्नाथसभा या नावाने प्रसिध्द आहे. भव्य आकारमान, संकीर्ण तलविन्यास, सौंदर्य आणि दृष्टिसौख्य देणारी अलंकरण योजना इत्यादी वैशिष्ट्यांमुळे ही दोन लेणी दर्शकांच्या मनाला भुरळ पाडतात.

**वेरूळ इंद्रसभा (लेणे क्रमांक ३२) :** इंद्रसभा या लेण्यात जाण्याकरता प्रथम गोपुरातून जावे लागते. गोपुर ओलांडल्यावर प्रांगण लागते. प्रांगणाच्या मधोमध मंदिराची प्रतिकृती असून या प्रतिकृतीच्या एका बाजूस हत्ती आणि दुसऱ्या बाजूस स्तंभ आहे. प्रांगणाच्या उजव्या बाजूस असलेला भव्य हत्ती कैलास लेण्याच्या प्रांगणातील तशाच प्रकारच्या हत्तीची आठवण करून देतो. प्रांगणाच्या डाव्या भागात उत्तर राष्ट्रकूट शैलीची वैशिष्ट्ये असलेला ८.२६ मीटर उंचीचा एकाश्मक स्तंभ आहे. या स्तंभावर एकमेकांकडे पाठ करून असलेले व वेगवेगळ्या दिशांना तोंड करून असलेले ब्रह्मयक्ष आहेत. मंदिरासमोर स्तंभ उभारण्याची अशी पध्दत नंतरच्या काळात दक्षिण भारतात मोठ्या प्रमाणात प्रचलित झाली. हे लयनमंदिर दक्षिण भारतातील अशा प्रकारचे पहिले मंदिर आहे असे म्हणता येईल.

या एकाश्मक स्तंभालगतच स्तंभमुखी व्हरांडा, चार स्तंभांवर पेललेला मंडप आणि मंडपामागे गर्भगृह असा तलविन्यास असलेले मंदिर आहे. या मंदिरापलीकडे आणखी एक मंदिर असून त्या मंदिरासमोर आणखी एक मंदिर आहे. या तिन्ही मंदिरामध्ये कमीअधिक फरकाने एकाच प्रकारचे मूर्तिस्थलयोजन (iconogrophic scheme) आहे. हे मूर्तिस्थलयोजन आधी वर्णन केल्याप्रमाणेच आहे. ही तिन्ही मंदिरे प्रांगणाच्या डाव्या भागात आहेत. प्रांगणाच्या उजव्या भागात मंदिरे नाहीत. तथापि प्रांगणातील सर्वाधिक आकर्षक वास्तू म्हणजे प्रांगणाच्या मध्यभागी सर्वतोभद्र जिनमूर्ती असलेली मंदिराची प्रतिकृती होय.

या मंदिर शिखराचे छोट्या कैलासच्या शिखराशी आणि विशेषत: कैलास लेण्याच्या शिखराशी बऱ्यापैकी साधर्म्य आहे. हे शिखर पायऱ्या पायऱ्यांचे शंक्वाकृती असून उत्तरोत्तर लहान होत जाणारे आहे. या शिखराच्या प्रत्येक मजल्याच्या कोपऱ्यात कूट शिखरे असून मधल्या भागात कूट प्रयोजने आहेत.

आधीच उल्लेखल्याप्रमाणे हे लेणे दुमजली आहे. या लेण्याच्या खालच्या मजल्यावर जमिनींची पातळी प्रांगणापेक्षा उंच असल्यामुळे लेण्यात जाण्यासाठी पायऱ्या आहेत. स्तंभमुखी व्हरांडा, त्यामागे बारा स्तंभ असलेला मंडप आणि मंडपाच्या मागील भिंतीत गर्भगृह असा लेण्याच्या खालच्या मजल्याचा तलविन्यास आहे. दोन स्तंभ आणि दोन अर्धस्तंभ यांनी व्हरांडा मंडपापासून अलग केला आहे. तीर्थंकरांच्या दोन मूर्ती सोडल्या तर हा खालचा मजला उल्लेखनीय नाही. या तीर्थंकराच्या मूर्तीखाली एक शिलालेख असून या शिलालेखावरून ही मूर्ती शांतिनाथाची आहे असे दिसते.

ही मूर्ती व्हरांडा आणि मंडप यांना अलग करणारे कडेचे दोन अर्धस्तंभ आणि मधले दोन स्तंभ यांनी बनलेल्या ओळीतील अर्धस्तंभावर आहे. त्याचप्रमाणे याच ओळीतील दुसऱ्या टोकाकडील अर्धस्तंभावरही अशीच मूर्ती आहे.

आधीच वर्णन केल्याप्रमाणे इंद्रसभेतील वरच्या मजल्यावरील मंदिर संकुल अधिक उल्लेखनीय आहे. लेण्याच्या व्हरांड्याच्या पूर्व टोकाकडून वर जाण्यासाठी जिने आहेत. दक्षिणाभिमुख असलेले मुख्य गर्भगृह आणि आग्नेय आणि नैर्ऋत्य कोपऱ्यांमध्ये एकमेकांसमोर असलेली दोन उपगर्भगृहे असे या वरच्या मजल्यावरील मंदिर संकुलाचे वर्णन करता येईल. या दोन्ही उपगर्भगृहांच्या दिशा भिन्न असल्या तरी त्यांचा मूलभूत तलविन्यास सारखाच म्हणजे मागील मंडपाइतकीच रुंदी असलेला स्तंभमुखी व्हरांडा आणि मंडपामागे गर्भगृह असा आहे. मंडपाच्या बाजूच्या दोन भिंतीमध्ये असलेल्या देवकोष्ठकामध्ये पार्श्वनाथ परिषहाला सामोरा जाणारा आणि बाहूबलीचे महात्म्य दाखविणारा कथापर शिल्पपट आहेत. हे मुख्य गर्भगृह आणि दोन उपगर्भगृहे यांचे मंडप (एकूण तीन मंडप) व्हरांड्यापासून दोन अर्धस्तंभ आणि अन्य स्तंभांनी अलग झाले आहेत. व्हरांड्याच्या बाजूंवर अंबिका आणि सर्वानुभूति यक्ष दाखविला आहे. उपगर्भगृहाचे मंडप चार स्तंभावर पेललेले असून मंडप आणि व्हरांड्याची सीमा दाखविणारे आणखी दोन स्तंभ आहेत; तर मुख्य गर्भगृहाचा मंडप बारा स्तंभावर पेललेला असून मधोमध सर्वतोभद्र प्रतिमा ठेवण्यासाठी असलेले पीठ आहे.

या वरच्या मजल्यावरील मुख्य मंडपाचे आल्हाददायी वैशिष्ट्य म्हणजे मंडपाच्या भिंतीतील अर्धस्तंभांमध्ये, म्हणजे दोन अर्धस्तंभांच्या मधल्या भागात असलेली तीर्थंकरांची मूर्तिशिल्पे आणि पुढच्या व्हरांड्यात असलेली वास्तवाकारापेक्षाही मोठ्या आकाराची सर्वानुभूति यक्ष आणि अंबिका यांची शिल्पे व तीर्थंकरांची शिल्पे होत. सुबकता आणि रेखीवपणा, एकंदरीत शिल्प चौकटीत समतोल साधेल अशा प्रकारची घटकांची योजना आणि मूर्तीच्या चेहऱ्यावरील तुरीय भाव या वैशिष्ट्यांमुळे पार्श्वनाथ आणि बाहुबली यांचे कथापरशिल्पपट आणि अंबिका व सर्वानुभूति यक्ष यांची मूर्तिशिल्पे प्रस्तरशिल्पाचा उत्कृष्ट नमुना ठरली आहेत, किंबहुना धाराशिव आणि बदामी येथे बसलेले तीर्थंकर आणि खड्गासनातील साधुसंत दाखविण्याचा जो प्रथमच प्रयोग झाला त्यास या लेण्यात चांगली अभिव्यक्ती लाभली आहे. इंद्रसभेतील मंडपाचे आणखी एक उल्लेखनीय वैशिष्ट्य म्हणजे त्याच्या छतावर रंगचित्रे असून या रंगचित्रांमध्ये विविध अलंकरणात्मक प्रयोजने व जैन धर्मातील अनेक कथानकातील दृश्ये चित्रित करण्यात आली आहेत.

**वेरूळ जगन्नाथ सभा (लेणे क्रमांक ३३)** : वेरूळ येथील जगन्नाथ सभा लेण्याचे स्वरुप प्रांगणाच्या तिन्ही बाजूस खोदलेले लयनसंकुल असे आहे. या लयनसंकुलात विविध आकाराची लयनमंदिरे असून त्यांचे तलविन्यासही वैविध्यपूर्ण आहेत. जगन्नाथ सभेच्या खालच्या मजल्यावर दोन छोटी ( 'जे-२२' व 'जे-२३') व दोन मोठी ('जे-२४' व 'जे-२५') लयनमंदिरे आहेत.

व्हरांडा व त्यामागे मंडप असा जे-२२ चा तलविन्यास आहे; त्याला गर्भगृह नाही. बसलेला तीर्थंकर ही या लेण्यातील मुख्य मूर्ती असून ती मंडपाच्या मागील भिंतीत मधोमध असलेल्या देवकोष्ठात आहे. याच मागील भिंतीवर एका टोकावर सर्वानुभूति यक्ष आणि दुसऱ्या कडेला अंबिका यांची मूर्तिशिल्पे आहेत. मंडपाच्या भिंतीवर बैठ्या स्थितीतील तीर्थंकराचे दोन पट्ट दाखविले आहेत. या मंडपातील सर्वात उल्लेखनीय बाब म्हणजे डाव्या भिंतीत कोरलेले शिल्पपट. व्हरांड्याच्या भिंतीवर पार्श्वनाथ, सर्वानुभूति यक्ष, यक्षी आणि भक्तगण दाखविले आहेत. मूर्तिस्थलयोजन (iconographic scheme) नेहमीच्या पठडीतील असले तरी त्यात समरूपता किंवा सममिती (symmetry) नाही व ते फारसे आकर्षकही नाही. जे-२३ मधील मूर्तिस्थलयोजन काहीसे सममितीत आहे. बिनखांबी मंडप आणि त्यामागे गर्भगृह असा या लेण्याचा तलविन्यास आहे. मंडपाच्या मागील भिंतीवर गर्भगृहाच्या दोन्ही बाजूस अंबिका यक्षी आणि सर्वानुभूति यक्ष दाखविला आहे. मंडपाच्या बाजूच्या भिंतीवर पार्श्वनाथ आणि बाहुबली दाखविले आहेत. मंडपाच्या प्रवेशद्वाराच्या दुतर्फा मंडपातील भिंतींवर प्रत्येकी एक तीर्थंकर दाखविला आहे. गर्भगृहाच्या तीन भिंतींवर बैठ्या स्थितीतील तीर्थंकरांच्या मूर्ती आहेत. जे-२४ या लेण्याचा तलविन्यासही या ठिकाणी असलेल्या जैन लेण्यांपेक्षा मूलभूतपणे निराळा नाही. पुढे स्तंभमुखी व्हरांडा, त्यामागे तितक्याच रूंदीचा मंडप, त्यामागे अंतराल व गर्भगृह असे या लेण्याच्या तलविन्यासाचे स्वरुप आहे. स्तंभ आणि अर्धस्तंभांद्वारे हा व्हरांडा मंडपापासून अलग केला आहे. मंडप चार स्तंभांवर पेललेला असून मंडपाच्या बाजूच्या भिंतींमध्ये प्रत्येकी एक उपगर्भगृह आहे. व्हरांड्यामध्ये आणि गर्भगृहामध्ये अनुक्रमे अंबिका यक्षी, सर्वानुभूती यक्ष, पार्श्वनाथ आणि बाहुबली यांची मूर्तिशिल्पे आहेत. दोन अर्धस्तंभांमधील भिंतभागांवर आणि गर्भगृहातील बाजूच्या भिंतीवर मिळून एकूण २० तीर्थंकरांची मूर्तिशिल्पे आहेत. उपगर्भगृहातील पार्श्वनाथाचे आणि गर्भगृहातील मूलनायकाचे शिल्प जमेस धरले तर ही संख्या २२ होते. जे-२३ या लेण्यांमध्ये जर आणखी दोन तीर्थंकर असते तर २४ तीर्थंकर पूर्ण झाले असते. बसलेल्या आणि उभ्या तीर्थंकराच्या प्रयोजनाची पुनरावृत्ती हे तर वेरूळ येथील सर्वच जैन

लेण्यांचे वैशिष्ट्य आहे. मूर्तिस्थलयोजनाच्या मूळ आराखड्याचा इरादा २४ तिर्थंकर, अंबिका यक्षी, सर्वानुभूति यक्ष यांच्यासह दाखविण्याचा, तसेच बाहुबलीचे कौतुक व पार्श्वनाथाचा परिषद यासारखे धार्मिक कथापरशिल्पपट कोरण्याचा असावा.

वेरूळ येथील जैन लेण्यांचे तलविन्यास शैव लेण्यांच्या तलविन्यासांशी मिळतेजुळते आहेत. उपगर्भगृहांच्या योजनेमुळे हे साधर्म्य अगदी ठळकपणे नजरेत भरते. शैव लेण्याच्या मंडपाच्या भिंतीवर कधीकधी शैव आणि वैष्णव कथापरपट आहेत, तर जैन लेण्यांमध्ये बहुतेकदा तीर्थंकरांच्या जोडमूर्ती व दोन अर्धस्तंभांच्या मधील जागेत कधीकधी एकाखाली एक असे तीर्थंकरांचे दोन पट आढळतात. यावरून जैन लेण्यांच्या स्थपतींनी आधीच उपलब्ध असलेल्या लयनतलविन्यासाचा अर्थपूर्ण मूर्तिस्थलयोजन उत्क्रांत करण्याकरिता मोठ्या चातुर्याने उपयोग करून घेतला असे दिसते. हीच कल्पना अधिक विकसित करून पश्चिम भारतातील जैन स्थापत्यकारांनी मंदिर संकुलाच्या सीमाभिंतीत ५६ ते ७२ किंवा कधीकधी त्याहूनही अधिक देवकोष्ठांची योजना केली ही बाब या संदर्भात इथे नमूद केली पाहिजे. चतुर्विंशतिपट्टासारखा मूर्तिशास्त्रीय मूर्तिप्रकारही याच काळात विकसित झाला ही बाबही महत्त्वपूर्ण आहे.

या लयनसंकुलाचाच भाग असलेल्या जे-२५ या लेण्याचा तलविन्यासही मंडपाचा आकार, मंडपाच्या मागील भिंतीत एकाऐवजी तीन गर्भगृहे हे अपवाद वगळता येथील अन्य जैन लेण्यांप्रमाणेच आहे. मूर्तिस्थलयोजनाचे एकंदरीत स्वरूपही आधी वर्णन केल्याप्रमाणे आहे.

जगन्नाथसभेचा वरचा मजला (जे-२१) तलविन्यासदृष्ट्या काहीसा निराळा आहे.[७२] या लेण्याला इंद्रसभेप्रमाणे यक्ष आणि यक्षी यांची मूर्तिशिल्पे असलेला आयताकार व्हरांडा नाही. या लेण्यात हे यक्ष यक्षी गर्भगृहाच्या द्वाराच्या दुतर्फा आहेत. ह्या यक्ष-यक्षीच्या जोडीची बसलेल्या तीर्थंकरांच्या जोडीजवळ आणि दोन अर्धस्तंभांच्या मध्ये असलेल्या भिंत भागात तीर्थंकरांच्या तीन पट्टांजवळ पुनरावृत्ती झाली आहे. इतर लेण्यात मंडपाच्या बाजूच्या भिंतीमध्ये पार्श्वनाथ आणि बाहुबलीचे कथापरपट दाखविणारी जशी उपगर्भगृहे आहेत तशी उपगर्भगृहे या लेण्याला नाहीत. तथापि एकंदरीत मूर्तिस्थलयोजन आधी वर्णिलेल्या अन्य लेण्यांप्रमाणेच आहे. लेणे क्रमांक ३[७३] (परेरांचे जे-२६) चा तलविन्यासही सारखाच, म्हणजे स्तंभमुखी व्हरांडा, चार स्तंभांवर पेललेला चौरसाकृती मंडप, अंतराल आणि गर्भगृह असा आहे. मंडपाच्या दोन बाजूच्या भिंतीत उपगर्भगृहे असून त्यात पार्श्वनाथ आणि बाहुबली दाखविले आहेत. पण अंबिका आणि सर्वानुभूति यक्ष गर्भगृहाच्या द्वाराच्या दुतर्फा दाखविण्यात आले आहेत.

या लयनसमूहातील छोट्या आणि मोठ्या लेण्यांचे तलविन्यास, वास्तुशास्त्रीय प्रयोजने, घटक, विशेषतः स्तंभ, मुखभागावर उठावात कोरलेली शिखरे व त्याचप्रमाणे खुद्द छोटा कैलासचे शिखर आणि इंद्रसभेच्या प्रांगणात असलेली शिखराची प्रतिकृती, मूर्तिशिल्पांचे हिंदू लेण्यांमधील मूर्तिशिल्पांशी असलेले साधर्म्य या बाबी या लयनसंकुलाचा काळ इ. स. चे नववे ते दहावे शतक असा सुचवितात. यातील काही लेण्यांमध्ये असलेल्या शिलालेखांची पुराभिलेखीय वैशिष्ट्ये वरील कालनिर्णयाला दुजोरा देतात. अपूर्णावस्थेत असलेल्या लेण्याच्या परिसरातील लेणे क्रमांक ३१ आणि पार्श्वनाथ टेकडीवर कोरलेली लेणी या परिसरात लयननिर्मिती उत्तर चालुक्यकाळापासून यादवकाळापर्यंत चालू राहिल्याची साक्ष देतात.

**खरूसा :** ब्राह्मणी लयनस्थापत्याच्या प्रकरणात खरूसा येथील लयनसमुहाचा विचार आपण केलेला आहे. या लयनसमुहात एक जैन लेणे आहे. हे लेणे टेकडीच्या दक्षिण टोकावर असून ७.३२ मीटर रुंद, ५.०३ मीटर खोल आहे. लेण्याच्या मागील भिंतीत बसलेला तीर्थंकर दाखवला आहे. खरूसा येथील अन्य लेण्यांच्या काळावरून हे लेणे इ. स. च्या नवव्या शतकाच्या उत्तरार्धात खोदले असावे असे दिसते.

**यादवकाळ**

"लयनमंदिर" या स्वरूपातील लयननिर्मिती यादवकाळातही चालूच राहिली. किंबहुना जैन लेणी यादवांच्या साम्राज्यभर विखुरलेली आढळतात. त्यातील प्रसिध्द उदाहरण म्हणजे वेरुळ येथील पार्श्वनाथ टेकडीवरील राष्ट्रकूट लयनमंदिराच्या परिसरातील लेणे क्रमांक ३१ (जोसे परेरांचे 'जे-५'), आणि जळगाव जिल्ह्यातील पाटणे येथील लेणी ही होत. कझिन्सने नाशिक जिल्ह्यातील चामर लेणे, धुळे जिल्ह्यातील भामेर आणि पुणे जिल्ह्यातील बामचंद्र येथे जैन लेणी असल्याचे नमूद केले आहे. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ व डेक्कन कॉलेज, पुणे यांनी अलीकडेच केलेल्या गवेषणातून औरंगाबाद जिल्ह्यातील दौलताबाद परिसरातील व देवगिरी किल्ल्याच्या पायथ्याशी असलेली लेणी यादवकालीन असल्याचे निष्पन्न झाले आहे. महाराष्ट्र शासनाच्या पुरातत्त्व व वस्तुसंग्रहालय संचालनालयाने अलीकडेच केलेल्या गवेषणामुळे या जैन लेण्यांच्या यादीत नाशिक जिल्ह्यातील चांदवड व अंजनेरी येथील लेणी व धुळे जिल्ह्यातील शहादा येथील लेण्यांची भर पडली आहे. याप्रमाणे महाराष्ट्रातील निरनिराळ्या जिल्ह्यांमध्ये यादवकालीन जैन लेणी आढळतात.

**पार्श्वनाथ टेकडी (वेरूळ) :** अपूर्णावस्थेतील जैन लेण्यांच्या परिसरात एक अनियमित आकाराची गुंफा असून त्यात काही अनियमित आकाराची लेणी आहेत. त्यामध्ये क्षेत्रपाल, पद्मावती यांसारखी जैन दैवते आणि उभे व बसलेले तीर्थंकर दाखविले आहेत. या लेण्यांना काही ठिकाणी शुष्कसांधी बांधीव भिंती आहेत ही वस्तुस्थिती ही लेणी नंतरच्या काळात खोदली गेल्याचे द्योतक आहे. २३ जिनमूर्ती असलेला तीर्थंकरपट्ट आणि जिनाला हत्तीद्वारे अभिषेक दाखविणारे शिल्प या बाबी ही लेणी यादवकाळातील असल्याची साक्ष देतात. तलविन्यासातील अनियमितपणा आणि लेण्यांचा आकार ही लेणी ऱ्हासाच्या काळात खोदली गेल्याचे स्पष्टपणे सूचित करतात.

पार्श्वनाथ टेकडीवर एक लयनसमूह आहे. या लयनसमूहातील लेण्यांना परेरा यांनी 'जे-२७' ते 'जे-३२' असे क्रमांक दिले आहेत. काही प्रमाणात 'जे-३०' हे लेणे सोडले तर या लेण्यांमध्ये वास्तुशास्त्रदृष्ट्या कोणतीही भव्यता अथवा उत्कृष्टता नाही. मंडप आणि त्यामागे गर्भगृह आणि त्याच्या दुतर्फा एकाश्मक हत्ती असा या लेण्याचा तलविन्यास आहे. जे-२९ या लेण्याचे स्वरूप एक मंडप, मंडपाच्या मागील भिंतीत तीर्थंकर आणि मंडपाच्या मधोमध सर्वतोभद्र प्रतिमा असे आहे. यातील सर्वात उल्लेखनीय बाब म्हणजे पार्श्वनाथाची महाकाय मूर्ती. सध्या ही मूर्ती गेल्याच शतकात बांधलेल्या एका वास्तूमध्ये आहे. पार्श्वनाथ सिंहासनावर बसलेला असून त्याच्या डोक्यावर सात फणा असलेल्या नागाचे छत्र आहे. पीठावर सिंहासनाच्या दुतर्फा चतुर्भुज यक्ष आणि यक्षीच्या मूर्ती असून किमान चार मानवमूर्ती आहेत. ही ३.०५ मीटर उंचीची आणि २.७४ मीटर रुंदीची पार्श्वनाथाची मूर्ती यादव मूर्तीशिल्पाचा उत्कृष्ट नमुना असून ती त्याच परिसरातील वर्धमानपुर (वदामापूर) येथील चक्रेश्वर नामक व्यापाऱ्याची निर्मिती आहे. ही मूर्ती शके ११५६ (इ. स. १२३४-३५) मधील असावी असा विद्वानांचा कयास आहे. या लेण्यांमध्ये आढळणारी महत्त्वपूर्ण वैशिष्ट्ये म्हणजे राष्ट्रकूट काळापासून प्रचलित असलेल्या वर्ण्यविषयांचे (themes) सातत्य आणि त्यात पडलेली नवीन वर्ण्यविषयक भर ही होत. बाजूच्या भिंतीवर असलेली पार्श्वनाथ व बाहुबलीची मूर्तिशिल्पे, सर्वसाधारणपणे तीर्थंकरांचे अनुचर म्हणून येणारे सर्वानुभूति यक्ष आणि अंबिका यक्षी, व शांतिनाथाला देण्यात आलेले महत्त्व ही नवीन पडलेल्या भरीची उदाहरणे आहेत. पण त्याचबरोबर एखाद्या विशिष्ट तीर्थंकराबरोबर असलेल्या यक्षाचा, म्हणजे ऋषभनाथाच्या गोमुख यक्षाचा मूर्तिशास्त्रीय विकास घडून येत होता हे 'जे-३०' या लेण्यावरून दिसून येते. सर्व क्षेत्रपालांमध्ये हनुमानाला क्षेत्रपाल म्हणून दिलेले महत्त्वही उल्लेखनीय आहे.

**पाटणे** : जळगाव जिल्ह्यातील पाटणे येथे काही लेणी आहेत. यातील एक लेणे नागार्जुनाची कोठडी म्हणून ओळखले जाते. ५.४९ मीटर रुंद x १.८३ मीटर खोल व्हरांडा, त्यामागे ६.१० मीटर रुंद x ४.८८ मीटर खोल मंडप आणि मंडपाच्या मागील भिंतीत जिनाची मूर्ती असा या लेण्याचा तलविन्यास आहे. व्हरांडा दोन स्तंभांवर पेललेला असून या स्तंभांवर लसुणाकृती शीर्षे (moulded capitals) आहेत. मंडपाच्या अंतर्भागात दुसऱ्या बाजूस दोन अनियमित आकाराचे स्तंभ असून त्यांच्या तळखड्याजवळ सर्वानुभूति यक्ष आणि अंबिका यक्षी कोरली आहे. मंडपाच्या मागील भिंतीत पंचतीर्थी मूर्ती आहे. यात मध्यभागी सिंहासनावर बसलेला मूलनायक असून त्याच्या प्रत्येक बाजूला एक बसलेला आणि एक उभा, म्हणजेच एकूण दोन बसलेले आणि उभे तीर्थंकर दाखवले आहेत. परिकरांमध्ये दोन चौरीधारक मकरतोरणे, छत्रातिछत्र (tripel umbrella) आणि अशोक वृक्षाची पालवी यांचा समावेश होतो. मूलनायकाच्या एका बाजूला आणि मागील भिंतीजवळ आणखी एक जिनमूर्ती आहे. मंडपाच्या दक्षिण भिंतीमध्ये एक उभी वास्तवाकार जिनमूर्ती असून उत्तरेकडील भिंतीत असलेल्या तीन आणि दक्षिणेकडील भिंतीत असलेल्या एका देवकोष्ठात व मागील भिंतीच्या दक्षिण टोकाजवळ खोदलेल्या अनियमित कक्षात प्रत्येकी एक जिनमूर्ती आहे. मूर्तिशास्त्रीय आणि शिल्पकलेची वैशिष्ट्ये आणि लसुणाकृती शीर्षे यावरून हे लेणे यादवकाळात खोदले गेले असे म्हणता येईल.

**चामरलेणे** (ता. जि. नाशिक) : नाशिक शहराच्या वायव्येला म्हसरूळ गावाच्या परिसरातील एका टेकडीवर हा लयनसमूह आहे. हा चामरलेणे म्हणून ओळखला जातो. या लयनसमूहातील दोन लेण्यांमध्ये, सर्वसाधारणपणे आढळणाऱ्या सर्वानुभूति यक्ष आणि अंबिका यांच्या मूर्तिशिल्पांव्यतिरिक्त अनेक जिनमूर्ती आहेत. यातील एका लेण्यामध्ये सिंहासनावर बसलेला मूलनायक आणि परिकरांमध्ये इतर २३ जिन दाखविले आहेत; त्यामुळे या शिल्पाकृतींना चतुर्विंशति पट्टांचे स्वरूप प्राप्त झाले आहे. येथे प्रस्तरात कोरलेली पार्श्वनाथाची महाकाय मूर्तीही आहे. येथील शिल्पशैली लक्षात घेता ही लेणी यादव काळात खोदली गेली असावीत असे दिसते.

**अंजनेरी** (ता. त्र्यंबकेश्वर, जि. नाशिक) : जवळच असलेल्या टेकडीच्या नावावरून या गावाला अंजनेरी हे नाव पडले आहे. हे गाव नाशिक-त्र्यंबकेश्वर रस्त्यावर नाशिकपासून २० कि. मी. अंतरावर असून या गावाच्या परिसरात प्राचीन मंदिराचे अवशेप आहेत. या ठिकाणी आढळलेल्या दुसऱ्या सेऊणचंद्राच्या काळातील, इ. स. च्या ११ व्या शतकाच्या शेवटच्या चतुर्थकातील शिलालेखामध्ये

जैन मंदिराला दान दिल्याचा उल्लेख आहे. या परिसरात असलेल्या बांधीव मंदिरांची माहिती पुढे स्वतंत्रपणे दिलेली आहे.

अंजनेरी टेकडीच्या खोवणीत एक लेणे असून त्यात मुख्य दैवत म्हणून पार्श्वनाथाची मूर्ती आहे. लेणे चौरसाकृती असून त्यात फक्त मंडपाचा समावेश होतो. मंडपाच्या मागील भिंतीत पार्श्वनाथाची पंचतीर्थी मूर्ती आहे. पार्श्वनाथांच्या दुतर्फा प्रत्येक बाजूस एक असे एकूण दोन तीर्थंकर दाखविले आहेत. बाहेरून लेण्यात शिरताना प्रवेशद्वाराच्या उजव्या बाजूस पार्श्वनाथाची उभी मूर्ती आहे. जैन लेण्यांमध्ये नेहमी आढळणारे अंबिका यक्षी आणि सर्वानुभूति यक्ष मंडपाच्या मागील भिंतीत असलेल्या तीर्थंकरयुक्त पार्श्वनाथाच्या दुतर्फा दाखविले आहेत. या लेण्यांतील स्तंभांचा स्तंभघटकक्रम, गुजरातमध्ये आढळणाऱ्या पश्चिम भारतीय शिल्पशैलीशी बऱ्यापैकी साधर्म्य असलेल्या मनुष्याकृती आणि शिल्पशैलीची इतर वैशिष्ट्ये लक्षात घेता हे लेणे आणि त्यातील कोरीवकाम इ. स.च्या तेराव्या शतकाच्या अखेरीस करण्यात आले असे दिसते.

**मोहिदे येथील लेणी** (ता. शहादा, जि. धुळे) : मोहिदे येथे असलेली लेणी शैलगृहस्थापत्याचा आगळावेगळा नमुना आहे. ही लेणी डोंगरामध्ये खोदलेली नसून मोहिदे गावाजवळून वाहणाऱ्या गोमाई नदीच्या मध्ये पात्रात असलेल्या प्रस्तरामध्ये खोदलेली आहेत. यातील उल्लेखनीय दोन लेणीही इतर शैलगृहांपेक्षा वेगळी आहेत. ही लेणी वरून खाली खोदण्यात आली तथापि वेरूळ येथील कैलास लेण्याप्रमाणे नाही. लयनमंदिराच्या मंडप आणि गर्भगृहाला छत नाही. कदाचित या लेण्यावर लाकडी तुळ्या टाकून त्यावर तात्पुरते छप्पर/शिखर बसविण्यात येत असावे. आयताकार मंडप आणि त्यामागे चौरसाकृती गर्भगृह असे या लयनमंदिराचे स्वरूप आहे. मंडपाच्या आणि गर्भगृहाच्या भिंतीवर तीर्थंकर, बाहुबली, यक्ष आणि यक्षी यांच्या मूर्ती आहेत. जरी तीर्थंकरांच्या मूर्तींमधील प्रत्येक तीर्थंकर ओळखता आला नाही, तरी मूर्तिशास्त्रीय स्थलयोजनात (iconographic scheme) २४ तीर्थंकर, यक्ष, यक्षी आणि क्षेत्रपालांसह इतर जैन दैवतांचा समावेश होतो. दुसरे लेणेही सामान्यच आहे. या दोन लेण्यातील मुख्य फरक म्हणजे गर्भगृहातील तीर्थंकरांची संख्या. लेणे क्रमांक १ च्या गर्भगृहात एकूण ७ मूर्ती आहेत. (मागच्या भिंतीत मूलनायक आणि बाजूच्या भिंतीमध्ये प्रत्येकी ३ तीर्थंकर), तर लेणे क्रमांक २ मधील गर्भगृहात ५ जिन आहेत (मागील भिंतीत एक आणि बाजूच्या भिंतीमध्ये प्रत्येकी दोन).

**भामेर** (ता. निजामपूर, जि. धुळे) : भामेर किल्ल्याच्या परिसरात ५ लेणी आहेत. यातील तिसऱ्या लेण्याला २२.५७ मीटर रुंदीचा व्हरांडा असून त्याच्या डाव्या टोकाला अर्धवट खोदलेला कक्ष आहे. ह्या व्हरांड्यातून ७.३२ मीटर x ६.१० मीटर आकाराच्या तीन मंडपामध्ये जाता येते. निराळ्या शब्दात-डावीकडे अर्धवट खोदलेला व्हरांडा व व्हरांड्यामागे एकमेकालगत असलेले तीन मंडप असा या लेण्याचा तलविन्यास आहे. या लेण्यामध्ये पार्श्वनाथ व जैन मूर्ती आढळतात. हे लेणे आज पडझड झालेल्या स्थितीत आहे.

**बामचंद्र** (ता. तळेगाव, जि. पुणे) : पुणे जिल्ह्यामध्ये चाकणच्या वायव्येला १० कि. मी. अंतरावर बामचंद्र हे गाव आहे. या गावाला लागूनच एक टेकडी आहे. ही टेकडी भंडाऱ्याचा डोंगर म्हणून ओळखली जाते. या डोंगरात असलेल्या लेण्यांमध्ये तुकाराम महाराज भजन करण्यास जात असत अशी वदंता आहे. मध्ययुगीन काळात आणि आधुनिक काळात या लेण्याचा बऱ्यापैकी जीर्णोध्दार झाला आहे. मंडप आणि त्यामागे गर्भगृह असा या लेण्याचा तलविन्यास असून सध्या गर्भगृहामध्ये शिवलिंग आहे. मंडप चौरसाकार (४.६३ मीटर x ४.६३ मीटर ) असून तो चार स्तंभांवर पेललेला आहे. चौरसाकृती पीठावर असलेले वर्तुळाकार पीठ, दरवाजाच्या ललाटभागावर कोरलेल्या पट्टामध्ये एक छत्रयुक्त आकृती या बाबी मूळात हे लेणे जैन असल्याचे सूचित करते.

---

# प्रकरण २ : बांधीव मंदिरे

**मंदिर संकल्पनेचा विकास** : बौध्द बांधीव स्थापत्याचा उल्लेख यापूर्वीच्या प्रकरणात केलेला आहेच. प्रस्तुत प्रकरणात हिंदू धर्मातील विविध पंथांच्या आणि जैन मंदिरांच्या स्थापत्याचा ऊहापोह केलेला आहे. बौध्द स्थापत्य हे हिंदू आणि जैन स्थापत्यापेक्षा निराळे असल्यामुळे त्याचा स्वतंत्रपणे विचार करावा लागला. बौध्द स्थापत्याला पुढील दोन कारणांमुळे इतर दोन स्थापत्यांपेक्षा वेगळेपण प्राप्त झाले आहे.

१. चापाकार मंदिरे सोडली तर बौध्द धार्मिक स्थापत्याचे प्रतिनिधित्व खुद्द स्तूपाद्वारेच केले जाते. असे नुसते स्तूप महाराष्ट्रात अनेक ठिकाणी सापडले आहेत.

२. इतिहासकाळाच्या सुरुवातीला नागरी लोकांमध्ये बौध्द धर्माचा लक्षणीय प्रसार झाला होता.

नंतरच्या काळात बौध्द स्थपतींचा कल बांधीव मंदिरे बांधण्याऐवजी शैलगृहे खोदण्याकडेच अधिक प्रमाणात राहिला; त्यामुळे सुरुवातीचे बौध्द बांधीव स्थापत्य आणि हिंदू बांधीव स्थापत्य यांना जोडणारी सलग बांधीव स्थापत्याची परंपरा दिसून येत नाही. याला असलेला एकमेव अपवाद म्हणजे या प्राचीन चापाकार मंदिरस्थापत्य परंपरेशी साधर्म्य दाखविणारे तेर येथील त्रिविक्रम मंदिर होय.

## मंदिर स्थापत्याचा विकास

गेल्या शतकात मूर्तिपूजेच्या प्राचीनतेचा शोध घेण्यासाठी झालेल्या संशोधनाचा एक भाग म्हणून भारतीय मंदिर स्थापत्याला कधी व कशी सुरूवात झाली याचाही शोध घेण्यात आला. भारतात आढळलेल्या सर्वाधिक प्राचीन मूर्ती बुध्दाच्या व कुषाणकालीन असून त्या व्यवच्छेदकपणे गांधार आणि मथुरा शैलीतील आहेत. त्यामुळे मूर्तिपूजा आणि मंदिरस्थापत्य या बाबी भारतात ग्रीकांकडून किंवा भारताच्या वायव्य सरहद्दीलगत नांदणाऱ्या ग्रीकोद्भव (hellenistic ) संस्कृतीकडून आल्या असाव्यात असे गृहित धरण्यात आले. मूळ भारतीय धर्मात, म्हणजेच वैदिक संस्कृतीत देवांना अग्निमध्ये आहुती दिल्या जात आणि आहुती अग्नी देवांना पोचवतो अशी धारणा होती. त्यामुळे यज्ञविधी हाच पूजेचा एकमेव प्रकार प्रचलित होता. मूर्तिपूजेचे उल्लेख वेदांमध्ये आढळत नाहीत. त्यामुळे देवांच्या मूर्ती बनवणे आणि या मूर्तींकरीता वास्तू किंवा मंदिरे बांधणे ही संकल्पनाच

वेदविधींना अज्ञात किंवा परकी होती. त्यामुळे आपल्या आचार्यांचे प्रतिनिधित्व करणाऱ्या प्रतीकांची किंवा त्यांचे अवशेषांनी युक्त असलेल्या स्तूपासारख्या वास्तूची पूजा करणाऱ्या बौध्दांना आणि जैनांनाही ती नवीन होती असे युरोपीय विद्वानांच्या एका गटाचे ठाम मत होते. भारतीय विद्वानांनी, विशेषतः आनंद कुमारस्वामी यांनी या मताच्या विरोधात जोरदार पुरावे सादर करून मूर्तिपूजा आणि मंदिरस्थापत्याची मुळे इतिहासकाळाच्या प्रारंभी भारतात मोठ्या प्रमाणात प्रचलित असलेल्या यक्षपूजेत होती असे दाखवून दिले.

धार्मिक वाङ्मय, उत्खननात आढळलेले भौतिक पुरावे, कलैतिहासिक प्रतिनिधित्व करणाऱ्या वस्तू आणि पुरावस्तू यांचा साकल्याने अभ्यास केल्यानंतर असे लक्षात आले की, इसवी सनाच्या पहिल्या दोन शतकांत वैदिक, जैन आणि बौध्द अशा विविध धर्मप्रवाहांना देवांच्या सगुण उपासनेची तीव्र गरज भासली. हिंदू धर्मात ही स्थिती भक्ती आणि अवतार या कल्पनांमध्ये तसेच विष्णू, शिव, बुध्द व महावीर या साऱ्यांना सामायिक असलेल्या भगवान् या संज्ञेने महत्त्वपूर्णपणे विशद झाली आहे. पण पूजावस्तूचे म्हणजे देवाचे सगुण स्वरूप कसे असावे, किंवा मर्त्य स्वरूपात जन्माला आलेल्या भगवान बुध्दाची किंवा महावीराची मूर्ती कशी असावी, तिची कलात्मक वैशिष्ट्ये काय असावीत हे मात्र स्थानिक कला परंपरेवर अवलंबून होते. ग्रीकोद्भव कलापरंपरा असलेल्या प्रांतातील बौध्द आणि हिंदू लोकांनी शिव, विष्णू किंवा बुध्दाला ग्रीक देवतांशी साधर्म्य असलेल्या स्वरूपात साकारले; तर मूळ स्थानिक कलापरंपरा अगोदरच विद्यमान असलेल्या प्रांतातील लोकांच्या देवमूर्ती पूजेत आधीपासूनच प्रचलित असलेल्या यक्षमूर्तींशी मिळत्याजुळत्या होत्या. दगडी फरशीवर किंवा शिलाफलकावर देवमूर्ती व दगडी कठडा असे पहिल्यावहिल्या देववास्तूंचे किंवा मंदिराचे स्वरूप होते. देवमूर्ती आणि सभोवताली दगडी कठडा असलेल्या शिलाफलक एखाद्या झाडाखाली असत. या शिलाफलकांवर संबंधित देवतेचे वाहन कोरलेले असे. प्राचीन काळात ज्यांची पूजा बहुतेक सर्व ठिकाणी प्रचलित होती ते वृष्णिवीर स्तंभशीर्षे म्हणून कोरलेल्या लांच्छनांच्या स्वरूपात दाखविले जात असत.* हे लांच्छन बहुधा त्यांचे वाहन असे. मगर, गरूड सभोवताली कठडा असलेले झाड अशी लांच्छने या स्तंभशीर्षावर कोरलेली

---

* अशा स्तंभशीर्षांना ध्वज असे संबोधण्यात येत असे. स्तंभशीर्षावर जे लांच्छन असेल त्या लांच्छनापुढे ध्वज हा शब्द जोडून जे नाम तयार होईल ते नाव ते लांच्छन वापरणाऱ्या राजाचे नाव म्हणूनही वापरले जाई. उदा. गरुडध्वज, मकरध्वज, इ. श्रीकृष्णाचा नातू प्रद्युम्न मकर हे लांच्छन वापरत असे, त्याचा उल्लेख भागवतामध्ये मकरध्वज असाही केलेला आढळतो. श्रीविष्णू गरुडध्वज, तर बलराम तालध्वज म्हणून पुराणात विख्यात आहेत.

असत. या पूजास्थानाचे वेगळेपण दाखविण्यासाठी व त्यांचे संरक्षण व्हावे यासाठी त्याभोवती दगडी कठडा असे. राजस्थानातील घोसुंडी येथील स्तंभावरील ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकातील शिलालेखात नारायण नामक देवाच्या पूजास्थानाभोवती (नारायण-वाटक) उभारलेल्या अशा दगडी कठड्याचा उल्लेख, गुडिमल्लम् येथे सापडलेले प्रसिध्द कायालिंग आणि सांची व भारहूत येथे दगडात कोरलेली अशा प्रकारची दृश्ये ही मंदिर-स्थापत्याची प्रारंभिक अवस्था विशद करतात. काही पवित्र वृक्षांचीही पूजा केली जात असे. अशा पूज्य वृक्षांभोवतीही शिलाप्राकार असे. असे शिलाप्राकारयुक्त पूज्य वृक्ष (चैत्य-वृक्ष) प्राचीन नाण्यांवरही दाखविण्यात आलेले आहेत. यावरून पूज्य वस्तूंभोवती शिलाप्राकार बांधण्याची पध्दत मोठ्या प्रमाणात प्रचलित होती हे लक्षात येते. यापुढील अवस्था म्हणजे पूजाविषय असलेल्या पूजनीय वस्तूवर झोपडीच्या स्वरूपात छत येणे. चैत्य-वृक्षांवरही असे छत घालण्यात येत असे. अर्थात वृक्षांची वाढ होत असताना वृक्ष ते छत तोडून बाहेर पडत असे. हे असे होणार याची कल्पना असूनही वृक्षावर छत उभारले जात असे, आणि त्यामुळेच पूजावस्तूंवर छप्पर घालणे या बाबीला धार्मिक महत्त्व असावे असे वाटते. शिवलिंग किंवा मूर्तीच्या स्वरूपात असलेल्या पूजावस्तूला "घर" देण्यात येऊ लागले. अर्थात या घराचे स्वरूप सुरुवातीला साधी पर्णकुटी असेच होते. मंदिर-स्थापत्य-विकासाच्या पुढच्या टप्प्यात देवाच्या घरात किंवा देवगृहात पूजेचे धार्मिक विधी करण्यासाठी आणि भक्त तसेच प्रत्यक्ष पूजाविधी करणाऱ्या लोकांना एकत्र जमण्यासाठी पुरेशी जागा उपलब्ध करण्यात आली. परिणामी पुढे केवळ गर्भगृह अथवा गर्भगृह आणि मंडप दोहोंच्याही बाहेरून असलेला प्रदक्षिणापथ यांची निर्मिती झाली. आता साध्या पर्णकुटीचे रूपांतर चापाकार मंदिरप्रकारात झाले. हा एकेकाळी लोकप्रिय झालेला मंदिरप्रकार आजीविक आणि बौध्दांच्या शैलगृहांच्या स्वरूपात आजही टिकून आहे. यापुढील विकासाच्या टप्प्यात, इतिहासकाळच्या सुरुवातीला मंदिराचे जे "देवगृह" असे स्वरूप होते ते जाऊन त्याला प्रासाद असे स्वरूप प्राप्त झाले. राजा हा विश्वातील महत्त्वाची कार्ये करणाऱ्या आठ देवांचा (लोकपालांचा) पृथ्वीवरील प्रतिनिधी आहे अशी श्रध्दा होती. त्यामुळे जर राजा हा देवाचा प्रतिनिधी असून प्रासादात राहतो, तर देवाच्या निवासवास्तूचे स्वरूप अनेकमजली प्रासाद असावे हे ओघानेच आले. देवाची दिनचर्याही राजाशी मिळतीजुळती ठेवण्यात आली. उदा. दर चार घटिकानंतर देवळात नगारा वाजविण्यात येऊ लागला. यालाच चौघडा म्हणतात. भूपाळ्या म्हणून त्याला उठविणे व रात्री झोपविणे, नैवेद्य दाखविणे, त्याची संगीत आणि नृत्याद्वारे करमणूक करणे हेही दिनचर्येचे भाग होते. या सर्व उपचारांना अंगभोग

आणि रंगभोग अशी नामाभिधाने आहेत. देवाला हे असे राजासारखे स्वरूप प्राप्त झाल्यामुळेच पूजाविधींमध्ये अनेक राजोपचारांचा समावेश झाला. हे सर्व राजोपचार यथासांग पार पडावेत यासाठी मंदिराच्या तलविन्यासातही काही बदल घडून आले. मंडप आणि गर्भगृह यांच्यामध्ये अंतराळाची योजना करण्यात आली आणि मंडपामध्ये नृत्याकरिता एका चौकाची (रंगमंडपाची) भर पडली. गर्भगृहावरील अनेक मजले अभिव्यक्त करणारे शिखर आणि गर्भगृहाच्या प्रवेशद्वाराच्या दोन्ही बाजूला द्वारपाल किंवा प्रतिहार आले.

यानंतरच्या विकासात मंदिर खुद्द ब्रह्मांडाचेच प्रतीक बनले. ख्रिस्तोत्तर दहाव्या ते अकराव्या शतकात साकारलेल्या या स्वरूपात मंदिर हे गर्भगृहातील देवाचे शरीर मानले गेल्यामुळे मंदिराच्या बाह्य आणि अंतर्भागावर परिवार देवता कोरण्यात आल्या. मंदिर स्थापत्याच्या चौथ्या टप्प्यात मंदिर नगरांचा (Temple Cities) उदय झाला. यात संपूर्ण नगर मंदिराच्या तटबंदीच्या आत असून मुख्य मंदिर या नगराचे मध्यवर्ती केंद्र बनले.

पूर्णपणे विकसित मंदिर स्थापत्यात अनेक गोष्टींचा समावेश झाल्यामुळे त्यात हिंदू किंवा भारतीय जीवनाचे घटक, आणि सामाजिक संस्था म्हणून त्यात झालेल्या विकासाची किंवा फेरफाराची प्रतिबिंबे दिसून येतात. मंदिर-स्थापत्य-विकासाचे वर वर्णन केलेले टप्पे संपूर्ण भारतातील मंदिर स्थापत्यविकासाचे आहेत. त्यामुळे यात वर्णिलेल्या सर्व अवस्थांचे प्रतिनिधित्व करणारी मंदिरे महाराष्ट्रात आढळतीलच असे नाही. परंतु पुढील भागात जे महाराष्ट्रातील मंदिरांचे विवेचन करण्यात यावयाचे आहे, त्यात आधी वर्णिलेले मंदिर-स्थापत्य-विकासाचे टप्पे लक्षात घेतले पाहिजेत. त्याचप्रमाणे सर्व भारतभर मंदिर बांधणाऱ्या स्थपतींनी जे तंत्र मंदिर बांधताना वापरले त्याकडेही लक्ष देणे आवश्यक आहे. ख्रिस्तोत्तर पहिल्या काही शतकांमध्ये (म्हणजे सातवाहन आणि कुषाणकाळात) स्थापत्यपरंपरेने किंवा तत्कालीन स्थपतींनी मंदिरबांधणीचे साधन म्हणून पक्क्या विटांची निवड केल्याचे दिसून येते. भिंतीचा पृष्ठभाग बनविण्यासाठी तर पक्क्या विटांचा सर्रास वापर होत असे. ख्रिस्तोत्तर दहाव्या शतकापर्यंत हे विटांचे स्थापत्य इतके विकसित झाले की, काही उंच आणि अवाढव्य मंदिरेही याच तंत्राने बांधण्यात आली. महाराष्ट्राच्या इतिहासात मात्र ही वीटबांधकामाची मंदिरे मंदिरस्थापत्याच्या कालखंडात येतात.

## विटांनी बांधलेली मंदिरे

आधी वर्णन केल्याप्रमाणे मंदिर बांधणीच्या उपक्रमामध्ये सुरुवातीची बहुतांशी मंदिरे विटांनीच बांधलेली असावी हे उघड आहे. पण शतकानुशतके टिकून

राहण्याच्या दृष्टीने वीट तशी नाशिवंतच असल्यामुळे या सुरुवातीच्या कालखंडातील फारच कमी मंदिरे आजमितीस टिकून आहेत. काही उत्खननांमध्ये विटांनी बांधलेल्या मंदिराचे अवशेष सापडले आहेत. निजाम राज्याच्या पुरातत्त्व विभागाला पैठण येथील उत्खननात सापडलेले मंदिर अवशेष सर्वाधिक उल्लेखनीय आहेत. तथापि या अवशेषांवरून मंदिराचे फारसे तपशील म्हणजे हे मंदिर कोणत्या देवाचे आणि कोणत्या संप्रदायाचे आहे इत्यादी कळू शकले नाही. विदर्भातील वाकाटककालीन मंदिरांचे अवशेषही गेल्या दोन दशकात उजेडात आले आहेत. मांढळ (नागपूर जिल्हा), नागरा (भंडारा जिल्हा), प्राचीन काळात वत्सगुल्म म्हणून ज्ञात असलेले आताचे वाशिम (अकोला जिल्हा) ही अशा मंदिरांचे अवशेष असलेली काही महत्त्वाची स्थळे आहेत. उस्मानाबाद जिल्ह्यातील तेर (प्राचीन-तगर) येथे विटांनी बांधलेल्या मंदिरांचा समूह सापडला आहे. आधी उल्लेख केलेल्या स्थळांमध्ये सापडलेले अवशेष वाकाटककालीन मंदिराचे आहेत (इ. स. २५० ते इ. स. ५१०); पण तेर येथे आढळलेली मंदिरे मात्र निरनिराळ्या कालखंडातील आहेत. तेथील त्रिविक्रम मंदिराचा काळ इ. स. ३ ऱ्या शतकापासून ५ व्या शतकापर्यंत मानला जातो. उत्तरेश्वर मंदिर ख्रिस्तोत्तर ६ व्या शतकातील तर नदीच्या दुसऱ्या तीरावर असलेल्या गोरोबा काकाच्या समाधिसंकुलातील मंदिरे (कालेश्वर मंदिर आणि नीलकंठेश्वर मंदिर) ख्रिस्तोत्तर ८ वे ते ९ वे शतक या काळातील आहेत. पुणे जिल्ह्यात हरिणे आणि परिंचे तसेच वेरुळ घृष्णेश्वर मंदिर परिसरातील उत्खननात विटांनी बांधलेल्या मंदिराच्या पायाचे अवशेष मिळाले आहेत. इथे फक्त पायाच सापडला असला तरीही या भागात विटांची मंदिरे बांधली जात होती याची साक्ष अवशेष देतात. ही अवशेषरूपांनी शिल्लक असलेली मंदिरे बहुधा चालुक्य-राष्ट्रकूटकाळात बांधली गेली असावीत. या वरील विवेचनावरून इतर ठिकाणी आणि इतर कालखंडात विटांची देवळे बांधलीच जात नव्हती असा निष्कर्ष मात्र काढू नये. वीट ही दगडाच्या तुलनेत नाशिवंत असल्यामुळे विटांची बांधकामे नष्ट झाली असावीत. पण संबंधित काळात विटांची मंदिरे मोठ्या संख्येने बांधली गेली असल्याची दाट शक्यता आहे.

**मांढळ येथील विटांची मदिरे** (ता. कुही, जि. नागपूर) : नागपूर विद्यापीठाच्या "प्राचीन भारतीय इतिहास, संस्कृती आणि पुरातत्व" विभागाने उत्खननात शोधलेले सर्व मंदिरांचे अवशेष महाराष्ट्रातील सर्वाधिक प्राचीन हिंदू मंदिरांचे आहेत. तेर येथील त्रिविक्रम मंदिर याला अपवाद आहे. ते या अवशेषांहून अधिक प्राचीन आहे. नागपूरच्या नैर्ऋत्येला ७५ कि. मी. असलेल्या मांढळ गावाबाहेर एकूण

तीन मंदिरे किंवा मंदिराचे अवशेष सापडले आहेत. ही मंदिरे एकमेकांपासून फार दूर नाहीत. या जागा वोंगी हुडकी, भोला हुडकी आणि वऱ्हाडी तलाव म्हणून ओळखल्या जातात. यातील वऱ्हाडी तलाव ही जागा सोडली तर अन्य दोन ठिकाणी पीठ पातळीपर्यंतचे अवशेषही सापडत नाहीत. वोंगीहुडकीचे मंदिर मध्यम आकाराचे असून गर्भगृह व मुखमंडप अशी त्याची रचना आहे. भोलाहुडकी येथे एक आयताकृती कट्टा असून त्याच्या अरुंद वाजू दक्षिणोत्तर असून दक्षिण व उत्तरेकडे कट्टयावर जाण्यासाठी जिने आहेत. मधल्या भागात नंतरच्या काळातील मंदिराचे अवशेष आहेत. या मंदिरापुढे एक पुरुपापेक्षाही अधिक खोलीचे एक कुंड आहे. या कुंडाच्या चारही वाजू आतल्या वाजूला उतरत्या आहेत; म्हणजेच जसजसे खोल जावे तसतसे हे कुंड अरुंद होत जाते. या मुख्य मंदिराजवळच वहुधा पुजाऱ्यांची घरे होती आणि या सर्व वास्तूंभोवती एक प्राकार होता. हे मंदिर एक महत्त्वाचे मंदिर असावे कारण हे मंदिर ज्याखाली दडले होते त्या टेकाडाचे उत्खनन करताना पहिल्याच स्तरात वाकाटक नृपति दुसरा प्रवरसेन (इ. स. ४२०-४५०) आणि दुसरा पृथ्वीपेण (इ. स. ४७०-४९०) यांचे ताम्रपट असलेला एक मृत्करंडक सापडला. त्याहीपेक्षा महत्त्वाचे म्हणजे तेथे भग्नावस्थेत आढळलेल्या शैव आणि वैष्णव मूर्ती होत. या मूर्ती दगडी असून त्या आयताकार कट्टयाच्या आतच सापडल्या आहेत. या सर्व मूर्तींची प्राचीनता निदान ख्रिस्तोत्तर चौथ्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत तरी जाते. या मूर्तींच्या आधारे ख्रिस्तोत्तर चौथ्या शतकाच्या उत्तरार्धात वोंगी हुडकी आणि भोला हुडकी येथील मंदिरे वांधण्यात आली असे म्हणता येईल. वऱ्हाडी तलावाच्या पश्चिम तीरावर गावाच्या हद्दीत असलेले मंदिर त्यातल्यात्यात वऱ्यापैकी टिकून आहे. या मंदिराचे स्वरूप गर्भगृह आणि त्यात जाण्यासाठी पायऱ्या असे आहे. सोपानाला ४.४९ मीटर लांवीचा कठडा आहे. कट्टयाच्या किंवा पीठाच्या उभ्या वाजूंना वालुकाश्म घडीव चिरे लावलेले आहेत. ही अशी नंतर लावलेल्या चिऱ्यांची भिंत प्रणालकाच्या पातळीपर्यंत आहे. महाराष्ट्र शासनाच्या पुरातत्व व वस्तुसंग्रहालय संचालनालयाने येथे पुनश्च केलेल्या उत्खननात एका प्रतिहारीची व सिंहाची मूर्ती सापडली आहे. शिवाय याच ठिकाणी याआधी केलेल्या उत्खननात परिपक्व वाकाटक शैलीतील अल्पशा उठावातील शिल्प सापडले आहे. मंदिराच्या गर्भगृहात काहीसे स्तंभासारखे दिसणारे शिवलिंग आहे. या शिवलिंगाचा खालचा भाग चौकोणी असून वरचा भाग गोलाकार आहे. हे शिवलिंग, उत्खननात सापडलेले केशउठावातील शिल्प या पुराव्यावरून या मंदिराचा अदमासे काळ इ. स. च्या चौथ्या शतकाचे शेवटचे चतुर्थक आणि इ. स. च्या पाचव्या शतकातील पहिले चतुर्थक असा ठरतो.

**मूलचेरा (विवेकानंदपूर) येथील विटांची मंदिरे** (जि. गडचिरोली) : मूलचेरा येथे दोन ठिकाणी उत्खननात मंदिरांचे अवशेष सापडले आहेत. त्यापैकी एका मंदिराचे अवशेष गावालगत असलेल्या शेतात सापडले आहेत तर दुसऱ्या मंदिराचे अवशेष गावाच्या सीमेलगत असलेल्या टेकाडात सापडले आहेत. शेतात सापडलेल्या मंदिराचे अवशेष टेकाडात सापडलेल्या मंदिर अवशेषांइतके उल्लेखनीय नाहीत. टेकाडात सापडलेल्या मंदिराचे स्वरूप मांढळ येथील मंदिरासारखेच आहे. म्हणजे या मंदिराच्या तलविन्यासावरून मुखमंडप आणि त्याला लागून असलेले गर्भगृह अशी रचना असल्याचे आढळते. मांढळ येथील मंदिराप्रमाणेच याही मंदिराला अंतराळ नाही. नेमक्या याच वैशिष्ट्यामुळे हे मंदिर मंदिरस्थापत्याच्या सुरुवातीच्या टप्प्यातील असावे असे वाटते. या मंदिराचे पीठ बांधताना आधी पीठाच्या आतील बाजूस विटांच्या भिंतींनी कप्पे बांधण्यात आले आणि नंतर हे कप्पे विटांचे तुकडे आणि माती टाकून भरण्यात आले. या कप्प्यांना बळकटी आणण्यासाठी पीठाच्या बाह्य भिंतीच्या आतल्या बाजूने या बाह्य रेषेला जोडणाऱ्या कप्प्यांच्या भिंती जोडणारी आणखी एक भिंत बांधण्यात आली होती. स्तूप स्थापत्यात आधी असे कप्पे बांधून ते फुटक्या विटांचे तुकडे आणि माती टाकून भरण्याचे बांधकाम तंत्र विदर्भात इ. स. पू. दुसऱ्या शतकापासून प्रचलित होते हे पवनीच्या स्तूपाच्या अवशेषावरून दिसून येते. विदर्भातील वाकाटककालीन स्थपतींना या तंत्राचा वारसा लाभला होता आणि त्यांनी मंदिराचे जोते बांधताना याच तंत्राचा परिणामकारकपणे अवलंब केला होता असे या मंदिर-अवशेषांवरून म्हणता येईल.

**नागरा येथील विटांचे मंदिर** (ता. जि. गोंदिया) : हे उत्खनन भैरव टेकडीवर करण्यात आले. अगदी अलीकडच्या काळापर्यंत या टेकडीवर एक भैरवाचे मंदिर होते. या टेकडीच्या उत्खननात अदमासे २७ मीटर x ४२ मीटर आकाराच्या भव्य जगतीवर बांधलेल्या मंदिराचे अवशेष सापडले आहेत. हे मंदिर पूर्वाभिमुख होते आणि मंदिराच्या पूर्व बाजूस जगतीमध्येच पायऱ्यांची योजना केली होती. पीठाच्या उर्वरित ५१७ चौ. मीटर जागेत मंदिराची उभारणी करण्यात आली होती. पीठाचा पश्चिम भाग व्यापणाऱ्या गर्भगृहाच्या आतबाहेर जाणारी बाह्यरेषेचे (निर्गम आणि प्रवेशाचे) काही भाग पीठाच्या थरांवरही दिसून येतात. हे वैशिष्ट्य मंदिरस्थापत्यकलेतील विकासाचे बोलके उदाहरण आहे. गर्भगृहाच्या आतील भागाचे क्षेत्रफळ ५ चौ. मीटर असून आतील २ मीटर लांबीच्या शिवलिंगावर अभिषेक केलेले पाणी बाहेर जाण्यासाठी सोय केलेली आहे. हे शिवलिंग टेकाडाच्या अगदी वरच्याच भागावर, किंबहुना पृष्ठभागावर आढळले असून या

शिवलिंगाचे स्वरूप खालच्या भागात चौकोनी खांबासारखे (५२ सें. मी. चा चौरस) तर वर गोलाकार असे होते.

शिवलिंगाच्या तळाजवळ मांढळ येथे आढळलेल्या शिवलिंगाप्रमाणेच बारीक रेषात कोरलेले मेढसूत्र दिसून येते. दगडांमध्ये खाचा पाडून खाचा एकमेकांवर येतील अशाप्रकारे दोन दगड बसवून तीर्थाचा निचरा करण्यासाठी पन्हाळ बनविले आहे. पण या पन्हाळाच्या शेवटी म्हणजे मंदिराच्या बाहेरच्या अंगाला असलेल्या पन्हाळाच्या टोकावर नंतरच्या काळात दिसते त्याप्रमाणे मकरप्रणाल नाही. तेथे भूताचे तोंड कोरले आहे. या भूतशिल्पाला दोन हात असून एका हातात मासा आहे. हे भूत जणू हातातील मासा परत पाण्यात सोडणार आहे असे वाटते. या शैलीवरून हे शिल्प इ. स. च्या पाचव्या शतकातील असावे असे वाटते. या मंदिराच्या पीठाच्या पश्चिम टोकावर गर्भगृह असून गर्भगृहापुढे अंतराळ आहे. अंतराळापुढे असलेला मंडप बहुधा लाकडी खांबांनी बनविलेला होता. मंडपात शिरण्याकरता पायऱ्या असून या पायऱ्यांच्या दोन्ही बाजूंना अगदी छोटी देवळे बांधली गेली होती असे अवशेषांवरून स्पष्टपणे जाणवते. सर्वात महत्त्वाचा वास्तुघटक म्हणजे जगतीवरील वेदिबंध. खुर थराच्या वर कुंभ थर असून त्यावर घटातून बाहेर डोकावणारी पाने नक्षीच्या आकारात दाखविली आहेत. त्याच्यावर साध्या चौरस अर्धस्तंभांनी बनलेले देवकोष्ठ आहे. हा निर्गमांवरील थरांचा क्रम आहे. पीठाच्या दोन्ही बाजूस आठ निर्गमांकरता सात प्रवेश (recesses) आहेत.

प्रवेशांवरील थर निर्गमांवरील थरांच्या तुलनेत साधे आहेत. कुंभभागाच्या वरती कुंभभागाला लागूनच अर्धस्तंभांचे देवकोष्ठ आहे. या देवकोष्ठात वर्तुळाकार आणि अष्टकोनी स्तंभ आहेत. या स्तंभांच्या घटकांचा क्रम वाकाटक प्रकारचा आहे. वेगळ्या शब्दात, हे वाकाटक शैलीतील स्तंभ आहेत. या स्तंभांच्या तळाला कलश असून वरच्या टोकाला कुंभ आहे. स्तंभांच्या कुंभ-भागाखाली असलेल्या अष्टकोनी भागावर मालाजाल (festoons) दाखविले आहे. माला कधीकधी संख्येने तीन आहेत. गोल स्तंभांची बाह्यरेषा अर्धवर्तुळाकार अंतर्वक्रांनी बनलेली आहे. सध्या शिल्लक असलेल्या पीठाची उंची २.५० मीटर असून हे ह्या मंदिरस्थापत्याचे लक्षात घेण्याजोगे वैशिष्ट्य आहे.

या मंदिराच्या भोवतालची माती दूर करताना भाजण्यापूर्वीच आकार दिलेल्या(moulded) विटा, पणत्या आणि एक स्फटिकमुद्रा सापडली आहे. या स्फटिकमुद्रेवर "नारायणो" असा लेख असून हा लेख पेटिकाशीर्ष ब्राह्मी लिपीत लिहिला आहे. मंदिरात जाण्यासाठी असलेल्या पायऱ्यांच्या दोन्ही बाजूस असलेली

छोटी देवालये, भूतप्रणाल, पेटिकाशीर्ष ब्राह्मीतील लेख असलेली स्फटिकमुद्रा, विटेवर अर्ध उठावात कोरलेली मगर आणि साधे शिवलिंग हे पुरावे सदर मंदिर वाकाटककालीन असल्याची ग्वाही देतात. कालक्रमदृष्ट्या भूतप्रणाल हे वास्तुवैशिष्ट्य मकरप्रणाल वास्तुवैशिष्ट्य येण्याआधीचे आहे. महाराष्ट्रात असे भूतप्रणाल या मंदिराव्यतिरिक्त घारापुरीच्या क्रमांक १ च्या लेण्यालगत गुंफा मंदिरात आढळते.

हे मंदिर पाहताच मध्यप्रदेशातील भूमरा येथील शिवमंदिराची आठवण येते. अर्थात भूमरा येथील मंदिर वास्तुशास्त्रदृष्ट्या अधिक प्रगत आहे. या सर्व बाबींचा विचार करता हे मंदिर इसवी सनाच्या पाचव्या शतकाच्या उत्तरार्धात बांधले गेले असावे असे वाटते.

## प्रस्तर मंदिरे

**वाकाटक काळ** : मौर्य राजवंशाच्या आणि वाकाटकांच्या शिलालेखात मंदिर बांधणीचे उल्लेख आढळतात. एका शिलालेखात प्रवरसेनाच्या नावे बांधलेले शिवमंदिर अशा अर्थी "प्रवरेश्वरसद्विंसति" असा उल्लेख आला आहे. "मोंडस्वामिन्" आणि "रामगिरिस्वामिन्" हे उल्लेख स्थाननामावरून देवाच्या मूर्तीची केलेली स्थापना स्पष्टपणे सूचित करतात. रामटेक येथील केवल- नरसिंहमंदिरातील १५ ओळींच्या प्रभावतीगुप्ताप्रशस्तीमध्ये त्याच मंदिराच्या (केवल- नरसिंहमंदिराचा) उल्लेख प्रभावतिस्वामिन असा केलेला आढळतो. पवनार येथे सध्याच्या विनोबाजींच्या आश्रमाजवळ काही वास्तु-अवशेपांसमवेत (उदा. कमळाची नक्षी असलेला छताचा भाग) सापडलेले कथाशिल्पांचे अवशेप तेथे विष्णूचे मंदिर असल्याचा निःसंदिग्ध पुरावा देतात. हे मंदिरसुध्दा बहुधा वाकाटककालीन असावे.

**रामटेक येथील मंदिरे** (ता. रामटेक, जि. नागपूर) : रामटेक येथील त्रिविक्रम मंदिर आधीपासूनच ज्ञात होते. पण याच परिसरातील आणखी पाच वाकाटक काळातील प्रस्तर मंदिरे उजेडात आली. या मंदिरामुळे पुरातत्त्वज्ञांचे वाकाटक स्थापत्याबद्दलचे मत तर बदललेच; पण वाकाटकांच्याच समकालीन आणि वाकाटकांपेक्षाही संपन्न असलेल्या गुप्तांच्या महत्त्वाच्या शहरात किंवा शहराच्याजवळ अशा प्रकारच्या मंदिरस्थापत्याच्या पुराव्यांचा तौलनिक दृष्ट्या अभाव आहे हा विरोध अधिक तीव्रपणे जाणवू लागला. या सहा मंदिरांचे तलविन्यास आणि मंदिरबांधणीसाठी अवलंबिलेले तंत्र पाहिले तर या ठिकाणी राजस्थपतींनी स्थापत्याचे निरनिराळे प्रयोग करून पाहिले असे लक्षात येईल. गुप्तराम मंदिर हे तसे फारसे महत्वाचे नसले तरी ते लेणेवजा बांधीव मंदिर उभारणीच्या प्राचीन प्रयत्नाचा नमुना आहे. वराहमंदिराचे स्वरूप साधा मंडप असे आहे तर भोगराम मंदिर द्विगर्भ पध्दतीचे आहे.

**गुप्तराम मंदिर** : (६.०५ मीटर पूर्व-पश्चिम x ३.४७ मीटर दक्षिणो
आकाराच्या) गुप्तमंदिराचा तलविन्यास अगदी साधा असून त्यात गर्भगृह (२.
मीटर पूर्व-पश्चिम x ३.४७ मीटर दक्षिणोत्तर ) व मंडपाचा (२.३५ मीटर प
पश्चिम x ३.४५ मीटर दक्षिणोत्तर) समावेश होतो. गर्भगृह आणि अर्धस्
(incipient) अंतराळ यांच्या पुढे मंडप आहे. अर्धस्फुट अंतराळाला चार स्त
असून पुढील दोन स्तंभ मंडपाच्याच भिंतीचे भाग बनले आहेत. उरलेले
अर्धस्तंभ गर्भगृहाच्या प्रवेशाच्या दोन बाजूस आहेत. मंडपाच्या स्तंभाच्या हस्ता
असलेल्या तुळया मंडपाचे चतुःस्तंभी स्वरूप स्पष्ट करतात. स्तंभ विवक्षित
वाकाटक प्रकारचे असून चौरस तळखडा, खांब, त्याच्या वरच्या बाजूस नेह
जिथे कमलतवक (lotus medallion) असते त्या जागी पट्ट आणि पट्टाच्या
हस्त असे या स्तंभांचे घटक आहेत.

**वराह मंदिर** :वराह मंदिर हे तौलनिकदृष्ट्या साधे मंदिर असून चार रुच
प्रकारचे स्तंभ असलेला मंडप असे त्याचे स्वरूप आहे. हे मंदिर २.६५ मी
लांबीच्या चौरस जगतीवर उभे असून मंदिरात जाण्यासाठी पायऱ्यांची योज
आहे. चौरस स्तंभ दोन कमलतवकांनी (lotus medallion) सुशोभित केल
आहेत. या दोन कमलतवकांमध्ये एक छोटा अष्टकोनी आणि षोडशकोनी
भाग आहेत. स्तंभांच्या वर चार साधे हस्त असून त्यांच्यावर तुळई आहे. तुळई
आतील बाजूस पद्मपत्रांची नक्षी कोरलेली आहे. या प्रत्येक स्तरावरील च
तुळया (lantern) एकमेकांना छेदतील असे छत असून एका चौरसात आण
एक चौरस दोन शिलास्तरांनी बनलेले आहेत. छताच्या आतील भागाला
चुन्याचे हात देऊन गिलावा करण्यात आला आहे. जतनाचे काम चालू अस
एक आमलक सापडला आहे. त्याकाळातील प्रचलित शैलीप्रमाणे छताच्या वर
बाजूस चार कोपऱ्यात चार लहान आमलक बसविले गेले असावेत आणि
सापडलेला आमलक या चार आमलकांपैकी एक असावा असा निष्कर्ष काढता येईल

**त्रिविक्रम मंदिर** : हे मंदिर सध्या भग्नावस्थेत आहे. केंद्र सरकार
भारतीय पुरातत्त्व सर्वेक्षणाने हे मंदिर "राष्ट्रीय संरक्षित स्मारक" म्हणून घो
केले आहे. या ठिकाणी माणसाच्या आकाराएवढी मोठी त्रिविक्रमाची मूर्ती आ
या मूर्तीमुळेच या मंदिराला त्रिविक्रम मंदिर हे नाव दिले गेले असावे. मंदिरा
अवशेषांची वास्तुवैशिष्ट्ये आणि काहीशा तुटलेल्या आणि झीज झालेल्या मूर्ती
शैली यावरून हे मंदिर वाकाटककालीन आहे असे निश्चितपणे म्हणता येई
या मंदिराचा पुढचा खुला मंडपच काय तो टिकून आहे. गर्भगृह पूर्णपणे प

गेले आहे. मंडप खुर, कुंभ आणि वेदिका असे तीन थर असलेल्या पीठावर असलेल्या स्तंभिकांनी बनला आहे. या स्तंभिकांवर मंडपाच्या तुळया आहेत. मंडपाच्या पुढच्या दोन कोपऱ्यात नेहमीचे वाकाटक शैलीचे स्तंभ आहेत. मात्र या स्तंभांवर कमलतवक (lotus medallion) मात्र दिसून येत नाही. तथापि दोन कमलतवकांच्या मधल्या भागात दिसणारे छोटे अष्टकोनी आणि षोडशकोनी भाग मात्र दिसून येतात. वेदिका आणि कक्षासनावर असलेल्या वामन-स्तंभांवरील अलंकरण मात्र उल्लेखनीय आहे. वेदिका खोलगट देवकोष्ठ आणि अर्धस्तंभांच्या पट्टाने अलंकृत करण्यात आली आहे. देवकोष्ठकांमध्ये गण दाखविले आहेत आणि अर्धस्तंभांवर फुलांची नक्षी आहे. वेदिकेवरील वामनस्तंभांचे तळखडे पूर्णकुंभांचे असून कुंभांच्या तळाजवळील प्रवेशभागात पुष्पहार दाखवला आहे. पूर्णकुंभावर खांब असून हे खांब अर्धकमलतवकांनी (half lotus medallion) अलंकृत केले आहेत. अष्टकोनी भागासह असलेले हे (अष्टाश्र) वामनस्तंभ स्तूपासभोवताली असलेल्या कठड्याच्या खांबांची आठवण करून देतात. या उलट रुचक स्तंभांवर असलेल्या तुळया मात्र बाहेरून मौक्तिकजालांनी (intertwined pearl festoons) आणि आतील बाजूस सिंहमुखांनी अलंकृत केलेल्या आहेत. छत सपाट म्हणजेच समतलवितान प्रकारचे आहे. त्याच्यावर लाकडासारखी पटई (wooden rafter) बनविण्यात आली आहेत.

**केवलनरसिंह मंदिर** : हे मंदिर सध्याच्या कालिदास स्मारकाच्या परिसरात असून या टेकडीवरील इतर सर्व प्राचीन मंदिराप्रमाणेच याही मंदिराचा भोसल्यांच्या काळात दुरुस्ती आणि जीर्णोध्दार करण्यात आला होता. जीर्णोध्दार करताना या मंदिरात बांधण्यात आलेले वाढीव घटक काढून टाकल्यानंतर मूळ वाकाटककालीन मंदिराचा तलविन्यास तर स्पष्ट झालाच पण त्याशिवाय मंडपाच्या आतील बाजूस दक्षिणेकडील भिंतीवरील १५ ओळींचा प्रभावतीगुप्ताचा प्रशस्ती लेखही सापडला. मंदिराच्या समतलवितानावर आढळणारी पुसट कमलतवके आणि त्याचप्रमाणे पावसाच्या पाण्याचा निचरा करणारे, आज वापरात नसलेले दगडी प्रणाल यावरून छताच्या खाली वाकाटककालीन मंदिर जसेच्यातसे शाबूत आहे असे म्हणता येईल. मूळ मंदिराच्या छप्परावर जीर्णोध्दार करताना ०.९१ मीटर उंचीचा चुनेगच्ची थर टाकण्यात आला आहे आणि मूळचे वाकाटककालीन शिखर आज अस्तित्वात नाही. हे मंदिर पश्चिमाभिमुख असून त्याच्या तलविन्यासात आतून समान रुंदी असलेल्या स्तंभांच्या आणि अर्धस्तंभांच्या प्रत्येकी एका जोडीने विभक्त केलेल्या गर्भगृह आणि मंडपाचा समावेश होतो. मंदिर जगतीवर बांधलेले असून मंदिरात जाण्यासाठी पायऱ्यांची व्यवस्था आहे. मंदिराचे प्रवेशद्वार

इंग्रजी "टी" अक्षराच्या आकारासारखे असून द्वारशाखांवर प्रत्येक बाजूस खालच्या बाजूस एक व त्याच्याच वर तीन अशी कोष्ठे आहेत. खालच्या बाजूस असलेल्या देवकोष्ठांमध्ये धनाच्या पिशव्या उलट्या करून नाणी ओतणारे गण दाखविले आहेत तर त्यांच्या वरील बाजूस असलेल्या एकूण सहा कोष्ठकांमध्ये निरनिराळ्या स्थितीत उभे असलेले गण दाखविले आहेत. खालच्या बाजूला असलेल्या कोष्ठातील गण वरच्या कोष्ठातील गणांपेक्षा आकाराने मोठे आहेत. गर्भगृहापेक्षा लक्षणीयपणे लहान असलेल्या मंडपाच्या तिन्ही बाजूस खालच्या द्वार पातळीवर वेदिकापट असून त्यात छोटी देवकोष्ठे आणि अर्धस्तंभ एकामागून एक येतात. या वेदिकेच्या वर एक आणि खाली एक असे पद्मपत्रपट्ट आहेत. गर्भगृहाच्या बाह्य भिंतीच्या मध्यावरही अशाच तऱ्हेची वेदिका आहे. हे अलंकरण त्रिविक्रम मंदिराच्या मंडपाच्या बाह्यांगावर आढळणाऱ्या अलंकरणाशी खूपच मिळतेजुळते आहे. अर्धस्तंभावर रत्नपट्टांची नक्षी असून त्यातील मोकळ्या जागेत फुलांची नक्षी आहे.

गर्भगृह आयताकार असून त्याच्या दोन बाजूस गवाक्षे आहेत. गवाक्षांवर स्तंभजालिका आहेत. गर्भगृहामध्ये मूर्तीभोवती प्रदक्षिणापथ आहे.

गर्भगृहाच्या मध्यभागी चार खांबाच्या किंवा चतुष्कीच्या मधली जागा व्यापणारा चौथरा आहे व त्यावर केवलनरसिंहाची मूर्ती आहे.

गर्भगृहाच्या पुढच्या बाजूस असलेल्या मंडपालाही असेच अंकण (म्हणजे आयताकृती चौथरा व त्यावर चतुष्की) असून त्यावर चतुष्कीचे चार स्तंभ आहेत. गर्भगृहं आणि मंडप दोन स्तंभ आणि दोन अर्धस्तंभ यांच्या ओळींनी विभक्त केलेले आहेत. गर्भगृह आणि मंडपात असलेल्या अंकणाच्या चतुष्कीचे स्तंभ चौरस आणि सपाट पृष्ठभागाचे असून ते बसॉल्टमध्ये (trap rock) आहेत तर गर्भगृहाला मंडपापासून स्वतंत्र करणारे स्तंभ वालुकाश्माचे (sand stone) आहेत. मंडपाच्या स्तंभांवर लसूनशीर्षे असून त्यावरील हस्तांवर तुळया आहेत. वरच्या भागाच्या दोन टोकांवर आडवे किंवा भूमिसमांतर मरकतमाणिक्यपट्ट आहेत. आतील स्तंभही तलविन्यासात चौरसाकृती आणि वरच्या भागातील तवकालंकरणाचा अपवाद वगळता साधे सपाट आहेत.

छतावरील कमी उठावात कोरलेली कमलतवके उल्लेखनीय आहेत. वालुकाश्माचे स्तंभ त्रिविक्रम मंदिरातील वामनस्तंभांप्रमाणेच अलंकृत आहेत. हे स्तंभ खांबावरील (shaft) किंवा स्तंभमध्यावरील आडव्या नाजुक नक्षीकामाच्या पट्टाने सजविले आहेत. या नक्षीकामात रत्नपट्टाचा समावेश होतो. रत्नपट्टाच्या खाली मौक्तिकजाल

आणि त्याच्याही खाली अर्धपुष्पकोषाच्या नागमोडी लाटा दाखविल्या आहेत. क्वचितप्रसंगी मधल्या भागात रत्नपट्टाऐवजी पुष्पपत्रे दाखवली आहेत. मधल्या भागात रत्न आणि गोलकांचा पट्ट आहे.

**रुद्रनरसिंह मंदिर :** रुद्रनरसिंह मंदिरही एका जगतीवर (१५.७० मीटर पूर्व-पश्चिम x १०.३० मीटर दक्षिणोत्तर) उभे असून त्यांची जास्तीतजास्त रुंदी ७.१० मीटर व लांबी ११.४० मीटर आहे. केवलनरसिंह मंदिराप्रमाणेच याही मंदिराला सांधार गर्भगृह आणि मंडप आहे. गर्भगृह आणि मंडप या दोहोंमध्ये मध्यभागी चतुष्की असून त्याखाली अंकण आहे. मंदिराच्या मूळ जमिनीच्या पातळीवर साठलेला मलबा काढून टाकल्यानंतर मंदिराचा तलविन्यास स्पष्ट झाला. त्याचप्रमाणे मंदिराच्या पडून गेलेल्या भिंतीवर (fallen walls) बांधण्यात आलेल्या सध्याच्या भिंती अत्यंत घाईगर्दीने उभारण्यात आल्या असून त्या बांधताना मंदिराच्या बाह्यरेषीशी सुसंगतता राखण्याची काळजीही घेतलेली दिसत नाही. या भिंती बहुधा मराठा-काळात उभारण्यात आल्या असाव्यात.

मलबा काढण्याचे काम चालू असताना एक जुने मकरप्रणालही सापडले आहे. सध्या केलेल्या जीर्णोध्दाराची बाह्यरेषा मंदिराच्या मूळ बाह्यरेषेशी काही अंशी मिळतीजुळती नसली तरी या मंदिराला अंगे प्रत्यंगे मिळून दहा पुढे आलेले भाग (projections) आणि आठ पाण्याची कुंडे असावीत असा निष्कर्ष काढता येतो. ही पाण्याची कुंडे जगतीच्या खालच्या पातळीवर आहेत. दहा पुढे आलेल्या भागांपैकी आठ भाग मंदिराच्या कोणांवर आहेत आणि दोन मध्यभागी आहेत. या पुढे आलेल्या भागाचे प्रयोजन काय होते आणि या भागांवर देवप्रतिमा होत्या की नाही हे आज निश्चितपणे सांगता येणार नाही. मात्र ती आठ कुंडे देवमूर्तीवरील अभिषेकजल साठविण्यासाठी असावीत असे वाटते. अशाप्रकारे रुद्रनरसिंह मंदिराच्या तलविन्यासाच्या बाह्यांगात विकास झालेला आढळतो. हा विकास बहुदा अनेक विधींच्या गरजा भागवण्यासाठी घडून आला असावा. मंडपात जाण्यासाठी असलेल्या द्वारावर नंतर बसविण्यात आलेले मध्ययुगीन द्वार काढून टाकल्यानंतर मूळचे साधे द्वार (हे द्वार केवलनरसिंह मंदिरातील द्वाराप्रमाणे इंग्रजी "टी" अक्षरासारखे नाही.) उघडकीस आले. या द्वारांच्या शाखांवर द्वारशाखांच्या तळाशी गणमूर्ती आहेत. पण केवलनरसिंह मंदिरातील गणांप्रमाणे धनाच्या पिशव्या ओतणारे नसून त्यांच्या हातात फक्त दंड आहे. या मंदिरातील मंडप (५.५५ मीटर दक्षिणोत्तर x ४.४० मीटर पूर्वपश्चिम ) आणि गर्भगृह ५.५५ मीटर दक्षिणोत्तर x ४.९० मीटर पूर्वपश्चिम) यांना विभक्त करणारे स्तंभ आणि

अर्धस्तंभ केवलनरसिंह मंदिराप्रमाणे लाल दगडात घडविलेले नाहीत. परिणामतः हे स्तंभ कमालीचे साधे सपाट आहेत.

या मंदिराच्या भिंती भोसला काळात नव्याने वांधण्यात आल्या असल्यामुळे केवलनरसिंह मंदिराप्रमाणे याही मंदिरात मंडपाच्या आणि गर्भगृहाच्या भिंतीच्या खालच्या भागात वेदिका आणि गर्भगृहाला दोन वाजूंनी खिडक्या होत्या किंवा नाही हे आज निश्चितपणे सांगता येणार नाही.

**भोगराम मंदिर :** भोगराम मंदिर वराह-मंडपाच्या समोर असून मंदिरात जाण्यासाठी पायऱ्यांची योजना आहे. मंदिराच्या धोपटून सपाट वनविलेल्या प्रांगणाभोवती असलेली भिंत आधुनिक काळात बांधलेली असली तरी पूर्वी त्याच जागी मूळ सीमाभिंत असावी असे मानण्यास जागा आहे. या मंदिराला दोन गर्भगृहे आहेत व ती मधल्या चिंचोळ्या जागेत विभक्त झाली आहेत. मात्र या दोन गर्भगृहांना एकच लंबचौकोनाकृती मंडप आहे. मंडपाच्या पुढे मुखमंडप असून तो एकूण सहा स्तंभांच्या ओळीने काही प्रमाणात पेलला गेला आहे. मुखमंडपातील स्तंभ साधे चौरस स्तंभ असून त्यांचे तळखडे चौकोनी ठोकळ्यासारखे आहेत. खांबांच्या वरच्या वाजूस अष्टकोनी भाग असून त्याच्यावर वाकाटक शैलीतील साधे हस्त आहेत. या स्तंभांवर तवके आढळत नाहीत हे येथे मुद्दाम नमूद केले पाहिजे. प्रत्येकी दोन स्तंभजाल वातायने असलेल्या या दोन गर्भगृहाच्या वाह्यांगावर सर्व वाजूंनी साध्या सपाट थरांच्यावर वेदिकापट्ट आहे. मंडपाच्या वाह्यांगावर त्रिविक्रम मंदिराच्या वाह्यांगावर आहे तशाच प्रकारचा अर्धस्तंभ आणि कोष्ठे आलटून पालटून आल्यामुळे वनलेला (गलपाद) पट्ट आहे. कोष्ठांमध्ये निरनिराळ्या स्थितीत उभे असलेले गण दाखविले आहेत तर अर्धस्तंभ रत्नपट्टांची किनार असलेल्या कल्पलतांनी अलंकृत केले आहेत. अशाच प्रकारचा पट्ट गर्भगृहाच्या वाह्यांगावरही आहे. एका गर्भगृहावरील अशा पट्टातील कोष्ठात अधोमुखी झेप घेणारी मगर दाखविली आहे. मुखमंडपात त्याच्या तिन्ही वाजूंनी प्रवेश करता येतो आणि त्याच्या मागील भिंतीतील दोन पुढे आलेल्या भागांमध्ये एक देवकोष्ठ असून सध्या ते रिकामे आहे. या मंदिराची दोन गर्भगृहे तलविन्यासासारखी भासली तरी त्यांच्या मोजमापात किंचित फरक आहे.

मंदिराच्या प्रवेशद्वाराजवळील छताच्या भागात असलेल्या कमलतवकावरून सध्या असलेले छत हे मूळचेच छत आहे असे अनुमान काढता येईल. गर्भगृहातील मूळ मूर्ती आज अस्तित्वात नाहीत. गर्भगृहाच्या मागील भिंतीला लागून असलेल्या

कट्ट्यावर आज यादव काळात घडविलेल्या मूर्ती आहेत. मंडपाच्या अंकणावर केवलनरसिंह आणि रुद्रनरसिंह मंदिराप्रमाणेच उंच कट्ट्यावर मूर्ती होत्या असे दिसते. आज त्या अस्तित्वात नाहीत.

रामटेकच्या टेकडीवरील शुष्कसांधी दगडी मंदिरे अनेक तऱ्हांनी आगळीवेगळी आहेत. पहिली महत्त्वाची गोष्ट म्हणजे महाराष्ट्रातील शुष्कसांधी मंदिरस्थापत्यतंत्राची प्राचीनता उत्तर भारतातील काही प्रांतांमध्ये इ. स. च्या सहाव्या शतकाइतकीच मागे जाते हे या मंदिरांनी सिध्द केले आहे. ही मंदिरे उजेडात येण्याआधी अंबरनाथ येथील इ. स. १०६० मधील अंबरनाथ मंदिरच महाराष्ट्रातील अशाप्रकारचे सर्वात प्राचीन मंदिर आहे अशी पुरातत्त्वज्ञांची धारणा होती.

दुसरी महत्त्वाची बाब म्हणजे अन्यत्र कुठेही, अगदी गुप्त राजाच्या मुलुखातही या मंदिराशी तुलना करता येईल अशी मंदिरे एकाच जागी इतक्या संख्येने बांधलेली आज तरी आढळत नाहीत. त्याचप्रमाणे या मंदिरातील शिल्पांची वैशिष्ट्यपूर्ण शैली आणि केवलनरसिंहमंदिरात सापडलेल्या प्रभावती गुप्ताचा प्रशस्तीचा शिलालेख यावरून ही मंदिरे इ. स. च्या पाचव्या शतकात बांधली गेली असे निःसंशयपणे सांगता येते.

तिसरी महत्त्वाची बाब म्हणजे येथील स्थपती मंदिराच्या तलविन्यासाची आखणी करण्याच्या बाबतीत खूपच सर्जनशील आणि कल्पक होते. त्यांनी या मंदिराची बांधणी करताना अगदी हेतुपुरःस्सरपणे दोन भिन्न प्रकारच्या दगडांचा वापर केला होता.

मूर्तिशास्त्रीय दृष्टिकोनातूनदेखील या मंदिरामध्ये महाराष्ट्रातील सर्वाधिक प्राचीन वैष्णव मूर्ती होत्या.

## विटांची मंदिरे

### कलचुरी कालीन

**तेर येथील उत्तरेश्वर मंदिर** (ता. जि. उस्मानाबाद) : तेर येथील उत्तरेश्वर मंदिर अनेक तऱ्हांनी लक्षणीय आणि महत्त्वपूर्ण आहे. हे मंदिर विटांनी बांधलेले असून त्याची दरवाजाची चौकट लाकडी आहे. सध्या ही चौकट तेरमधील रामलिंगअप्पा लामतुरे वस्तुसंग्रहालयात आहे.

हे मंदिर अत्यंत महत्त्वाचे आहे कारण, विटा आणि लाकडाचा वापर करून धार्मिक वास्तूंचे बांधकाम करण्याच्या तंत्राचे आणि मंदिरस्थापत्यपरंपरेचे सातत्य ते दाखविते. याच गावातील अत्यंत सुंदर असलेल्या त्रिविक्रम मंदिराचा

उल्लेख याआधीच केला आहे. गजपृष्ठाकार (apsidal) छपराची उभारणी करताना कॉर्बेलिंग (Corbelling) चे तंत्र अगदी परिपूर्ण विकसित झाले होते, हे विधान चापाकृत तलविन्यास असलेल्या त्रिविक्रम मंदिराच्या बाबतीत तर पूर्णतः खरे आहे. उत्तरेश्वर मंदिरात कॉर्बेलिंग (Corbelling) खूपच सोपे होते; कारण त्यांचे गर्भगृह चौरसाकृती असून त्यावर कूटशिखराकृती (pyramidal) द्राविड प्रकारचे शिखर होते. या दोन मंदिरातील आणखी एक साम्याचा मुद्दा म्हणजे कॉर्बेलिंग (corbelling) आणि ब्रेसिंग (bracing) करता लांब लाकडी तुळयांचा केलेला वापर होय.

या मंदिराचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे गर्भगृहाच्या प्रवेशमार्गाचे सौंदर्य वाढवणारी दरवाजाची लाकडी चौकट होय. द्वारशाखांवर रत्नांची, गोलकांची, व्यालांची (griffins) नक्षी असून; त्यावर उडते विद्याधरही दाखवले आहेत. ललाटावर ब्रह्मा, विष्णू, शिव आणि लकुलीशही दाखविला असून त्यांच्या सभोवताली वाद्ये वाजविणारे गण दाखविले आहेत.

नावाप्रमाणेच हे उत्तरेच्या ईश्वराचे म्हणजे शंकराचे मंदिर आहे. मंदिर पूर्वाभिमुख असून त्यात गर्भगृह आणि मंडपाचा समावेश होतो. त्रिविक्रम मंदिराप्रमाणेच याही मंदिराचा मंडप मोठ्या आकाराचा होता असे दिसते. आज जरी गर्भगृहात प्रत्यक्ष प्रवेश करण्याचे द्वार दगडी आणि मध्ययुगीन शैलीतील असले तरीही राज्य सरकारच्या पुरातत्त्व व वस्तुसंग्रहालय संचालनालयाने केलेल्या साफसफाईच्या कामाच्या वेळी उघड झालेल्या विटांच्या भिंतींवरून मंडप मुळात विटा आणि लाकूड यांचा वापर करूनच बांधण्यात आला असावा असे सिध्द होते.

मंदिराचे अधिष्ठान जरी मलव्याखाली झाकले गेले असले तरीही त्याचे काही थर दिसतात. या थरांवर गर्भगृहाची भिंत असून, या भिंतीवर ठराविक अंतरावर द्राविड शैलीचे सडपातळ स्तंभ आढळतात. या अशा स्तंभांच्या मधील जागेत चैत्यगवाक्षांची नक्षी असून त्यावरील कमानीच्या खालच्या भागात मकर दाखविले आहेत. या भिंतीच्या वर त्रिमितियुक्त दोन थरांचे छप्पर असून त्यावर स्तूपिकेसारखा चौरसाकृती वास्तुघटक आहे. पंचरथ प्रकारची बाह्यरेषा असलेल्या या गर्भगृहावर छपराच्या दोन थरात शालाशिखर व कूटशिखरसदृश वास्तूघटक आढळतात. तुलनेने कमी अलंकृत असलेल्या स्तूपिकेची बाह्यरेषा त्रिरथ प्रकारची असून तिचा वरचा भाग त्रिमितियुक्त आहे. ही स्तूपिका प्रत्येक बाजूची अंगे अगदी वरपर्यंत नेते. गर्भगृहाच्या बाह्यांगावर दिसून येणारी वास्तुवैशिष्ट्ये, चोल काळातील नंतरच्या द्राविडशैलीत कूटशिखरे आणि शालाशिखरे यांच्या तळाशी आढळतात.

त्या व्याल-घटकांच्या ऐवजी मकर-घटकांचा केलेला वापर, मध्यभागी चैत्यगवाक्ष असलेल्या स्तूपिकेची वैशिष्ट्यपूर्ण रचना आणि त्याचप्रमाणे दरवाजाच्या लाकडी चौकटीवरील शिल्पांची शैली यावरून हे मंदिर इ. स. ५५० च्या सुमारास बांधले गेले असावे असे वाटते. त्रिविक्रम मंदिराच्या विटांच्या आकाराच्या (१७ सें. मी. x १९ सें. मी. x ८ सें. मी. ) तुलनेत लहान झालेल्या या मंदिरातील विटांचा आकारही (१६ सें.मी. x १९ सें. मी. x २.२५ सें. मी.) या मतास पुष्टी देतो.

## राष्ट्रकूट आणि उत्तर कलचुरीकालीन मंदिरे

वाकाटकांच्या लयानंतरच्या काळात एक प्रकारची राजकीय पोकळी प्रत्ययास येते. त्या काळात महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागात वेगवेगळ्या वंशातील राजे राज्य करीत होते. अशा राजवंशांपैकी काही घराणी म्हणजे त्रैकूटक, मौर्य आणि कलचुरी ही होत. कलचुरींचा आणि विशेषतः सरुवातीच्या राष्ट्रकूट घराण्यातील राजांचा, महाराष्ट्राच्या बहुतांशी भूभागावर अंमल होता असा विद्वानांचा होरा आहे; आणि तो खराही आहे. कलचुरींचा पाडाव करूनच बदामीचे चालुक्य प्रबळ बनले असे मानायला आधार आहे. त्यामुळे प्रा. मिराशी आणि काही विद्वानांना दुसऱ्या पुलकेशीच्या महाराष्ट्रातील साम्राज्यविस्तारापूर्वी "कलचुरी काळ" असे काहीतरी प्रकरण असावे असे वाटते. आणि म्हणून हे विद्वान जोगेश्वरी, मंडपेश्वर आणि घारापुरीच्या लेण्यांचे त्याचप्रमाणे तेर येथील उत्तरेश्वर मंदिराचे कर्ते कलचुरीच होते असे मानतात. पण हे अगदी ढोबळ किंवा सर्वसाधारण सत्यच असू शकेल. त्रैकूटक किंवा मौर्य यांसारख्या छोट्या स्थानिक राजांनीही या कामास अर्थसहाय्य करून आश्रय दिला असण्याची शक्यता आहे. ही तीन लेणी आणि तेर येथील उत्तरेश्वर मंदिर यांचे कर्तृत्व कोणत्याही राजघराण्याला बहाल करण्यापूर्वी या सर्व शक्यतांचा विचार होणे आवश्यक आहे.

१९६० च्या सुमारास विद्वानांचे असे ठाम मत बनत गेले की, महाराष्ट्रात राष्ट्रकूटांचे स्थानही तितकेच महत्त्वाचे होते. राष्ट्रकूटांची एक शाखा विदर्भावर तर दुसरी शाखा वेरूळ परिसरात निश्चितपणे राज्य करीत होती. आणखी एक शाखा दक्षिण महाराष्ट्रात राज्य करीत होती; आणि सातारा जिल्ह्यातील माण हे तिच्या राजधानीचे ठिकाण होते. महाराष्ट्रात चालुक्यांचा अंमल पूर्णपणे प्रस्थापित होण्याआधी राष्ट्रकूटांच्या या तीन शाखांचेच महाराष्ट्रावर बऱ्यापैकी अधिपत्य होते. अगदी चालुक्यांचे सार्वभौमत्व प्रस्थापित झाल्यानंतरही वरूळ येथे राष्ट्रकूटांची एक शाखा चालुक्यांचे मांडलिकत्व पत्करून टिकून होती. खुद्द चालुक्यांच्या थेट आश्रयाखाली निर्माण झालेल्या विटांच्या अथवा प्रस्तराच्या स्थापत्याचे अवशेष

महाराष्ट्रात आढळून येत नाहीत. राष्ट्रकूटांच्या बाबतीत मात्र असे म्हणता येण
नाही. राष्ट्रकूटांची किंवा राष्ट्रकूटांच्या आश्रयाखाली बांधण्यात आलेली आ
असे म्हणता येईल अशी काही विटांची आणि काही प्रस्तरांची मंदिरे आहे
चंद्रपूर जिल्ह्यातील भांदक किंवा सध्याचे भद्रावती येथे शैलीच्या दृष्टिकोना
राष्ट्रकूटकालीन म्हणता येतील अशा अनेक मंदिरांचे अवशेष सापडले आहे
त्याचप्रमाणे विदर्भ भागात आणखी दोन प्रस्तरमंदिरेही आहेत. त्यापैकी ए
मंदिर रामटेक येथे असून दुसरे वाकेश्वर येथे आहे. (ही दोन्ही ठिकाणे नाग
जिल्ह्यातच आहेत.) तेर येथे राष्ट्रकूट काळातील एक विटांचे मंदिर आहे. वि
भागात आणखीही अशी मंदिरे आढळली आहेत की, ज्यांचे श्रेय शैलीच्या दृष्टिकोना
राष्ट्रकूटांचे समकालीन आणि त्यांच्याशी मैत्रीपूर्ण संबंध असलेल्या राजघराण्या
जाते. हे राजघराणे म्हणजे मध्यप्रदेशातील नंतरचे कलचुरी घराणे (उत्तरकलचु
होय. त्यांच्या स्थापत्यकलेचा नमुना म्हणजे चंद्रपूर जिल्ह्यातील भटाळ्याजवळ
शैव मंदिरं आणि वैनगंगा नदीच्या तीरावरील मार्कंडी मंदिरे होत.

**तेर येथील काळेश्वर मंदिर :** संत गोरोबांच्या समाधीच्या परिसर
अंतरालविरहित आणि मंडपाने युक्त असे विटांचे मंदिर आहे. मंदिरा
बाह्यांगावर सर्व बाजूंनी मध्ययुगीन काळात बांधलेल्या आधारभिंती (butte
walls) आहेत. कमानयुक्त मंडपाचा दरवाजाही मूळचा नसून नंतरच्या काळ
बसवलेला आहे. पण गर्भगृहावरील शिखराचा भाग आणि अंतर्भागातील कॉर्बेल
मंदिराच्या प्राचीनत्वाची साक्ष देतात. मंडोवरावर सलग आधारभिंती दि
असल्याने मूळ मंदिराचे बाह्यांग कसे होते हे आज सांगता येत नाही. छ
चौरस, निमुळते होत जाणारे असून त्यावर चौरस तलविन्यासाची स्तूपिका अ
स्तूपिकेवरील शंक्वाकृती भाग आधुनिक काळात बसविण्यात आला आहे. उत्तरे
येथील मंदिराप्रमाणेच या मंदिराच्या शिखरावरही शालाशिखरे व कूटशिखरे य
युक्त असलेले मजले (तल) आहेत. त्याचप्रमाणे शिखराच्या तळाजवळ मकरप्रयोज
आहेत. या उत्तरेश्वर मंदिराशी साम्य असलेल्या इतर वास्तुघटकांबरोबरच कैल
लेण्यात (वेरूळ येथील क्रमांक १६ चे लेणे) आढळते तसे शुकनासही आहे.
मंदिराच्या शिखरावरील कूटशिखरे आणि शालाशिखरे उत्तरेश्वर मंदिराच्या शिखराव
कूटशिखरे आणि शालाशिखरांपेक्षा अधिक विकसित आहेत. या मंदिरा
विटांचा आकार उत्तरेश्वर मंदिराच्या विटांइतकाच आहे.

**रामटेक येथील देवी मंदिर :** रामटेक येथील जैनमंदिर संकुलासमोर हे मं
आहे. या मंदिराच्या अंतर्भागाचा जीर्णोध्दार झाला आहे. केवळ गर्भस्व
असलेल्या या मंदिराला मध्ययुगीन काळात मंडप बांधण्यात आला. या सा

आणि छोट्या मंदिराला त्याच्या शिखरामुळे महत्त्व प्राप्त झाले आहे. मंदिराच्या वर आयताकृती शालाशिखर आहे. मंदिराच्या बाह्यांगावर कोणतेही अलंकरण नाही. भिंतीच्या वर आणि शालाशिखराच्या खाली थरयुक्त चौरस निमुळते छप्पर आहे. यावरून वास्तुशास्त्रात ज्याचा वलभीप्रासाद म्हणून उल्लेख होतो; त्या प्रकारात मोडणारे हे मंदिर असावे.

**वाकेश्वर मंदिर** (ता. मोहाडी, जि. भंडारा) : वाकेश्वर गावालाही या मंदिरावरूनच नाव देण्यात आले आहे. मंदिर मध्यम आकाराचे असून त्यात गर्भगृह व मंडपाचा समावेश होतो. मंडपात जाण्यासाठी पायऱ्यांची योजना आहे. मंदिराचा आकार ५.३० मीटर पूर्व-पश्चिम x ३.३५ मीटर दक्षिणोत्तर आहे. गर्भगृह आणि मंडप या दोघांचेही छप्पर आजमितीस शिल्लक नाही. काही पायऱ्या चढून गेल्यानंतर मंडपात जाता येते. हा मंडप पुढील दोन अर्धस्तंभ आणि मागील दोन चतुर्थक स्तंभांवर (quarter pillars) उभा आहे. या अदमासे चौरसाकृती मंडपाच्या (२.३० मीटर x २.२० मीटर) दक्षिण आणि उत्तर बाजूकडील भिंतींमध्ये प्रत्येकी एक देवकोष्ठ असून मागील बाजूस गर्भगृहाचे प्रवेशद्वार आहे. एरवी या साध्या असणाऱ्या दरवाज्याला द्वारशाखांमध्ये दिसेल अशी स्तंभशाखा आहे. ललाटावरील उत्तरांगावर रथिका दाखविल्या आहेत; त्यापैकी तीन शिखरांच्या खाली आमलक आहे. गर्भगृह चौरस असून (२.३० मीटर x २.३० मीटर) त्याच्या जमिनीची पातळी मंडपाच्या जमिनीच्या पातळीपेक्षा किंचित खाली आहे. इतर अनेक शैव मंदिरांप्रमाणे याही मंदिराला पूजेकरता लागणारी भांडी ठेवण्यासाठी डावीकडील भिंतीत पुढे आलेला भाग आहे. स्तंभांची उंची अदमासे २.३६ मीटर असून ते साधारणपणे भटाळा येथील शिवमंदिराच्या स्तंभासारखेच आहेत. या स्तंभांचा तळखडा चौरस असून खांबही चौरस आहेत, वरच्या बाजूस अष्टकोनी पट्ट असून त्यावर कुंभ आणि कलश आहेत. त्यावर साधे हस्त आहेत. आजमितीस या मंदिरात कोणतीही शिल्पाकृती आढळून येत नाही. अंशतः अलंकृत प्रवेशमार्ग आणि स्तंभ यावरून हे मंदिर दहाव्या शतकातील कलचुरी शैलीचे आहे असे म्हणता येईल.

**भटाळा येथील शिवमंदिर** (ता. वरोरा, जि. चंद्रपूर) : या तालुक्याच्या गावापासून १२ कि. मी. अंतरावर भटाळा हे गाव आहे. या गावात बऱ्यापैकी मोठ्या आकाराचे शिव मंदिर आहे. सध्या हे मंदिर फक्त अंतराल (७.३५ मीटर x ३.४५ मीटर ) आणि गर्भगृहाच्या (६ मीटर x ६ मीटर) स्वरूपात अवशिष्ट आहे. या मंदिराची प्रमाणे, विशेषतः उंचीच्या संदर्भातील प्रमाणे, असामान्यपणे मोठी आहेत. मंदिराची अगोदरच असलेली असामान्य उंची अंतराळावर आणि गर्भगृहावर आणखी एक मजला बांधल्यामुळे विशेषत्वाने

डोळ्यात भरते. या वरच्या मजल्यांचा पूजाविधींच्या दृष्टीने काहीही उपय
नसल्यामुळे वरच्या मजल्यांची योजना केवळ स्थापत्याच्या दृष्टिकोनातूनच करण्
आली होती असे म्हणता येईल. मंदिराच्या बाह्यांगावर, मंडोवर भागात ही उ
एकावर एक अशा तीन जंघाभागांनी प्रतिबिंबित झाली आहे.

गर्भगृहाचा तलविन्यास गर्भगृहाच्या देखाव्याइतकाच साधा आहे. तलविन्
पंचरथ असून त्याच्या तिन्ही बाजूंच्या भद्रांवर रथिका आहेत. दक्षिणेकड
रथिकेमध्ये कार्तिकेय, पश्चिमेकडील रथिकेमध्ये वृषांतिक शिव आणि उत्तरेकड
रथिकेमध्ये चामुंडा आहे. बऱ्यापैकी लांबलचक असलेल्या अंतराळाला (७.
मीटर लांब) भारदस्त स्तंभ आहेत. सुरुवातीच्या राष्ट्रकूटकालीन मंदिरां
स्तंभांच्या तुलनेत हे स्तंभ अधिक जवळजवळ आहेत. या मंदिराचे आणखी
उल्लेखनीय वैशिष्ट्य म्हणजे गर्भगृहामध्ये चार चौरस स्तंभांवर (०.७५ मीट
चौरस) उभा असलेला मंडप. त्यावर प्रत्येक स्तरावरील चार तुळया एकमेव
छेदतील अशा प्रकारचे छत आहे. स्तंभावर नक्षीकामाचा अथवा शिल्पाकृत
अभावच असून चौरस तळखडा, कलशाने अलंकृत केलेला खांब आणि साधे
असे त्यांचे स्वरूप आहे. दुसऱ्या प्रकारच्या स्तंभांना कुंभाकृती तळखडा अ
खांब चौरस आहेत, खांबाच्या वर कलश असून त्यावर चार हस्त आ
मध्यभागी आडव्या पट्टात दोन कमलतबके आहेत. अंतराळाच्या मुखाजवळ
स्तंभ अधिक विकसित असून त्यांच्या मध्यभागी आडव्या पट्टातील कमलतबक
चैत्यगवाक्षाचे स्वरूप येते. अशा दोन पट्टांमध्ये पूर्णकलश येतात. तौलनिकदृष
दरवाजा अगदीच साधा आहे. द्वार पंचशाख पध्दतीचे असून मध्ये स्तंभश
आहे. उत्तरांगावर पाच शिखरे दाखविली असून त्यातील तीन शिखरे नागर प्रकारची
एक सोडून एक असलेली उरलेली दोन शिखरे द्राविड पध्दतीची आहेत.

दुर्दैवाने गर्भगृहावरील शिखर आणि अंतराळावरील छत संपूर्णपणे अस्तित्
नाही. तथापि गर्भगृहावर चार कोपऱ्यात आणि चार कोपऱ्यांच्या मध्यभागी
छोटी शिखरे आहेत त्यावरून या विमानावर पूर्वी नागर शिखर असावे
अंदाज बांधता येतो. स्तंभावरील घटक, त्रिजंघ मंडोवर, छोट्या शिख
बाह्यरेषा आणि रथिकांमधील मूर्तींची शैली यावरून हे मंदिर दहाव्या शतक
उत्तरार्धात बांधले गेले असावे असे दिसते.

या मंदिराच्या परिसरात भूपृष्ठावर सुट्या शिल्पांच्या स्वरूपात विखुरलेले
अवशेष आढळले आहेत. आणखी काही अवशेष याच आवारालगत असल
शाळेच्या पायाजवळ खोदकाम चालू असताना सापडले. या अवशेषांमधील

उल्लेखनीय अवशेष म्हणजे लाल वालुकाश्मात घडवलेले तोरण. या तोरणावर गजाभिषिक्त लक्ष्मीची मूर्ती कोरली आहे. या मंदिराचे स्तंभ आणि शाळेचा पाया खोदताना सापडलेली लक्ष्मीची मूर्ती या बाबींचे राष्ट्रकूट कलेच्या पुरावशेषांशी खूपच साधर्म्य आहे. हे पुरावेही आपण अनुमानित केलेल्या काळावर शिक्कामोर्तब करतात. तथापि मंदिराचे सर्वसाधारण स्थापत्य त्यावरील लतिन नागर प्रकारचे शिखर आणि शिल्पांची एकंदरित शैली ही मध्यप्रदेशातील प्रारंभीच्या मध्ययुगीन कलेशी अधिक मिळतीजुळती आहे.

वाकाटकांपासून ते कलचुरी आणि राष्ट्रकूटकाळापर्यंतच्या विटांच्या आणि शुष्कसांधी प्रस्तर मंदिराच्या वरील आढाव्यावरून असे लक्षात येते की, बांधीव-मंदिर-स्थापत्याची सुरुवात कितीही अल्प प्रमाणात दिसत असली, आणि इसवी सनाच्या दहाव्या शतकापर्यंत त्याचे सातत्य कितीही किरकोळ प्रमाणात दिसत असले तरीही आता आपल्याला महाराष्ट्रात बांधीव मंदिर स्थापत्याला इसवी सनाच्या अकराव्या शतकात सुरुवात झाली असा २५ वर्षांपूर्वीचा दृष्टिकोन स्वीकारता येणार नाही. ह्या प्रारंभीच्या शुष्कसांधी बांधीव स्थापत्याला भौगोलिक मर्यादा आहेत. हे स्थापत्य फक्त पूर्व विदर्भातच आढळते, आणि म्हणूनच ही २५ वर्षांपूर्वीची भूमिका किंवा मतप्रवाह काही अपवाद वगळता आणि काही फेरफार करून का होईना काही अंशी सकृतदर्शनी तरी खरा वाटतो. ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकापासून ते इसवी सनाच्या दहाव्या शतकापर्यंतच्या बहुसंख्य वास्तूंचे स्वरूप लयनस्थापत्य असे आहे; बांधीव स्थापत्य असे नाही. या संदर्भात इसवी सनाच्या अकराव्या शतकाच्या उत्तरार्धापासून ते इसवी सनाच्या चौदाव्या शतकाच्या सुरुवातीपर्यंत संपूर्ण महाराष्ट्रभर मोठ्या प्रमाणात उभारल्या गेलेल्या बांधीव मंदिरांचा आणि या काळातील बांधीव मंदिर स्थापत्याचा अभ्यास केलेल्या विद्वानांच्या मताचा आढावा घेणे आवश्यक आहे.

## हेमाडपंती शैली

वास्तविक शुष्कसांधी मंदिरे भारतात सर्वत्र आढळतात. इतर प्रांतातील अशा प्रकारच्या मंदिरांप्रमाणेच महाराष्ट्रातही ह्या मंदिरांची कोणत्यातरी आख्यायिकेतील व्यक्तींशी सांगड घातली गेल्याचे आढळते. अशी सांगड घातली गेलेली व्यक्ती एकतर स्थपती तरी असते किंवा मंदिरबांधणीचा आर्थिक भार उचलणारी आश्रयदात्री तरी असते. कर्नाटकात अशा प्रकारच्या मंदिरांची सांगड जक्कणाचार्यांशी घातली जाते. महाराष्ट्रात अशा मंदिरांना "हेमाडपंती" संबोधण्यात येते. तर बहुतांशी भारतात पसरलेल्या स्थापत्य परंपरेची सांगड कोक्कसाशी घालण्यात येते. हेमाडपंती

हे विशेषण बऱ्याचदा या मंदिरांचे मध्ययुगीन मंदिरांपासून असलेले वेगळे
स्पष्ट करण्यासाठी वापरण्यात येते. बहुतेकदा सज्जापर्यंत दगडी आणि सज्ज
वर विटांचे बांधकाम असलेल्या मराठाकालीन मंदिरांपासून या मंदिराचे वेगळे
स्पष्ट करण्यासाठी त्यांना हेमाडपंती संबोधण्यात येते. या मंदिरांच्या गर्भगृहाव
केवळ शिखरच मराठा मंदिरापेक्षा वेगळे असते असे नाही तर मराठाका
मंदिरांवर नंतर चुन्याचे नक्षीकाम (stuco work) होत असल्यामुळे त्यांच्या दिसण्या
वेगळेपण असते. म्हणूनच सर्वसामान्य मराठी माणूस जेव्हा एखाद्या मंदिर
हेमाडपंती म्हणतो तेव्हा त्याच्या मनात मंदिर ज्या कच्च्यामालापासून बनविले
ते बांधकामसाहित्य, मंदिराची प्राचीनता यासह मध्ययुगीन मंदिरांपासून वेगळे
दाखविणारी अनेकविध वैशिष्ट्ये असतात. हेमाडपंत किंवा हेमाद्री महारा
चांगलाच प्रख्यात होता. त्याच्याशी निगडित असलेल्या अनेक दंतकथा आ
तो तेराव्या शतकात यादवांचा मुख्य प्रधान होता. त्याची कारकीर्द चांग
प्रदीर्घ असून तीन यादवराजांची सेवा करण्याचे भाग्य त्याला लाभले होते.
प्रकांडपंडित होता आणि त्याने "चतुर्वर्ग चिंतामणी" नामक ग्रंथाची निर्मिती
आहे. या ग्रंथात त्या काळातील निरनिराळ्या धार्मिक विधींचे संकलन करण
आले आहे. हा ग्रंथ तत्कालिन प्रबुध्द हिंदूंचा एकप्रकारे मार्गदर्शक अ
संदर्भग्रंथ होता. आख्यायिका लक्षात घेतल्यास हेमाद्री सुधारणावादी व पौरा
धर्माचा खंदा पुरस्कर्ता असावा असे दिसते. मंदिरे ही अशा प्रकारच्या धा
विधींची आणि कार्यांची केंद्रस्थाने असल्यामुळे यादव, शिलाहार आणि चाल
राजांच्या काळात लोकप्रिय बनलेल्या या प्रकारच्या प्रस्तर मंदिरांना त्याच्या नावाव
ओळखण्यात येऊ लागले. शिलालेखांचा पुरावा अभ्यासला तर अशा प्रका
मंदिरे ११ व्या शतकाच्या उत्तरार्धापासूनच बांधण्यात येत होती असे दिसते.
हेमाद्री किंवा हेमाडपंत मात्र १३ व्या शतकातला आहे. अर्थातच ११ व्या अ
१२ व्या शतकातील अशा प्रकारच्या शुष्कसांधी प्रस्तरमंदिरांना हेमाडपंती संबो
उचित ठरणार नाही. नेमक्या याच कारणामुळे हेन्री कझिन्सने त्या
**मिडीवल टेंपल्स ऑफ दि डेक्कन** या ग्रंथात मध्ययुगातील ठराविक काळात
मंदिरांनाच (१३व्या व १४व्या शतकातील मंदिरांना ) हेमाडपंती संबो
आहे आणि ११ ते १४ व्या शतकातील सर्वसाधारण मंदिरांचा उल्लेख त
नागर, स्थानिक नागर, किंवा (तथाकथित) इंडो-आर्यन आणि उत्तरभार
मंदिरे असा केला आहे. भारताची स्वाभाविक भौगोलिक विभागणी, उ

भारतात आणि अगदी दक्षिण भारतात आढळून येणारे नागर आणि द्राविड हे मंदिर स्थापत्यप्रकार आणि मंदिराचे शिखरप्रकार यांमध्ये कझिन्सने वापरलेल्या विचित्र प्रकारनामांचा उगम आहे. थोडक्यात कझिन्सला असे दाखवून द्यायचे होते की, महाराष्ट्रात आढळणारी ही मध्ययुगीन मंदिरे उत्तर कर्नाटक, आंध्र प्रदेश, केरळ आणि तामिळनाडूमध्ये आढळणाऱ्या मंदिरांपेक्षा वेगळी आहेत. महाराष्ट्राने ११ व्या शतकापासून अचानकपणे अंगिकारलेला शुष्कसांधी प्रस्तरमंदिरांचा हा स्थापत्यप्रकार गुजरात, माळवा, मध्यभारत, उत्तर प्रदेश आणि ओरिसा येथे आढळणाऱ्या मंदिरांशी, म्हणजेच उत्तर भारतातील स्थानिक मंदिर स्थापत्याशी, नागर शैलीशी, अधिक मिळताजुळता आहे हा मुद्दाही त्याने आग्रहाने मांडला.

पुणे, नाशिक आणि अहमदनगर जिल्ह्यातील, त्याचप्रमाणे खानदेश, विदर्भ आणि मराठवाडा भागातील निझामाच्या संस्थानातील व दक्षिण महाराष्ट्रातील त्यावेळच्या संस्थानातील मध्ययुगीन मंदिर स्थापत्याचा हेन्री कझिन्स हा पहिला अभ्यासक. त्यानंतर डॉ. ए. व्ही. नाईक यांनी १९३० ते १९४० च्या काळात दख्खनमधील अगदी चौथ्या शतकापासून ते १४ व्या शतकापर्यंतच्या सर्व स्थापत्यप्रकारांचा आणि या कालखंडातील (कझिन्सप्रणीत मध्ययुगीन कालखंडातील) स्थापत्य प्रकारांचा विस्तृत आढावा घेतला. ए. व्ही. नाईक यांनी महाराष्ट्रातील मंदिर स्थापत्य आणि शिल्प यांचा स्वतंत्र अभ्यास केला. त्याविपयी डॉ. गो. ब. देगलूरकर त्याचप्रमाणे मराठवाड्यातील मंदिर स्थापत्याचे अभ्यासक डॉ. प्रभाकर देव यांनीही मंदिराचे वर्णन आणि वर्गीकरण करताना "दख्खन प्रकारची नागर शैली" असाच संज्ञाप्रकार वापरला आहे. महाराष्ट्रातील मंदिर स्थापत्यशैलीला अशारितीने "दख्खन प्रकारची नागर शैली " असे संबोधले आहे. अशा प्रकारे, या शतकाच्या पन्नाशीपर्यंत तरी पाश्चिमात्य आणि पौर्वात्य विद्वानांची धारणा [७४] ही अशीच होती.

आनंद कुमारस्वामी, आर. के. आचार्य आणि स्टेला क्रॅमरिश यांनी केलेल्या पायाभूत संशोधनामुळे आणि नंतरच्या काळातील डॉ. कृष्णदेव आणि मधुसूदन ढाकी यांनी केलेल्या अभ्यासामुळे भारतीय स्थापत्यशास्त्राबाबत एक नवीन दृष्टिकोन तयार झाला आहे. त्यामुळे स्थापत्य, शिल्प आणि मूर्तीचे संदर्भग्रंथ, किंवा तत्कालिन स्थपतींकरता असलेले मार्गदर्शक ग्रंथ असे स्वरूप असलेल्या शिल्पसंहितांच्या दृष्टिकोनातून प्राचीन भारतीय वास्तुशास्त्र समजून घेण्याला अनन्यसाधारण महत्त्व प्राप्त झाले. भारतातील स्थापत्य नमुन्यांचे वर्णन ग्रीक

किंवा रोमन परिभाषेत करण्याऐवजी पारंपरिक भारतीय वास्तुशास्त्राच्या परिभाषेचा आधार घेऊन संपूर्ण वास्तूचे आणि वास्तुघटकांचे महत्त्व आणि कार्य समजून घेण्याची आवश्यकता भासू लागली. या अभ्यासामुळे उत्तर आणि दक्षिण भारतातील निरनिराळया प्रांतांत अवलंबण्यात आलेल्या स्थापत्यपरंपरा किंवा स्थापत्यविद्याकुले या विद्याकुलांचे एकमेकांवर पडलेले प्रभाव आणि ऐतिहासिक दृष्टिकोनातून त्यांचा झालेला विकास इत्यादी बावी उजेडात आल्या. या विद्वानांनी केलेल्या अभ्यासामुळे आणि तत्कालीन स्थपतींनीही ज्यांचा अभ्यास केला होता आणि ज्यांत अशा वास्तुशास्त्रविषयक वावींचा उल्लेख आहे अशा सर्व उपलब्ध पारंपरिक वाङ्मयाच्या सहाय्याने नागर, द्राविड, भूमिज, वेसर, कलिंग हे मंदिरस्थापत्यप्रकार आणि त्यांचे उपप्रकार कळू शकले.

स्वातंत्र्योत्तर काळात महाराष्ट्रातील मंदिर स्थापत्यावर लिखाण करणाऱ्या सर्व विद्वानांनी जुन्याच परिभाषेचा आणि वर्गीकरणाचा आणि त्यातील रुढ वर्गनामांचाच वापर केलेला आढळतो. मात्र पी. के. आचार्य यांचे शिष्य श्री. के. व्ही. सौंदरराजन हे मात्र याला अपवाद आहेत. त्यांनी या रुढ वर्णनांपासून फारकत घेऊन पारंपरिक वास्तुशास्त्रीय परिभाषेचा वापर करून महाराष्ट्रातील वांधीव मंदिरांच्या प्रादेशिक शैलीला अगदी योग्यपणे "भूमिज" असे संवोधिले आहे. महाराष्ट्रातील मंदिरांचे "दख्खन प्रकारची नागर शैली" असे केलेले वर्णन नुसते चुकीचेच नाही तर दिशाभूल करणारेही आहे. श्री. सौंदरराजन यांनी या क्षेत्रात टाकलेली आणखी एक बहुमोल भर म्हणजे महाराष्ट्रातील स्थापत्यावर दक्षिण गुजरात, मध्यप्रदेश आणि उत्तर कर्नाटक या प्रांतांमधून आलेल्या सांस्कृतिक उर्मींचे प्रभाव पडले आहेत हे त्यांचे निरीक्षण.[७५] श्री. सौंदरराजन् यांनी **आर्ट ऑफ साउथ इंडिया** या मालिकेतील त्यांच्या दख्खनवरील ग्रंथात यादव साम्राज्याच्या भौगोलिक सीमांतर्गत भागातील मंदिरस्थापत्यांवर कलात्मक प्रभाव टाकणारे प्रदेश कुठले हे स्पष्ट केले आहे. ज्या कलेचा प्रभाव ज्या प्रदेशावर पडला आहे त्या प्रदेशाला त्या कलेचे किंवा शैलीचे नाव देऊन हे प्रदेश खालीलप्रमाणे विशद करता येतील. वायव्य महाराष्ट्रावर ज्यांचा प्रभाव पडला आहे तो महागुर्जर कलेचा प्रदेश, पूर्व महाराष्ट्रात चंदेल्ल कलाप्रदेश, आग्नेय महाराष्ट्रात काकतीय कलाप्रदेश, दक्षिण महाराष्ट्रात उत्तरचालुक्य कलाप्रदेश आणि पश्चिम आणि मध्य महाराष्ट्रात भूमिज. याच ग्रंथात क्रमांक ३ च्या नकाशात दर्शविलेले हे प्रदेश किंवा या प्रदेशांच्या

सीमारेषा विशिष्ट कलाप्रभाव असलेल्या प्रदेशांच्या ढोवळ बाह्यरेषा आहेत. त्यात केवळ निश्चित प्रकारचीच कला आढळेल अशी ठाम भूमिका घेता येईल अंशा त्या "सरहद्दी" नाहीत; किंवहुना या सीमारेषा काही ठिकाणी एकमेकांना छेदूनही जातात. सौंदरराजन यांच्या निरीक्षणाच्या संदर्भात आणखी एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे ती म्हणजे हे प्रभाव कधीकधी राजकीय वर्चस्वातून येत ही बाब खरी असली तरीही शैलीचे प्रभावप्रदेश, विस्तारित होणाऱ्या किंवा ऱ्हास पावणाऱ्या राजकीय आश्रयानुसार बदलत नाहीत; आणि नव्हते. म्हणूनच ११वे शतक ते १४वे शतक या काळात महाराष्ट्रात रुजलेल्या आणि विकसित झालेल्या शैलींचे अधिक चांगल्या तऱ्हेने आकलन करून घेऊन आणि आणखी मोठ्या प्रमाणात सर्वेक्षण करून या नकाशात दाखवलेल्या सीमारेषांची पुनर्रचना करणे आवश्यक आहे.

या सर्व बावी लक्षात घेता इ. स. ११वे शतक ते इ. स. १४ व्या शतकापर्यंतची कलेतिहासाची साधने विशद करण्याचा ढाचाही बदलणे आवश्यक आहे. म्हणून मंदिरांची वर्णने प्रांतपरत्वे वा कालानुक्रमानुसार करण्याऐवजी येथे निराळया पध्दतीचा अंगिकार करण्यात येणार आहे. एखादे मंदिर भूमिज, वेसर, नागर किंवा द्राविड यापैकी कोणत्या प्रकारात मोडते हे ठरविण्याचा शिखर हा एकमेव महत्त्वपूर्ण आणि निर्णायक वास्तुघटक असतो आणि या प्रकारावरूनच निरनिराळे कलाप्रभाव ओळखणे सोपे जाते. पण सद्यःस्थितीत ज्यांचे शिखर शावूत आहे अशी फारच थोडी मंदिरे शिल्लक आहेत. ज्यांची शिखरे शिल्लक आहेत अशा मंदिरांचे विवेचन प्रथम करण्यात आलेले आहे. एकाच प्रकारच्या शैलीचे शिखर असणाऱ्या मंदिरांचे गट करण्यात आले असून प्रत्येक गटाच्या विवेचनात मंदिराचा क्रम शक्यतो कालानुक्रमानुसार ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. त्यानुसार प्रथम नांगर, वेसर, भूमिज आणि फांसना शिखरे असलेल्या मंदिरांचे विवेचन करण्यात आलेले आहे. काही भूमिज मंदिरांची शिखरे विटांची आहेत. त्यामुळे त्यांचे प्रस्तर शिखर भूमिज आणि विटांचे शिखर असलेली भूमिज मंदिरे अशा दोन भागात वर्गीकरण केले आहे. त्यापुढील भागात ज्या मंदिरांचा तलविन्यास सामान्यपणे आढळणाऱ्या मंदिरांच्या तलविन्यासापेक्षा वेगळा आहे अशा मंदिरांचे विवेचन केले आहे, उदा. एकगर्भी, द्विगर्भी आणि तीन गर्भगृहे असलेली मंदिरे. तिसऱ्या भागात ज्यांची शिखरे नष्ट झाली आहेत अशा महत्त्वाच्या मंदिरांचा विचार केलेला आहे. या मंदिरांचा क्रमही शक्यतो कालक्रमानुसार ठेवण्याचा प्रयत्न केला आहे.

## नागर मंदिरे

**चंडिका मंदिर–भांदक :** भांदक येथील सध्याच्या जैन मंदिराच्या परिस
असलेले हे मंदिर इ. स. च्या अकराव्या शतकातील मध्यप्रदेशच्या कलचुरी कल
नमुना आहे. मध्ययुगातील हिंदू राजांनी या मंदिराची दुरुस्ती आणि जीर्णो
केला.पीठावर असलेल्या या मंदिराला मंडप आणि गर्भगृह असून गर्भगृ
दुर्गादेवींची प्राचीन मूर्ती आहे. मंडपाचे स्तंभ मूळ मंदिराचेच आहेत; परंतु मंडपा
भिंतीत असलेले अर्धस्तंभ मात्र शैलीच्या दृष्टीकोनातून नंतरच्या काळातील आ
मंदिराचे बाह्यांग आणि मंडपाचे शिखर पाहता हे मंदिर इ. स. च्या अकरा
शतकात बांधले गेले असावे. मंदिरात संवत् ११३३ (इ. स. १०७६) चा
शिलालेख आहे. सध्या हा शिलालेख मंडपातील मागील भिंतीत बसविलेला अ
या शिलालेखानुसार हे सांधार गर्भगृह, अंतराल, रंगशिला असलेला मोठा मंडप
घटकांचे बनवलेले होते. मूळ मंदिराच्या अनेक वास्तुघटकांवरुन (उदा. मु
शिखराचे घटक,आमलक आणि त्याचप्रमाणे मंडपाच्या वामन भिंती)मूळ म
नागर प्रकारचे, कदाचित लतिननागर प्रकारचे असावे असे स्पष्टपणे दिसून
तळखड्यावर आडवे थर (moulding) असून त्यावर पूर्णकुंभ आणि जाल
(festoons) युक्त असलेला चौरस खांब, त्यावर पीटाकृतिशीर्ष (cush
capital) आणि त्यावर कीचकहस्त असे या स्तंभाचे स्वरूप आहे. तसेच चतुष्की
मधोमध असलेले वऱ्यापैकी मोठया आकाराचे लिंगपीट, यावरून हे मंदिर मू
छोट्या कुंडानजिक (हे कुंड आजही अस्तित्वात आहे) असलेले शिवमंदिर असल
स्पष्टपणे दिसून येते. मंदिराभोवती काही अन्य छोटी मंदिरेही होती.

**मार्कंडी येथील मंदिरे :** सध्याच्या गडचिरोली जिल्ह्यातील मार्कंडी येथे वैनगंगे
तीरावर असलेल्या या मंदिर-संकुलाच्या टिकाणीच वैनगंगा वळण घे
उत्तराभिमुख बनते; त्यामुळे हे स्थान अत्यंत पवित्र मानले गेले होते. गेल्या शत
वेगलरने या स्थळाची पाहणी करून येथे एकूण २४ मंदिरे आहेत आणि मंदिर-स
या दृष्टिकोनातून ही मंदिरे वैशिष्ट्यपूर्ण आहेत असे नमूद करून टेवले अ
नंतरच्या काळात या मंदिराच्या शैलीच्या आणि काही इतर वैशिष्ट्यांमुळे वि
प्रभावित झाले आणि मार्कंडीचे "विदर्भातील खजुराहो" असे वर्णन केले ग
यातील काही वैशिष्ट्ये कलात्मक तर काही सांप्रदायिक (cultic) स्वरूपाची आ
दर्शकावर झटकन प्रभाव पाडणारे वैशिष्ट्य म्हणजे वाहयांगावर असलेले शिल
एकावर एक असे तीन जंघा पट्ट आणि मोठया प्रमाणावर आढळणाऱ्या व्यालाकृ
विलक्षण सदाशिव, हरिहरपितामहार्क या मूर्ती आणि गर्भगृहावर दोनदा आणि
मंडपाच्या बाह्यांगावर आपल्या शक्तींसह येणारे दिक्पाल हया वैशिष्ट्यां
सांप्रदायिक साधर्म्य प्रकर्षाने जाणवते. या मंदिरांची वास्तुशास्त्रीय वैशिष्
मूर्तिशिल्पांची शैली आणि शिलालेख यांवरुन ही मंदिरे इ. स. ८५० ते ११००

काळात बांधली गेली असावी असे विद्वानांचे मत होते. निरनिराळया मतमतांतरांच्या आणि त्याबाबत घेतल्या गेलेल्या भूमिकांच्या तपशिलाच्या जास्त खोलात न जाताही ही मंदिरे इ. स. चे १० वे शतक ते इ. स. चे ११ वे शतक या काळात बांधली गेली असे ढोबळमानाने म्हटल्यास वावगे ठरणार नाही. या मंदिरांबाबतची आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे या मंदिरांवर त्या काळात प्रचलित असलेले लतिननागर आणि फांसना शिखरप्रकार. अशाप्रकारे ही मंदिरे छत्तिसगड आणि विदर्भाच्या ईशान्येकडील मध्यप्रदेशातील इतर भागातील वास्तुशैलीशी साधर्म्य दाखवतात. सध्या या मंदिरांपैकी फक्त अठरा मंदिरे शिल्लक असून ती भारतीय पुरातत्त्व सर्वेक्षणाच्या नियंत्रणाखाली आहेत. तूर्त या मंदिरांपैकी फक्त दोनच मंदिरांचा विचार करावयाचा आहे.

या मंदिरांपैकी सर्वाधिक प्राचीन आणि तत्कालिन स्थापत्यशैलीचे सर्वाधिक प्रतिनिधित्व करणारे मंदिर म्हणजे मार्कंडऋषि मंदिर होय. हे मंदिर पूर्वाभिमुख असून तीन बाजूंना तीन मुखमंडप असलेला मंडप, अंतराल आणि गर्भगृह अशी त्याची रचना आहे. हे शिवमंदिर असून मंदिरासमोर नंदीसाठी स्वतंत्र मंडप आहे. मंदिरावर लतिनप्रकारचे नागर शिखर असून त्याची बरीच पडझड झालेली आहे. या मंदिराची सुमारे शंभर वर्षांपूर्वी गोंड राजाने दुरुस्ती केली अशी आख्यायिका आहे. शिखराची बरीच पडझड झालेली असली तरी कलचुरी आणि चंदेल्ल स्थापत्यकलेशी असलेले या मंदिरशिखराचे साधर्म्य ओळखता येईल इतके अवशेप शिखराच्या दक्षिण भागावर शिल्लक आहेत. अंतराळावर मोठे शुकनास आहे. मंडपावर एकूण पाच शिखरे होती. त्यापैकी चार कोपऱ्यातील चार शिखरे शिल्लक असून ती फांसना पद्धतीची आहेत. पाचवे म्हणजे मधोमध असलेले शिखर आज शिल्लक नाही. पण तेही फांसना प्रकारचेच असावे. नंदिमंडपाचा तलविन्यास चौरस असून त्याला तिन्ही बाजूंनी पुढे आलेले भाग किंवा अंगे आहेत. मंडपाच्या उरलेल्या म्हणजे मुख्यमंदिराभिमुख असलेल्या भागावरही मूळात अंग असावे, पण त्याची पुनर्रचना झाली आहे. नंदिमंडप मूळात कदाचित वामनभिंती असलेला खुला मंडप असावा. अंतरालावर असलेल्या शुकनासात खरोखरीचा वरचा मजला असून त्याला मध्यभागी दरवाजा आणि त्याच्या दोन बाजूस दोन लहान आकाराची मंदिरे आहेत. उत्सेधदृष्ट्या या लहान मंदिरांच्या पीठांचे थर मुख्य मंदिराच्या पीठाच्या थरांसारखेच आहेत; आणि मुख्य मंदिराप्रमाणेच त्याच्याही जंघा-पातळीवर नरथर आहे. शुकनासेच्या या दरवाजावर एकमेकांना खेटून बसलेले उमामहेश्वर दाखवले असून त्याच्या दोन्ही बाजूंना सुरसुंदरी दाखवल्या आहेत. त्यावर मंची आणि कपोताली असून. त्याच्याहीवर हंसपट्ट आहे. आणखी काही थर गेल्यानंतर गवाक्षयुक्त त्रिकोणी शिखर असून त्याच्या दोन्ही बाजूस वानरे आणि व्याल दाखवले आहेत. शुकनासाच्या बाह्यांगावर, उमामहेश्वरांच्या पातळीवर काही मूर्ती आहेत. आणि

शुकनासाच्या मागे कपोतालीच्या वर लतिन प्रकारचे नागर शिखर आहे. मुख्य मंदिराच्या बाहयांगावर सर्वात खाली पीठ, मधोमध आम्रभंजिकांनी अलंकृत केलेला वेदीबंध, भिंतींच्या भागावर तीन जंघा-पट्ट आणि कपोतालीच्या वर लतिन शिखर आहे. कोपऱ्यांवर असणाऱ्या शिखरांवर भूमिआमलक असून सध्या शिल्लक असलेल्या शिखरावर असे सहा भूमिआमलक दिसतात. पीठामध्ये जाड्यकुंभ, अंतरपत्र, कणी आणि त्यानंतर वेदीबंध असे थर आहेत. वेदिबंधावर सगळयात खाली ग्रासपट्टी, नंतर साधा सपाट पट्ट आणि त्यावर कुंभ अंतरपत्र, कलश कपोताली आणि मंचिका असे घटक आहेत. सपाट किंवा रिक्तपट्टाच्या वरची कडा आणि कपोतालीवर ठराविक अंतरावर येणारी व्यालमुखे ही मंडपावरील वेदीबंधावर आम्रभंजिकांनी आणि गर्भगृहाच्या बाह्यांगावर उद्‌गमांनी जोडलेली आहेत. आधीच नमूद केल्याप्रमाणे मंदिराच्या बाह्यांगांच्या भिंतींवर तीन शिल्पपट्ट आहेत. गर्भगृहाच्या मागील बाजूस असलेल्या भद्रावर हरिहरपितामहार्क, तर उरलेल्या दोन भद्रांवर नृत्य करणारा भैरव आणि बसलेला दशभुज सदाशिव दाखविला आहे. कोपऱ्यावरील पट्टावर दिक्पाल आणि वसू दाखविले आहेत आणि कोण आणि भद्र यांच्या मधील भागात अप्सरा दाखविल्या आहेत.शिल्पसंहितेत वर्णिलेले सर्वप्रकारचे व्याल सलिलांतराच्या उत्सेध भागावर दाखविले आहेत. या मंदिरावर इतके विविध प्रकारचे व्याल दाखविले आहेत की, प्रत्येक व्याल वेगळ्या प्रकारचा किंवा अद्वितीय आहे. फक्त जेव्हा शिल्पीची कल्पनाशक्ती आटली, तेव्हा त्याने मधून मधून साधू दाखविले आहेत. मंडपाच्या बाह्यांगावरील शिल्पयोजनाही यापेक्षा वेगळी नाही. खालच्या पट्टातील कोपऱ्यांवर दिक्पाल आणि शक्तींसह असलेले इतर देव दाखविले आहेत,.तर वरच्या दोन पट्टांवर सलिलांतरांच्या भागात व्याल आणि उरलेल्या भागात अप्सरा आहेत.

**यमधर्म मंदिर** : मार्कंडी येथील येथे विवेचनासाठी निवडलेले दुसरे मंदिर म्हणजे यमधर्म मंदिर असून येथे असलेल्या इतर मंदिरांप्रमाणे या मंदिरालाही मंडप नाही. या प्रकारचे वैशिष्ट्य मध्यप्रदेशातील मध्यम आकाराच्या मंदिरांमध्ये आढळते. हे वैशिष्ट्य या भागातील अगदी सुरुवातीच्या काळातील मंदिरांपासून आहे. या काळात मंदिर प्रस्तर किंवा विटांनी बांधले जात असे. पण मंडप मात्र अन्य साहित्य वापरून उभारला जात असे. आरंग येथील मंदिर, भटाळा येथील शिवमंदिर या प्रकारची उत्तम उदाहरणे आहेत. यमधर्ममंदिराच्या तलविन्यासात गर्भगृह आणि अंतरालाचा समावेश होतो. गर्भगृह अंतरालाच्या पातळीपेक्षा खालच्या पातळीवर आहे, आणि अंतरालातून गर्भगृहात जाण्यासाठी चार पायऱ्या उतरुन जावे लागते. गर्भगृहाचा तलविन्यास चौरस असून पंचरथ प्रकारचा आहे. गर्भगृहाच्या बाह्यांगावर कोणतीही शिल्पे नाहीत. मात्र मागील भद्रावर सूर्यमूर्ती असून उरलेल्या दक्षिण आणि उत्तर बाजूंच्या भद्रांवर अनुक्रमे अंधकासुरवध मूर्ती आणि चामुंडा आहे. जंघेवरील

उरलेल्या दोन पट्टांवर कोणतीही शिल्पे नाहीत. शिखराला लागून असलेले शुकनास मार्कंड ऋषि मंदिरातील शुकनासासारखेच आहे, मात्र त्यावर कोणतेही शिल्प नाही. पण या शुकनासाने, एरवी शिल्पांचा अभाव असलेल्या शिखराला शोभा आणली आहे. शिखरावर चार बाजूंना असलेल्या चार साध्या सपाट रेखांवर आमलक असून त्यावर कळस आहे.

बाह्यांगाच्या तुलनेत, गर्भगृहाचे प्रवेशद्वारावर मात्र बऱ्यापैकी अलंकरण आहे. या प्रवेशद्वाराला अनेक द्वारशाखा असून त्या पुष्पपट्टांनी (floral bands) आणि व्यालांनी अलंकृत केल्या आहेत. अर्धस्तंभांनी पेललेल्या ललाटावर मध्यभागी गणेश आहे. द्वारचौकटीच्या खालच्या भागात गंगा, यमुना, सेविका तसेच शैव आणि वैष्णव लांच्छनांनी युक्त असलेले द्वारपाल दाखवले आहेत.

**अंजनेरी येथील जैन मंदिरे :** नाशिक-त्र्यंबकेश्वर मार्गावर, नाशिकापासून २० मैल अंतरावरील अंजनेरी गावाजवळ १६ मंदिरांचा समूह आणि त्याच काळात बांधलेली पण आज अत्यंत वाईट अवस्थेत असलेली पुष्करिणी आहे. या मंदिरांपैकी चार मंदिरे हिंदूंची आहेत आणि उरलेली जैन मंदिरे आहेत. या विविध मंदिरांना भूषवणाऱ्या शिखरप्रकारांमुळे हा मंदिरसमूह उल्लेखनीय बनला आहे. या ठिकाणी नागर, भूमिज आणि फांसनाकार असे तीन शिखरप्रकार आढळतात. ही सर्व मंदिरे सर्वसाधारणपणे मध्यम आकाराची असली तरी ती काही शतकांमध्ये बांधली गेली असल्यामुळे त्यांना विशेष महत्त्व आहे. या ठिकाणी सापडलेल्या महासामंत सेऊणचंद्र यादवाच्या (इ. स. ११२० - इ. स. ११४५) शिलालेखामुळे या मंदिरांचा काळ ठरविणे सुलभ झाले. तीर्थंकर चंद्रप्रभ-मंदिराच्या व्यवस्थेसाठी घरे आणि दुकाने दान केल्याचे या शिलालेखात नमूद केलेले आहे. शिलालेखावरून या ठिकाणी असलेली मंदिरे इ. स. च्या ११ व्या आणि १२ व्या शतकात बांधली गेली असे दिसते. या मंदिरसमूहाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे या मंदिरांपैकी तीन मंदिरे आणि दोन मठ जवळजवळ असून या पाच वास्तूंभोवती एकच सीमाभिंत आहे. उल्लेखित तिनही मंदिरे नागर प्रकारची असून त्यांचा तलविन्यास पंचरथ प्रकारचा आहे. त्यांच्या तलविन्यासात आडवा लांबट मुखमंडप, तेवढयाच रुंदीचा चौरस मंडप, अंतराल आणि गर्भगृह यांचा समावेश होतो. गर्भगृह आणि मंडप यांचे आकार वेगवेगळे असले तरी या दोहोंचा तलविन्यास मात्र पंचरथ आहे. या ठिकाणी असलेल्या इतर मंदिरांशी, विशेषतः वैष्णव आणि शैव मंदिरांशी फारकत घेणारे या मंदिरांचे वैशिष्ट्य म्हणजे या मंदिरांच्या मुखमंडपाची रुंदी मंडपाच्या रुंदीइतकीच आहे. याउलट इतर मंदिरांच्या मुखमंडपांची रुंदी मंडपापेक्षा बरीच कमी असून यांनी अर्धमंडप या संज्ञेला सार्थकता आणली आहे. सध्या ज्यांचे विवेचन सुरू आहे त्या तीन नागर मंदिरांचे मुखमंडप दोन स्तंभ आणि दोन अर्धस्तंभांवर उभे आहेत. ते मंडपाच्या रुंदीइतकेच रुंद आहेत. [७६] गर्भगृहावरील शिखरावर कोणतेही अलंकरण

नाही. मध्यभागी मूलमंजरी आणि चार बाजूंच्या चार कोपऱ्यावर मूलमंजरी
प्रतिकृती आहेत. म्हणूनच ही नागर मंदिरे पंचाण्डक प्रकारची आहेत असे म्ह
येईल. गर्भगृहावरील अंगे आणि प्रत्यंगे मूलमंजरीवरील आमलकाखाली
आली आहेत. आमलकावर शिखरशीर्ष आहे.

कझिन्सकृत **मिडीवल टेंपल्स ऑफ द डेक्कन** या ग्रंथामध्ये (प्लेट नं. ५९)
प्रकारच्या नागर मंदिराचे छायाचित्र आहे. या मंदिराला मूलमंजरीव्यतिरिक्त
कोपऱ्यांवर चार छोटी नागर शिखरे आहेत आणि या शिखरांवर निराळ्याच प्रक
कळस आहेत. मात्र या मंदिराच्या मंडपावर फांसनाकार शिखर आहे.

**धोडांबे येथील कृष्ण मंदिर** (ता. चांदवड, जि. नाशिक) : धोडांबे येथे मह
मंदिराजवळच कृष्णमंदिर असून त्याचे तलविन्यासदृष्ट्या फक्त मंडप, अंत
आणि गर्भगृह एवढेच भाग शिल्लक आहेत. ज्याला अर्धमंडप म्हणता येईल
मुखमंडप पूर्वी होता, पण आता तो शिल्लक नाही. हे मंदिर मध्यम आका
असल्यामुळे मंडप आठ अर्धस्तंभांवर उभा आहे. म्हणजेच मंडपात एकही मोक
स्तंभ नाही. याअर्थाने हे मंदिर बिनखांबी आहे. गर्भगृहाचा तलविन्यास चौरस
पंचरथ प्रकारचा आहे. तीन भद्रांमधील तीन गवाक्षांमध्ये विष्णूची तीन रू
दाखविली आहेत, तर कर्णाच्या प्रत्येक बाजूवर एक याप्रमाणे चार कर्णांव
जंघाभागावर एकूण आठ दिक्पाल दाखविले आहेत. प्रतिरथांवरील जं
सुरसुंदरींची शिल्पे आहेत. गर्भगृहावरील शिखराचा काही भाग शिल्लक आहे

उत्सेधाचे थर जमिनीपासून अनुक्रमे पीठ, वेदीबंध, मंडोवर आणि नागर वि
असे आहेत. नागर विमान बहुधा २५ अंडांचे असावे. त्यामुळे या मंदिर
''पंचविंशत्यंडक प्रासाद'' असे म्हणता येईल.

खुर, जाडंब आणि कर्णी असे पीठाचे थर आहेत आणि वेदीबंधानंतर
अलंकरणपट्ट येतो. या पट्टावर खुर, कुंभ, अंतरपत्र, कपोताली आणि मंची
थर आहेत. त्यावर मंडोवर असून त्यात जंघा, उद्गम भरणी आणि छाद्य
घटक येतात आणि त्यावर शिखर येते. मूलमंजरीच्या सभोवताली कोपऱ्यांवर अ
प्रतिरथांवर विमानाच्या प्रतिकृती (शृंगे) असून त्यांच्या भद्रांवर दोन उरःशृंगे आहे
मूलमंजरीवर विमानाच्या २५ प्रतिकृती किंवा अंड आहेत; पण सभोवताल
शृंगांवर फक्त ९ अंड आहेत आणि म्हणून त्यांचे स्वरूप 'नवाण्डक' असे अ
स्थापत्याच्या आणि शिल्पांच्या शैलीवरून हे मंदिर इ. स. च्या ११ व्या शतक
बांधले गेले असावे असे दिसते.

**सिन्नर येथील गोंदेश्वर मंदिर (चार आयतने)** (ता. सिन्नर, जि. नाशिक) : सिन
येथील गोंदेश्वर मंदिर पंचायतन प्रकारचे असून महाराष्ट्रातील मंदिरस्थाप
विकासाचा एक नमुना म्हणून त्याचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. मुख्य मंदिर

पीठावर (जगती) असून त्या समोर नंदीमंडप आहे. मुख्य मंदिराच्या चार कोपऱ्यांजवळ काही अंतर सोडून चार छोटी देवळे (आयतने) आहेत. या आयतनांमध्ये मुख्य मंदिरातील देवाशी संबंधित असलेल्या देव-देवता आहेत. मुख्य मंदिर शिवाचे असून त्याच्या गर्भगृहावर भूमिज शिखर आहे. मुख्यमंदिरासमोर असलेल्या नंदी-मंडपावर चौकोनी शंक्वाकृती द्राविड शिखर आहे. उरलेल्या चार आयतनांवर नागर शिखरे आहेत. यातील एक शिखर कझिन्स लिखित **मिडीवल टेंपल्स ऑफ द डेक्कन** या पुस्तकात ( प्लेट क्रमांक XXXXIV वर ) दाखविण्यात आले आहे. शिल्पसंहितांच्या भाषेत या प्रकारच्या शिखरांना लतिन नागर शिखर[७७] म्हणतात. काही पायऱ्या चढून गेल्यानंतर लागणारा कक्षासनयुक्त अर्धखुला मुखमंडप त्याच्यामागे अंतराल आणि अंतरालाच्या मागे गर्भगृह असा त्यांचा तलविन्यास[७८] आहे. पीठावर साधे सपाट निर्गम असून गर्भगृहाच्या मागच्या बाजूची बाह्यरेषा सप्तरथ प्रकारची अंगे आणि प्रत्यंगे दाखविते. त्याच्यावर मंडोवराचा भाग असून त्यावरील तीन भद्र-भागांवरच मूर्ती आहेत. वक्राकार निमुळत्या शिखरांवर भद्र भागावर पट्ट किंवा लता येतात. हे पट्ट चैत्य-गवाक्षांनी अलंकृत केले आहेत. मंदिराच्या मुखभागावरील शिखराच्या पट्टावर शुकनास आहे. उरलेल्या तीन भद्रपट्टांवर चैत्यगवाक्षे अधिक चांगल्या उठावात कोरलेली आहेत. त्यामुळे ''पंचाण्डक लतिन'' प्रकारचे शिखर आहे असे म्हणता येईल. बहुतेक वेळा शुकनासांच्या बाजूंवर छोटी मंदिरे दाखविलेली असून त्यात देवदेवता दाखविलेल्या असतात. या मंदिरांवर मात्र या अशा छोटया मंदिरांऐवजी त्या जागी उभ्या चौकटची नक्षी असलेले पट्ट (lozenses) व त्यावर गवाक्षे दाखविली आहेत. अशाच प्रकारची गवाक्षे मुख्य शिखरांच्या लतांच्या तळभागी आढळली आहेत. अर्धमंडपावर चौकोनी शंक्वाकृती द्राविड शिखर आहे. मुख्य कळसाच्या खालच्या बाजूस अमलसार आणि कलशांना पेलणारी चार बाजूंना चार कीर्तिमुखे आहेत. ती चैत्य प्रकारचीच प्रतिकृती भासतात.

**लोणाड येथील शिवमंदिर** ( तालुका कल्याण, जिल्हा ठाणे ): येथील तळ्याच्या पूर्वेला एक शिलाहार यादव काळातील शिवमंदिर असून ते बरेचसे पडक्या अवस्थेत आहे. पूर्वाभिमुख असलेल्या या मंदिरात जाण्यासाठी सात पायऱ्या असून त्या चढून गेल्यावर मुखमंडपात प्रवेश करता येतो. मुखमंडपानंतर अर्धवट खुला असा सभामंडप, सभामंडपानंतर अंतराल, अंतरालानंतर गर्भगृह आणि मंडपाच्या दोन बाजूंना प्रत्येकी एक अशी अंतरालयुक्त गर्भगृहे अशी मंदिराची रचना आहे. हे मंदिर तीन गर्भगृहे असलेले किंवा त्रिदल प्रकारचे आहे. मुखमंडपानंतर सभामंडप लागतो. सभामंडपाच्या मध्यभागी रंगशिला आहे. सभामंडपाला बारा स्तंभ आहेत. सभामंडपाच्या चारी कोपऱ्यांवर वामनभिंती व कक्षासने आहेत आणि ह्या अर्थाने हा सभामंडप अर्धखुला आहे. मुख्य आणि बाजूच्या दोन गर्भगृहांना अगदी साधे अंतराल असून मुख्य गर्भगृहाच्या अंतरालात आणि इतर दोन गर्भगृहांच्या अंतरालात

किंचित फरक आहे. मुख्य गर्भगृहाच्या अंतरालाच्या दक्षिण आणि उत्तर भिंतीवर प्रत्येकी एक देवकोष्ठ असून ती आज रिक्त आहेत.

सभामंडपावरील छत आणि त्याला पेलणारे अर्धेअधिक स्तंभ आज शिल्लक नाहीत. मुख्य गर्भगृहाचे अंतराल सभामंडपापासून विभक्त करणारे दोन स्तंभच थोडेफार अलंकृत आणि मूर्तिशिल्पांनी युक्त आहेत. बाकीच्या स्तंभांवर नक्षी अथवा मूर्तिशिल्पे नाहीत. या अलंकृत स्तंभांचे तळखडे चौरसाकृती असून त्यावर त्यापेक्षा लहान आकाराचे चौरस तलविन्यासाचे खांब आहेत. मूर्तिशिल्पांच्या वर नेहमीचे त्रिकोणी अलंकरण (उद्‌गम) आणि कीर्तिमुख असलेले जालपट्ट आहेत. कोपऱ्यांवरील स्तंभही असेच आहेत मात्र त्यावर मूर्तिशिल्पे नाहीत. शिवाय या स्तंभांमधून कक्षासनयुक्त वामनभिंती जात असल्याने ते एकाअर्थी वामनस्तंभच आहेत. बाकीचे स्तंभ अगदीच साध्या प्रकारचे असून त्यांना दुहेरी चौरस तळखडे आहेत. त्यावर बाकीच्या स्तंभांपेक्षाही कमी आकाराचे खांब आहेत. कक्षासनाच्या पातळीच्या वरच्या पातळीवर एक अष्टकोनी घटक येतो. या अष्टकोनी घटकाच्या मधोमध कलश आणि कुंभी हे घटक येतात. आधी वर्णन केलेल्या स्तंभांना चौरस कलश आणि चौरस भरणी आहे. गर्भगृहाच्या प्रवेशमार्गावर चंद्रशिला आणि शंखावटी आहे. द्वाराला पाच शाखा आहेत. या शाखांपैकी मधली स्तंभशाखा सोडली तर बाकीच्या शाखांवर कोणतेही अलंकरण नाही. द्वाराच्या ललाटावर गणेशमूर्ती आहे. उत्तररांगावरील पाच छोटया मंदिरांमध्ये दोन देव आणि तीन देवींच्या मूर्ती आहेत. दक्षिणेकडील टोकाच्या किंवा द्वाराभिमुख दर्शकाच्या डावीकडील पहिल्या छोटया मंदिरात हंसासहित ब्रह्मदेव आहे. त्याच्या वरच्या दोन हातात कमळे आहेत. खालचा उजवा हात वरदमुद्रेत आहे आणि खालच्या डाव्या हातात बहुधा कमंडलु आहे. दर्शकाच्या उजव्या बाजूकडील टोकाच्या छोटया मंदिरात मनुष्याकृती गरूडासह असलेला विष्णू आहे. विष्णूच्या चार हातात दक्षिण-अधःकर क्रमाने* शंख, चक्र, गदा आणि पद्‌म ही लांच्छने आहेत. मध्यभागी असलेल्या छोटया मंदिरात ललितासनात बसलेली शिवमूर्ती आहे. तिच्या हातांमध्ये द. अ. क्रमाने त्रिशूळ, डमरु, नाग, खट्‌वांग ही लांच्छने आहेत. शिवाच्या उजवीकडील छोटया मंदिरात हंसावर बसलेली गायत्री असून डावीकडील छोटया मंदिरातील देवी वैष्णवी आहे. तिच्या वरच्या दोन हातात गदा आणि चक्र असल्यामुळे ती वैष्णव आहे हे सहज लक्षात येते.

गर्भगृहात जाण्यासाठी काही पायऱ्या उतरून जावे लागते. कारण गर्भगृह

*दक्षिण-अधःकर क्रम : जेव्हा दोनापेक्षा जास्त हात असलेली देवमूर्ती असते तेव्हा या मूर्तीच्या हातातील लांच्छने किंवा धारण केलेल्यावस्तू पुढील पद्धतीने विशद केल्या जातातः- सुरुवात सर्वात खालच्या उजव्या हाताने होते. सर्वात वरच्या उजव्या हातातील लांच्छन नमूद केल्यानंतर अर्धविराम दिला जातो. मग सर्वात वरच्या डाव्या हातातील लांच्छनापासून सुरुवात करून सर्वात खालच्या डाव्या हातातील लांच्छनापर्यंतची लांच्छने नमूद केली जातात. लांच्छने नसल्यास वरद वगैरे प्रकारची हस्तमुद्रा नमूद केली जाते. थोडक्यात, सर्वात खालचा उजवा हात ते सर्वात खालचा डावा हात असा हा अनुक्रम असतो. जागा वाचवण्यासाठी यापुढील विवेचनात या पद्धतीने लांच्छन वर्णन करताना "द. अ. क्रमाने" असा थोडक्यात निर्देश करण्यात येईल.

अंतरालाच्या पातळीपेक्षा खालच्या पातळीवर आहे. गर्भगृहात दोन बाजूंना दोन छोटी मंदिरे आहेत. त्यांच्यावर ललाटबिंबासारखा प्रकार नसल्याने त्यात कोणते देव होते हे सांगता येत नाही. पण गर्भगृहाच्या द्वारावरील उत्तरांगावरील छोटया मंदिरात दाखविलेल्या देवदेवतांवरून या मंदिरांमध्ये शिव आणि ब्रह्मदेवाच्या त्यांच्या शक्तींसह असलेल्या मूर्ती असाव्यात. गर्भगृहाचा तलविन्यास पंचरथ प्रकारचा आहे. गर्भगृहाच्या मंडोवर-भागावर कोणतेही अलंकरण नाही. मात्र तीन भद्रांवर तीन मूर्ती आहेत. गर्भगृहाच्या मागच्या बाजूस म्हणजेच पश्चिमेकडील भद्रावर अत्यंत झिजलेली शिवाची तांडवनृत्यमूर्ती आहे. दक्षिणेकडील भद्रावर गजासुरवधमूर्ती तर उत्तरेकडील भद्रावर चामुंडेची मूर्ती आहे. या मंदिराचा सर्वात महत्त्वाचा वास्तुघटक म्हणजे गर्भगृहावरील शिखर. पण आज केवळ तीन कोपऱ्यातील तीन छोटी शिखरेच शिल्लक आहेत. मुख्य शिखर आणि शुकनास पडून गेले होते. त्याजागी आता नवीन चुनेगच्ची शिखर बांधण्यात आले आहे. वायव्य, नैर्ऋत्य आणि आग्नेय बाजूंवर असलेले तीन अंड हे मंदिर नागर प्रकारच्या शिखराने युक्त असल्याची स्पष्ट साक्ष देतात. उपलब्ध पुराव्यावरून हे तीन अंड आणि आज अस्तित्वात नसला तरी एकेकाळी नक्कीच अस्तित्वात असलेला या तीन अंडासारखाच अंड आणि मूलमंजरी मिळून हा पंचाण्डक नागर प्रासाद असावा असे अनुमान करता येते. या एरवी साध्या असलेल्या मंदिराचा आणखी एक उल्लेखनीय विशेष म्हणजे या मंदिराच्या बाजूच्या दोन गर्भगृहांच्या पीठांवर असलेला गजथर किंवा भूमिसमांतर असलेली हत्तींची ओळ पीठावरील इतर ठिकाणावरील याच पातळीवरील असणाऱ्या भागाचे स्वरूप सपाट पट्ट असेच आहे. मुखमंडपाच्या दक्षिणेकडील भागावर ''मकरध्वज जोगी'' असा शिलालेख आहे. असाच शिलालेख महाराष्ट्रातील इतर मंदिरांवरही ( उदाहरणार्थ मार्कंडी येथील मंदिरे ) आढळला आहे.

**राजुरा येथील शिवमंदिर** (ता. राजुरा, जि. गडचिरोली) : राजुरा येथील शिवमंदिर-संकुल अनेक तऱ्हेने उल्लेखनीय आहे. या मंदिराच्या सीमाभिंतीच्या आत चतु:शाल प्रकारची वास्तू आहे. ही वास्तू बहुधा त्याकाळातील मठ असावा. येथे असलेले शिवमंदिर पूर्वाभिमुख आहे. अर्धवट खुल्या मंडपात जाण्यासाठी असलेला एक मुखमंडप आणि बाजूचे दोन अर्धमंडप, अर्धा खुला असे स्वरूप असलेला मंडप, मंडपाच्या मागे अंतराल आणि त्यामागे गर्भगृह असा मंदिराचा तलविन्यास मागे आहे. वामन-भिंतीवर असलेल्या-वामन स्तंभांनी हा अर्ध-खुला मंडप पेलला आहे. मंडपाच्या मध्यभागी चतुष्की असून त्यावर घुमटाकार छत आहे. सध्या रंगमंडपावर आणखी एक पोटमाळा आहे. अंतरालावर लहान गवाक्ष (small turret) असून, गर्भगृहावर लतिन प्रकारचे नागर शिखर आहे. रंगमंडपावरील पोटमाळा आणि मंदिराचा अर्धाअधिक भाग मूळ वास्तुप्रकारशी मिळताजुळता नाही. म्हणूनच हे भाग भोसल्यानी इ. स. च्या १८ व्या शतकात केलेल्या जीर्णोद्धाराची परिणती असावी असे दिसते. असे असले तरी या उत्तर कलचुरिकालीन मंदिराची

स्थापत्यशैली स्पष्ट करण्याइतपत मूळचे भाग अजूनही शिल्लक आहेत.

जीर्णोद्धाराचे परिणाम मंदिराच्या मुख्य वास्तूवरही दिसून येतात. उदाहरणार्थ हनुमान, नरसिंह आणि भद्रावरील देवकोष्टांमधील मूर्ती भोसलेकालीनच आहेत. परंतु मंडपाच्या मागील बाह्यांगावरील जंघाभागावरुन, गर्भगृहाच्या दाराच्या चौकटीवरुन आणि रंगमंडपाच्या छतावरुन मुळात हे मंदिर उत्तरकलचुरींची निर्मिती असल्याचे स्पष्ट होते. रंगमंडपाच्या छतावर गजतालु-प्रयोजने आहेत. गर्भगृहाच्या जंघा भागावर दोन शिल्पपट्ट आहेत. या पट्टांतील कर्णभागावर दिक्पाल, कर्ण आणि भद्रांच्या मधील भागात सुरसुंदरी आणि सलिलांतराच्या भागावर व्याल दाखविले आहेत. आधी उल्लेख केल्याप्रमाणे गर्भगृहाच्या पार्श्व-भद्रांवरील देवकोष्ठांमध्ये मूळ मूर्तीऐवजी भोसला काळातील मूर्ती आहेत. मूळ मूर्ती भग्न झाल्यामुळे जीर्णोद्धार करताना त्या बदलण्यात आल्या असाव्यात. पण गर्भगृहाच्या मागील बाह्यांगावरील भद्रातील देवकोष्टात मूळची मूर्ती असून ती त्रिपुरान्तक शिवाची आहे. या मंदिराचे स्थापत्य, मूर्तिशिल्पांवरील तपशील, शिल्पे, अलंकारिक घटक आणि त्यांची शैली इत्यादी बाबी लक्षात घेता हे मंदिर इ. स. च्या १३ व्या शतकात बांधले गेले असावे असे अनुमान काढता येते.

**रामटेक येथील राम-लक्ष्मण मंदिरे :** संस्कृत वाङ्.मयात रामगिरी या नावाने प्रसिद्ध असलेल्या रामटेक येथील टेकडीजवळ राम, लक्ष्मण आणि सीता यांनी काही काळ वास्तव्य केले होते अशी आख्यायिका आहे. वाकाटककाळात ही आख्यायिका प्रचलित होती. रामगिरीच्या स्वामीचे (रामगिरिस्वामिन्) मंदिर दुसऱ्या प्रवरसेनाच्या काळात (इ. स. ५२० ते इ. स. ५२५) किंवा त्याच्याअगोदरच्या काळात बांधले गेले. तथापि हा रामगिरीचा स्वामी (किंवा ईश्वर) रघुनायक रामच[७५] होता किंवा नाही हे समजून येत नाही. रामटेकवरील जी सहा मंदिरे स्पष्टपणे वाकाटककालीन म्हणून ओळखली गेली आहेत त्यांमध्ये वा. वि. मिराशींचा होरा होता त्याप्रमाणे रामाच्या मूर्ती अथवा पादुका आढळलेल्या नाहीत. पण यादव काळात (इ. स. चे १३ वे शतक) मात्र हे स्थान रामोपासनेचे महत्त्वाचे केंद्र बनल्याचे निःसंदिग्ध पुरावे उपलब्ध आहेत. रामदेवराय यादवाच्या (इ. स. १२७१ ते इ. स. १३११) राघव नामक अमात्याच्या (chemberlain) शिलालेखात राम, लक्ष्मण आणि सीतेशी संबंधित असलेल्या मंदिरांचा उल्लेख आढळतो. ''सिंदूरगिरि माहात्म्य'' या मध्ययुगीन स्थलमाहात्म्यात रामाने रामटेकला दोन वेळा भेट दिली असा उल्लेख येतो. पहिल्या वेळी वनवासात असताना आणि दुसऱ्या वेळी शंबुकाचा वध करण्यासाठी. वर उल्लेखिलेल्या शिलालेखाच्या पद्य मजकुराची रचना करणाऱ्या त्रिविक्रम कवीने (हा अमात्य राघवाचा भाऊ होता) अमात्य राघवाने त्याचे जीवन रामोपासनेला वाहून घेतल्याचे म्हटले आहे. यावरुन १३ व्या शतकाच्या अखेरीच्या आधीपासूनच या ठिकाणी राममंदिर असावे असा निष्कर्ष निघतो.

टेकडीच्या माथ्यावर किल्ला म्हणून ओळखल्या जाणाऱ्या भागात सर्वात मागे काहीशा उंच भागावर रामस्वामी मंदिर आणि लक्ष्मणस्वामी मंदिर अशी दोन मंदिरे आहेत.. प्राकारात प्रवेश करण्यासाठी गोपुर असून ते नंतरच्या काळातील आहे. मंदिरालगतच आणि सीमाभिंतीच्या आत या दोन मंदिरांच्याच काळातील काही छोटी मंदिरे आहेत. या सर्व लहानमोठ्या मंदिरांना गेली तीनशे वर्षे चुन्याचा गिलावा दिला गेल्याने या मंदिरांवर त्याच्या सफेदीची चांगलीच जाड पुटे चढलेली आहेत. त्यामुळे मंदिरांवरील मूर्तिशिल्पांचे अलंकरणात्मक तपशील आणि मंदिराचे काही वास्तुघटकही झाकले गेले आहेत.

राम आणि लक्ष्मणाच्या मंदिरामध्ये केवळ दोन-तीन मीटर इतकेच अंतर आहे. या मंदिरामधील साधर्म्यामुळे फक्त एकाच मंदिराचे वर्णन केले तरी त्यावरुन दुसऱ्याची कल्पना येऊ शकते. रामाचे मंदिर नागर प्रकारचे असून पुढच्या बाजूस मुखमंडप (२.७० मीटर x १.४५ मीटर) आणि दोन बाजूस दोन अर्धमंडप आहेत. बाजूचे अर्धमंडप (३.२० मीटर x २.७० मीटर) मुखमंडपापेक्षा आकाराने मोटे आहेत. पुढे मुखमंडप आणि दोन बाजूला अर्धमंडप असलेला मंडप, त्याच्यामागे काहीसे अंतराल (३.५० मीटर x १.०५ मीटर) आणि चौरस गर्भगृह असा मंदिराचा तलविन्यास आहे. सध्या मंदिराच्या व्यवस्थापन समितीने दक्षिणेकडील अर्धमंडपाचे स्ट्रॉंगरुममध्ये रूपांतर केले आहे. गर्भगृहाच्या बाह्यरेषेचा तलविन्यास पंचरथ प्रकारचा आहे. गर्भगृहावर शिखर-शेखरी प्रकारचे नागर शिखर आहे. मंडपावर घुमटाकार छत आहे.

**लोहारे येथील शिवमंदिर** (ता. जि. यवतमाळ) : यवतमाळ शहरापासून तीन कि. मी. अंतरावर नागर प्रकारचे हे शिवमंदिर असून ते कमलेश्वर मंदिर म्हणून ओळखले जाते. या मंदिराचे स्वरूप छोटया आकाराचा लतिन नागर प्रासाद असे असून मुखमंडप, अर्धखुला मंडप, अंतराल आणि गर्भगृह असा त्याचा तलविन्यास आहे. मुखमंडपाला आणि मंडपाला वामनभिंती आहेत. खुर आणि त्यावरील अधिकाधिक कर्मी निर्गमाचे दोन थर सोडले तर पीठावर निर्गम वा प्रवेशाचे थर नाहीत. वरच्या भागात ठळकपणे दिसणारे आसनपट्ट आहेत, कक्षासने मात्र नाहीत. मुखमंडप आणि मंडपाचे छप्पर एकूण दहा स्तंभावर पेललेले आहे. स्तंभांचा तलविन्यास चौरस असून चौरस तळखडा, चौरस खांब, तीन अष्टकोनी पट्ट, त्यातील वरच्या अष्टकोनी पट्टावर चौरस घटक, त्यावर पुन्हा अष्टकोनी घटक व त्यानंतर पीठाकृती शीर्ष व कीचकहस्त असे त्यांचे स्वरूप आहे. चौरस घटकावर आलंकारिक शिल्पे आणि मूर्तिशिल्पे आहेत. बाह्यरेषेजवळच्या स्तंभांच्या हस्तांवर नागशीर्षप्रयोजने आहेत तर मधील स्तंभांवर कीचकहस्त आहेत. मागच्या भिंतीतील अर्धस्तंभांचे वैशिष्ट्य म्हणजे या अर्धस्तंभांवरील चौरस घटकावर कीर्तिमुख असून त्याच्या तोंडातून साखळी असलेली घंटा दाखविली आहे. गर्भगृहाच्या दरवाजाच्या

चौकटीत खालच्या भागात कोणतीही मूर्तिशिल्पे नाहीत. उत्तरांगावरही कोणत्याही मूर्ती नाहीत. दरवाजाच्या सर्वाधिक आतील शाखेवर चौकटच्या नक्षीचा पट्ट आहे. मंदिराची छते अत्यंत साधी असून प्रत्येक स्तरावरील चार तुळया एकमेकांना झाकतील अशाप्रकारची आहेत. गर्भगृहाच्या जमिनीची पातळी अंतरालाच्या पातळीपेक्षा खाली आहे. त्यामुळे या मंदिराचे वर्णन पाताळलिंग असलेले मंदिर असे करण्यात येते.

काही साधे सपाट आडवे थर सोडले तर विमानाच्या बाह्यांगावर कोणतेही अलंकरण नाही. पीठ अगदी सामान्य असून त्यावर खालपासून खुर, जाडंब त्यावर कुंभ, अंतरपत्र, कलश, मंची आणि कपोताली असे थर आहेत. त्यावर सपाट भिंत असून वर उद्गम आहे.शिखरावरील सर्वात अधिक बाहेर येणारा भाग भद्र असून प्रत्येक बाजूवर तीन फालना आहेत. मूलमंजरी आणि फालनावरही नेहमीचे जाल अलंकरण नाही. या मंदिराची स्थापत्यशैली, मूर्तिशिल्प इत्यादी बाबी लक्षात घेता हे मंदिर १३ व्या शतकाच्या शेवटी बांधले गेले असावे.

**महागाव येथील द्विदल मंदिर** (ता. महागाव, जि. यवतमाळ): यवतमाळ जिल्हयातील महागाव येथे वैशिष्टयपूर्ण असे लतिन नागर प्रकारचे मंदिर-संकुल आहे. त्या मंदिराभोवती प्राकार असून हे आकर्षक मंदिर-संकुल एका ओढयाच्या काठी आहे. मंदिराच्या आवारात प्रवेश करण्यासाठी पूर्वेकडील प्राकारात एक गोपुर आहे. मंदिर उत्तराभिमुख असून उत्तरेकडूनही या मंदिरात प्रवेश करण्यासाठी रस्ता आहे. मात्र हा रस्ता ओढयातून येतो आणि त्याचे स्वरूप ओढयातून वर येणाऱ्या पायऱ्या असे आहे. मात्र उत्तरेकडील प्राकाराला गोपुर नाही, आणि जो काही दरवाजा आहे तोही याबाजूच्या प्राकाराच्या मधोमध नाही.

पूर्व आणि उत्तर दिशेकडे अर्धमंडप असलेला अर्धखुला मंडप, त्याच्या पश्चिम आणि दक्षिण भागी, पश्चिम आणि दक्षिण दिशेला असलेल्या गर्भगृहांकडे जाण्याचा मार्ग असलेली अंतराले व त्यांच्या मागे गर्भगृहे असा या मंदिराचा तलविन्यास आहे. मंडपाच्या दक्षिणेला मुख्य गर्भगृह असून त्यात विष्णु , तर मंडपाच्या पश्चिम बाजूच्या उप-गर्भगृहात शिवलिंग आहे. प्रत्येक अर्धमंडपासमोर छोटा वाहनमंडप आहे. पूर्वेकडील वाहनमंडपात नंदी आहे, तर उत्तरेकडील वाहनमंडपात पूर्वी गरुडमूर्ती असावी, पण आज ती अस्तित्वात नाही.

मंडप चौरसाकृती असून त्याच्या मधोमध चौरस रंगशिला आहे. रंगशिलेच्या चार कोपऱ्यांवर चार स्तंभ असून मंडपाच्या पूर्व आणि उत्तर बाजूंना वामन-भिंती व त्यावर वामन-स्तंभ आहेत. मंदिरातील स्तंभ लोहारे येथील नागर मंदिराच्या स्तंभासारखेच आहेत. मुख्य स्तंभावर कीचकहस्त, तर वामन-स्तंभावर नागशीर्ष-हस्त आहेत.

लोहारे येथील नागर मंदिराप्रमाणेच याही मंदिरावर उल्लेखनीय असे कोणतेही आडवे थर नाहीत, भिंतीचे पृष्ठभाग साधे सपाट असून लतिन नागर शिखरावर कोणतेही जाल अलंकरण नाही. मंडप आणि शिवलिंग असलेले गर्भगृह यांच्यावरील शिखरे आज अस्तित्वात नाहीत. मंदिराचे वैशिष्ट्य म्हणजे त्या मंदिराच्या अंतरालात प्रवेश करण्यासाठी पूर्वेकडून मार्ग देणारा छोटासा अर्धमंडप असून त्यावर आणि वाहन-मंडपांवर फांसना पद्धतीची शिखरे आहेत.

आज मंदिराचा परिसर प्राकाराच्या पडलेल्या अवशेषांनी भरून गेला आहे. मंदिरातील शिवलिंग असलेल्या गर्भगृहाची पातळी मंदिराच्या पातळीपेक्षा खूपच खोल आहे. परिणामी गर्भगृहाच्या उत्तरेकडील भिंतीतून एक झरा निघालेला असून त्यामुळे भिंतीलगतची मंदिराबाहेरच्या जमिनीची पातळी मंदिराबाहेरील इतर बाजूंकडील जमिनीच्या पातळीपेक्षा कमी झाली आहे.

लोहारे येथील मंदिराप्रमाणेच हे मंदिरही १३ व्या शतकाच्या अखेरीस बांधण्यात आले असावे. परंतु महागाव येथील मंदिराचा गुंतागुंतीचा तलविन्यास, त्यातील दरवाजे, स्तंभ आणि मूर्तिशिल्पे यांचा विचार करता तौलनिकदृष्ट्या महागाव येथील मंदिर लोहारे येथील मंदिरापेक्षा जुने आहे हे निःसंदिग्धपणे स्पष्ट होते.

**काटोल येथील मंदिरे** (ता. काटोल, जि. नागपूर) : काटोल येथील कपूरेश्वर आणि चंडिकामाता मंदिर ही दोन मंदिरे लतिन नागर मंदिरांची उतम उदाहरणे आहेत. या मंदिरांचे राजुरा आणि मार्कंडी येथील तशाच प्रकारच्या मंदिरांशी खूपच साधर्म्य आहे.

कपूरेश्वर मंदिर : हे शिवमंदिर पूर्वाभिमुख असून त्यात अंतराल व गर्भगृहाचा समावेश होतो. अंतरालच्या पुढे अलिकडेच विटांनी बांधलेला मंडप असून त्यावर पत्र्याचे छत आहे. मार्कंडी मंदिर-संकुलात अंतरालपर्यंतचे काम दगडाचे आणि मंडपाचे बांधकाम मात्र वेगळयाच माध्यमात असलेली (हा मंडप बहुतांशी उदाहरणांमध्ये तात्पुरत्या स्वरूपाचा किंवा निदान नाशिवंत साहित्याने बांधला जात असावा असे दिसते. त्यामुळेच तत्कालीन मंडपाचे अवशेष आज दिसून येत नाहीत) मंदिरे आढळतात. अशा प्रकारचे मंदिर स्थापत्य मध्ययुगाच्या सुरुवातीला मध्यप्रदेशात प्रचलित होते. मार्कंडी (जि. चंद्रपूर) येथील मंदिरे याच परंपरेतील आहेत. हीच परंपरा काटोल येथेही दिसून येते.

दगडाने बांधलेल्या मंदिर-भागाच्या तलविन्यासात गर्भगृह आणि अंतरालाचा समावेश होतो. गर्भगृहाचा तलविन्यास पंचरथ आहे. शिखरावर चार मुख्य दिशांना लता असून कोणांवर भूमि-आमलक आहेत. लतेच्या मध्य-भागात शूरसेनक असून त्यावर चैत्यगवाक्षाचे अलंकरण आहे. प्रतिरथ साधे-सपाट असून त्यांवर कोणतेही अलंकरण नाही. तळाशी असलेल्या शूरसेनकात कोणतेही मूर्तिशिल्प नाही.

गर्भगृहाच्या मंडोवरावर शिल्पाकृतींनी युक्त असे दोन जंघाभाग आहेत. या भागांवर अष्टदिक्पाल आणि सुरसुंदरी आहेत, तर भद्रांमधील देवकोष्ठांमध्ये परिवारदेवता आहेत. राजुरा आणि मार्कंडी येथील मंदिराप्रमाणेच याही मंदिराच्या सलिलांतर भागात व्यालशिल्पे आहेत. या दोन जंघाभागांखाली असलेल्या वेदीबंधावर कुंभ, कलश, कपोत आणि मंची हे थर आहेत. शिखराचा मूळ आमलक आणि कळस आज शिल्लक नाही. सध्या त्या जागी विटा आणि चुना यांच्या सहाय्याने कळस बांधण्यात आला आहे.

चंडिकामाता मंदिर : चंडिकामाता मंदिराचीही कमालीची पडझड झाली असून. त्याची अगदी अलीकडच्याच काळात मोठया प्रमाणावर दुरुस्ती करण्यात आली आहे. त्यामुळे मंडप आणि अंतरालाच्या वरचे मजले आणि त्यांच्या भिंती आधुनिक काळात बांधण्यात आल्या आहेत. मुख्य शिखराचीही बरीच पडझड झालेली असून शिखराचा वरचा अर्धा भागही आधुनिक काळातील निर्मिती आहे. गर्भगृहाचा तलविन्यास त्रिरथ असून मुखमंडप, मंडप, अंतराल आणि गर्भगृह अशी त्याची रचना आहे. मूळ मंडप अर्धखुला असून त्याच्या बाह्यांगावर वेदिका होती आणि वामनभिंतींवर आतील अंगास वामनस्तंभ होते. या अर्धखुल्या मंडपाच्या मध्यभागी चतुष्की असून या चतुष्कीवर उत्तरोत्तर लहान होत जाणाऱ्या दगडी वलयांनी युक्त असलेले घुमटाकार छत पेललेले आहे. चौरस तळखडा, तीन अष्टकोनी घटक आणि त्यांच्यामध्ये कर्णी, त्यावर कुंभी, कलश आणि हस्त असा घटकक्रम असलेले स्तंभ भटाळा भागातील मंदिरांच्या स्तंभांशी साधर्म्य दाखवतात. गर्भगृहाच्या बाह्यांगावर कर्पूरेश्वर मंदिराच्या गर्भगृहाच्या बाह्यांगाप्रमाणेच वेदीबंध आढळतो आणि या वेदीबंधाच्या वरच्या भागात दोन जंघा आढळतात. या मंदिराचा जीर्णोद्धार शिल्पशास्त्रांचे सर्व संकेत डावलून झाल्याने मुळतः मंदिरावर लतिन प्रकारचे शिखर होते आणि कोनांवर भूमिआमलक होते एवढेच सांगता येईल. जंघा भागावरील शिल्पाकृतींचा केवळ अंदाजच बांधावा लागेल.

काटोल येथील या दोन मंदिरांवरील शिल्पाकृती, वास्तुशास्त्रीय शैली, तलविन्यास. मंडोवर आणि शिखर यावरील अलंकरण आणि राजुरा येथील मंदिराशी असणारे साधर्म्य लक्षात घेता ही दोन्ही मंदिरे इ. स. च्या १३ व्या शतकात बांधली गेली असे दिसते.

**संगमेश्वर येथील मंदिरे** (ता. संगमेश्वर, जि. रत्नागिरी) : येथील सोमेश्वर आणि काशिविश्वेश्वर ही मंदिरे त्यांवर असलेल्या नागर शिखरांमुळे उल्लेखनीय आहेत. देवपाली मार्गावरून कार्तिकस्वामी मंदिराकडे जाताना बाजूच्या शेतांमध्ये ही मंदिरे असून ती एकमेकांना लागून आहेत. दोन्ही मंदिरे पूर्वाभिमुख असून नंतरच्या काळातील हेमाडपंती मंदिराप्रमाणे या मंदिरांनाही मुखमंडप नाही. त्याचप्रमाणे गूढमंडपाला पुढच्या बाजूला फक्त वामनभिंत आहे. वामनभिंत आणि वरचा

तुलापट्ट यांच्यामधील भाग जालवातायनांना असतात तशा जाळीदार दगडांनी झाकला आहे. ही जाळी जांभ्या दगडात घडवलेली आहे. नंतरच्या काळातील हेमाडपंती मंदिरांच्या वैशिष्ट्यानुसार मंडपाच्या बाजूच्या दोन भिंतींची जाडी मुखभागाजवळ ब-यापैकी पुढे आलेली असते आणि या जाडीच्या पृष्ठभागात प्रत्येकी एक देवकोष्ठ असते. म्हणजेच मंदिराच्या मंडपाच्या मुख भागावर दोन टोकांवरील कोप-यापुढे आलेले दोन भाग असून अशा प्रत्येक भागात एक अशी एकूण दोन देवकोष्ठे असतात. हे वैशिष्ट्य या दोन्ही मंदिरात आढळते. मात्र आज ही देवकोष्ठे रिकामी आहेत.

सोमेश्वर मंदिर जगतीवर उभे असून त्यात जाण्यासाठी पाय-या आहेत. मंडपाचे द्वार साधे असून त्याला ठळक स्तंभशाखा आहे. मात्र द्वारावर उत्तरांग नाही. मंडपावरील घुमटाकार छत आठ भित्तिसंगत स्तंभ आणि चार स्तंभ यावर पेललेले आहे. या चार स्तंभांपैकी दोन स्तंभ अंतरालात तर दोन वामनस्तंभ मंडपाच्या मुख-भागात आहेत. मंडपाच्या चार कोपऱ्यातील चार भित्तिसंगत-स्तंभांवरील शिल्पाकृती सोडल्या तर मंडपात कोणत्याही शिल्पाकृती नाहीत. या. चार शिल्पाकृती इतक्या झिजलेल्या आहेत की त्यांची सौंदर्यसमीक्षा अशक्य आहे. त्या बहुधा दिक्पालांच्या असाव्यात. अंतरालात बाजूच्या प्रत्येक भिंतीत देवकोष्ठाशिवाय काहीही उल्लेखनीय नाही. गर्भगृहाचे द्वारही मंडपाच्या द्वाराइतकेच साधे असून त्याच्या खालच्या अर्धांगावर प्रतीहारमूर्ती नाहीत. मात्र द्वारावर उत्तरांग असून त्यात तीन रथिका आहेत. त्यातील बाजूच्या दोन रथिकांवर नागर शिखरे तर मधील रथिकेवर वेसर शिखर आहे.

मंदिराच्या बाह्यांगाकडे पाहता त्याचा ''जगती'' भाग मातीखाली गाडला गेला असल्याने त्यावरील थरांची माहिती आजतरी देता येत नाही. पण मंडोवरावरील थरांप्रमाणेच हे थरही साधे सपाट असावेत असे वाटते. मंदिराचा मंडोवर - भाग आणि गर्भगृहावरील शिखर पूर्णतः साधे-सपाट आहे. गर्भगृहावरील शिखर लतिन-नागर प्रकारचे आहे.

काशीविश्वेश्वर मंदिर आकाराने काहीसे मोठे आहे. पण या दोन मंदिरांमध्ये फारच कमी आणि नगण्य फरक असल्याने या मंदिराचे वर्णन स्वतंत्रपणे दिलेले नाही.

## वेसर मंदिरे

दक्षिण आणि उत्तर भारतातील सर्वच शिल्पसंहिता मंदिर स्थापत्याच्या प्रादेशिक प्रकारांचे वर्णन करतात. हे मंदिर प्रकार गर्भगृहावर असलेल्या शिखराची धाटणी, जडणघडण आणि त्याचे दृश्य स्वरूप यावरून ठरत असत. नागर आणि द्राविड हे मंदिरप्रकार सुप्रसिद्धच आहेत. पण या प्रकारांबरोबरच शिल्पसंहितांमध्ये भूमिज,

वेसर, कलिंग आणि वराट याही मंदिर प्रकारांचा उल्लेख आहे. प्रो. स्टेला क्रॅमरिश यांनी केलेल्या महत्त्वपूर्ण आणि गौरवास्पद संशोधनामुळेच भूमिज मंदिरे नागर आणि द्राविड मंदिरांपासून वेगळी ओळखता येऊ लागली. परंतु वेसर मंदिराची म्हणजेच पर्यायाने वेसर शिखराची व्यवच्छेदक वैशिष्ट्ये काय असावीत यावर मात्र प्रदीर्घ वादंग झाले. बदामीच्या चालुक्यांच्या राजाश्रयाखालील ऐहोळी, बदामी आणि पट्टदकल येथील मंदिरांमध्ये वेसर प्रकारची वैशिष्ट्ये आहेत असा सर्वसाधारण समज होता. पण काही विद्वानांना हे मान्य नव्हते. कारण वेसर हा संस्कृत शब्द असून याचा अर्थ खेचर असा आहे. या नावावरूनच हा संकरित स्थापत्यप्रकार असावा असे दिसून येते. बहुधा हा प्रकार नागर आणि द्राविड या दोन वास्तुस्थापत्याचे मिश्रण असावे असाही विद्वानांचा होरा होता. दक्षिण भारतातील स्थपति परंपरेने वर्णिलेली नागर आणि द्राविड वास्तुस्थापत्याच्या तलविन्यासाची गृहीतके आणि वेसर प्रकाराबाबत असलेली समजुतीतील संदिग्धता यामुळे वेसर वास्तुस्थापत्याची व्यवच्छेदक लक्षणे कोणती याबाबत बरेच उलटसुलट मतप्रवाह होते. तथापि ढाकी या पुरातत्त्ववेत्याने १२ व्या व १३ व्या शतकातील कानडी शिलालेखांचा अभ्यास करून त्यातील काही शिलालेखांमध्ये काही स्थपतींनी त्यांना नागर, कलिंग, द्राविड आणि वेसर किंवा अन्य लेखात नागर, भूमिज आणि द्राविड स्थापत्यांचे साद्यंत ज्ञान आणि अनुभव असल्याचा दावा केल्याचे निदर्शनास आणून कल्याणीचे चालुक्य आणि द्वारसमुद्राचे होयसळ यांच्या राजाश्रयाखाली विकसित झालेल्या नंतरच्या काळातील कर्नाट शैलीतील मंदिरे वेसर मंदिरे म्हणून ओळखता येतील हे दाखवून दिले. नागर आणि द्राविड शैलीतील वास्तुघटकांच्या विशिष्ट प्रकारच्या संयोगातून इ.स.च्या पहिल्या सहस्त्रकाच्या अखेरीस वेसर शैली उदयाला आली असे दिसते.[८०]

सध्या आपण ज्याला महाराष्ट्र म्हणून ओळखतो त्या प्रदेशावर वर्चस्व असणाऱ्या चालुक्य राजांच्या आश्रयाखाली किंवा त्यांचे मांडलिक असलेल्या शिलाहार आणि यादव राजांच्या प्रदेशातही या शैलीचा प्रभाव पडून अनेक वेसर मंदिरे उभारण्यात आली असण्याची शक्यता असली तरीही आजमितीस फारच थोडी वेसर मंदिरे [८१] महाराष्ट्रात शिल्लक आहेत.

**सिन्नर येथील आयेश्वर मंदिर :** शिलालेखांमध्ये श्रीनगर किवा सिंदिनगर म्हणून उल्लेखिलेले आजचे सिन्नर त्या काळात व्यापारउदीमाने भरभराटीला आलेले एक शहर होते. हे शहर यादवांचे राजधानीचे शहर होते. नंतर यादवांनी त्यांची राजधानी देवगिरी येथे हलविली. आजही या गावात अनेक मंदिरे व मंदिरांचे अवशेष एकेकाळच्या वैभवाची साक्ष देत टिकून आहेत. पण यातील गोंदेश्वर मंदिर आणि आयेश्वर मंदिर ही दोनच मंदिरे उल्लेखनीय आहेत. बहुधा ही दोन्ही मंदिरे राजाश्रयातूनच निर्मिली गेली असावीत. यातील गोंदेश्वर मंदिर भूमिज प्रकारचे

तर आयेश्वर मंदिर वेसर प्रकारचे आहे. आयेश्वर मंदिर सध्याच्या गावाच्या सीमेजवळ एका छोटया ओढयाच्या तीरावर आहे. मंदिर पूर्वाभिमुख आहे. मंदिराभोवती पूर्वी दगडी सीमाभिंतही असावी असा अंदाज आहे. मंडपावरील छप्पर पूर्णतः नष्ट झाले आहे . तर गर्भगृहावरील छप्पर काही प्रमाणात शिल्लक आहे. मुखमंडप, मंडप, अंतराल आणि गर्भगृह असा या मंदिराचा तलविन्यास आहे. मंदिराच्या मंडपाची अचूक मोजमापे या घडीला ज्ञात नसली तरी त्याची काही वास्तुशास्त्रीय वैशिष्टये उल्लेखनीय असून ती खालीलप्रमाणे आहेत.

१) अंतरालाच्या कमानीवर असलेले नृत्य करणाऱ्या शिवाचे शिल्प,

२) त्याच कमानीवर असलेले लक्ष्मीचे शिल्प आणि गर्भगृहाच्या द्वारावरील ललाटावर कोरलेल्या सप्तमातृकांच्या मूर्ती,

३) अंतरालाच्या छतावर दाखविण्यात आलेले अष्टदिक्पाल,

४) उत्तरचालुक्यकालीन मंदिरात आढळणाऱ्या स्तंभासारखेच मंडपाचे स्तंभ,

५) गर्भगृहाच्या बाह्यांगावर नंतरच्या काळातील कर्नाट शैलीचे अर्धस्तंभ आहेत.

या सर्व वैशिष्टयांमुळे हे मंदिर ११ व्या शतकाच्या शेवटच्या चतुर्थकात दुसऱ्या सेऊणचंद्राचा मुलगा परमदेव याने बांधले असावे असे तज्ञांचे मत झाले. त्यामुळे या मंदिराची शैली कर्नाटकातील मंदिरांशी मिळतीजुळती असावी असा त्यांचा समज झाला. परिणामतः हे मंदिर स्थानिक शिल्पींची कलाकृती असूनही त्याला "उत्तर चालुक्यकालीन" असे कालवाचक विशेषण प्राप्त झाले. या मंदिरातील स्तंभावर कीचकहस्त आहेत. हे वैशिष्टय गुजरातमधील त्याच काळात प्रचलित असलेल्या सोळंकी स्थापत्यशैलीतून आलेले आहे.

या मंदिराची तीन वैशिष्टये आपण अधिक लक्षपूर्वक अभ्यासली पाहिजेत. पहिले वैशिष्टये म्हणजे या मंदिराच्या गर्भगृहाचे पीठ अंबरनाथ, बलसाणे आणि सिन्नरमध्येच असलेले गोंदेश्वर मंदिर या भूमिज प्रकारच्या मंदिरांच्या पीठ किंवा महापीठापेक्षा कर्नाट मंदिरांच्या पीठांशी अधिक मिळतेजुळते आहे. दुसरे वैशिष्टय म्हणजे गर्भगृहाच्या बाह्यांगावर असलेले अर्धस्तंभ आणि दोन अर्धस्तंभांच्या मध्ये असलेले मंजरींचे अलंकरण. तिसरे वैशिष्टय म्हणजे गर्भगृहाच्या भद्रांवरील कपोतालीच्या वरच्या विमानभागावर शूरसेनकाऐवजी येणारे शालाशिखर. दुर्दैवाने आज शिखराचा मुख्य भाग शिल्लक नाही. तो जर शिल्लक असता तर महाराष्ट्रातील सुरुवातीच्या वेसर मंदिरांचा आणि याच काळातील उत्तर कर्नाटकातील वेसर मंदिरांचा तौलनिक अभ्यास होऊ शकला असता.

**पाटणे येथील देवी मंदिराचे उप-आयतन :** पाटणे येथील देवी मंदिर वास्तुशास्त्राच्या विद्यार्थ्यांच्या दृष्टीने अनेक कारणांसाठी अत्यंत महत्त्वाचे आहे. गेल्या शतकात या मंदिराचा बऱ्यापैकी जीर्णोद्धार आणि दुरुस्ती झालेली असली तरी हे मंदिर मूळात मध्यभागी सर्व आयतनांना सामायिक असलेला एकच लंबचौकोनाकृती मंडप, मंडपाच्या मागच्याबाजूस मंडपाला लागून असलेली तीन आयतने आणि मंडपाच्या दोन टोकांना एकमेकांना सन्मुख असलेली दोन आयतने असा तलविन्यास असलेले पंचायतन प्रकारचे मंदिर असावे असा अंदाज करता येतो. पण आज फक्त चार आयतने शिल्लक आहेत. या मंदिराच्या आयतनांना वेगवेगळया प्रकारची शिखरे आहेत. एका ओळीत असलेल्या पश्चिमाभिमुख आयतनातील मध्यभागी असलेल्या आयतनावर फांसना प्रकारचे शिखर आहे. उत्तराभिमुख आयतनावर वेसर शिखर असावे असे मानण्यास जागा आहे.

सामायिक मंडपाला लागून असलेले अंतराल व गर्भगृह यांनी युक्त असलेल्या वेसर प्रकारचे उत्तराभिमुख आयतन आज रिकामे आहे. आयतनाची बाह्य रेषा, भिंतीचे बाह्यांग आणि कपोतालीवरील वास्तुघटक मूळचेच आहेत. कपोतालीवर शाला-शिखराचे अवशेष असून त्याच्या दोन्ही कडांना विभागलेली चैत्य-कमान आहे. ही विभाजित चैत्यकमान मकरमुखाने अलंकृत केली आहे. हा पुरावा या मंदिरावर नागर किंवा भूमिज शिखर नव्हते आणि या आयतनावरील शिखर नंतरच्या काळातील कर्नाटक मंदिरांवरील शिखराप्रमाणे होते असा अंदाज बांधण्यास पुरेसा आहे.

**किन्ही येथील मंदिरे** (ता. मालेगाव, जि. अकोला)**:** किन्ही येथे तीन मंदिरे असून यातील एक मंदिर वेसर प्रकारचे आहे. हे मंदिर-संकुल गावाच्या टोकाला असून ते चांगल्या स्थितीत नाही. पण ही सर्व मंदिरे एकाच प्रकारे बांधण्यात आली आहेत. या मंदिरांची शिखरे विटांनी बांधलेली असून इतर भाग दगडात बांधलेला आहे. यापैकी फक्त एकाच मंदिरावरील शिखर आज शिल्लक असून ते आजही उत्तम स्थितीत आहे. ते दक्षिण कर्नाटकातील होयसळ मंदिरांवरील शिखरांशी मिळतेजुळते आहे. मंदिर पूर्वाभिमुख असून तीन बाजूंना तीन प्रवेशद्वारे असलेला मंडप (२.२५ चौ. मी.),अंतराल(१.६० मीटर x १.२० मीटर)आणि गर्भगृह(१.६० चौ. मी.) असा या मंदिराचा तलविन्यास आहे. मंडपाला मुखमंडप अथवा अर्धमंडप नाहीत. गर्भगृहात मुख्य मूर्ती ठेवण्याकरिता मागील भिंतीत पदस्थल (Pedestal) आहे. मंदिराच्या गर्भगृहाचे, अंतरालाचे आणि मंडपाचे बाह्यांग साधे सपाट आहे. याला अपवाद म्हणजे सलिलांतरात येणाऱ्या मंजरी. मंडपाच्या मध्यभागी चतुष्की आहे. मंडपाचे मुख्य पूर्वाभिमुख प्रवेशद्वार पंचशाखा प्रकारचे असून बाजूची दोन द्वारे साधी आहेत. गर्भगृहाचा तलविन्यास पंचरथ आहे. शिखर आणि शिल्पाच्या वैशिष्ट्यांवरून हे मंदिर इ. स. १३ व्या शतकाच्या उत्तरार्धात बांधले गेले असावे.

# भूमिज मंदिरे

हेन्री कझिन्सने त्याच्या **मिडीव्हल टेंपल्स ऑफ द डेक्कन** या ग्रंथात महाराष्ट्रातील मंदिरांबाबतची काही निरीक्षणे नमूद केली आहेत. त्यापैकी महाराष्ट्रातील बहुसंख्य मंदिरांवरील शिखरे पडून गेली आहेत हे एक सगळयात धक्कादायक निरीक्षण आहे. त्याच्या कारणमीमांसेचा शोध घेताना स्थानिक प्रस्तर लेणी खोदण्याकरता उपयुक्त आहे, पण मोठया व मध्यम आकाराच्या तुळया आणि स्तंभ बनवण्याकरता तो निरुपयोगी आहे या वस्तुस्थितीकडे त्याने लक्ष वेधले आहे. कदाचित याच कारणामुळे मंदिर बांधून पूर्ण झाल्यानंतर अगदी अल्पावधीतच मंडपाच्या तुळयांना आधार द्यावा लागलेला दिसून येतो. स्थानिक प्रस्तराच्या वजन धारण करण्याच्या अक्षमतेमुळे काही स्थपतींनी गर्भगृहांवर विटांची शिखरे बांधली. भूमिज प्रकारचे शिखर असलेल्या मंदिरांमध्ये अशी विटांची शिखरे असलेली बरीच मंदिरे आढळतात. या अशा प्रकारच्या शिखरांची रचना पाहता ही मंदिराची मूळ शिखरेच होती. दगडी शिखर पडल्यानंतर किंवा दगडी शिखर दूर करून त्याजागी नंतर बांधलेले विटांचे शिखर असे त्यांचे स्वरूप नाही हे अगदी स्पष्टपणे लक्षात येते. विटांनी हे शिखर बांधताना त्यात कोणकोणते बदल घडून आले हे पाहणे महत्त्वाचे असल्यामुळे भूमिज मंदिरांचे विवेचन अ) प्रस्तरशिखर असलेली भूमिज मंदिरे आणि ब) विटांचे शिखर असलेली भूमिज मंदिरे अशा दोन भागात केले आहे.

**प्रस्तरशिखर असलेली भूमिज मंदिरे :**

**अंबरनाथ येथील शिवमंदिर :** (ता. अंबरनाथ, जि. ठाणे) या मंदिराचे स्थापत्य वैशिष्ट्याव्यतिरिक्तही अत्यंत महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे मंदिरावर एक शिलालेख असून त्यात मंदिराचे बांधकाम ठाणे येथील शिलाहार राजा मुम्मुणिराज याच्या कारकिर्दीत शक संवत् ९८२ (सन १० जुलै १०६० ) रोजी पूर्ण झाले असा उल्लेख आहे. हा शक संवत्सराचा उल्लेख अत्यंत महत्त्वाचा आहे. कारण भूमिज प्रकारातील सर्वात प्राचीन मानले जाणारे माळव्यातील उदयपूर येथील उदयेश्वर मंदिर साधारणपणे याच सुमारास, म्हणजे इ. स. १०६९ मध्ये बांधले गेले. मात्र त्या देवळातील पूजाअर्चा वगैरे धार्मिक विधींना सुरुवात इ. स. १०८० मध्ये झाली. त्यामुळे या दृष्टिकोनातून अंबरनाथ येथील शिवमंदिर उदयेश्वर मंदिरापेक्षा प्राचीन आहे असे वाटते.

शिलालेखामध्ये मंदिराचा उल्लेख, ''श्री अंबरनाथ देवकुल'' असा करण्यात आला असून त्या मंदिरावरूनच या गावाला आणि पर्यायाने रेल्वे स्थानकाला ''अंबरनाथ'' हे नाव पडले. हे मंदिर मुंबई-पुणे लोहमार्गावरील अंबरनाथ स्थानकापासून दोन कि. मी. अंतरावर असून त्या भोवती त्याच काळात बांधलेली सीमाभिंत आहे. मंदिर पश्चिमाभिमुख असून दोन अर्धमंडप आणि एक मुखमंडप

असलेला मंडप, त्याच्या मागे अंतराल आणि गर्भगृह असा त्याचा तलविन्यास आहे. येथे स्वयंभू शिवलिंग असल्याने या जागीच मंदिर उभारण्यात आल्यामुळे गर्भगृहाच्या जमिनीची पातळी मंदिराच्या अन्य भागातील जमिनीच्या पातळीपेक्षा बरीच खाली असून गर्भगृहात काही पायऱ्या उतरूनच प्रवेश करावा लागतो.

शिल्पसंहितांनुसार भूमिज मंदिरे पुढीलप्रमाणे तीन प्रकारची असतात- चतुरस्त्र, वृत्तसंस्थानक आणि अष्टशाल हे तीन प्रकार होत. अष्टशाल या प्रकारात गर्भगृहाला आठ भद्र असतात. अंबरनाथ मंदिराचा तलविन्यास तारकाकृती आहे. मंडप आणि गर्भगृहाच्या बाह्यरेषा एकमेकांना कोपऱ्यात छेदणाऱ्या चौरसासारख्या आहेत.

मंदिर विस्तीर्ण पीठावर उभे आहे. सध्याच्या जमिनीच्या पातळीच्या वर कुंभ, अंतरपत्र, ग्रासपट्टी, गजथर आणि नरथर असे पीठाचे थर आहेत. त्यामुळे हे पीठ साध्या पीठापेक्षा अधिक अलंकृत आहे असे म्हणता येते. पीठाच्या विविध आडव्या थरांवर गुजरातमधील कलेचा प्रभाव दिसून येतो.

पीठाच्या वर मंडोवर असून यात तवंगानी अलंकृत केलेला कुंभ भागाचा मधूनमधून देवमूर्ती असलेला पट्ट, अंतरपत्र, कपोताली इत्यादी भाग आहे. त्यावर जंघा, उद्गम, भरणी, शिरावटी, मंचिका, कपोताली आणि छाद्य आहेत. त्यावर गर्भगृहावरील शिखराला सुरुवात होते.

मंदिराचा तलविन्यास आधीच नमूद केल्याप्रमाणे तारकाकृती आहे. त्याची परिणती गर्भगृह आणि मंडपाच्या बाह्यांगावर अंगे आणि सलिलांतरे येण्यात झाली आहे. परिणामी पुढे आलेल्या स्तंभाच्या दोन उपलब्ध बाजूंवर मूर्तींची जोडी आहे आणि गर्भगृहाच्या तीन मुख्य भद्रांवर रथिका आहेत. भूमिज मंदिरांमध्ये सर्वच भद्र आणि अंगभागावर मूळ शिखराची प्रतिकृती असलेली लघुशिखरे असतात. त्यामुळे कपोतालीवर अशा लघुशिखरांची एक ओळच निर्माण होते आणि त्यातून प्रकाश आणि सावलीचा एक सुंदर आविष्कार तयार होतो. या मंदिरावरही अर्थातच ह्या छायाप्रकाशलीलेचे सुखद दर्शन घडते. हे शिवमंदिर असल्याने ह्या मंदिराच्या स्तंभाच्या बाह्यांगावरील मुख्य देव शिवपरिवारातीलच आहेत. अंतरालाच्या बाह्यांगावर गणेश आणि चंडिका आहेत गर्भगृहाच्या बाजूच्या दोन भद्रांवर महाकाली आणि गजासुरसंहारमूर्ती आहेत. गर्भगृहाच्या मागील बाजूच्या भद्रावर हरि-हर-पितामहार्क आहे.

या मंदिरावर दाखविण्यात आलेली शिवाची उल्लेखनीय स्वरूपे म्हणजे मार्कंडेयानुग्रह, कल्याणसुंदर आणि लिंगोद्भव शिव. विष्णूचे काही अवतार आणि रूपेही मंदिराच्या भिंतीवर दाखविण्यात आली आहेत. मंदिराच्या कोणांवर दिक्पाल दाखविले आहेत. ब्रह्मदेवाला या मंदिरात विशेष महत्त्व देण्यात आले आहे. मंडपाच्या नैर्ऋत्य कोपऱ्यात ब्रह्मदेवाचे एक लहानसे मंदिर आहे.

मंदिराच्या मंडपात चौरस रंगशिला असून त्यावर चतुष्की आहे. या चार स्तंभांवर घुमटाकार छत पेलले आहे. या छताच्या खालच्या भागापासून उत्तरोत्तर लहान होत जाणारी वर्तुळे आहेत. सर्वात वर कमळाचा आकार कोरला आहे. त्यामुळे हे घुमटाकार छत उलट्या कमलपुष्पासारखे भासते. मात्र चतुष्कीच्या चार बाजूंच्या चार भागांवर मात्र बाह्य भागाकडे निमुळती होत जाणारी छते आहेत. ही छते रंगशिलेवरील छताच्या तुलनेत कमी अलंकृत आहेत. मंडपातील आणि अर्धमंडपातील स्तंभही उल्लेखनीय आहेत. ह्या दोन प्रकारच्या स्तंभांवर येणारे घटक आणि त्यांचा क्रम सारखाच आहे. हे स्तंभ गुजरातमधील त्याच काळात बांधल्या गेलेल्या सोळंकी मंदिरांमधील स्तंभाशी मिळतेजुळते आहेत. या स्तंभांचे तळखडे चौरस असून त्यावर तीन अष्टकोनी घटक, त्यावर वर्तुळाकार घटक, वर पीठाकृती शीर्ष आणि त्यावर कीचकहस्त आहेत. स्तंभांमधील खांब आणि अष्टकोनी घटकही पुराणकथांशी संबंधित असलेल्या मूर्तिशिल्पांनी युक्त आहेत. अर्धमंडपातील स्तंभांवर मात्र कीचकहस्तांऐवजी साधे नागशीर्ष हस्त आहेत.

अंबरनाथ हे जरी महाराष्ट्रातील सर्वात प्राचीन भूमिज मंदिर असले तरी या मंदिराला त्याची स्वतःची अशी खास वैशिष्ट्ये आहेत. या वैशिष्ट्यांमुळे ते माळव्यातील उदयेश्वर मंदिरासारख्या सर्वसाधारण भूमिज मंदिरापेक्षा काही अंशी भिन्न आहे. मंदिराचा तलविन्यास सप्तरथ असून त्याचे शिखर सात मजली आहे (सप्तभूज भूमिज प्रासाद). ह्या भूमी किंवा मजले बहुतेकवेळा मुख्य शिखरावरील उत्सेधात्मक सात शिखरप्रतिकृतींनी म्हणजे एकावर एक अशा सात प्रतिकृतींच्या रांगांनी सूचित केले जातात. या शिखर प्रतिकृतींच्या रांगा मुख्य शिखरावरील चार लतांच्या मधल्या भागात असतात. या चार मुख्य दिशांना असणाऱ्या लता चैत्यगवाक्ष - प्रयोजनांनी अलंकृत केल्या जातात. अंबरनाथ मंदिरावर असलेल्या शिखरप्रतिकृती मात्र मुख्य शिखराच्या प्रतिकृती नाहीत. त्या दाक्षिणात्य (द्राविड) पद्धतीची शाला, शिखरे आहेत. त्यांना शिल्पशास्त्रांच्या तांत्रिक भाषेत स्तंभकूट संबोधले जाते. मंडपावर चौकोनी, शंक्वाकृती शिखराऐवजी घंटासंवरण प्रकारचे शिखर आहे. शिल्प-संहितांमध्ये ''द्राविडकर्म'' या प्रकारचे वास्तु-अलंकरण सांगितले आहे. कृष्णदेवांच्या मते अशा प्रकारच्या शिखर-रचना करणे म्हणजेच द्राविडकर्म असावे. तसे असल्यास अंबरनाथचे मंदिर या प्रकारचे अलंकरण असलेले महाराष्ट्रातील पहिले मंदिर होय.

**बलसाणे येथील मंदिरे** (ता. पिंपळगाव, जि. धुळे) : धुळे जिल्ह्यातील बलसाणे येथील मंदिर क्र. ४ व मंदिर क्रमांक १ ही मंदिरे भूमिज मंदिरे आहेत. या मंदिरांची शिखरे पूर्णतः अस्तित्वात नसली तरी काही प्रमाणात शिल्लक आहेत. ही दोन्ही मंदिरे साधारणपणे एकाच काळातील म्हणजे इ. स. ११ व्या शतकाच्या उत्तरार्धातील आहेत. या दोन मंदिरांमध्ये एकच महत्त्वाचा फरक आहे आणि तो म्हणजे क्रमांक

४ चे मंदिर एकच गर्भगृह असलेले आहे तर क्रमांक १ चे मंदिर त्रिदल प्रकारचे किंवा तीन गर्भगृहे असलेले आहे.

**मंदिर क्रमांक १ :** पश्चिमाभिमुख असलेले हे मंदिर आकाराने अंबरनाथ मंदिरापेक्षा लहान असले तरी त्याचे अंबरनाथ मंदिराशी बऱ्यापैकी साधर्म्य आहे. बाजूच्या दोन अर्धमंडपांऐवजी त्या जागी दोन गर्भगृहे आहेत. सर्व म्हणजे तिन्ही गर्भगृहांचा तलविन्यास पंचरथ प्रकारचा आहे. मुखमंडप, चौरस मंडप (५.१८-मीटर x ५.१८ मीटर ), चौरसमंडपाला लागून तीन अंतराळे आणि त्यांच्यामागे गर्भगृहे असा मंदिराचा एकूण तलविन्यास आहे. बाजूच्या दोन गर्भगृहांची अंतराले मुख्य गर्भगृहाच्या अंतराळच्या तुलनेत आकाराने लहान आहेत. मुख्य गर्भगृहात शिवलिंग आहे. इतर दोन गर्भगृहांच्या द्वारशाखेवरील मूर्ती आणि उत्तरांगावरील मूर्ती विचारात घेता ही गर्भगृहे विष्णु आणि शक्तीच्या स्वरूपाची असावीत असे दिसते. या मंदिराचे एक उल्लेखनीय वैशिष्ट्य म्हणजे मुख्य गर्भगृहाच्या मागील भिंतीत असलेले देवकोष्ठ . हे मंदिर शिवाचे असल्यामुळे या देवकोष्ठात शिवमूर्ती असावी.

मंडपामध्ये चतुष्की असून या चतुष्कीवर घुमटाकार छत आहे. या घुमटात उत्तरोत्तर लहान होत जाणारी केंद्रगामी वर्तुळे आहेत. स्तंभ अंबरनाथ मंदिराच्या स्तंभांसारखेच आहेत. चौरसाकृती तळखडा, चौरसाकृती खांब त्यावर अष्टकोनी व वर्तुळाकृती घटक आणि वर पीठाकृती शीर्ष आणि त्याच्याही वर कीचकहस्त असे त्यांचे स्वरूप आहे.

गजथराचा अभाव ही बाब सोडली तर पीठ अंबरनाथ मंदिराच्या पीठासारखेच आहे. जंघाभागावर नटेश्वर, भैरव, दुर्गा, नरसिंह, त्रिविक्रम आणि पार्वती यांच्या मूर्ती आहेत. या मूर्तीमुळे बाजूच्या दोन गर्भगृहांमध्ये विष्णू आणि शक्तीच्या प्रतिमा असाव्यात या अंदाजास पुष्टी मिळते. मुख्य गर्भगृहावर चार बाजूस चार लतापट्ट असलेले भूमिज शिखर आहे. शिखराच्या पायाजवळ तीन बाजूस तीन शूरसेनक आहेत. मात्र एका बाबतीत हे शिखर अंबरनाथ शिखरापेक्षा थोडे वेगळे आहे. ते असे की, या शिखरावरील शिखरप्रतिकृती ह्या मुख्य शिखराच्याच प्रतिकृती आहेत आणि मधूनमधून मनुष्याकृती दाखविल्या आहेत.

**झोडगे येथील शिवमंदिर** (ता. मालेगाव, जि. नाशिक) : माणकेश्वर मंदिर म्हणून ओळखले जाणारे हे मंदिर भूमिज प्रासादाचा एक सुंदर नमुना आहे. या मंदिराचा तलविन्यास सिन्नर येथील गोंदेश्वर मंदिराच्या तलविन्यासाशी मिळताजुळता आहे. ह्या दोन मंदिरांमध्ये असलेला एकमेव फरक म्हणजे गोंदेश्वर मंदिर एकदल मंदिर आहे तर हे मंदिर त्रिदल प्रकारचे आहे. परंतु बाजूची दोन गर्भगृहे मुख्य मंदिराच्या निर्मितीनंतर ५० वर्षांनी किंवा त्याहूनही जास्त काळ लोटल्यानंतर बनविण्यात आली

आहेत हे प्रथमदर्शनीच लक्षात येते. मंदिर पश्चिमाभिमुख असून त्यासमोर सध्या नंदीचा चौथरा आहे. वामनभिंती असलेला मुखमंडप, बिनखांबी मंडप, अंतराल आणि गर्भगृहे असा हया मंदिराचा तलविन्यास आहे. मुख्य गर्भगृह मंदिराच्या पूर्वभागात असून दक्षिण व उत्तर भागात बाकीची दोन गर्भगृहे आहेत. बाजूच्या गर्भगृहांची अंतराले मुख्य गर्भगृहाच्या अंतरालाच्या तुलनेत आकाराने लहान आहेत.

मंदिराचा तलविन्यास पंचरथ प्रकारचा असून हे मंदिर सप्तभूम भूमिज प्रासाद आहे. शिखराच्या पुढच्या भागावर शुकनास आहे. मंडपावर चौकोनी शंक्वाकृती संवरण शिखर होते. बाजूच्या दोन गर्भगृहावरही भूमिज प्रकारचे, बहुधा पंचभूम प्रकारचे शिखर असावे.बाजूच्या दोन्ही गर्भगृहांच्या बाह्यांगावर कोणतेही मूर्तिशिल्प नाही. त्याचप्रमाणे या बाजूच्या गर्भगृहांमध्ये ज्या मूर्ती बसविण्यात आल्या होत्या त्याही आज अस्तित्वात नाहीत. मुखमंडपावरील छप्परही आज शिल्लक नाही.

या मंदिराला सिन्नर येथील गोंदेश्वर मंदिरासारखी भव्यता नसली, अंतर्भागात मोठया प्रमाणावर अलंकरण नसले, तरीही या मंदिराची खास उल्लेखनीय वैशिष्ट्ये, आहेत. पीठ आणि मंडोवराची रचना व जडणघडण इतर भूमिज मंदिरांसारखीच आहे. तथापि ती गोंदेश्वर मंदिराच्या पीठ आणि मंडोवराइतकी उत्कृष्ट नाही. परंतु मंदिराच्या गर्भगृहाचा आणि अंतरालाचा जंघा-भाग मात्र मूर्तिशिल्पांनी नटला आहे. शिल्पसंहितांनुसार पश्चिम भारतात चार जंघाप्रकार प्रचलित होते आणि या मंदिराची जंघा "लाटी" या प्रकारची आहे. महत्त्वपूर्ण शिल्पमूर्तींमध्ये भद्रावरील देवकोष्ठात असलेले शिवाचे एक स्वरूप, अंतरालावरील शैव देवता आणि कोणावरील अष्टदिक्पालांचा समावेश होतो. त्याचप्रमाणे आमलकाखाली चार कीर्तिमुखांच्यामध्ये असलेल्या देवमूर्तीही उल्लेखनीय आहेत. चार बाजूंना असलेल्या चार लतांच्या दोन्ही बाजूस शिखरांनी युक्त असलेले उर्ध्वगामी पट्ट आहेत.

आधीच उल्लेख केल्याप्रमाणे मंडप बिनखांबी (astyler) असून मधल्या भागात रंगशिला आहे. रंगशिलेवर असलेल्या घुमटाकार छताला आधार देण्यासाठी रंगशिलेला चतुष्की नाही. म्हणून हा संपूर्ण मंडप चार द्वारांच्या दुतर्फा असलेल्या एकूण आठ अर्धस्तंभांवर पेलला गेला आहे. मंडपाच्या चारी द्वारांच्या दुतर्फा असलेल्या अर्धस्तंभालगत जे स्तंभ (प्रत्येक द्वारास दोन स्तंभ ) आज दिसतात ते नंतर म्हणजे अर्धमंडपांचे गर्भगृहात रुपांतर करण्याच्या वेळी बसविण्यात आले असावेत. स्तंभ जरी मूर्तिशिल्पांनी भरगच्चपणे अलंकृत केलेले नसले तरीसुद्धा त्यांचे सर्वसाधारण स्वरूप सिन्नर येथील गोंदेश्वर मंदिरातील स्तंभाप्रमाणेच आहे.

मंडपातील चौरस अर्धस्तंभांवर नागशीर्षहस्त आहेत. मुखमंडपातील स्तंभ किंचितसे निराळे आहेत. चौरसाकृती तळखड्यावर सुरसुंदरींची मूर्तिशिल्पे असलेला अष्टकोनी खांब, त्यावर पूर्णघट, त्यावर वर्तुळाकृती घटक, त्यावर पीठाकृती शीर्ष

आणि त्यावर कीचकहस्त असे त्याचे स्वरूप आहे. वर वर्णन केलेल्या वास्तुशास्त्रीय आणि शिल्प वैशिष्ट्यांचा विचार करता हे मंदिर ख्रिस्तोत्तर बाराव्या शतकाच्या मध्यात बांधले गेले असावे असे दिसते.

**सिन्नर येथील गोंदेश्वर मंदिर :** पूर्वाभिमुख असलेले हे मंदिर महाराष्ट्रातील भूमिज मंदिरांमधील सर्वात सुंदर मंदिर आहे. मंदिरास विशाल आवार, त्याभोवती सीमाभिंत व मंदिराभोवती नागर प्रकारची चार उप-आयतने आहेत. मंदिरासमोर नंदिमंडप असून हा नंदिमंडपही एखाद्या उप-आयतनासारखा दिसतो.

मंदिराचा तलविन्यास सप्तरथ प्रकारचा असून ते सप्तभूम प्रासाद आहे. मुखमंडप आणि बाजूचे दोन अर्धमंडप असलेला मंडप, अंतराल आणि गर्भगृह अशी मंदिराची रचना आहे. उंच पीठावर गजथर उंचीवर असल्याने तो बऱ्यापैकी बाहेर आलेला आहे. त्याचा निर्गम मोठा आहे. मंडप आणि गर्भगृहाचे उत्सेधात्मक थर पुढीलप्रमाणे आहेत- तळाशी चौकटची आणि गोलकाची नक्षी असलेले खुर, त्यावर जाड्यकुंभ, जाड्यकुंभानंतर मंडोवराला सुरुवात होते. त्यात कुंभ, कपोताली आणि छाद्याचा समावेश होतो. या पातळीच्या वर मंडपाचे छत आणि गर्भगृहावरील शिखर आहे. मंडपावरील छप्पर संवरणा प्रकारचे आहे, तर गर्भगृहावर सप्तभूम शिखर आहे. या मंदिराचे एक महत्त्वाचे वैशिष्टय म्हणजे त्याच्या जंघाभागावर कोण, भद्र आणि तवंगांवरील मूर्तिशिल्पांचा अपवाद वगळला तर एकही मूर्तिशिल्प नाही. सलिलांतरांवर मंजरीयुक्त अर्धस्तंभ आहेत ही बाबही लक्षात घेण्याजोगी आहे. त्यामुळे या मंदिराची जंघा ''द्राविडी जंघा'' या प्रकारात मोडते असे म्हणता येईल. तिन्ही अर्धमंडपांच्या तळाशी एकाच प्रकारचे आडवे थर आहेत आणि त्यावर वेदिका, आसनपट्ट आणि कक्षासन आहेत. वेदिकेवर कूटस्तंभांचे अलंकरण असून मधल्या भागात सुरसुंदरी दाखविण्यात आल्या आहेत. आसनपट्टांवर द्रविड शिखरांचे नमुने कोरलेले असून कक्षासनांवर पुराणकथांमधील दृश्ये कोरलेली आहेत. आसनपट्टांवर अर्धमंडपांचे छत पेलणारे वामनस्तंभ आहेत. ही छप्परे नंदीमंडपावरील छप्परांप्रमाणेच दाक्षिणात्य प्रकारची, बहुधा वेसर प्रकारची आहेत.

मंडपाचा तलविन्यास चौरस आहे आणि मंडप आठ अर्धस्तंभ, कोपऱ्यातील चार चतुर्थक स्तंभ, आणि मधल्या चतुष्कीचे चार स्तंभ यांवर पेलला गेला आहे. मधल्या चतुष्कीवर घुमटाकार छत असून त्यात उत्तरोत्तर लहान होत जाणारे वर्तुळाकार भाग आहेत. घुमटाच्या केंद्रस्थानी कमळाची नक्षी आहे. मध्यचौरसाच्या बाजूच्या पाखांवर उतरत्या आकाराची छते आहेत. द्वार अत्यंत नक्षीदार असून ते पंचशाख पद्धतीचे आहे. या शाखांवर आतल्या बाजूने पद्मलता, पद्म, अर्धस्तंभ, चौकट आणि गोलक यांच्या नक्षी आहे. उंबऱ्याच्या पातळीवर निधी दाखवले असून द्वारशाखांवर प्रतीहार आणि चामरधारिणी आहेत. द्वारावरील उत्तरांगावर पाच लहान आकाराची देवळे दाखविली असून त्यात व मंदिरांच्या मधल्या भागात चार

अशा एकूण नऊ देवतामूर्ती आहेत. या उत्तरांगावरील लहान देवळांच्या शिखरांच्या मधल्या भागात गजमुंडांचे अलंकरण आहे. सभामंडपातील आणि सभामंडपाबाहेरील स्तंभही उल्लेखनीय आहेत. या स्तंभाच्या प्रत्येक बाजूवर पाच पुढे आलेले भाग (पंचांगस्तंभ) आहेत. चौरस तलविन्यास असलेल्या या स्तंभावर दोन मूर्तिशिल्पांचे आणि दोन भौमितिक आणि पुष्पाकृतींचे पट्ट आहेत त्यावर शीर्ष आणि नागशीर्षहस्त आहेत. या स्तंभांवर येणाऱ्या घटकांचा क्रम अंबरनाथ मंदिरातील स्तंभांवरील घटकांसारखाच असला तरी त्यांची निर्माणशैली निराळी आहे. म्हणूनच हे स्तंभ अंबरनाथ मंदिराचे स्तंभ वाटतात तसे सोळंकी स्तंभांची नक्कल वाटत नाहीत.

या मंदिरातील मूर्तियोजना मर्यादित आहे. मुख्य मंदिर शिवाचे असून गर्भगृहाच्या प्रवेशद्वारावर शैव द्वारपाल आहेत आणि मंदिरासमोर नंदिमंडप आहे. मंडपाच्या कोणांवर अष्टदिक्पाल त्यांच्या शक्तींसह दाखवले आहेत. भद्रांवरील देवकोष्ठे आज रिकामी असली तरी खाली असलेल्या कुंभ भागांमध्ये आणि शुकनासेवर बाजूच्या भागातील लहान देवळ्यांमध्ये शैव देवता किंवा मूर्ती आहेत. प्रदक्षिणामार्गाने वाटचाल केली तर त्या क्रमाने मुख्य मंदिराच्या आग्नेयेला विष्णू, नैर्ऋत्येला गणेश, ईशान्येला पार्वती व वायव्येला सूर्याची उप-आयतने आहेत.

नंदीमंडप हा एखाद्या मंदिरासारखाच असून त्यावर चौकोनी शंक्वाकृती शिखर आहे. मंडप पश्चिमाभिमुख असून त्यात जाण्यासाठी पायऱ्यांची योजना आहे. मंडपाचा उत्सेध पीठापासून कपोतालीपर्यंत अगदी मुख्य मंदिराच्या तिन्ही बाजूस असणाऱ्या अर्धमंडपाप्रमाणे आहे. अर्धमंडपांप्रमाणेच नंदीमंडपावरही वेदिका आणि कक्षासनाची योजना असल्याने त्याच्या चारी बाजूंना भिंती नाहीत. नंदीमंडप "खुलामंडप" या सदरात मोडतो.

मंदिराचा तलविन्यास, अर्धमंडपांचा उत्सेध, निरनिराळया प्रकारची छपरे आणि पंचायतनामध्ये नागर, भूमिज आणि वेसर या तिन्ही प्रकारच्या शिखरांचा केलेला समावेश यासारख्या वास्तुशास्त्रीय वैशिष्ट्यांवरून आणि मूर्ती, फुलांची नक्षी आणि भौमितिक आकारांच्या नक्षीशिल्पांवरून हे मंदिर इ. स. च्या १२ व्या शतकाच्या मध्यात बांधले गेले असावे असे म्हणता येईल. या मंदिराची संकल्पना आणि भव्यता लक्षात घेता आयेश्वर मंदिराप्रमाणेच हेही मंदिर राजाश्रयाखाली किंवा राजानेच बांधले असावे. या मंदिराचे नाव गोंदेश्वर असल्यामुळे पहिल्या मल्लुगीचा (इ. स. ११४५ ते ११६५) पुत्र यादव राजपुत्र गोविंद याच्या नावे हे मंदिर बांधले असण्याची दाट शक्यता आहे.

**खिद्रापूर येथील कोप्पेश्वर मंदिर** (ता. शिरोळा, जि. कोल्हापूर): कोल्हापूर येथील महालक्ष्मी मंदिराप्रमाणेच कोल्हापूरच्या आग्नेयेला ६५ कि. मी. अंतरावर खिद्रापूर गावात कृष्णेच्या तीरावर असलेले कोप्पेश्वर मंदिरही शिलाहार स्थापत्यशैलीचा

उत्कृष्ट नमुना आहे. मंदिराभोवती सीमाभिंत अथवा प्राकार असून त्यातून मंदिराकडे जाण्याचा दरवाजा मध्यम आकाराचा आहे. तो अगदी अलिकडच्या काळातील आहे. मुख्य मंडपापासून किंचित विलग असलेला खुला मंडप, मंडप, अंतराल आणि गर्भगृह असा मंदिराचा तलविन्यास आहे. सध्या मंदिराच्या गर्भगृहावर असलेले चौकोनी शंक्वाकृती शिखर निश्चितपणे मराठा काळाच्याही नंतर बांधण्यात आले आहे. गर्भगृहाच्या कपोतालीवर मुख्य शिखराची प्रतिकृती असलेल्या छोटया शिखरांची ओळ आहे. पडून गेलेले मुख्य शिखर बांधताना ते या प्रतिकृतीनुसार बांधता आले असते. परंतु जीर्णोद्धाराचे काम करणाऱ्या स्थपतीने तसे केलेले नाही. यावरून त्याला शिल्पग्रंथांचे ज्ञान नव्हते हे उघड आहे. कपोतालीवर असलेल्या मुख्य शिखरांच्या प्रतिकृती, भद्रावर असलेल्या देवकोष्टांवरील शिखरे यावरून मूळात हे मंदिर शिलाहार शैलीचे सप्तरथ भूमिज प्रासाद असावे हे उघड आहे.

या मंदिराच्या फक्त गर्भगृहावरीलच मूळ शिखर पडून गेले नसून अंतराल, मंडप आणि त्यापासून किंचित विलग असलेल्या आणि स्वर्गमंडप या नावाने ओळखल्या जाणाऱ्या मंडपाचेही मूळ छप्पर आज अस्तित्वात नाही. स्वर्गमंडपावर तर छत कधीच नव्हते. यामुळेच काही विद्वानांचे "केवळ स्वर्गमंडपच आकाशाला खुला होता (छप्परहित होता), एवढेच नव्हे तर सर्व मंदिराचेच बांधकाम अपूर्ण होते आणि याचे कारण यादवराजा सिंघणाच्या (इ. स. १२१० ते १२४६) हातून झालेला शिलाहारांचा उच्छेद हे असावे" असे टोकाचे मत बनले. तथापि मंदिरात देवाची प्रतिष्ठापना झाली होती. मंदिराच्या देखभालीसाठी आणि दैनंदिन पूजेअर्चेसाठी देणग्याही देण्यात आल्या होत्या. इंग्रजी दिनदर्शिकेनुसार इ. स. १२१२ मधील एप्रिल महिन्यात (शके ११३६) झालेल्या सूर्यग्रहणाच्या वेळी त्यात आणखी देणग्यांची भर पडली. यादव राजा सिंघणाने या अपूर्ण मंदिराला असलेली आधीची अनुदाने तर कायम केलीच, पण आणखीही अनुदाने दिल्याची बाब जरा विसंगत वाटते. गर्भगृहाच्या कपोतालीवरील प्रतिकृती मूळ शिखर प्रस्तराचे असल्याचे स्पष्ट करतात. मूळ शिखर पडून गेल्यानंतर आज दिसणारे विटांचे शिखर बांधण्यात आले असावे. हे मंदिर खालील वैशिष्ट्यांमुळे शिलाहार कलेचा सुंदर नमुना झाले आहे.

अ) मुखमंडपाऐवजी किंचित विलग असा स्वर्गमंडप,

ब) गर्भगृह आणि मंडपाच्या पीठावर नेहमीपेक्षा खूप उंच अशा गजथराची योजना,

क) गर्भगृहालगत गर्भगृहातून प्रवेश असलेल्या तीन उप-देवळ्यांची दालने,

ड) स्वर्गमंडपात दिक्पाल असूनही गर्भगृहाच्या बाह्यांगाच्या उद्‌गम पातळीवर शक्तींसह दाखवण्यात आलेले दिक्पाल आणि

ई) सोळंकी शैलीतील करोटक छताशी साधर्म्य असलेले स्वर्गमंडपाच्या

घुमटाकार छतावरील (याचा फक्त खालचा भागच बांधला गेला आहे) अलंकरण.

मंदिर पूर्वाभिमुख असून सर्वात पुढच्या बाजूस मुखमंडपाऐवजी त्रिरथ तलविन्यासाचा पूर्णमंडप आहे. मंडपाच्या जमिनीवर मध्यभागी वर्तुळाकार रंगशिला असून तिच्या भोवती वरच्या अपूर्ण घुमटाकार छताला पेलणारे बारा स्तंभ आहेत. या स्तंभांच्या आतील भागांकडे असलेल्या हस्तांवर कार्तिकेय आणि इतर काही देवतांबरोबरच अष्टदिक्पाल त्यांच्या वाहनांसह दाखविले आहेत. तुलापट्टावर गौण देवतांच्या लघुमंदिरांचा पट्ट आहे. यावर गजतालु प्रयोजनांनी युक्त अशी उत्तरोत्तर लहान होत जाणारी वर्तुळाकार कडी आहेत. बारा स्तंभांच्या मागे तुलनेने कमी रुंदीचे नऊ स्तंभ आहेत. हा मंडप एकूण अट्ठेचाळीस स्तंभानी पेलला गेला आहे. कमी रुंदीचे किंवा सडपातळ स्तंभ नंतरच्या काळातील कर्नाट शैलीच्या मंदिरात आढळणाऱ्या स्तंभांशी साधर्म्य दाखवितात.

स्वर्गमंडप ओलांडून आत गेल्यानंतर मोठा सभामंडप लागतो. या सभामंडपाला उत्तर आणि दक्षिण दिशांना भव्य प्रवेशद्वारे असून त्यांना पायऱ्या आहेत. समोरच्या किंवा पुढच्या द्वारातूनही स्वर्गमंडपाकडे जाता येते. प्रवेशद्वाराच्या दोन्ही बाजूला प्रवेशद्वारालगतच एकेक स्तंभ आहे आणि तळाशी लहान कोनाड्यात व्याल दाखविले आहेत. स्वर्गमंडपापेक्षा सभामंडपाची मांडणी वेगळी आहे. सभामंडपाच्या मधल्या बारा स्तंभांभोवती वीस चौकोनीकृती स्तंभ आहेत. या वीस स्तंभांच्या रांगांपलिकडे सभामंडपाच्या भिंती आहेत. एवढा विस्तृत मंडप असलेली मंदिरे महाराष्ट्रात अगदी अत्यल्पच आहेत. या मंडपात प्रकाशासाठी दोन्ही बाजूंना प्रशस्त गवाक्षे आहेत. मंडपातून अंतरालात जाण्याच्या प्रवेशमार्गाच्या दोन्ही बाजूस माणसाच्या आकाराच्या द्वारपालांच्या मूर्ती आहेत. द्वारशाखांच्या तळाशी नेहमीच्या देवतामूर्ती आहेत. द्वार पंचशाख प्रकारचे असून मधल्या स्तंभशाखेवर उत्तरांग आहे. उत्तरांगावर पाच लघुमंदिरे आहेत. गर्भगृहात दोन शिवलिंग आहेत. जादा शिवलिंगांचे स्पष्टीकरण देणाऱ्या स्थानिक आख्यायिकाही आहेत. परंतु गर्भगृहातून प्रवेश असलेल्या तीन उप-दालनांमध्ये कोणत्या देवमूर्ती होत्या याबाबत निश्चिपणे काहीही सांगितले जात नाही. याचा फक्त अंदाजच बांधावा लागतो.

गर्भगृहाच्या आणि सभामंडपाच्या बाह्यांगाच्या वेगवेगळया पातळयांवर बरीच आकृतिशिल्पे आहेत. उदा. जंघाभाग, भद्रावरील देवकोष्ठे, देवकोष्ठांवरील शिखरांची पातळी आणि अधिष्ठानाचे थर आकृतिशिल्पांनी समृद्ध आहेत. आधीच वर्णिल्याप्रमाणे गजथरावरील हत्ती मोठया आकाराचे आणि नजरेत भरतील अशा उठावात कोरण्यात आले आहेत आणि कोणत्याही प्रकारचा वाहनविवेक न ठेवता देवदेवतांपासून साधूपर्यंतच्या सर्व मूर्ती ह्या हत्तींच्या पाठीवर उभ्या आहेत. या गजारुढ मूर्तींची स्थानयोजना अभ्यासनीय आहे. भद्रावरील देवकोष्ठात हत्तींऐवजी

बैल दाखविले असून शिव त्याच्या शक्तीबरोबर या बैलावर आरुढ असलेला दाखविला आहे. नायिका, विष्णूचे अवतार, चामुंडा, गणेश, दुर्गा यासारख्या परिवार देवतांव्यतिरिक्त जंघाभागावरील पट्टावर दाखविलेला दोन शक्तींसह असलेला शिव आगळावेगळा आहे.

या मंदिराचा नेहमीपेक्षा निराळा असलेला तलविन्यास, स्तंभमांडणीतील वैविध्य, मंदिरावर असलेली शिल्पांची आणि मूर्तींची रेलचल यामुळे हे मंदिर महाराष्ट्रातील १२ व्या शतकातील शिलाहार शैलीतील एक महत्त्वाचे मंदिर आहे.

**अंजनेरी येथील विष्णूमंदिर :** अंजनेरी येथील मंदिरसमूहातील क्रमांक आठचे हे मंदिर या समूहातील इतर मंदिरांच्या धाटणीपेक्षा काहीसे निराळे आणि म्हणूनच अपवादात्मक आहे. या भागातील बहुतेक मंदिरांवर नागर शिखरे आहेत. अंजनेरीच्या या मंदिरसमूहात फांसना प्रकारचे शिखर असलेले एक मंदिर आहे. या मंदिरसमूहातील विष्णुमंदिराचे शिखर भूमिज प्रकारचे आहे.

मंदिर पश्चिमाभिमुख आहे. या शतकाच्या सुरुवातीला जेव्हा हेन्री कझिन्सने या मंदिराची पाहणी केली त्यावेळीच हे मंदिर अत्यंत वाईट अवस्थेत होते. मंदिराचे शिखर आणि मंदिराचे उंच जोते या दोन्ही घटकांची बऱ्यापैकी पडझड झाली होती आणि मंदिरावर झाडीझुडपे मोठया प्रमाणात वाढलेली होती. आज मंदिरावरील झाडीझुडपे काढून टाकण्यात आलेली असली तरीही मंदिराची सध्याची स्थिती फारशी चांगली नाही. मंदिर उंच जगतीवर उभे असून मंडप, अंतराल आणि गर्भगृह असा त्याचा तलविन्यास आहे. या मंदिरास कदाचित मुखमंडपही असावा. परंतु मंडपाचा भाग पडून गेला असल्याने जमिनीवरील भिंतीच्या अवशेषांवरूनच त्याची कल्पना करावी लागते. शिखरावरील शिल्लक असलेल्या तीन लता आणि त्यांवरील चैत्यगवाक्षांची नक्षी यावरून शिखर भूमिज प्रकारचे असावे असे दिसते. दोन लता असलेल्या छोट्या शिखर प्रतिकृतींच्या रांगा(शृंगहार) आज पडून गेलेल्या आहेत. पण मंदिराच्या पडझडीच्या अवशेषांचे जे ढिगारे मंदिराभोवती आहेत त्यात या शिखरप्रतिकृती दिसून येतात. आज या मंदिराच्या शिखराची चांगलीच पडझड झाली असल्याने या शिखरावर प्रतीकात्मकरीत्या किती भूमि अथवा मजले दाखविण्यात आले होते हे निश्चितपणे सांगता येणे कठीण आहे. तथापि हे शिखर 'पंचभूम भूमिज प्रासादाचे' असावे असा अंदाज करता येतो.

गर्भगृहाचा तलविन्यास पंचरथ आहे. गर्भगृहाच्या दक्षिणेकडील भद्रावर नरसिंहाची, पूर्वेकडील भद्रावर वराहाची आणि उत्तरेकडील भद्रावर वामनाची मूर्ती आहे. या मूर्ती सोडल्या तर गर्भगृहाच्या बाह्यांगावर कोणतेही अलंकरण नाही. तथापि पीठाच्या कुंभ थरावर छोटया देवळांची (लघुमंदिरांची) नक्षी आहे. मात्र या लघुमंदिरांमध्ये कोणतीही आकृतिशिल्पे नाहीत. याचप्रमाणे अंगभागाच्या म्हणजे

बाह्यांगावर पुढे आलेल्या स्तंभांच्या जंघा भागावर कोणतीही आकृतिशिल्पे नाहीत. म्हणून शिल्पशास्त्राच्या भाषेत या जंघेला नागर जंघा अथवा शुद्ध जंघा म्हणता येईल.

पीठाच्या वरच्या भागातील उत्सेधात्मक थर पुढीलप्रमाणे आहेत - भिट्ट, जाड्यकुंभ आणि कणी, यावर कुंभ, कलश, कपोताली आणि मंचिका. भद्रांवरील जंघा भाग वगळला तर बाकीच्या जंघा भागावर कोणतीही आकृतिशिल्पे नाहीत. त्यावर भरणी, शिरावटी, कपोताली आणि छाद्य आहे.

अंतराळाला अंडाकृती छत असून त्याच्या मागच्या भिंतीत गर्भगृहाचे द्वार आहे. या द्वारावरील ललाटबिंबावर विष्णु कोरला असून त्याच्या एका बाजूस ब्रह्मदेव आणि दुसऱ्या बाजूस शिव कोरला आहे. ललाटबिंबाच्या खालच्या भागावर जिथे बहुधा गणेश कोरलेला असतो तेथील मूर्ती तुटलेली आहे. ही कोरलेली मूर्ती गरुडाची असावी असे कझिन्स यांना वाटते.

या विष्णूमंदिराचे याच मंदिरसंकुलातील जैन मंदिरांशी वास्तुशास्त्रीयदृष्ट्या अथवा शिल्पदृष्ट्या असलेले साधर्म्य लक्षात घेता हे मंदिर इसवी सनाच्या ११ व्या शतकाच्या अखेरीस किंवा १२ व्या शतकाच्या सुरुवातीला बांधले गेले असावे.

**सातगाव येथील विष्णूमंदिर :** बुलढाणा जिल्हयातील चिखली तालुक्यात सातगाव येथे चार मंदिरांचे अवशेष आहेत. यापैकी येथील विष्णुमंदिर भूमिज स्थापत्याचा नमुना आहे. अर्धमंडप, मंडप, अंतराल आणि गर्भगृह यावरील शिखरे आज पूर्णपणे शाबूत नसली तरी गर्भगृह सप्तरथ प्रकारचे असून सप्तभूमप्रासाद प्रकारचे शिखर होते हे दाखविण्याइतपत शिखराचे अवशेष शिल्लक आहेत. मंदिर पश्चिमाभिमुख असून पुढे मुखमंडप व दोन बाजूस दोन अर्धमंडप असलेला अर्धखुला मंडप, अंतराल आणि गर्भगृह असा या मंदिराचा तलविन्यास आहे. तीन अर्धखुले अर्धमंडप आणि अर्धखुला मंडप यांची रचनाच अशी आहे की, या तिन्ही प्रवेशमार्गातून थेट मंडपाच्या मध्यभागी असलेल्या चतुष्कीप्रत जाता यावे. या चतुष्कीच्या मधील भागात रंगशिला असून चतुष्कीच्या स्तंभांनी त्यावरील छत पेलले आहे.

मंदिराच्या बाह्यांगाचे सगळयात लक्षणीय वैशिष्ट्य म्हणजे गर्भगृह आणि अंतरालाच्या बाह्यांगावर भद्रांवरील रथिकांचा अपवाद वगळला तर जंघा पातळीवर असलेला मनुष्याकृती शिल्पांचा पूर्ण अभाव. त्याचप्रमाणे कूटस्तंभांवरील शिखरे भूमिज नसून लतिन नागर प्रकारची आहेत हे त्याचे दुसरे वैशिष्ट्य होय. मंडपाच्या बाह्यांगामध्ये पीठाच्या वर वेदिका असून वेदिकेवर कूटस्तंभ आहेत. दोन कूटस्तंभांच्या मधील भागात सुरसुंदरींची मूर्तिशिल्पे आहेत. त्यावर एकेकाळी कक्षासन असावे. पण आज ते शिल्लक नाही. शुकनासेचा फक्त खालचा भाग शिल्लक आहे आणि त्याच्या एक तृतियांश भागात हत्ती कोरला आहे. मंडपावर इतर भूमिज मंदिरांच्या मंडपाप्रमाणेच संवरण प्रकारचे शिखर आहे.

**साकेगाव येथील साकेश्वर मंदिर :** बुलढाणा जिल्ह्यातील चिखली तालुक्याच्या ठिकाणापासून सहा मैल पश्चिमेला साकेगावमध्ये हे एक शिवमंदिर आहे. मुखमंडप, मंडप, अंतराळ आणि गर्भगृह असा मंदिराचा तलविन्यास आहे. मंदिर पूर्वाभिमुख आहे.

मुखमंडप आणि मंडपाच्या मध्यभागाला घुमटाकार छत आहे. मंडपाच्या छताच्या उर्वरित आठ भागांना प्रत्येक स्तरावरील तुळया एकमेकींना छेदतील असे छत (lantern type ceiling) आहे. स्तंभांची रचना किंवा प्रकार सातगाव येथील मंदिरांच्या स्तंभांसारखाच असून चौरस तळखडा, त्यावर सपाट खांब, त्यावर उद्‌गमासारखा घटक, अष्टकोनी घटक, पूर्णकलश, कुंभशीर्ष आणि त्यावर कीचकहस्त असे त्यांचे स्वरूप आहे. महत्त्वपूर्ण स्थान भूषविणाऱ्या स्तंभांमध्ये विशेषत्वाने पूर्णकलश प्रयोजनाचा अंतर्भाव केलेला दिसून येतो. पण साध्या किंवा गौण स्थानी असलेल्या स्तंभांवर या जागी अष्टकोनी घटक किंवा चौरस पट्ट दिसून येतात.

मंदिराचे सर्वाधिक उल्लेखनीय भाग म्हणजे शुकनास आणि गर्भगृहावरील भूमिज शिखर होत. शुकनास सातगाव येथील विष्णुमंदिराप्रमाणेच दुमजली असून तिच्या तळाशी हत्ती दाखविले आहेत. शुकनासेच्या मुखभागावर कीर्तिमुखातून उद्‌भवलेली तिहेरी कमान असून तिच्या खालच्या तीन पट्टांमध्ये ब्रह्मदेव, महेश, व विष्णू आहेत आणि त्यावरील मुख्य मध्यवर्ती कमानीमध्ये ध्यानस्त बसलेला महेश दाखविला आहे. शुकनासेच्या बऱ्याच भागाचा जीर्णोद्धार झाला असला तरी तो बऱ्यापैकी आधीच्या शुकनासेसारखाच झाला असावा. शुकनासेच्या प्रत्येक बाजूवर तीन लघुदेवळे असून एकंदर सहा स्तंभकूट आहेत. ही सहा संख्या स्तंभकूटांच्या बाबतीत नेहमी आढळून न येणारी आहे. हे मंदिर आणि सातगाव येथील विष्णूमंदिर ही दोन्ही त्यांच्या स्थापत्याच्या आणि शिल्पाच्या शैलीवरून ख्रिस्तोत्तर १३ व्या शतकाच्या पूर्वार्धात बांधली गेली असावीत.

**रतनवाडी येथील अमृतेश्वर मंदिर** (ता. अकोला, जि. अहमदनगर): रतनवाडी या गावी हे अमृतेश्वर मंदिर आहे. अर्धमंडप, मंडप, अंतराल, गर्भगृह आणि गर्भगृहामागे आणखी एक अर्धमंडप असा मंदिराचा तलविन्यास आहे. मंदिराला असलेला एक आगळावेगळा आणि असाधारण घटक म्हणजे या गर्भगृहाला मागच्या बाजूला एक अर्धमंडप आहे. मंडपाच्या बाजूच्या भिंतींना बाहेरच्या बाजूप्रत जाणारी अंगे आहेत. आणि या अंगांना साध्या सपाट भिंतींऐवजी जालवातायने आहेत. स्तंभ बऱ्यापैकी अलंकृत असून खाली थरयुक्त चौरस तळखडा, त्यावर चौरसाकृती खांब, खांबाचा वरचा भाग अष्टकोनी व त्यावर वर्तुळाकार भाग, त्यावर कीचकहस्ताला आधार देणारे वर्तुळाकृती शीर्ष असा स्तंभघटकक्रम आहे. मंडपाचे छत घुमटाकार असून त्यावर ठराविक अंतर सोडून नर्तक आणि वादकांच्या प्रतिमा तिरप्या

अश्मपृष्ठावर (struts) आहेत. या मंदिराची सर्वात उल्लेखनीय बाब म्हणजे त्यावर टिकून राहिलेले भूमिज शिखर. शिखरांवर चार बाजूंनी प्रत्येकी एक अशा एकूण चार लता आहेत. शृंगहारांच्या उभ्या ओळीत (शिखराच्या लतेच्या एका बाजूस शिखराच्या कोपऱ्यापर्यंत म्हणजे चतुर्थांशात) प्रत्येक चतुर्थांशात तीन उभ्या ओळी असून प्रत्येक ओळीत पाच कूटस्तंभ आहेत. मागच्या बाजूच्या अर्धमंडपाचे शिखर सकृतदर्शनी फांसनाकार असावे असे दिसते. हे मंदिर साधारणपणे इ. स. च्या तेराव्या शतकात बांधले गेले असावे.

## विटांचे शिखर असलेली भूमिज मंदिरे

**ताहाकरी येथील भवानी मंदिर**(ता. अकोला, जि. अहमदनगर): अकोला शहराच्या वायव्येस १५ कि. मी. अंतरावर ताहाकरी हे गाव आहे. या गावातील भवानी मंदिर त्रिकूट स्वरूपाचे असून ते त्याच्या तलविन्यासामुळे आणि एकेकाळी त्यावर असलेल्या शिखरामुळे उल्लेखनीय आहे. या मंदिराच्या तिन्ही गर्भगृहांवर विटांची शिखरे होती. गेल्या शतकात हेन्री कझिन्सने जेव्हा या मंदिराची पाहणी केली तेव्हाच ही शिखरे कमालीच्या दुरावस्थेत होती.

कझिन्सने त्याच्या पुस्तकात प्रसिद्ध केलेल्या चित्रावरून या मंदिराचा तलविन्यास सप्तरथ असून ते सप्तभूम भूमिजप्रासाद असल्याचे स्पष्टपणे दिसून येते. म्हणूनच या मंदिरावरील शिखरे आज नष्ट झालेली असली तरीही या मंदिराचे विवरण या भागात करण्यात येत आहे. हे मंदिर पश्चिमाभिमुख असून मुखमंडप, त्यामागे दोन बाजूस प्रत्येकी एक अंतरालयुक्त उपगर्भगृह असलेला मंडप, त्यामागे अंतराल व मुख्य गर्भगृह असा या मंदिराचा तलविन्यास आहे. उपगर्भगृहांची अंतराले मुख्य गर्भगृहापेक्षा लहान आहेत. मुखमंडपाला वामनभिंत असून त्यावर प्रत्येक बाजूस पाच वामनस्तंभ आहेत. या वामन स्तंभाव्यतिरिक्त पुढे दोन आणि मागे दोन असे एकूण चार मुख्य स्तंभ आहेत. अशा स्तंभांवर मंडपाचे घुमटाकार छत पेललेले आहे. या मुखमंडपामागे मंडप असून त्यात चार कोपऱ्यात चार व यातील प्रत्येक स्तंभाशी काटकोनात पण चतुष्कीच्या बाहय भागात प्रत्येकी दोन स्तंभ आहेत. म्हणजेच मंडप बारा स्तंभांनी पेललेला आहे. मंडपावर कमानींची कलाकुसर असलेले अलंकृत असे घुमटाकार छत आहे. या छताच्या उत्तरोत्तर लहान होत जाणाऱ्या वर्तुळाकार भागांमध्ये ठराविक अंतरावर तिरप्या सपाट पृष्ठभागावर (struts) किंवा फलकांवर नर्तकांच्या आणि वादकांच्या मूर्ती आहेत. घुमटाच्या मध्यातून कमलाकृती नक्षीचा दगडी भाग खाली आला आहे. हा भाग त्याचप्रमाणे लघुमंदिरांचा कोरीव पट्ट, कीर्तिमुख, रुपकंठ, गजतालू यासारखी प्रयोजने पश्चिम भारतीय

सोळंकी शैलीशी साधर्म्य दाखवितात. चार स्तंभ आणि दोन अर्धस्तंभांच्या पलिकडे अंतराल आहे. अंतरालाला आयताकृती छत असून त्यात मधोमध छोटा घुमट आहे. अंतरालाच्या मागे चौरसाकृती गर्भगृह असून त्यात मागील बाजूस मूर्तीकरता पीठ आहे. दोन उपगर्भगृहांमध्येही अशीच पीठे आहेत.

मंदिराचा अंतर्भाग अलंकरणाने समृद्ध असला तरी मंदिराचे बाह्यांग मात्र साधे आहे. खाली मध्यम आकाराचे पीठ असून त्यावर साधी सपाट जंघा आहे. पीठामध्ये तीन थर आहेत. सर्वात वरच्या थरावर चौकटची नक्षी आहे. त्यावर कपोताली, कलश आणि मंची आहे. मंडोवराच्या खालच्या थरांनंतर साध्या सपाट (याला शिल्प - संहितांमध्ये ''शुद्ध जंघा'' असे संबोधले आहे)जंघा भागाला प्रारंभ होतो. जंघाभागावर नक्षीकाम नसले तरी गर्भगृहाच्या तीन भद्रांवर तीन देवकोष्ठे असून त्यात मूर्ती आहेत. सलिलांतरावरील जंघाभागात अप्सरांच्या मूर्ती आहेत. फक्त मंडपाच्या बाजूंना असलेल्या दोन गर्भगृहांच्या आणि अंतरालाच्या बाह्यांगावरच मंजरी आढळतात, अन्यत्र आढळत नाहीत.

मंडपाच्या मुख्य स्तंभावर खांबाच्या चारी बाजूंवर आणि ठराविक पातळीवर असणाऱ्या पट्टांवर आकृतिशिल्पे आहेत. स्तंभावर कीचकहस्त आहेत . याउलट अर्धस्तंभ आणि चतुर्थकस्तंभ तुलनेने साधे असून त्यावर कोणतीही आकृतिशिल्पे नाहीत. या स्तंभांवर नागशीर्षहस्त आहेत.

भद्रांवरील देवकोष्ठात असलेल्या मूर्ती, मंडोवरावर मोठया प्रमाणात आढळणाऱ्या स्त्रीमूर्ती, तिन्ही गर्भगृहांमध्ये आढळणारा कट्टा किंवा पदस्थल आणि परंपरेने चालत आलेले ''भवानी मंदिर'' हे नाव इत्यादी बाबींवरुन हे देवीचे मंदिर होते हे निःसंदिग्धपणे लक्षात येते. या तीन गर्भगृहांमध्ये महालक्ष्मी, महाकाली आणि महासरस्वतीच्या मूर्ती असाव्यात. कोल्हापूरच्या महालक्ष्मीचा संप्रदाय त्या काळात चांगलाच फोफावला होता आणि ताहाकरी हे या संप्रदायाचे त्या भागातील केंद्र असावे असे दिसते.

छतावरील आणि मुख्यमंडपातील शिल्पकला, स्तंभप्रकार आणि मंडपाच्या बाजूच्या गर्भगृहांची असलेली द्राविडी जंघा आणि शिल्पशैली ही वैशिष्टये लक्षात घेता हे मंदिर इ. स. च्या १२ व्या शतकाच्या सुरूवातीला बांधले गेले असावे.

**फलटण येथील जबरेश्वर मंदिर** (ता. फलटण, जि. सातारा) : फलटण शहरात पवार गल्लीमध्ये हे मंदिर असून ते रस्त्याच्या मधोमध एक मीटर उंचीच्या जोत्यावर उभे आहे. जोत्याची बाहयरेषा मंदिराच्या बाहयरेषेशी समांतर आणि थोडे अंतर

राखून आहे. त्यामुळे यापुढे आलेल्या जोत्याचा प्रदक्षिणापथासारखाही उपयोग होतो. मंदिरात जाण्यासाठी असलेल्या पायऱ्या चढून गेल्यानंतर मुखमंडप लागतो. मंदिर उत्तराभिमुख असून मुखमंडप, सभामंडप, अंतराल आणि गर्भगृह असा त्याचा तलविन्यास आहे. या मंदिराचा गर्भगृहाचा तलविन्यास सप्तरथ असून विमानावर पूर्वी विटांचे शिखर होते. आज या शिखरांच्या फक्त दोन भूमीच शिल्लक आहेत. या मंदिराच्या रथप्रकारावरून हे मंदिर सप्तभूम भूमिज प्रासाद असावे असे दिसते.

उत्सेधदृष्ट्या जगतीमध्ये एकावर एक असे दोन खुर आहेत. या वरच्या खुरांचा भाग अंतर्वलित होऊन त्यावर जो वास्तुघटक आहे त्याला छाद्य म्हणता येईल. त्यावर खुर, जाडंब आणि कुंभ हे पीठाचे घटक आहेत. त्यावर कपोतासारखा एक भाग आहे. त्यावरील भागात म्हणजे मंडोवरात अनुक्रमे जांडब आणि तवंगयुक्त कुंभ, कलश, मंची, कपोत, जंघा, उद्गम, भरणी, शिरावटी आणि छाद्य हे घटक येतात. त्यावर विमानाच्या आणि मंडपाच्या शिखरास सुरुवात होते. छाद्याच्या वर कपोत आणि मंची असे आणखी दोन घटक येतात. त्यावर भूमिज शिखरांचे कूटस्तंभ येतात. मंदिराच्या भद्रांना उपांगे आहेत. त्यांना प्राचीन वास्तुशास्त्रीय परिभाषेत नंदिका म्हणतात. जंघा पातळीवर मंदिराच्या पूर्व, पश्चिम आणि दक्षिण बाजूंवर देवींच्या मूर्ती आहेत. शिखरपातळीवर सर्वसाधारणपणे इतर भूमिज शिखरांवर आढळते त्याप्रमाणे शिखराच्या पायालगत शूरसेनक असण्याऐवजी इथे प्रथम शिखराची प्रतिकृती असून त्याच्यावर शूरसेनक आहे. या शूरसेनकावरील लतेचा आणि मूलमंजरीचा भाग आज शिल्लक नाही. मंडोवराच्या जंघा भागावर स्त्रीयुग्मे दाखविण्यात आली आहेत. अधूनमधून मिथुनमूर्तीही आहेत. बहुतांशी सलिलांतरांमध्ये तपस्वी आणि व्याल दाखविले आहेत. जंघेवर एका विशिष्ट प्रकारची मूर्तियोजना आहे. चार दिक्पाल चार कोणांच्या मागील बाजूंस असून उरलेले चार दिक्पाल कपिलीवर कोरलेले आहेत. मंडोवराच्या जंघाभागावर काही कथाशिल्पपट आहेत. मंडपाच्या पूर्व आणि पश्चिम भागांच्या मध्यावर अंगे आहेत. यापैकी पूर्व भागावरील अंगावर अंबिका आणि सर्वानुभूती यक्ष दाखविला आहे तर पश्चिम भागावरील अंगावर अंबिका तिच्या वाहनासह (सिंहासह) दाखविली आहे.

उत्तराभिमुख असलेल्या या मंदिरात जाण्यासाठी पायऱ्या आहेत. पायऱ्या संपल्या की मुखमंडप लागतो. या मुखमंडपाची रुंदी नेहमी आढळणाऱ्या मुखमंडपापेक्षा जास्त आहे. अगदी नेमके वर्णन करावयाचे झाल्यास ही रुंदी जवळपास मंदिराच्या रुंदीइतकीच आहे. मुखमंडपाच्या प्रवेशाच्या दोन्ही बाजूस प्रत्येकी दोन असे एकूण चार स्तंभ असून या स्तंभावर मुखमंडपाचे छप्पर पेललेले आहे. स्तंभांवर आकृतिशिल्पे असून ती स्तंभाच्या उद्गम, भरणी आणि शिरावटी या स्तरांवर रेललेल्या आहेत. शिरावटीवर नागफणे कोरलेले आहेत.

मंडपाच्या प्रवेशद्वाराच्या दोन्ही बाजूस देवकोष्ठे असून आज त्यात सुट्या मूर्ती आहेत. प्रवेशद्वार पंचशाख प्रकारचे असून त्यावर उंबऱ्याच्या वरच्या पातळीवर प्रतीहारमूर्ती आहेत. त्या दरवाजा पासून अनुक्रमे कुंभधारक, कमलधारक आणि पाश-अंकुश धारण करणारे प्रतीहार अशा आहेत. त्याचप्रमाणे या शाखा, आतल्या शाखेपासून बाह्यतमशाखेपर्यंत अनुक्रमे कल्पलता, गंधर्वस्तंभ पद्मलता आणि व्याल यांनी अलंकृत केल्या आहेत. ललाटबिंबावर आणि त्याच्या वर असलेल्या पाच रथिकांमध्ये तीर्थंकरांच्या मूर्ती आहेत.

मंडप अष्टकोनी असून त्याचे छत करोटक प्रकारचे आहे. एकावर एक असलेल्या आणि उत्तरोत्तर निमुळत्या होत जाणाऱ्या दगडी वलयांनी हे छत बनलेले आहे. कोणतीही नक्षी नसलेल्या खालच्या तीन वलयांनंतरची वलये आजमितीस शिल्लक नाहीत. अंतरालाच्या बाजूच्या दोन भिंतींमध्ये प्रत्येकी एक देवकोष्ठ आहे. अंतरालातून गर्भगृहात प्रवेश करण्यासाठी असलेले द्वार पंचशाखपध्दतीचे असून हे द्वार मुखमंडपापासून मंडपात नेणाऱ्या द्वाराशी खूपच मिळतेजुळते आहे. त्यावरील अत्यंत उल्लेखनीय शिल्प म्हणजे नागफणा असलेला वादक. स्तंभशाखेवर प्रतीहार "आभंग" स्थितीत त्यांच्या वाहनासह दाखविण्यात आले आहेत, येथे त्यांचे वाहन हत्ती आहे. त्यांच्या हातात पाश, अंकुश आणि पुष्प ही लांछने आहेत, चौथा हात वरदमुद्रेत आहे. अंतराल आणि गर्भगृहांची छतेही करोटक पध्दतीचीच आहेत, उत्तरांगावर मध्यभागी पार्श्वनाथाची मूर्ती आहे.

विमानाच्या तिन्ही भद्रांवर देवता कोरल्या आहेत. पूर्वेकडील भद्रावरील देवतेचे वाहन हंस असून तिचे चारही हात तुटलेले आहेत. त्यामुळे या हातांमध्ये कोणती आयुधे होती याचा बोध होत नाही, दक्षिण बाजूकडील भद्रावर असणाऱ्या देवतेच्या हाती द. अ. क्रमानुसार (तुटलेला हात), बाण, धनुष्य, (तुटलेला हात), आहे. या देवतेचे वाहन बैल आहे. पश्चिम भद्रावरील देवतेच्या मूर्तीची खूपच मोडतोड झाली असून तिच्या पायाजवळ गरूडमूर्तीचे अवशेष आहेत.

वैशिष्ट्यपूर्ण ठिकाणी असलेले शूरसेनक, दिक्पालांची योजना, आकृतिशिल्पांची शैली या वैशिष्ट्यांवरून तारकाकृति तलविन्यास असलेले हे भूमिज मंदिर इ. स. च्या १३ व्या शतकाच्या उत्तरार्धात बांधले गेले असावे असे वाटते. मूळात हे जैन मंदिर पार्श्वनाथाचे असावे.

**जागजी येथील लक्ष्मी मंदिर** (ता. जि. धाराशीव) : तेरपासून १२ कि. मी. अंतरावर असलेल्या जागजी गावातील हे भूमिज मंदिर उल्लेखनीय आहे. शिखरावरील आमलसार आणि कळस आज शिल्लक नाही. तथापि बाकीचे शिखर मात्र बऱ्यापैकी शाबूत आहे. शिखर विटांनी बांधलेले आहे. मंदिर पश्चिमाभिमुख आहे.

मंदिराचा सध्याचा सभामंडप जुन्या मंदिराच्या जीर्णोध्दाराची परिणती आहे. विटांच्या स्तंभांना जोडणाऱ्या मध्ययुगीन कमानी याची साक्ष देतात. या मंदिराचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे मंदिरासमोर असलेली पुष्करिणी. या पुष्करिणीत जाण्यासाठी चारी बाजूंनी मार्ग होते. तीन बाजूंना तीन अर्धमंडप असलेला मंडप, अंतराल आणि गर्भगृह असा मूळ मंदिराचा तलविन्यास असावा. मंडप आणि त्याभोवतालचे तीन अर्धमंडप आजच्याप्रमाणेच पूर्वीही विटांनीच बांधलेले असावेत असे मानण्यास जागा आहे.अंतराल मात्र दगडांनी बांधण्यात आलेला आहे.गर्भगृहामध्ये मध्यभागी एक चतुष्की असून त्यात देवीची मूर्ती आहे. चतुष्कीभोवती प्रदक्षिणा घालता येईल इतकी जागा गर्भगृहातच आहे. गर्भगृहाच्या बाह्यांगावर कोणतीही आकृतिशिल्पे अथवा नक्षी नाही. या मंदिराच्या गर्भगृहाचा तलविन्यास लक्षात घेता हे मंदिर **सप्तरथ सप्तभूम भूमिज प्रासाद** आहे असे म्हणता येईल. आतून पोकळ असलेल्या शिखराचे एक उल्लेखनीय वैशिष्ट्य म्हणजे शुकनासेच्या पातळीवर एक मजला असून त्यात आजही जाता येते. या पोकळ शिखराच्या आतील पृष्ठभाग बारकाईने अभ्यासला तर या भागात आढळणारी विटांनी बांधलेली मंदिरे ज्या पध्दतीने बांधण्यात आली होती तीच पध्दत येथे वापरण्यात आली आहे असे लक्षात येते. यासंदर्भात तेर येथील कालेश्वर, उत्तरेश्वर आणि त्रिविक्रम मंदिरांची उदाहरणे देता येतील. या तिन्ही मंदिरात गर्भगृहावर वरचा मजला नसला तरीही अंतर्वक्र छप्पर बनवण्यासाठी जे झुकावाच्या विटांचे (corbelling) तंत्र वापरण्यात आले आहे त्या तंत्राचा या चारही मंदिरामध्ये वापर करण्यात आला आहे. त्याचप्रमाणे दाटणी (bracing) करीता कधी कधी लांब लाकडाच्या तुळ्यांचा करण्यात येणारा वापर स्थानिक स्थपतींचे या माध्यमातील (विटांची मंदिरे बांधण्यातील) नैपुण्य दाखवून देतात. आणखी एक उल्लेखनीय वैशिष्ट्य म्हणजे शिखरावर केलेला चुन्याचा नक्षीदार गिलावा.हा गिलावा आजही चांगल्या स्थितीत टिकून आहे. शिखराच्या लतेवरील आणि स्तंभकूटांवरील फुलांची नक्षी उल्लेखनीय असून या मंदिराचा काळ ठरविण्याच्या दृष्टीने तो अत्यंत महत्वाचा घटक आहे.

मंदिरासमोर पुष्करिणी असून या पुष्करिणीत उतरण्यासाठी असलेल्या मार्गाच्या विविध पातळ्यांवर एकूण चोवीस देवकुलिका आहेत. या देवकुलिकांमध्ये विष्णूची चोवीस रूपे आहेत. पुष्करिणीतील मंदिरांच्या गर्भगृहावर भूमिज शिखर आहे आणि इतर भागांवर भूमिज आणि वेसर अशी दोन्ही प्रकारची शिखरे आहेत.

वैशिष्ट्यपूर्ण तलविन्यास, बांधकामांकरिता दोन भिन्न माध्यमांचा वापर करण्यात आलेले आणि समोर पुष्करिणी असलेले हे मंदिर खूपच आगळेवेगळे आहे. या मंदिराच्या वास्तुशास्त्रीय वैशिष्ट्यांवरून आणि मंदिराच्या परिसरात सापडलेल्या सुट्या शिल्पांवरून (काही शिल्पे सध्या मराठवाडा विद्यापीठाच्या वस्तुसंग्रहालयात आहेत). हे मंदिर इ. स. च्या बाराव्या शतकात बांधले गेले असावे.

**कोकमठाण येथील जगदंबादेवी मंदिर** (ता. कोरेगाव, जि. अहमदनगर) : कोपरगावच्या ईशान्येस ५ कि. मी. अंतरावरील कोकमठाण गावात हे भूमिज प्रकारचे मंदिर असून त्याचे शिखर विटांनी तर बाकीचा भाग दगडांनी बांधलेला आहे. मंदिराचा तलविन्यास तारकाकृती असून विटा आणि चुना यांच्या सहाय्याने बांधण्यात आलेले शिखर आजमितीस पूर्णपणे शिल्लक नाही. आमलसार, कलश आणि दोन भूमी आज शिल्लक नाहीत. हे मंदिर कदाचित सप्तभूम भूमिज प्रासाद या प्रकारचे असावे.

मंदिर उत्तराभिमुख असून त्याच्या तलविन्यासाप्रमाणेच त्यातील काही वास्तुशास्त्रीय घटकांचे निर्माण तंत्रही वैशिष्ट्यपूर्ण आहे. मंदिर द्विगर्भ प्रकारचे आहे. मुख्य गर्भगृहात आज शिवलिंग असले तरी आधी त्यात विष्णूची मूर्ती असावी असे मानण्यास जागा आहे. मंडपाच्या पूर्वेला पण मंडपाला जोडून असलेल्या दुय्यम गर्भगृहात देवीची मूर्ती असून आज ती देवी जगदंबा देवी म्हणून ओळखली जाते. दुय्यम गर्भगृहाचा तलविन्यास साधा चौकोनी असून त्याला कोणतीही अंगे नाहीत. त्यामुळे हे मंदिर मुळात तीन अर्धमंडपांनी युक्त असलेला मंडप आणि एकच गर्भगृह असलेले होते, परंतु नंतरच्या काळात पूर्वेकडील अर्धमंडप गर्भगृहात रूपांतरित करण्यात आला असावा या निष्कर्षाप्रत बरेच विद्वान आले आहेत.

तथापि या बिनखांबी मंडपाचे, अर्धस्तंभाचे आणि तीन चतुर्थक स्तंभांचे नीट निरीक्षण केले आणि दोन अंतरालातील साधर्म्य लक्षात घेतले तर हे दुसरे गर्भगृह मूळ मंदिराचाच भाग होते असे वाटते.

या मंदिराचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे मंदिराच्या बाह्यांगावरील भद्रांना देण्यात आलेले लहान भूमिज मंदिराचे स्वरूप होय. गर्भगृहावरील प्रचंड शिखराचे वजन पेलण्यासाठी भिंती अधिक भक्कम करण्याकरीता ही अशी योजना करण्यात

आली असावी असे कझिन्स यांचे मत आहे. पण मंदिराच्या तलविन्यासाचे अगदी बारकाईने निरीक्षण केले तर गर्भगृहाच्या दोन बाजूंना ब-यापैकी पुढे आलेल्या भद्र-अंगामध्ये खोल्या नसल्यातरी देवकोष्ठे आहेत हे लक्षात येईल.

आधीच उल्लेख केल्याप्रमाणे मंडप बिनखांबी असून त्याचे छत उत्तरोत्तर लहान होत जाणा-या वतुळाकार वलयांनी बनलेले आहे. छताच्या मध्यावर फुलांच्या कळीची नक्षी असलेला उक्षेप आहे. अंतरालाच्या द्वारावरील उत्तरांगावर पाच रथिका असून त्यात देवीच्या मूर्ती आहेत. अंतरालाचे छतही घुमटाकार आहे.

दोन्ही गर्भगृहांच्या दरवाज्यांवरील गरुडमूर्ती आणि मुख्य गर्भगृहाच्या अंतरालाच्या दरवाज्याच्या उत्तरांगावरील रथिकांमधील देवीच्या मूर्ती यावरून या मंदिरात मुख्य दैवते म्हणून विष्णू आणि लक्ष्मीच्या मूर्ती होत्या असे दिसते. मंदिराचा तलविन्यास, वास्तुशास्त्रीय शैली आणि शिल्प यावरून हे मंदिर इ. स. च्या तेराव्या शतकात बांधले गेले असावे असे दिसते.

**गुरसाळे येथील सोमलिंग मंदिर** (ता. खटाव, जि. सातारा) : गुरसाळे गावी हे मंदिर आहे. सदर मंदिर पंचभूम भूमिज प्रासाद असून मुखमंडप, मंडप, अंतराल आणि गर्भगृह असा त्याचा तलविन्यास आहे. मंदिराचे बाह्यांग पूर्णपणे साधे सपाट आहे. त्यावरील थरही सपाट पट्टांच्या स्वरूपात आहेत. या पट्टांच्या निर्गमामुळेच एरवी सपाट असणाऱ्या बाह्यांगाला काहीशी कलात्मकता प्राप्त झाली आहे. मुखमंडपावर आणि मंडपावर साधी फांसना शिखरे आहेत. या अगदीच साध्या सपाट मंदिराला काहीसा अलंकारिक भाग म्हणजे शुकनास आणि गर्भगृहावरील भूमिज शिखर होत. शिखरावर चार मुख्य दिशांना चार लता आहेत. या चार लतांच्या तळाशी प्रत्येक लतेवर एका ऐवजी एकावर एक अशी दोन शूरसेनके आहेत. आणखी एक महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे आमलसाराच्या खाली आणि शिखराच्याच पाचव्या भूमीच्या कूटस्तंभांच्या वर ओळीने अंगे येतात. या अंगाच्याच वरच्या बाजूस आमलकाच्या कंगोऱ्यांना सुरूवात होते.

या मंदिराचे साधे सपाट बाह्यांग, शिल्पग्रंथात वर्णिल्याप्रमाणे व्यवच्छेदकपणे ओळखता येतील अशा थरांचा अभाव या वैशिष्ट्यांवरून हे मंदिर १४ व्या शतकाच्या सुरूवातीला बांधले गेले असावे.

**शिंगणापूर येथील अमृतेश्वर मंदिर** (ता. माण, जि. सातारा) : शिंगणापूर हे गाव शिखर शिंगणापूर या नावाने प्रसिध्द असून, येथे एका टेकडीवर एक मंदिर संकुल आहे. कदाचित यामुळेच या ठिकाणाला शिखर शिंगणापूर हे नाव पडले असावे.

ही मंदिरे यादव नृपती सिंघणाने बांधली असून ती महाराष्ट्रातील लढवय्यांकरिता अनन्यसाधारण महत्त्वाची आहेत. या मंदिर-संकुलातील शंभू महादेव हे छत्रपती शिवाजी महाराजांच्या वंशाचे म्हणजे भोसल्यांचेही दैवत असल्यामुळे त्यास विशेष ऐतिहासिक महत्त्व प्राप्त झालेले आहे. येथील फक्त दोनच मंदिरे भव्य असून त्यावर विटांनी बांधलेली भूमिज शिखरे आहेत. यातील मुख्य मंदिर शंभू महादेवाचे असून ते पडल्यामुळे मराठा काळात नव्याने बांधण्यात आले. या मंदिराचा तलविन्यास, स्तंभ आणि द्वारशाखा या बाबी यादव स्थापत्याशी मिळत्याजुळत्या असल्या तरी त्यातील शिल्पे आणि भूमिज शिखराचा खालचा भाग सध्याचे मंदिर मध्ययुगात बांधले असल्याची साक्ष देतात. या मंदिराला एकावर एक अशी तीन शूरसेनके असून शुकनासेच्या पातळीपर्यंत स्तंभकूट आहेत. सदर मंदिर मध्ययुगीन असल्याने त्याचे तपशीलवार विवरण येथे केलेले नाही.

या मुख्य मंदिराच्या दक्षिणेला किंचित खालच्या पातळीवर अमृतेश्वर मंदिर आहे. एक मुखमंडप आणि दोन अर्धमंडप असलेला मंडप, अंतराल आणि गर्भगृह असा त्याचा तलविन्यास आहे. मंदिर उंच जगतीवर उभे आहे. या जगतीला कोणतेही अलंकरण नसलेल्या खूर प्रकाराचे थर आहेत. या थराच्या प्रवेश आणि निर्गमांमुळेच या भागाला काहीसा उठाव आलेला आहे.

मंदिराचा तलविन्यास पंचरथ प्रकारचा असून या मंदिराचे स्वरूप **नवभूम भूमिज प्रासाद** असे आहे. मंदिराच्या गर्भगृहावर विटांचे भूमिज शिखर असून त्यावर चुन्यात केलेली कलाकुसर आहे. शिखराच्या लतेवरील चुन्यातील कोरीव काम आणि त्याचप्रमाणे स्तंभकूटावरील कोरीव काम लक्षात घेता ही निर्मिती दाक्षिणात्य स्थपतींचीच असली पाहिजे याविषयी शंका उरत नाही. गंड-भेरुंड प्रयोजने आणि शूरसेनकांमध्ये कोरलेली वेसर शिखरे याचे स्पष्ट पुरावे आहेत. मंदिराच्या मागील बाह्यांगावर बसविलेले मध्ययुगीन स्तंभकूट, सध्याचे विटांचे शिखर ही नंतरच्या काळातील निर्मिती असल्याची साक्ष देतात.

गर्भगृहाच्या आणि मंडपाच्या पीठावर आणि अधिष्ठानावर कोणतेही अलंकरण असलेले थर नाहीत. पीठावर फारसे ठळक नसलेले आलटून पालटून येणारे, आणि उत्तरोत्तर कमी निर्गमाचे खुर आणि जाड्यकुंभाचे थर आहेत. विमानाच्या जंघा भागावर तीन मुख्य दिशांना तीन देवकोष्ठे असून त्यावर प्रतीकात्मक (Stylised) भरणी, शिरावटी आणि छाद्य हे भाग येतात. त्याच्यावर आणि विटांच्या शिखराच्या खाली असलेल्या भागात भरणी आणि शिरावटी हे घटक पुन्हा एकदा दाखविले आहेत.

आधीच नमूद केल्याप्रमाणे गर्भगृहावरील विटांचे भूमिज शिखर विजयनगर काळातील आहे. शिखराच्या तीन लतांच्या खालच्या भागात एका ऐवजी दोन शूरसेनके आहेत. खिद्रापूर येथील कोप्पेश्वर मंदिराप्रमाणेच याही मंदिराच्या शूरसेनकात शिखरप्रतिकृती आहे. उदाहरणार्थ मंदिराच्या मागील बाजूच्या शूरसेनकात उठावात कोरलेले वेसर शिखर आहे. मुखमंडपात आणि दोन्ही अर्धमंडपात जाण्यासाठी पायऱ्या आहेतच. प्रथम या पायऱ्या जगतीच्या पातळीपर्यंत जातात. त्या पातळीवर थोडी जास्त रुंद जागा असून तेथून परत पायऱ्यांना सुरुवात होऊन त्या मुखमंडपापर्यंत किंवा अर्धमंडपापर्यंत जातात. मुखमंडप आणि अर्धमंडपाच्या बाह्यांगावर मात्र जाड्य कुंभ, खुर आणि जाडंव असे ठळक थर असून प्रत्येक दोन थरांच्यामध्ये अंतरपत्रांचा थर आहे. त्याच्यावर कलश आणि मंची हे भाग येतात. मंडपातील स्तंभ आणि मुखमंडप व अर्धमंडपांमधील अर्धस्तंभ, एकाच प्रकारचे म्हणजे एकाच घटकक्रमाचे आहेत. त्रिकोणी नक्षी असलेला चौरस तळखडा, अष्टकोनी पट्ट, त्यावर चौरस घटक, त्यावर कुंभ, त्यावर कलशाकार शीर्ष आणि त्यावर नागशीर्ष हस्त असे या स्तंभांचे स्वरूप आहे. काही घटकांवर, विशेषतः अष्टकोनी घटकावरील पट्टावर, जाळीदार नक्षी आहे. त्यांचे एकंदरीत स्वरूप शिलाहार आणि होयसळ स्तंभांशी स्पष्ट साधर्म्य दाखविते.

मंडप आणि गर्भगृहाच्या द्वारांना पाच ते सहा शाखा आहेत. मधली शाखा स्तंभशाखा असून त्यावर उत्तरांग पेललेले आहे. उत्तरांगावर तीन रथिका असून त्यात देवदेवतांऐवजी चौकटची नक्षी आहे. हे मंदिर चौदाव्या शतकाच्या सुरुवातीस बांधले गेले असे दिसते.

**धारासुर येथील विष्णूमंदिर** ( ता. गंगाखेड, जि. परभणी ) : हे मंदिर जागजी येथील मंदिरासारखेच आहे. मंदिराचा शिखराव्यतिरिक्तचा भाग दगडी असून, शिखर मात्र विटांनी बांधलेले भूमिज शिखर आहे. एक मुखमंडप आणि दोन बाजूस दोन अर्धमंडप असलेला मंडप, त्याच्यामागे अंतराल आणि गर्भगृह असा त्याचा तलविन्यास आहे. मंदिर उंच जगतीवर असून मुखमंडप, आणि दोन अर्धमंडपाकडे जाणाऱ्या पायऱ्या जगतीमध्येच आहेत. अन्वा येथील मंदिराप्रमाणेच याही मंदिराच्या मुखमंडपाच्या आणि अर्धमंडपाच्या मुखावर दोन बाजूस प्रत्येकी एक देवकोष्ठ आहे.

मंदिराच्या बाह्यांगावर शिल्पे आहेत. गर्भगृहावरील शिखर जागजी येथील मंदिराच्या शिखराप्रमाणेच आतून पोकळ आहे. बांधकाम-तंत्र एकच आहे. आणि शुकनासेच्या पातळीवर एक मजला आहे. मात्र आज शुकनासेचा फारच थोडा

भाग शिल्लक आहे. मंदिराचा तलविन्यास आणि शिल्प-शैली यावरून हे मंदिर इ. स. च्या तेराव्या शतकाच्या उत्तरार्धात बांधले गेले असावे.

**राहेर येथील नरसिंह मंदिर** (ता. बिलोली, जि. नांदेड) : राहेर येथील नरसिंह मंदिर गोदावरीच्या तीरावर असून, १३ व्या शतकाच्या शेवटी आणि १४ व्या शतकाच्या सुरुवातीस जी अनेक मंदिरे बांधली गेली त्यात या मंदिराचा समावेश होतो. मंदिरासभोवताली प्रांगण असून प्रांगणाभोवती दगडी प्राकार आहे. या सीमाभिंतीचा नदीलगतचा भाग ढासळून गेला आहे. ही शुष्कसांधी तंत्राने बांधलेली भिंतही मंदिर संकुलाचाच भाग असावी, कारण या प्राकारला प्रवेशद्वार आहे. हे प्रवेशद्वारही आज चांगल्या स्थितीत नाही.

मंदिर पूर्वाभिमुख आहे. मुखमंडप, मंडप, अंतराल आणि गर्भगृह असा त्याचा तलविन्यास आहे. गर्भगृह सप्तरथ तलविन्यासाचे असून मंदिराचे स्वरूप "सप्तभूम, भूमिज प्रासाद" असे असावे. मध्ययुगीन काळात मंदिराचा जीर्णोध्दार झाला होता असे मानण्यास जागा आहे आणि विटांच्या शिखराची पुनर्बांधणी करतांना शिखराची बाह्यरेषा व्यवस्थित राहिलेली नाही. तथापि मंदिरावर माती आणि विटांच्या सहाय्याने बांधलेले आणि बाहेरून चुन्याचा गिलावा असलेले भूमिज शिखरच होते हे दाखविण्याइतपत पुरावा शिल्लक आहे. मंडपाचा तलविन्यास पंचरथ असून मंडपावरील आणि मुखमंडपावरील छप्पर आज शिल्लक नाही. मंदिरावर प्रवेश आणि निर्गम यांच्या सहाय्याने आडवे थर दाखविले असले तरी शिल्पशास्त्रातील संज्ञा देता येतील अशी त्यांची व्यवच्छेदक वैशिष्ट्ये नाहीत. मंदिराच्या भिंतीप्रमाणेच हे थरही अगदी साधे सपाट आहेत.

डॉ. प्रभाकर देव यांच्या मते पुढे आलेला रुंद सज्जा, चौकोनी तलविन्यास, गर्भगृह आणि अंतराल यांचा आकार सारखाच असणे ही चालुक्य स्थापत्याची वैशिष्ट्ये आहेत. साधे सपाट बाह्यांग, चौकटच्या आणि फुलांच्या नक्षीचा वारेमाप वापर आणि आकृतिशिल्पांचा अभाव ही यादव स्थापत्याची वैशिष्ट्ये आहेत. या वैशिष्ट्यांमुळे डॉ. देव सदर मंदिर त्यांच्या वर्गीकरणाच्या तिसऱ्या टप्प्यात[८२] (इ. स. १२०० ते इ. स. १४००) बसवतात. त्यांच्या मते हे मंदिर इ. स. च्या १३ व्या शतकातील आहे.

## फांसना शिखराची मंदिरे :

नागर, वेसर आणि भूमिज शिखरांप्रमाणेच फांसना हा शिखर प्रकारही महाराष्ट्रात होता. मात्र इतर तीन शिखरप्रकार जसे गर्भगृहावर असतात तसा हा शिखरप्रकार गर्भगृहावर वापरलेला फारसा आढळून येत नाही. फांसना

शिखरे बऱ्याचदा लहान किंवा मोठ्या मंडपावर दिसतात. एकाअर्थी इतर शिखरप्रकारांच्या तुलनेत हा अत्यंत साधा आणि मूलभूत स्वरूपाचा शिखरप्रकार आहे. उत्तर कदंबराजांच्या प्रदेशात हा शिखरप्रकार मोठ्या प्रमाणवर आढळून येत असल्यामुळे, काही विद्वानांनी या शिखरप्रकाराला "कदंव नागर" असे संबोधले आहे. इ. स. च्या बाराव्या आणि तेराव्या शतकातील कर्नाटक शैलीतील काम करणारे स्थपती या शिखराला " कलिंग शिखरे"[८३] म्हणून ओळखत असत, असा पुरावा काही शिलालेखातून मिळतो. या प्रकारची शिखरे संपूर्ण भारतभर आढळत असल्याने या शिखराचा उल्लेख कोणत्याही प्रांताच्या नावाने न करता फांसनाकार शिखर किंवा फंसना शिखर असा करण्याचे ठरविले आहे. या प्रकारची शिखरे सर्वत्र आढळण्याचे कारण असे की, हे शिखर सौंदर्यदृष्ट्या फारसे आकर्षक नसले तरी त्याचे निर्माणतंत्र अगदी साधे सुटसुटीत असते. त्यामुळे ते बांधायला अगदी सोपे आणि व्यवहारदृष्ट्या किफायतशीर आहे. त्याची बाह्यरेषा चौकोनी पाया असलेल्या शंकूसारखी आहे. त्याच्या चारही किंवा दोन्ही बाजूंवर असलेल्या भूमिसमांतर रेपा शिखराच्या कोप-यांवर पाकळीच्या आकाराने आणि दर ठराविक अंतरानंतर अर्धवतुर्ळाकृति आकाराने खंडित झालेल्या असतात. एकाअर्थी हे शिखर ठराविक अंतराने येणारे "तल" वेगळे दाखविण्यासाठी शालाशिखरे आणि कूटशिखरे असलेले द्राविड शिखर प्रतीकात्मकपणे अभिव्यक्त करणारे आहे. आणि या अभिव्यक्तिसाठीच शिखराच्या सरळ भूमिसमांतर रेपा कोपऱ्यांवर पाकळीचे आणि प्रत्येक ठराविक अंतरानंतर अर्धवर्तुळाचे आकार धारण करतात.

फांसनाकार शिखरे मंदिराच्या विमानावर नसून मंडपावर किंवा अर्धमंडपावर आढळतात. यावरूनच हा शिखरप्रकार भव्य आणि सौंदर्यसंपन्न शिखरासाठी अस्तितवात आला नाही हे स्पष्ट होते. मंदिरसंकुलातील दुय्यम मंदिरांवर, विशेपतः एका ओळीत असलेल्या मंदिरांवर आढळणारी फांसनाकार शिखरेवरील धारणा पक्की करतात. फांसना शिखरांना दिले जाणारे दुय्यम महत्व हेही समाधि मंदिरांकरता होणाऱ्या या शिखराच्या वापराचे प्रमुख कारण असू शकेल.[८४] हा मुद्दा स्पष्ट करणारे महाराष्ट्रातील प्राचीन उदाहरण म्हणजे मार्कंडी येथील मंदिर संकुलातील तथाकथित दशावतार मंदिरावरील फांसनाकार शिखरे. पुणे-कोल्हापूर रेल्वे मार्गावरील सांगली जिल्ह्यातील ताकारी गावाच्या परिसरात आढळणारी सागरेश्वर मंदिर समूहातील मंदिरे वेगळ्या धाटणीच्या-याच शिखरप्रकाराची उत्तम उदाहरणे आहेत. या उत्तर यादवकालीन मंदिरसंकुलाच्या उत्तर टोकाला एकूण चौदा मंदिरे एकमेकांना जोडून आहेत. त्यामुळे ही मंदिरे

एक प्रकारे सिमाभिंतीचा हेतू साध्य करतात. इतर मंदिरांमध्ये आणि या मंदिरांच्या सलग मालिकेत फरक इतकाच आहे की, या प्रत्येक मंदिराला स्वतंत्र शिखर असण्याऐवजी या सर्व चौदा मंदिरांना एकच लांबलचक लंब चौकोनी पाया असलेले शंक्वाकृती फांसना शिखर आहे. या शिखराचा दोन्ही टोकाकडील भाग आज शिल्लक नाही, त्यामुळे हे भाग कसे होते हे समजण्यास मार्ग नाही. शिखराच्या उतारावरील भूमिसमांतर शिखररेषांवर ठराविक अंतरावर असलेल्या अर्धवर्तुळांवरून हे फांसना शिखर असल्याचा बोध होतो. पण नेहमीप्रमाणे ही अर्धवर्तुळे किंवा वर गेलेले त्रिकोणी भाग अलंकरणरहित नसून त्यात पुष्पनक्षीची प्रयोजने आहेत. सिन्नर येथील गोंदेश्वर मंदिराचे वर्णन करतांना मुख्य मंदिराच्या आणि उप-आयतनांच्या अर्धमंडपांवर आणि नंदिमंडपावर फांसनाकार शिखर असल्याचा उल्लेख आधी येऊन गेलाच आहे.

आरे (ता. करवीर, जि. कोल्हापूर) येथील महादेव मंदिर आणि गुरसाळे (ता. खटाव, जि. सातारा) येथील मंदिर या दोन्ही मंदिरांच्या मंडपावर आणि मुखमंडपावर फांसनाकार शिखरे आहेत.

आधीच नमूद केलेल्या कारणांमुळे, मूळ शिखर फांसनाकार असलेली मंदिरे मोठ्या प्रमाणात आढळून येत नाहीत. अशा मंदिरांमध्ये खालील मंदिरे उल्लेखनीय आहेत.

१) पाटणे (जि. जळगाव) येथील देवीचे मंदिर या नावाने ओळखल्या जाणाऱ्या पंचायतनातील एक आयतन. २) इब्राहिमपूर (ता. चंदगड, जि. कोल्हापूर) येथील जैन मंदिरे.

पाटणे येथील पंचायतन संकुलातील विष्णूमंदिर हे प्राचीन फांसना मंदिराचे एक उदाहरण आहे. आधीच वर्णन केल्याप्रमाणे हे निराळ्याच प्रकारचे पंचायतन आहे. आज उपलब्ध असलेल्या अवशेषांवरून मध्यभागी लंबचौकोनी मंडप, त्याच्या मागील बाजूस मंडपाला जोडून एकाजवळ एक अशी तीन गर्भगृहे आणि मंडपाच्या दोन अरूंद बाजूंना जोडून प्रत्येक बाजूला एक, याप्रमाणे एकूण दोन गर्भगृहे असे या पंचायतनाचे स्वरूप असावे असे लक्षात येते.

मागील तीन गर्भगृहांपेकी मधले गर्भगृह विष्णूचे असून त्यावर साधे फांसनाकार शिखर आहे. इतर आयतनांवरही असेच शिखर होते का हा संशोधनाचा विषय आहे. हेन्री कझिन्स लिखित **मिडिव्हल टेंपल्स ऑफ द दख्खन**[८५] या ग्रंथात प्लेट क्रमांक XXVII मध्ये या पंचायतनाचा मागच्या बाजूस फोटो दिला आहे. तो पाहून याबाबत तर्क करता येईल.

## तलविन्यासातील वैविध्य :

आतापर्यंत मंदिरांचे वर्णन वाचून मुखमंडप, मंडप, अंतराल आणि गर्भगृह असे या काळातील मंदिरांचे स्वरूप होते असा ग्रह होईल. हा ग्रह काही प्रमाणात खराही आहे. कारण तलविन्यासात जे काही वैविध्य आले ते बहुतांशी मंडपाच्या दोन बाजूंना अर्धमंडप ठेवणे किंवा मंडप अर्धखुला ठेवणे या प्रकारचे होते. खिद्रापूरच्या कोप्पेश्वर मंदिरात आणखी एक मंडप (स्वर्गमंडप) आहे. अशा प्रकारात फारतर नागर, वेसर किंवा फांसना यासारखी निरनिराळी शिखरे बांधून वैविध्य आणलेले आढळते. या व्यतिरिक्त जर वैविध्य असलेच तर ते आकाराचे असेल असाही आपला समज होईल. पण आपण जर काळजीपूर्वक निरीक्षण करून अभ्यास केला तर प्राचीन स्थपतींना बऱ्यापैकी स्वातंत्र्य होते आणि आवश्यकतेनुसार व मंदिर बांधणाऱ्या धनिकाच्या मर्जीनुसार ते या स्वातंत्र्याचा वापर करत असत असे आपल्या लक्षात येईल. हे निरीक्षण सिध्द करणारी अनेक उदाहरणे आहेत. एकाच सामायिक मंडपाला जोडून दोन, पाच आणि अगदी दहा गर्भगृहे असलेली मंदिरेही आढळतात. देणगीदाराच्या किंवा त्याच्या आश्रयदात्याच्या इच्छेनुसार स्थपती एकच गर्भगृह असलेल्या मंदिराचे तीन गर्भगृहे असलेल्या मंदिरात रूपांतर करू शकत असे. झोडगे येथील शिवमंदिराच्या बाबतीत नेमके हेच घडले आहे. सिन्नर येथील गोंदेश्वर पंचायतन मंदिराप्रमाणे मुख्य मंदिरावर एक शिखर, मंडपावर दुसरे शिखर, इतर आयतनांवर आणखी निराळ्या प्रकारचे शिखर असे निरनिराळे शिखरप्रकार वापरूनही वैविध्य आणण्यात येत असे. मुख्य शिखरावर दाखविण्यात येणाऱ्या शिखर प्रतिकृती कोणत्या प्रकारच्या असाव्यात हे ठरविण्याचे स्वातंत्र्यही स्थपतीला होते. अंबरनाथचे शिवमंदिर याचा उत्तम नमुना आहे. अंबरनाथ मंदिराच्या स्थपतीने शृंगहाराकरिता आणि मंडपावरील संवरण शिखराकरता द्राविड प्रकारच्या शिखरप्रतिकृतींची योजना केलेली आहे. स्थपती मंदिर बांधतांना नागरी, लाटी, वाराटी किंवा द्राविडी या जंघाप्रकारांपैकी कोणत्याही एका जंघाप्रकाराची निवड करू शकत असे. निराळ्या शब्दात सांगायचे तर स्थपती कोणत्याही प्रादेशिक प्रकारात मंदिराच्या बाह्यांगावरील भिंती सजवू शकत असे. या प्रकारांमध्ये विशिष्ट प्रकारच्या प्रयोजनांचा आणि आकृतिशिल्पांचा समावेश होत असे. मध्ययुगीन स्थपतींना खरोखरीच स्वातंत्र्य होते काय ? हा वादाचा मुद्दा आहे. कदाचित असेही असेल की, वर उल्लेखिलेली विविधता वैयक्तिक परंपरेतून आलेली असावी. पण शिल्पसंहितांचा अभ्यास केला तर स्वतःच्या परंपरेत राहूनही स्थपतीला वैविध्य आणण्यास आणि निरनिराळ्या स्वरूपांची निवड करण्यास बऱ्यापैकी स्वातंत्र्य होते असे दिसून येईल.

या प्रकरणात अलंकरणाच्या वैविध्याची चर्चा नसून ज्यांचा शिल्पग्रंथात उल्लेख नाही आणि ज्यांचे स्वरूप केवळ स्थपतींनी घेतलेल्या स्वातंत्र्याची परिणती आहे अशा तलविन्यासांची किंवा तलविन्यासातील वैविध्याची चर्चा करावयाची आहे. हा फरक निरनिराळ्या पूजाविधींच्या गरजा भागविण्यासाठी किंवा आश्रयदात्यांच्या इच्छेनुसार करण्यात आला असावा.

**बार्शी टाकळी येथील देवी मंदिर** (ता. जि. अकोला) : उपलब्ध परिस्थितीत धार्मिक विधींच्या गरजा भागविण्यासाठी (या गरजा नेमक्या काय होत्या ते आपल्याला अजूनही नीटसे कळलेले नाही) करण्यात आलेल्या आगळ्यावेगळ्या तलविन्यासाचे उत्तम उदाहरण म्हणजे अकोला जिल्ह्यातील बार्शी टाकळी येथील देवी मंदिर. मुखमंडप, मंडप, अंतराल आणि गर्भगृह अशी या मंदिराची रचना आहे. गर्भगृह, पूर्वाभिमुख आहे पण मंदिराचा अर्धमंडप, (मुखमंडप ?) मात्र मंडप, अंतराल आणि गर्भगृहाच्या रेषेत नसून मंडपाच्या काटकोनात, म्हणजे मंडपाच्या उत्तरेला आहे. अर्धमंडपाच्या पाय-या मंडपामध्येच आहेत आणि त्या थेटपणे मंडपाच्या अंकणाप्रत जातात. या अंकणावर चार स्तंभ आहेत. मंडपाच्या अंतर्भागातील पूर्वेकडील भिंतीत चार, दक्षिणेकडील भिंतीत सात आणि पश्चिमेकडील भितीत दोन देवकोष्ठे आहेत. दक्षिणेकडील भिंतीत असलेल्या सात देवकोष्ठांमध्ये अर्थातच सप्तमातृका होत्या.

मंदिर उंच जगतीवर उभे असून, जगतीवर काही थरांची पुनरावृत्ती करण्यात आली आहे. मंडोवरावर आणि मंडोवराच्या वरच्या भागावर नेहमी आढळून येणारे थर आहेत. मंडप, अंतराल आणि गर्भगृहावरील शिखरे पूर्णतः पडून गेली आहेत. पण यातील एक असाधारण वैशिष्ट्य म्हणजे कपोतावर आढळणारा स्त्रीमूर्तींचा पट्ट. विमानाचा तलविन्यास पाहिला तर कोन आणि भद्र यांच्यामधील प्रतिरथ काटकोनात नसून लघुकोनी (acute angle) आहेत. म्हणून हा तलविन्यास तारकाकृती आहे असे म्हणता येईल. भद्रभागासह मंडोवरावर स्त्रीमूर्तींचे एकापेक्षा अधिक पट्ट आढळून येतात, मूर्तीयोजनाचा (कोणत्या संप्रदायाच्या मूर्ती आहेत याचा) विचार करता मंदिरात वैष्णव आणि शाक्त मूर्ती आढळतात. आधीच नमूद केल्याप्रमाणे, मंडपाच्या दक्षिणेकडील भिंतीतील सात देवकोष्ठे सप्तमातृकांकरता बनवण्यात आली होती. गर्भगृहात मूर्ती असे स्वरूप नसलेले दैवत (उदा. शिवलिंग) निश्चितच नव्हते. पदस्थल-कट्ट्यासमोर जी वाहनमूर्ती आहे त्यावर शेंदराचे इतके थर बसले आहेत की, मूळ मूर्तीचे स्वरूप ओळखणे कठीण झाले आहे. बाह्यात्कारी स्वरूप पाहता ही भूतमूर्ती असावी असे वाटते.

गर्भगृहाच्या प्रवेशमार्गावरील प्रतिहारांचे स्वरूप दिशाभूल करणारे आहे, कारण ते वैष्णव प्रतिहार आहेत. तथापि बाह्यांगावरील मूर्तींची लांच्छने, मंडपातील दक्षिण भिंतीत असलेली सात देवकोष्ठे आणि मंडपाच्या मध्ये असलेल्या स्तंभावरील मूर्ती हे मंदिर वैष्णव संप्रदायाशी साहचर्य दाखवणारे देवीचे मंदिर असल्याचे सूचित करतात. एका स्तंभावर विष्णूचे अवतार तर दुसऱ्या स्तंभावर संबंधित दिशांना अभिमुख असलेले दिक्पाल दाखवले आहेत. आणखी एका स्तंभावर विष्णूची वेगवेगळी स्वरूपे आणि देवीच्या मूर्ती आहेत. मंदिरातील मूर्ती आणि अलंकरण शिल्पे, स्तंभांचा घटक क्रम आणि मंदिरात असलेला शके १०९८ (इ. स. ११७५ ) चा शिलालेख यावरून सदर मंदिर इ. स. च्या १२ व्या शतकाच्या मध्यात बांधले गेले असावे.

मूर्तियोजनाच्या दृष्टीकोनातून हे मंदिर निश्चितच खूप निराळे आहे. मंदिराच्या पूर्व, दक्षिण आणि पश्चिम भिंतीत देवकोष्ठे करून त्यात ठराविक देवमूर्ती बसवण्याखेरीज स्थपतीला गत्यंतर उरले नसावे. म्हणूनच मंडपाचा प्रवेशमार्ग उत्तरेकडे ठेवावा लागला. मंडपाच्या पूर्वेकडील भागावर संपूर्ण भिंत असून तिच्या आतील भागावर चार देवकोष्ठे आहेत हे येथे पुन्हा एकदा नमूद करणे आवश्यक आहे. तेथील स्थानिक पुरोहिताने जी मूर्तियोजना ठरवून दिली होती ती प्रत्यक्षात आणण्याकरता स्थपतीला तलविन्यासात हे फेरफार करावे लागले.

## व्दिगर्भ मंदिरे :

शिखर शाबूत असलेल्या मंदिरांच्या विवरणात त्रिदल मंदिरांचा (तीन गर्भगृहे असलेल्या मंदिरांचा) उल्लेख या आधीच येऊन गेला आहे. किंबहुना आधीच्या विद्वानांनी, मंदिर स्थापत्यावर लिखाण करताना, मंदिराचे कालदृष्ट्या वर्गीकरण करताना (१) एक गर्भगृह असलेली मंदिरे आणि (२) तीन गर्भगृहे असलेली मंदिरे असे दोन मुख्य उपप्रकार पाडलेले आढळतात. महाराष्ट्रात आणि उत्तर कर्नाटकात त्रिदल मंदिरे मोठ्या प्रमाणात आढळतात. दख्खन भागातील (म्हणजे "दख्खनचे पठार" या भौगोलिक स्वाभाविक विभागातील) त्रिदल मंदिरे हाच मुळी एक स्वतंत्र अभ्यासविषय आहे. अशा मंदिराचा उल्लेख शिलालेखांमध्ये "त्रैपुरूषदेवालय" असा केलेला आढळतो. अशा मंदिरांमध्ये बहुदा सृष्टीरचयिता ब्रह्मदेव, पालनकर्ता विष्णू आणि संहारकर्ता शिव हे मुख्य देव असतात. महाराष्ट्रात मात्र बहुसंख्य मंदिरांमध्ये ब्रह्मदेवाऐवजी देवी किंवा शक्तीचे एखादे स्वरूप आढळते. कर्नाटकामध्ये तिन्ही गर्भगृहांमध्ये विष्णूचीच रूपे असलेली त्रिदल मंदिरे आढळतात. फारच अपवादात्मक उदाहरण उमरगा येथील मंदिराचे देता येईल.

येथील त्रिदल मंदिरात मुख्य गर्भगृहात आणि एका दुय्यम गर्भगृहात विष्णूचीच रूपे असून उरलेल्या दुय्यम गर्भगृहामध्ये शिवलिंग आहे. खिद्रापूर येथील कोप्पेश्वर मंदिराच्या गर्भगृहाला लागून असलेल्या तीन दालनांमध्ये कोणती दैवते होती याचा छडा अद्यापही लागलेला नाही. कोल्हापूर येथील महालक्ष्मी मंदिराच्या दोन दुय्यम गर्भगृहांमध्ये महासरस्वती आणि महाकालीच्या मूर्ती आहेत हे माहीत असूनही मुख्य गर्भगृहालगतच्या तीन दालनांमध्ये कोणती दैवते होती हे अद्यापही गूढच आहे. श्रीमद् शंकराचार्यांनी शिव, विष्णू, गणेश, आदित्य आणि देवी या पाच मुख्य देवतांच्या भक्तांमधील वाद कमी करणारी एकत्वाची किंवा अद्वैताची चळवळ सुरू केली. तीन गर्भगृहात तीन दैवते असलेली त्रिदल मंदिरे ही याच चळवळीच्या अवलंबाचा एक भाग होती. या दैवतांना समसमान मानण्याच्या सातत्यपूर्ण प्रयत्नांना महाराष्ट्रात खूप पूर्वीच सुरुवात झाली. निदान राष्ट्रकूट काळापासून म्हणजे अदमासे इ. स. ७ व्या शतकापासून तसे जाणीवपूर्वक प्रयत्न झाले. दख्खनमधील उदारमतवादी दृष्टिकोन असलेल्या लोकांनी हा अशा प्रकारचा तोडगा काढला. या समानतेच्या तत्त्वाचा पुराणकारांनी लिखाणात स्वीकार केलेला असला तरीही, मूर्तिकारांनी शिव आणि विष्णू यांची वैशिष्ट्ये आणि लांच्छने एकत्रित करून हरिहर नामक एकच मूर्ती बनविली. गुप्त काळापासून ही मूर्ती भारतात सर्वत्र आढळते. साहजिकच काही स्थपतींनी त्रिदल मंदिराच्या ऐवजी द्विगर्भ मंदिरे उभारली. बहुतेकदा द्विगर्भ मंदिरातील दुय्यम गर्भगृह, मंडप व गर्भगृह अक्षाच्या काटकोनात असे आणि परिणामी परस्परांना काटकोनात असलेले दोन अक्ष असलेली द्विगर्भ मंदिरे अस्तित्वात आली. यातील दुसरा प्रकार म्हणजे मंडपाच्या समोरासमोरील दोन बाजूंना लागून गर्भगृहे असणे. यात मंदिराचे प्रवेशमार्ग मंडपाच्या उरलेल्या दोन समोरासमोरील बाजूंकडून असत. यवतमाळ जिल्ह्यातील महागाव येथील नागर मंदिर आणि कोकमठाण येथील भूमिज मंदिर पहिल्या प्रकारात मोडतात, तर चारठाणे येथील द्विगर्भ मंदिर, वेळापूर (तालुका पंढरपूर, जिल्हा सोलापूर) येथील शिवमंदिर आणि गंजीभोरे येथील शिव व विष्णू मंदिर ही दुसऱ्या प्रकारची उदाहरणे आहेत. हे दोन प्रकार महाराष्ट्रात बहुतेक ठिकाणी आढळणाऱ्या तलविन्यासातच फेरफार करून बनले आहेत. तिसरा प्रकार मात्र पूर्णतः निराळा असून हत्तरसंग कुंडल (ता. दक्षिण सोलापूर, जि. सोलापूर) येथील मंदिर हे त्याचे उत्तम उदाहरण आहे. परंतु या मंदिराच्या वास्तुघटकांचे स्वरूप लक्षात घेता हे मंदिर काहीसे नंतरच्या काळातील असावे. या मंदिराचा मुखमंडप मंडपाच्याच रुंदीचा आहे आणि मंडपामागे एकमेकांना चिकटून एकाच दिशेला अभिमुख असलेली दोन गर्भगृहे आहेत.

**गंजीभोरे येथील माधवेश्वर मंदिर** ( ता. पारनेर, जि अहमदनगर ) : हे मंदिर नंतरच्या काळातील असले तरी वर वर्णिलेल्या दुसऱ्या प्रकाराचे ते उत्तम उदाहरण आहे. या मंदिरासमोर बारव असून या बारवेतून मंदिरात जाण्यासाठी पायऱ्या आहेत. बारव आणि मंदिर यांच्याभोवती प्राकार असून, त्याचे प्रवेशद्वार पश्चिमेकडे आहे. एक काहीसा अरुंद आणि लंबचौकोनाकृती मंडप आणि मंडपाच्या दोन्ही अरुंद टोकांना लागून परस्परांना अभिमुख असलेली दोन अंतरालयुक्त गर्भगृहे असा मंदिराचा तलविन्यास आहे. मंडपाची लांबी पूर्व-पश्चिम अशी आहे. मंडपाच्या पश्चिमेकडील गर्भगृहात एका पीठावर लक्ष्मी आणि माधवाची मूर्ती आहे तर गर्भगृहाच्या मध्यभागी शिवलिंग आहे. या गर्भगृहाला मागच्या बाजूने एक प्रवेशमार्ग असून त्याला अर्धमंडप आहे. हा अर्धमंडप कक्षासनाने युक्त असून त्यावर अर्धवट कोरीवकाम आहे. या अर्धमंडपाच्या पूर्वेला काही अंतर सोडून नंदीमंडप आहे.

मंडप, अर्धमंडप आणि नंदीमंडपातील स्तंभांचा घटकक्रम एकाच प्रकारचा आहे. मंदिराच्या बाह्यांगावर फुलांच्या नक्षीचे आणि कीर्तिमुखांचे अलंकरण आहे.

या मंदिराचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे प्राकाराचाच भाग असलेल्या मार्गिकेत गोपींसमवेत असलेल्या मुरलीधराची मूर्ती.

**वेळापूर येथील शिवमंदिर** (ता. माळशिरस, जि. सोलापूर) : माळशिरसच्या आग्नेयेला १० मैल अंतरावर वेळापूर हे गाव असून, या गावात हे शिवमंदिर आहे. एकमेकांना अभिमुख असलेल्या दोन अर्धमंडपांनी युक्त आणि मध्यभागी अंकण असलेला अर्धखुला मंडप आणि मंडपाच्या उरलेल्या दोन बाजूस एकाच अक्षात एकमेकांना अभिमुख असलेली अंतरालयुक्त गर्भगृहे असा मंदिराचा तलविन्यास आहे. अर्धमंडपांना वामनभिंती आहेत. दोन्ही अर्धमंडपात जाण्यासाठी पायऱ्या आहेत. मंडपाच्या चारही कोपऱ्यांमध्ये अंतरालाच्या प्रवेशमार्गाच्या दोन्ही बाजूस देवकोष्ठे आहेत. दोन्ही गर्भगृहे एकाच आकाराची असली तरी त्या दोन्हींमध्ये फरक आहे. आज पूर्णतः पडझड झालेल्या स्थितीत असलेल्या गर्भगृहाचे अंतराल दुसऱ्या गर्भगृहाच्या अंतरालाच्या तुलनेत लहान आहे.

स्तंभांचा घटकक्रम किंवा स्तंभरचना, अलंकरण नसलेले प्रवेशमार्ग आणि याच परिसरात सापडलेले शिलालेख लक्षात घेता हे मंदिर यादव नृपति रामचंद्र याच्या कारकिर्दीच्या शेवटी किंवा कदाचित १४ व्या शतकाच्या सुरुवातीस बांधले गेले असावे असे अनुमान करता येते.

**पाटणे येथील पंचायतन** (ता. चाळीसगाव, जि. जळगाव) : पाटणे गावाच्या हद्दीत आणि सातमाळा टेकड्यांच्या पायथ्याशी नदीच्या तीरावर हे पंचायतन आहे. हे पंचायतन आई भवानी मंदिर म्हणून ओळखले जाते. या मंदिरात यादवांचा मांडलिक असलेल्या सोइदेवाचा शिलालेख आहे. हा सोइदेव यादव नृपति सिंघणाचा समकालीन असून, शिलालेखात त्याने चांगदेव नामक राजज्योतिष्याच्या अधिपत्याखाली असलेल्या मठास दिलेल्या देणग्यांचा उल्लेख आहे. या शिलालेखावरून सदर मंदिर इ. स. तेराव्या शतकाच्या सरुवातीस (इ. स. १२०९ च्या सुमारास) बांधले गेले असावे.

हे मंदिर खूप लोकप्रिय असल्याने आणि दरवर्षी येथे मोठी जत्रा भरत असल्याने मध्ययुगीन आणि ब्रिटिश काळात त्यात मोठ्या प्रमाणात बदल करण्यात आले आहेत. सध्या काही पायऱ्या चढून गेल्यानंतर एक सज्जा लागतो आणि या सज्जामागे हे मंदिर आहे. चार गर्भगृहांना समायिक असलेला लंबचौकोनाकृती खुला मंडप असे मंदिराचे सध्याचे स्वरूप आहे. यापैकी तीन गर्भगृहे मंडपाच्या एकाच बाजूस एकाच दिशेला अभिमूख असून चौथे गर्भगृह या तीन गर्भगृहांच्या ओळीशी काटकोनात मंडपाच्या अरुंद बाजूला लागून आहे. पण या चौथ्या गर्भगृहासमोरील, मंडपाच्या दुसऱ्या अरुंद बाजूला लागून आणखी एक गर्भगृह होते हे सिध्द करण्याइतका पुरावा किंवा अवशेष आजही शिल्लक आहेत. आधी नमूद केल्याप्रमाणे या मंदिराची मोठ्या प्रमाणावर दुरूस्ती होताना त्यात अनेक बदल झाले आहेत. काही मंदिरघटकांचे तर आकारही बदलले असण्याची शक्यता आहे. परिणामी आज या मंदिराकडे पाहिले असता ते आधुनिक काळात बांधलेले मंदिर वाटते. या आधी वेसर आणि फांसना प्रकारचे शिखर असलेल्या मंदिरांचे विवेचन करताना फांसना प्रकारचे शिखर असलेल्या विष्णूच्या गर्भगृहाची आणि दक्षिणेकडील वेसर शिखर असलेल्या गर्भगृहाची चर्चा आपण केलेली आहे. ही मंदिरे मुळात कशी असावीत याची साधारण कल्पना कझिन्सकृत "मिडिव्हल टेंपल्स ऑफ द डेक्कन" या ग्रंथात दिलेल्या छायाचित्रावरून येऊ शकेल. या मंदिराच्या वैशिष्ट्यपूर्ण तलविन्यासामुळे त्याची या प्रकरणात आवर्जून चर्चा केली आहे. कारण सामान्यपणे मध्यभागी मुख्य मंदिर किंवा मुख्य आयतन आणि त्याच्या चारही बाजूंना काही अंतर सोडून चार उप-आयतने असे पंचायतनाचे स्वरूप असते. सिन्नर येथील गोंदेश्वर मंदिर याचा उत्तम नमुना आहे. पण येथे मात्र पाचही आयतने लंबचौकोनाकृती खुल्या मंडपाच्या तीन बाजूंना जोडून आहेत.

**बलसाणे येथील बहुगर्भी मंदिर** : धुळे जिल्ह्यातील बलसाणे येथील ५ क्रमांकाच्या मंदिराचा तलविन्यास खूपच निराळा आहे. या मंदिराला मंडपाच्याच रुंदीचा खुला मुखमंडप आहे. त्याची बाहेरच्या बाजूची रुंदी आतील बाजूच्या रुंदीपेक्षा जास्त वाटते कारण आतील बाजूला लागून दोन कोप-यांवर मंडपातून प्रवेश असलेली दोन दालने आहेत. मुखमंडपाच्या मागे मंडप आहे. या मंडपाचा तलविन्यास चौरसाकृति असून त्याच्या बाजूच्या दोन भिंतीमध्ये प्रत्येकी तीन दालने आहेत. पुढच्या व मागच्या भिंतीत म्हणजे मुखमंडपात जाणाऱ्या आणि अंतरालात जाणऱ्या मार्गाच्या दोन्ही बाजूस प्रत्येकी एक दालन आहे. म्हणजेच या मंडपाला लागून एकूण दहा दालने आहेत. मुख्य गर्भगृहात आणि मंडपाला लागून असलेल्या दालनातील विष्णूमूर्तीमुळे विव्दानांनी या मंदिराला "दशावतार मंदिर" असे संबोधले आहे. विष्णूचे दहा अवतार या मंदिरात दाखविण्याकरता या आगळ्यावेगळ्या तलविन्यासाची निर्मिती झाली.

**यवत येथील भुलेश्वर मंदिर** (ता. दौंड, जि. पुणे) : यवत येथील भुलेश्वर मंदिर तसे साधेच आहे. अर्धखुला मंडप, अंतराल आणि गर्भगृह असा त्याचा तलविन्यास आहे. या मंदिरासमोर नंदीमंडप आहे. पण या मंदिराचे सगळ्यात महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे या मंदिराच्या आवाराभोवती असलेल्या सीमाभिंतीला जोडून असलेल्या सोळा देवकुलिका होत. मुख्य मंदिराच्या गर्भगृहावरील आणि मंडपावरील शिखर आज शिल्लक नाही. गर्भगृह आणि अंतराल यांच्या बाह्यांगादर एकूण पाच देवकोष्ठे आहेत. या देवकोष्ठांपैकी तीन देवकोष्ठे गर्भगृहाच्या तीन भद्रांवर असून अंतरालाच्या बाह्यांगावर प्रत्येक बाजूस एक अशी दोन देवकोष्ठे आहेत. अर्धखुल्या मंडपावरील वेदीबंधावर नेहमीप्रमाणे आलटूनपालटून आकृतिशिल्पे येण्याऐवजी फक्त दोन भूमिसमांतर थर आहेत. यातील खालच्या थरावर सिंह आणि हत्ती तर वरच्या थरावर पुराणकथांमधील दृश्ये कोरलेली आहेत.

सीमाभिंतीलगत देवकुलिकांची रांग असणे हा स्थापत्यप्रकार पश्चिम भारतात विकसित झाला. याचे मुख्य कारण म्हणजे जैनविधींकरता त्याची आवश्यकता होती. अशा जैन मंदिरांमध्ये २४ किंवा ७२ देवकुलिका असतात व त्यात भूत आणि भविष्यकाळातील २४ तीर्थंकरांच्या मूर्ती असतात. यवत येथील ह्या शिवमंदिरात इतक्या देवकुलिका कशासाठी बांधण्यात आल्या याबाबतचे समाधानकारक स्पष्टीकरण देता येत नाही.

आतापर्यंत आपण गर्भगृहांची संख्या आणि मंडपांचे स्थान यासंदर्भातील तलविन्यासांचे वैविध्य पाहिले. पण अर्धमंडपांची संख्या आणि त्यांचे असमरूप स्थानयोजना असलेले मंदिर म्हणजे माहुली येथील कळम्मादेवी मंदिर होय. त्याची माहिती खाली दिली आहे.

**माहुली येथील कळम्मादेवी मंदिर** (ता. खानापूर, जि. सांगली ) : सांगली जिल्ह्यातील माहुली गावात हे मंदिर आहे. एक मीटरहून अधिक उंचीच्या जगतीवर उभे असलेले हे मंदिर पूर्वाभिमुख आहे. मंदिरात जाण्यासाठी मंदिराच्या मंडपाच्या पूर्व आणि दक्षिण बाजूंकडून कठडायुक्त पायऱ्या असून पायऱ्यांच्या दोन्ही बाजूस कठड्यावर हत्तींच्या मूर्ती आहेत. पूर्वेस मुखमंडप आहे. या दोन्ही पायऱ्यांचे मार्ग आता मोडकळीला आले असून त्यावर बरीच झाडीझुडपे वाढलेली आहेत.

जगती साधी असून तीवर जमिनीपासून सुरुवात करता खुर, जाडंव, चौकटची नक्षी असलेले काहीसे रुंद अंतरपत्र, कपोत आणि छाद्य असे थर आहेत. जगतीचे थर सहजगत्या ओळखता येतील असे ठळक व ठसठशीत आहेत. मात्र त्यावरील कोरीव काम पूर्ण झाल्यासारखे वाटत नाही. जगतीच्यावर कुंभ, कलश, जंघा भागाचा पाया, उद्गम, भरणी आणि शिरावटी हे घटक येतात. मंडपाच्या बाह्यांगाच्या तुलनेत विमानाच्या बाह्यांगावरील पीठ आणि मंडोवर भागावर बरीच कलाकुसर आढळते. जंघा भागावर बरेच केशउठावातील कोरीव काम आढळते. त्याचप्रमाणे कपिलीच्या जंघा-भागावर एक स्त्रीमूर्ती कोरलेली आहे. विमानाचा तलविन्यास तारकाकृति आणि सप्तरथ प्रकारचा आहे. विमानावर तीन भद्र असून प्रत्येक भद्रावर एक रथिका होती. त्यापैकी फक्त एक रथिका पूर्णपणे शाबूत आहे. दुसऱ्या रथिकेची थोडीफार पडझड झाली आहे, तर तिसरी पूर्णतः पडून गेली आहे. शाबूत असलेल्या रथिकेत मनुष्याकृती दैत्यास मारणाऱ्या महिषासुरमर्दिनीची मूर्ती आहे. विमान आणि कपिलीच्या बाह्यांगाप्रमाणेच कुंभभागावरही कलाकुसर आहे. या भागावर वेसर शिखर असलेल्या छोट्या देवकुलिका कोरल्या आहेत. मात्र या देवकुलिकांमध्ये फक्त चौकटचा आकार कोरला आहे. शिल्पीची सर्व कल्पनाशक्ती केशउठावातील नाजूक कोरीव कामावरच केंद्रीत झाली होती असे दिसते. या कोरीव कामात पूर्णकलश आणि मकरतोरण यासारखी प्रयोजने, गरुड आणि हनुमानाच्या त्याचप्रमाणे आधीच उल्लेख केलेल्या कपिली भागावरील स्त्रीमूर्तीचा समावेश होतो. ही स्त्रीमूर्ती नृत्याच्या आविर्भावात असून तिने अंगावर लोकरीचा कोट घातला आहे. तिच्या अंतर्वस्त्रावर थेंबाकृती नक्षी आहे. वरंडिकेवरही विटकामाचे दोन-तीन थर आहेत. मंदिराच्या उत्तरेकडील भागावर सुंदर मकरप्रणाल आहे.

मंदिराच्या अंतर्भागात नवरंग प्रकारचा मंडप असून त्याच्या मधोमध अंकण व परस्परांना मध्यभागी छेदतील अशा तुळ्यांचे थर रचून केलेले छत आहे. या छतावर अर्धउठावात कोरलेले कमळ आहे. अंतरालाच्या प्रवेशमार्गाच्या दोन्ही बाजूस प्रत्येकी एक अशी एकूण दोन देवकोष्ठे आहेत. देवकोष्ठांवर वेसर प्रकारचे शिखर आहे. सध्या त्यातील एका देवकोष्ठात देवीची मूर्ती तर दुसऱ्यात योगपट्टासनातील केवलनरसिंहाची मूर्ती आहे. अंतरालात जाण्याचे द्वार थोडेसे वेगळे आहे. या द्वारावर नेहमी आढळते तशी स्तंभशाखा नाही, तर त्यावर रत्न-प्रयोजनांची पुनरावृत्ती आहे. द्वारचौकटीच्या वरच्या आडव्या भागात वेसरशिखरयुक्त रथिका असून त्यात गणेश आहे. द्वाराच्याभोवती चौकटच्या आकाराची छिद्रे असलेले जालवातायन आहे. गर्भगृहाचे द्वार पंचशाख प्रकारचे असून त्यावर कमळाची नक्षी ( कमलपट्ट ) आहे. ललाटबिंबावर गणपती आहे. ललाटबिंबाच्या दोन्ही बाजूस आणि उत्तरांगाच्या पातळीच्या वर कोणत्याही अनलंकृत शाखेवर आढळते तशा प्रकारचे प्रयोजन आहे. असे प्रयोजन बहुधा शिलाहारांच्या प्रदेशातील तत्कालीन मंदिरात आढळते. या मंदिरावरील आकृतिशिल्पेही कोल्हापूर भागातील मंदिरांशी, म्हणजेच कुंतल शैलीशी साधर्म्य दाखवतात.

या मंदिराच्या गर्भगृहात जरी शिवलिंग असले तरीही हे मंदिर कळ्म्मादेवी मंदिर म्हणूनच ओळखले जाते. मंदिराच्या गर्भगृहाच्या मागील भिंतीतून आधाराकरता असलेले दोन त्रिकोणी घटक आहेत. या घटकांवरच पदस्थल पेलले गेले असावे. या घटकांवर पूर्वी पदस्थल असून त्यावर देवीची मूर्ती होती असे सांगितले जाते. त्यामुळे मुळात हे मंदिर बांधणाऱ्या स्थपतीच्या मनात द्विगर्भ मंदिर बांधण्याची योजना असण्याची आणि आपल्याला अज्ञात असलेल्या कोणत्यातरी कारणामुळे प्रस्तावित दाक्षिणाभिमुख दुय्यम गर्भगृह बांधता आले नसण्याची दाट शक्यता आहे. ही शक्यता जर मान्य केली तर दक्षिणेकडील प्रवेशद्वाराचे आणि मंडपाच्या उत्तरेकडील अलंकरणरहीत भागाचे समाधानकारक स्पष्टीकरण मिळते. मूळ योजनेत असलेले दक्षिणाभिमुख गर्भगृह देवीच्या मूर्तीसाठी असावे; पण ते न बांधले गेल्याने देवीची मूर्ती त्रिकोणी घटकांवरील पदस्थलावर ठेवण्यात आली असावी असे अनुमान काढता येईल.

शिल्पसंहितांमध्ये प्रासाद मंदिरांच्या १४ जाती किंवा प्रकार सांगितले आहेत. शिल्पसंहितांच्या चौकटीत राहूनही स्थपतींना मिळणाऱ्या स्वातंत्र्यामुळे तलविन्यासातील आणि वास्तुघटक प्रकारातील व त्यांच्या अलंकरणातील विविधतेमुळे मंदिरांचे शेकडो प्रकार निर्माण होतात. केवळ शिल्पसंहितांचा काळजीपूर्वक आणि बारकाईने

अभ्यास करून त्या समजून घेतल्यानेच आपल्याला उपलब्ध मंदिरे त्यातील नेमक्या कोणत्या प्रकारात मोडतात हे ठरविता येईल. या प्रकरणात घेतलेल्या आढाव्याचा हेतू फक्त पारंपरिक मंदिरांच्या तलविन्यासातील वैविध्य थोडक्यात विशद करणे एवढाच मर्यादित होता. पण वैविध्य अनेक प्रकारे आणि अनेक घटकांच्या सहाय्याने उद्‌भवू शकते. उदा. चौरस किंवा वर्तुळाकृती तलविन्यास, चारपेक्षा अधिक संख्येने भद्र असलेला तलविन्यास, वेदीवंधाचे आणि मंडोवराचे विविध प्रकार आणि शिखराचे अलंकरण इत्यादी.

## शिखर पूर्णतः पडून गेलेली महाराष्ट्रातील महत्त्वाची मंदिरे :

हेन्री कझिन्सने त्याच्या "मिडिव्हल टेंपल्स ऑफ द डेक्कन" या पुस्तकात ठाणे जिल्ह्यातील मंदिरांचीही नोंद घेतली आहे. त्यापैकी एक मंदिर कल्याण-कसारा रेल्वे मार्गावरील आटगाव स्थानकाजवळ आहे. दुसरे मंदिर सध्याच्या डोंविवली इंडस्ट्रियल इस्टेटकडून शीळकडे जाणाऱ्या मार्गावर आहे. तुंगारेश्वर टेकडीच्या परिसरात आणखी चार मंदिरे आहेत. त्यापैकी दोन मंदिरे पारोळजवळील लहान ओढ्यांजवळ असून ती लहान टाक्या आणि मोठ्या टाक्या या नावाने ओळखली जातात.कझिन्सच्या वर उल्लेखिलेल्या पुस्तकात[८६] त्यांची छायाचित्रे आहेत ( प्लेट XII आणि XIII ). या छायाचित्रांवरून स्तंभघटकक्रमाची आणि द्वाराची स्पष्ट कल्पना येते. त्यातील एका मंदिराचे वाहेरून दिसणारे दृश्य असलेले एक छायाचित्रही आहे. मोठ्या टाक्याच्या शिखरभागावर वेली आणि रानझुडूपे प्रचंड प्रमाणात वाढलेली असल्याने मोठ्या टाक्याचे शिखर कोणत्या प्रकारचे होते हे आता ओळखणे कठीण आहे. पण छायाचित्रांवरून गर्भगृहाचा तलविन्यास पंचरथ प्रकारचा होता आणि तीन भद्रांवरील तीन मोठ्या आकाराच्या देवकोष्ठांमध्ये उभ्या मूर्ती होत्या हे स्पष्टपणे जाणवते. गर्भगृहाच्या मंडोवरावर कोणतेही अलंकरण नाही. मंदिरावरील अलंकरण म्हणजे देवकोष्ठांवर असलेली शिखरे आणि देवकोष्ठांच्या खालच्या पातळीवर संपूर्ण वाह्यांगावर असलेला कीर्तिमुखाचा पट्ट तसेच छाद्याच्या किंचित खालच्या पातळीवर कीर्तिमुखाला समांतर आणि गर्भगृहाच्या तिन्ही वाजूच्या वाह्यांगावर असलेला चौकटच्या नक्षीचा पट्ट आहे. छायाचित्रात दाखविलेले द्वार त्रिशाखपद्धतीचे असून सर्वात वाहेरील शाखेवर लतापट्ट तर सर्वात आतील शाखेवर पद्मपत्रपट्ट आहे. मधली शाखा स्तंभशाखा आहे. उत्तरांगावर पाच देवमूर्ती आहेत. मधल्या मूर्तीच्या दो वाजूस गणेश आणि कार्तिकेय यांच्या मूर्ती आहेत. द्वारशाखांच्या खालच्या भागात परिचरांसमवेत असलेले शैव द्वारपाल दाखविले आहेत. स्तंभांव हस्त होते.

ही दोन मंदिरे अंबरनाथ येथील शिवमंदिराच्याही आधीच्या काळातील असावीत असे कझिन्सचे मत आहे.

**होट्टल येथील मंदिरे** (ता. देगलूर, जि. नांदेड) : देगलूरच्या पश्चिमेस ८ कि. मी. अंतरावर असलेल्या होट्टल गावात तीन मंदिरे आहेत. या मंदिरांमध्ये सुरुवातीच्या चालुक्य राजांचे शिलालेख असल्याने या मंदिरांना विशेष महत्त्व प्राप्त झाले आहे. सोमेश्वर मंदिर, परमेश्वर किंवा सिद्धेश्वर मंदिर आणि महादेव मंदिर ही तीन मंदिरे होत. यातील पहिल्या दोन मंदिरांना सहाव्या विक्रमादित्याच्या काळात दाने मिळाली होती.

परमेश्वर किंवा सिद्धेश्वर मंदिराला सिद्धेश्वर हे नाव चालुक्य राजा विक्रमादित्याचा मांडलिक वन्हिकुलचा सिद्धुकी याच्या नावावरूनच पडले असावे. त्याचाच शिलालेख या मंदिरात आहे. तथापि या शिलालेखात या मंदिराचा रोव्वेश्वर मंदिर असा उल्लेख आहे. पुढे मुखमंडप आणि दोन बाजूंना दोन अर्धमंडप असलेला अर्धखुला मंडप, अंतराल आणि गर्भगृह असा या मंदिराचा तलविन्यास आहे. मंदिर १.२१ मीटर उंचीच्या जगतीवर उभे आहे. मंदिराचा तलविन्यास सप्तरथ प्रकारचा असून मंदिराचे शिखर आज अस्तित्वात नाही.

गणेश आणि काली यांसारख्या परिवारदेवतांच्या मूर्ती, गर्भगृहाच्या तीन भद्रांवर असलेल्या तीन देवकोष्ठांमधील आणि अंतरालाच्या बाह्यांगावरील शिवाची उग्र रूपे आणि सलिलांतरांमध्ये दाखवलेल्या सुरसुंदरी एवढीच काय ती शिल्पे मंदिराच्या बाह्यांगावर आहेत. अर्धमंडप आणि मंडपाला वामनभिंती असून त्यावर कक्षासने आहेत. कक्षासनावर नेहमीचे वेदिकेचे अलंकरण आहे. वेसर शिखर असलेले स्तंभ आणि अशा दोन स्तंभांच्या मध्ये असलेल्या खोलगट भागात सुरसुंदरी असे या अलंकरणाचे स्वरूप आहे. मंडप आणि अंतरालाची छते प्रत्येक स्तरावरील चार तुळ्या एकमेकांना छेदतील अशा प्रकारची आहेत. उत्तर चालुक्य स्थापत्य शैलीशी साधर्म्य दाखविणारे स्तंभ, गर्भगृहाच्या द्वारावरील ललाटबिंबावर असलेली गजलक्ष्मी, अंतरालाच्या प्रवेशमार्गावरील तुलापट्टावर कोरलेला शिव नटराज, सहा शाखा असलेले प्रशस्त द्वार आणि द्वारशाखांच्या खालच्या भागात दाखविलेले शैव आणि वैष्णव प्रतीहार ही या मंदिराची उल्लेखनीय वैशिष्ट्ये आहेत.

या मंदिराच्या वास्तुशास्त्रीय घटकांची ढब, त्यांचे चालुक्य शैलीतील मंदिरांच्या वास्तुघटकांशी असलेले साधर्म्य, द्वारावर आणि तुलापट्टावर दाखविण्यात आलेले शिव आणि लक्ष्मी व सगळ्यात महत्त्वाचे म्हणजे मंदिरावर आढळलेला

इ. स. ११२० चा शिलालेख या बाबी लक्षात घेता हे मंदिर इ.स. च्या १२ व्या शतकाच्या पहिल्या चतुर्थकात बांधले गेले असावे.

सोमेश्वर मंदिर हे त्रिदल मंदिर असून पुढे मुखमंडप आणि तीन बाजूंना तीन गर्भगृहे असलेला मंडप असे त्याचे स्वरूप आहे. मुख्य गर्भगृह शिवाचे असून ते पूर्वाभिमुख आहे. मात्र आज त्यात शिवलिंग नाही. उत्तराभिमुख असलेले दुय्यम गर्भगृह विष्णूचे असून त्याच्या ललाटबिंबावर गणेशाऐवजी गजलक्ष्मी आहे आणि द्वारशाखांच्या खालच्या भागात वैष्णव द्वारपाल आहेत. शिलालेखामध्ये या मंदिराचा उल्लेख त्रैपुरुषक देवालय असा असल्यामुळे तिसरे गर्भगृह ब्रह्मदेवाचे असावे असा कुणाचाही समज होईल. हे गर्भगृह सध्या रिकामे आहे. गर्भगृहाच्या द्वारावर पाश, अंकुश आणि फळ धारण करणारी लक्ष्मी दाखविली आहे. गर्भगृह दक्षिणाभिमुख आहे, त्यामुळे ते शक्तीच्या एखाद्या स्वरूपाचे असावे. या मंदिराची वास्तुशास्त्रीय वैशिष्ट्ये, शैली, सहाव्या विक्रमादित्याच्या कारकिर्दीच्या २६ व्या वर्षीचा ( इ. स. ११०१) शिलालेख या बाबी लक्षात घेता हे मंदिर बाराव्या शतकाच्या पहिल्या चतुर्थकात बांधले गेले हे स्पष्ट दिसते.

**अन्वा येथील शिवमंदिर** (ता. सिल्लोड, जि. औरंगाबाद) : अन्वा येथील शिव-मंदिर मुळात विष्णूचे मंदिर होते. मंदिर चार फूट उंचीच्या जगतीवर उभे असून मुखमंडप आणि दोन बाजूंना प्रत्येकी एक अर्धमंडप असलेला अर्धखुला मंडप, अंतराल आणि गर्भगृह असा त्याचा तलविन्यास आहे. या तिन्ही अर्धमंडपांमध्ये जाण्यासाठी प्रत्येकी तीन पायऱ्या असून त्यांच्या तळाशी दोन्ही बाजूस वैष्णव द्वारपाल आहेत. गर्भगृहाचा तलविन्यास सप्तरथ, तर मंडपाचा तलविन्यास पंचरथ आहे. चार मुख्य दिशांना प्रत्येकी चार स्तंभांची ओळ, प्रत्येक उपदिशेस एकस्तंभ आणि मंडपाच्या मागील बाजूस दोन स्तंभ अशा २२ स्तंभांवर हा मंडप उभा आहे. मंडपाच्या वामनभिंतीजवळ एकूण १० स्तंभ आहेत. म्हणजेच मंडपात पुढील भागात १८ व मागील अर्ध्या भागात १४ स्तंभ असे एकूण ३२ स्तंभ आहेत. मंडपाच्या वामनभिंतीवर नेहमीचे वेदिकेचे अलंकरण आहे. शिखर असलेले स्तंभ आणि खोलगट भाग आलटून पालटून आहेत. खोलगट भागात सुरसुंदरी दाखविल्या आहेत. गर्भगृहाच्या बाह्यांगावर वैष्णव देवदेवता आहेत. मेधा, शांती, रती, तुष्टि, लज्जा या मूर्ती विशेष उल्लेखनीय आहेत. डॉ. देगलूरकरांच्या मते या सर्व मूर्ती, हे मंदिर मुळात वैष्णव असल्याची साक्ष[८७] देतात. मंडपाचे छतही तितकेच उल्लेखनीय आहे. छत घुमटाकार

(करोटक वितान) असून उत्तरोत्तर लहान होत जाणाऱ्या वर्तुळाकृती वलयांनी बनले आहे. घुमटाकार छताच्या सगळ्यात वरच्या बाजूस कमळाच्या कळीची नक्षी बाहेर आली आहे.

**अंभई येथील वाडेश्वर मंदिर** (ता. सिल्लोड, जि. औरंगाबाद) : अंभई येथील वाडेश्वर मंदिर होट्टल येथील सिद्धेश्वर मंदिराप्रमाणे त्रिदल असून त्याचे बरेच वास्तुशास्त्रीय घटकही सिद्धेश्वर मंदिराच्या वास्तु-घटकांशी मिळतेजुळते आहेत. या मंदिरातील दोन गर्भगृहांमध्ये विष्णू आणि शिव आहेत. तिसऱ्या गर्भगृहाच्या ललाटबिंबावर सप्तमातृका कोरल्या आहेत. त्यावरून तिसरे गर्भगृह निर्विवादपणे देवीचेच होते याविषयी शंका नाही. मंडोवरावर आढळणाऱ्या शैव, वैष्णव आणि शाक्त मूर्तीही हा कयास खरा असल्याची ग्वाही देतात. प्रत्येक गर्भगृहाच्या आणि त्याचप्रमाणे मंडपाच्याही बाह्यांगावर अष्टदिक्पाल आढळतात.

या मंदिराची वास्तुशास्त्रीय वैशिष्ट्ये आणि शिल्पशैली लक्षात घेता हे मंदिर १२ व्या शतकाच्या पूर्वार्धात बांधले गेले असावे.

**निलंगा येथील निलकंठेश्वर मंदिर** (ता. निलंगा, जि. लातूर) : येथील निलकंठेश्वर मंदिर त्रिदल पद्धतीचे असून मुखमंडप, मंडप आणि मंडपाला जोडलेली तीन गर्भगृहे असा त्याचा तलविन्यास आहे. मुख्य गर्भगृहात शिवलिंग असून तीन गर्भगृहांच्या तीन भद्रांवर शैव आणि वैष्णव देवदेवतांच्या मूर्ती आहेत. सुरसुंदरींच्या शिल्पाकृतीही मोठ्या संख्येने आहेत. मंडपाच्या मुखभागात वामनभिंती असून दरवाजाजवळ दोन स्तंभ आहेत. मुखभाग सोडल्यास मंडपाच्या उरलेल्या बाजू बंद आहेत. मंडपाच्या प्रत्येक कोपऱ्यात स्तंभांची चतुष्की आहे. म्हणजेच मंडप एकूण सोळा स्तंभांवर उभा आहे. मंडपाच्या मधोमध रंगशिला असून तिच्यावरील छत प्रत्येक चतुष्कीच्या कोपऱ्यातील एक स्तंभ अशा चार स्तंभांवर पेललेले आहे.

मंडपामधून तीन गर्भगृहांमध्ये जाण्याचे प्रवेशमार्ग आहेत. प्रत्येक गर्भगृह आणि मंडप यांच्यामध्ये अंतराल आहे. पूर्वाभिमुख असलेल्या मुख्य गर्भगृहात शिवलिंग आहे. उत्तराभिमुख गर्भगृहामध्ये हर आणि गौरी यांच्या मूर्ती आहेत. दक्षिणाभिमुख गर्भगृहामध्ये विष्णूच्या चोवीस रूपांपैकी केशव हे रूप दाखविले आहे.

या मंदिराच्या शिल्पशैलीवरून हे मंदिर १२ व्या शतकाच्या अखेरीस बांधले गेले असावे.

**पानगाव येथील विठ्ठल मंदिर** (ता. रेणापूर, जि. लातूर) : परळी वैजनाथपासून ३० कि. मी अंतरावर असलेल्या पानगाव येथे विठ्ठल मंदिर असून ते पूर्वाभिमुख आहे. पूर्वेस मुखमंडप, दक्षिणेस आणि उत्तरेस अर्धमंडप असलेला अर्धखुला मंडप, अंतराल आणि गर्भगृह असा त्याचा तलविन्यास आहे. होट्टल येथील सिद्धेश्वर मंदिर आणि धर्मपुरी येथील केदारेश्वर मंदिर ही मंदिरेही पूर्वाभिमुख असून त्यांचाही तलविन्यास अगदी असाच आहे हे या संदर्भात नमूद करणे आवश्यक आहे. उपरोक्त मंदिरांशी साधर्म्य असलेल्या घटकांव्यतिरिक्त या मंदिरासमोर एक बऱ्यांपैकी मोठा मंडप आहे. डॉ. प्रभाकर देव यांच्या मते मुळात त्याचे स्वरूप गोपुर असे असावे. तसे असेल तर या मंडपाला जोडूनच मंदिराची सिमाभिंत असली पाहिजे.

गर्भगृहाचा तलविन्यास सप्तरथ असून त्याचे बाह्यांग आणि मंडपाचा अंतर्भाग सुरसुंदरींच्या मूर्तीशिल्पांनी अलंकृत करण्यात आला आहे. मंडपामधील सुरसुंदरींचे स्वरूप हस्तावरील सपाट पट्टीवर असलेल्या मूर्ती असे आहे. होयसळांच्या आश्रयाखाली बांधलेल्या मंदिरांमध्येही अशाच मूर्ती आढळतात. तथापि शैलीच्या दृष्टीकोनातून त्या उत्तर चालुक्यांच्या काळातील, म्हणजेच नंतरच्या कर्नाटक शैलीच्या शिल्पांशी मिळत्याजुळत्या आहेत. आधीच नमूद केल्याप्रमाणे मंडप अर्धखुला असून प्रवेशमार्गांचा अपवाद वगळता मंडपाच्या सर्व बाजूंनी वेदिकेच्या वामनभिंती आहेत. वेदिकेच्या बाह्यांगावर आलटून पालटून येणारे अर्धस्तंभ आणि कोष्ठे यांचे अलंकरण आहे. कोष्ठांमध्ये नृत्यांगना आणि वादकांच्या मूर्ती आहेत. अर्धस्तंभांवर शिखरे दाखविली आहेत.

मंडपाच्या अंतर्भागात मंडप एकूण बावीस पूर्णस्तंभांवर आणि आठ वामनस्तंभांवर पेललेला आहे. त्यातील अठरा स्तंभ परिघभागात आहेत, तर मध्यभागी चार स्तंभ (चतुष्की) आहेत. शिवाय मंडपाच्या वेदिकेवर आठ वामनस्तंभ आहेत. स्तंभांचा घटकक्रम त्याच प्रदेशात आढळणाऱ्या स्तंभांसारखा म्हणजे चौरस तळखडा, तीन अष्टकोनी घटकांनी युक्त असलेला खांब, त्यातील प्रत्येक दोन लगतच्या अष्टकोनी घटकांच्या मधोमध वतुर्ळाकार घटक, वरच्या बाजूस चौरस घटक, त्यावर उद्गमसदृश घटक, त्यावर भरणी आणि शिरावटी असा आहे. खांबांचा वरचा भाग आणि खांबावरील तुळई यांना जोडणाऱ्या दगडी फळीसारख्या भागावर(हस्तपट्टांवर) सुरसुंदरींच्या मूर्ती आहेत. विशेष म्हणजे मंडपाच्या आतील मागच्या भिंतीत अंतरालाच्या द्वाराच्या दोन्ही बाजूस प्रत्येकी एक देवकोष्ठ आहे.

गर्भगृहाच्या द्वारावर खालच्या भागात शैव द्वारपाल आहेत. एरव्ही हे गर्भगृह आतून साधे सपाट असून त्याचे छतही साधे सपाट आहे. असे छत शिल्पग्रंथांमध्ये समतलवितान म्हणून ओळखले जाते. मंदिरासमोर असलेल्या गोपुरसदृश मंडपात नंदी असल्यामुळे हे मूळचे शैव देवालय असून त्याचे नंतर विठ्ठल मंदिरात म्हणजेच वैष्णव मंदिरात रूपांतर झाले असावे असा डॉ. प्रभाकर देवांप्रमाणे कोणाचाही समज होणे अपरिहार्य आहे. पण गर्भगृहांच्या भद्रांवरील देवकोष्ठातील वैष्णव मूर्ती लक्षात घेता डॉ. देव यांच्या या मताचा पुनर्विचार होणे आवश्यक आहे.

या मंदिराची वास्तुशास्त्रीय वैशिष्ट्ये आणि शैली लक्षात घेता हे मंदिर इ. स. च्या ११-१२ व्या शतकात बांधले गेले असावे.

**कोल्हापूर येथील मंदिरे** (ता. जि. कोल्हापूर) : **अ) महालक्ष्मी मंदिर** : सध्याच्या महालक्ष्मीच्या त्रैकूट मंदिरात महाकाली, महालक्ष्मी आणि महासरस्वतीच्या गर्भगृहांचा समावेश होतो. महालक्ष्मी हे या मंदिरातील मुख्य दैवत आहे. साहजिकच मुख्य गर्भगृह महालक्ष्मीचे असून ते पश्चिमाभिमुख आहे. दक्षिणाभिमुख गर्भगृह महाकालीचे तर उत्तराभिमुख गर्भगृह महासरस्वतीचे आहे. महासरस्वती असलेले हे उत्तराभिमुख गर्भगृह एक तर पुनर्बांधणी झालेले तरी आहे किंवा मध्ययुगीन काळात मुळात द्विगर्भ मंदिर असे स्वरूप असलेल्या मूळ मंदिरात या गर्भगृहाची भर पडलेली आहे.

मुख्य मंदिरात प्रथम येतो तो मुखमंडप*. हा मुखमंडप सध्या गणेशमंडप या नावाने ओळखला जातो व त्यात तीन बाजूंनी प्रवेश करता येतो. त्यानंतर लागतो अर्धखुला सभामंडप, त्यानंतर अंतराल आणि अंतरालाच्या मागे प्रदक्षिणामार्गाने युक्त असलेले सांधार गर्भगृह. गर्भगृहात प्रदक्षिणामार्गाच्या आतील क्षेत्रात गाभाऱ्याला लागून तीन दिशांना असलेली तीन दालने आणि गर्भगृहाच्या भद्रांमधून, म्हणजेच वाह्यांगातून प्रवेशमार्ग असलेली आणि प्रदक्षिणापथाच्या बाहेरच्या अंगाला पण गर्भगृहाच्या बाह्यभिंतीच्या आतील अंगास असलेली तीन स्वतंत्र देवळे ही या मुख्य गर्भगृहाची उल्लेखनीय वैशिष्ट्ये आहेत.

ही मुख्य गर्भगृहाच्या वाह्यांगातून प्रवेशमार्ग असणारी गर्भगृहातील स्वतंत्र देवळे एवढी ठळक आहेत की, त्यात जाण्यासाठी पुढे असलेल्या भागात स्वतंत्र पायऱ्या

---

* मुखमंडपाच्याही आधी गरुडमंडप लागतो. पण गरुडमंडप खूप नंतरच्या काळात बांधला गेला आहे. प्रस्तुत लेखनात फक्त प्राचीन काळातील स्थापत्याचाच विचार करायचा असल्याने फक्त त्याच काळात निर्मिलेल्या वास्तुघटकांचा उहापोह करण्यात आला आहे.

आहेत. मागच्या बाजूच्या देवळात जाण्यासाठी जगतीवरून पायऱ्या आहेत. सध्या या मुख्य गर्भगृहावर पायऱ्यापायऱ्यांचे शंक्वाकृती शिखर आहे. पण हे शिखर मूळ शिखर पडून गेल्यानंतर मध्ययुगीन काळात बांधले गेले आहे. मूळ शिखर निराळेच असल्याचा पुरावा देणारे वास्तुघटक आजही शिल्लक आहेत. गर्भगृहाच्या सपाट छप्पराच्या वर आणि अंतरालाच्या सपाट छप्पराच्या वर शुकनासेत आणखी एक मजला होता हे दाखविण्याइतपत अवशेष आजही आहेत. मात्र शुकनास आणि मूळ शिखरे आज अस्तित्वात नाहीत. मंडपाच्याही वर भव्य स्तंभांच्या चतुष्कीवर पेलले गेलेले करोटक (घुमटाकार) प्रकारचे छत आहे. पण या छताच्या खाली आणि मंडपाच्या वर एक चौकोनी मजला होता हे निःसंदिग्धपणे जाणवते. या घुमटावर संवरणा प्रकारचे शिखर असावे. अंतराल, मुख्य गर्भगृह आणि महाकालीचे गर्भगृह यांच्या बाह्यांगाच्या भिंती लक्षणीय उंच असल्या तरी पश्चिम भारतीय शिल्पसंहितांमध्ये आढळणाऱ्या नागर मंदिरांच्या मेरुमंडोवराच्या वर्णनाप्रमाणे त्यांना दोन किंवा तीन जंघा नाहीत ही बाब येथे नमूद केली पाहिजे. मुख्य गर्भगृहाच्या जाडजूड भिंतीत बाह्यांगातून प्रवेशमार्ग असलेल्या देवळांवरही पोटमाळे आहेत. त्यामुळेही बाह्यांगाच्या भिंतीची उंची वाढलेली आहे. या सर्व वैशिष्ट्यांवरून हे मंदिर केवळ खिद्रापूरच्या कोप्पेश्वर मंदिरापेक्षाच नव्हे तर ते कदाचित शिलाहार आणि यादव यांनी बांधलेल्या मंदिरांमध्ये सर्वाधिक भव्य मंदिर आहे हे स्पष्टपणे लक्षात येते.

आधीच नमूद केल्याप्रमाणे गर्भगृहातच प्रदक्षिणापथ आहे आणि त्याचा आकार अनेक रथ असलेल्या वास्तूच्या बाह्यरेपेसारखा आहे. गर्भगृहापुढे अंतराल असून ते गर्भगृहाच्या दर्शनी भिंतीइतक्याच रुंदीचे आहे. फक्त गर्भगृहाजवळील दोन कोपऱ्यात अंतरालाची भिंत मागे गेलेली आहे. त्यामुळे अंतरालाचा हा गर्भगृहाजवळील भाग गाभाऱ्याच्या दोन्ही बाजूंच्या प्रदक्षिणा मार्गाच्या बाजूच्या भिंतीपर्यंत रुंद बनला आहे. हे दोन वाढीव आयताकार भाग आज देवीचे शेजघर आणि दागदागिने ठेवण्याची खोली म्हणून वापरण्यात येत असले तरी ती जागा पूर्वी चार किंवा सहा दुय्यम देवतांचे दालन म्हणून वापरली जात असावी. पण बहुतेक वेळा अशी जागा किंवा दालने ठेवण्याऐवजी अंतरालाच्या भिंतीतच देवकोष्ठे बनविण्याचा पर्याय स्थपतींनी स्वीकारलेला आढळतो. म्हणूनच ही दालनांकरता असलेली जागा हे या मंदिराचे आगळेवेगळे वैशिष्ट्य आहे. हे अंतरालही नेहमी आढळणाऱ्या अंतरालापेक्षा आकाराने खूपच मोठे आहे आणि म्हणूनच हे पेलण्याकरता १२ स्तंभांची योजना करावी लागली आहे. अंतरालाच्या चारही कोपऱ्यात प्रत्येकी तीन स्तंभ असून कोपऱ्यातला स्तंभ इतर दोन स्तंभांपेक्षा

अधिक मोठा आहे. या स्तंभांवर अलंकरण नाही. किंवहुना अंतरालावर असलेला मजला पेलणे एवढेच या स्तंभांचे प्रयोजन असावे.

अंतरालाच्या आधी विशाल मंडप आहे. मंडपाच्या मागच्या भिंतील मनुष्याकारापेक्षाही मोठे द्वारपाल आहेत. द्वारपालांच्या मागील भिंतीचे स्वरूप दगडात कोरलेली जाळी किंवा जालवातायन असे आहे. आधीच नमूद केल्याप्रमाणे मंडप अर्धखुला असून त्याच्या तीन बाजूंना वामनभिंती आहेत. वामनभिंतीवर वामनस्तंभ आहेत. या वामनस्तंभांवर तीन पाखभागांचे छत पेललेले आहे. जीर्णोध्दार आणि महाकालीच्या गर्भगृहाची विशालकोनात असलेली जोड यामुळे या वामनभिंतीवर नेमके किती वामनस्तंभ होते हे सांगता येणे कठीण आहे. पण जास्तीतजास्त असे चौसष्ट वामनस्तंभ असावेत. मंडपामध्ये तीन प्रकारचे एकूण अठ्ठावीस स्तंभ आहेत. आकार, छेद (section) आणि उंची या निकषांवर स्तंभांचे निदान तीन प्रकार पडतात. मधले चार स्तंभ आधीच उल्लेख केल्याप्रमाणे सर्वाधिक भव्य आणि उंच असून त्यांवर घुमटाकार छत पेललेले आहे. वामनभिंतींच्या बाह्यांगावर नेहमीचे वेदिकेचे अलंकरण आहे. त्यावर वतुर्ळाकार अर्धस्तंभ आणि खोलगट भाग आलटून पालटून येतात. या तीन बाजूंच्या तीन वामनभिंतींना मध्येच खंड असून त्यातून दोन बाजूंच्या दोन दुय्यम गर्भगृहांकडे आणि समोरच्या अर्धमंडपात जाता येते.

समोरच्या अर्धमंडपाला किंवा मुखमंडपाला तीन बाजूंनी प्रवेशमार्ग आहेत. त्यातील पुढचा प्रवेशमार्ग मराठा काळात गरुडमंडप बांधतांना झाकला गेला आहे. मुखमंडप चौरसाकृति असून मुख्य गर्भगृहालगत असलेल्या अंतराला इतकाच रुंद आहे. त्याचा तलविन्यासही अंतरालासारखाच आहे. त्यातही प्रत्येक कोपऱ्यात तीन स्तंभ असून कोपऱ्यातील एक स्तंभ आकाराने अधिक भव्य आणि अष्टकोनी आहे.

बाह्यांगामध्ये जगतीवर प्रासाद असून त्याचा तलविन्यास सप्तरथ प्रकारचा आहे. जगतीवर एकावर एक असे दोन खुर, जाडंब, कलश आणि छाद्य असे थर आहेत. छाद्यावर सपाट पट्ट असून त्यावर भौमितिक प्रयोजने कोरलेली आहेत. जगतीवर वेदीबंध, जंघा आणि नेहमी आढळून न येणारे काही थर यांनी बनलेले मंडोवर आहे. जंघाभागाखाली खुर, कुंभ, कलश आणि कपोत हे थर आढळतात. जंघाभागाचे पायाभूत थर संपले की, अंग भागावर नागर शिखरांनी युक्त अशी देवकोष्ठे आहेत. या देवकोष्ठांवरील बहुतांशी नागर शिखरे शिखरशेखरी प्रकारची आहेत. बहुतेक देवकोष्ठांमध्ये नर्तिकांची तर

काही देवकोष्ठांमध्ये स्त्री-वादकांची शिल्पे आहेत. म्हणून ही जंघा लाटी प्रकारची आहे असे म्हणता येईल. पुढे आलेल्या भागांवर, म्हणजेच अंगभागांवर स्तंभांचे सर्व घटक आढळून येत असले तरी हे भाग स्तंभांच्या स्वरूपात नाहीत. देवकोष्ठांच्या शिखरांच्या वरच्या भागात त्रिकोणाकृती प्रयोजने आहेत. त्यांना भौमितिक शैलीतील उद्‌गम असे म्हणता येईल. त्यावर कलश , भरणी, शिरावटी आणि छाद्य हे घटक येतात. शिखर असलेली ही देवकोष्ठे विमानाच्या बाह्यांगात असलेल्या देवळांच्या दरवाजाच्या वरच्या तुळईच्या पातळीत आहेत. त्यावर भद्र भागातील पोटमाळ्याला सुरुवात होते. या भागावर स्तंभांचा मुखभाग असून त्याची लांबी अलंकृत पट्टांइतकी आहे. शिवाय भौमितिक शैलीतील उद्‌गम, कलश आणि भरणी, त्यावर संपूर्ण गर्भगृह आणि अंतराल यांना सामायिक असलेला शिरावटीचा थर आणि त्यावर छाद्य आहे.

**ब) महाकाली मंदिर** : या त्रिदल मंदिरातील सध्याचे महासरस्वतीचे गर्भगृह हे पूर्णतः मराठा काळातील निर्मिती असल्यामुळे या दोन दुय्यम गर्भगृहांपैकी फक्त महाकालीच्या गर्भगृहाचाच वास्तुशास्त्रीय दृष्टिकोनातून विचार करणे उचित ठरेल. जंघापातळीवरील शैलीतील थोड्या फेरफारांचा अपवाद वगळता हे गर्भगृह बऱ्याच दृष्टिकोनातून मुख्य गर्भगृहाशी मिळतेजुळते आहे. या गर्भगृहात आतील भागात प्रदक्षिणापथ आहे. बाह्यांगात मुखमंडपांनी युक्त अशी तीन स्वतंत्र मंदिरे आणि जंघाभागात शिखरांनी युक्त अशी देवकोष्ठे असून त्यात अप्सरांच्या मूर्ती आहेत. या गर्भगृहाच्या बाह्यांगात मुख्य गर्भगृहाच्या बाह्यांगाच्या तुलनेत काही फरक आहे. पहिला फरक म्हणजे सलिलांतरातही अप्सरांच्या मूर्ती आहेत. देवकोष्ठांची शिखरे नागर नसून वेसर प्रकारची आहेत. देवकोष्ठे आणि त्यांच्यावरील शिखरेही मुख्य गर्भगृहावरील देवकोष्ठ आणि शिखरांपेक्षा मोठ्या आकाराची आहेत. म्हणूनच नंतरच्या काळात बांधले गेल्याची शक्यता असलेल्या या महाकालीच्या गर्भगृहाला वाढीव उंची दाखविण्यासाठी अलंकृत पट्ट आणि देवकोष्ठांच्या नागर शिखरांच्या वर भौमितिक शैलीतील उद्‌गम यांची योजना करावी लागली. त्याचप्रमाणे महाकालीच्या गर्भगृहाला भद्रांमधील देवळांवर पोटमाळ्यांऐवजी वेसर शिखरे आहेत. या दोन्ही गर्भगृहांची केवळ जगतीची उंचीच सारखी आहे असे नाही तर त्यावरील थरही सारखेच आहेत. दोन्ही गर्भगृहांच्या जगती जेथे एकत्र मिळतात तेथे हे साम्य प्रकर्षाने लक्षात येते. तथापि महाकालीच्या गर्भगृहाला लागून जो अर्धखुला मंडप आहे त्याच्या वेदिकेवरील कक्षासनावर वेगळ्या धाटणीचे अर्धस्तंभ आहेत.

महाकालीच्या गर्भगृहाचा अंतर्भागही मुख्य गर्भगृहाच्या अंतर्भागापेक्षा वेगळा आहे. महाकाली मंदिराच्या अर्धखुल्या मंडपाच्या पुढे कोणत्या प्रकारचा मुखमंडप होता हे आज सांगता येणे कठीण आहे. परंतु या अर्धखुल्या मंडपाचे बाजूचे दोन प्रवेशमार्ग आजही शिल्लक आहेत. हे मार्ग पूर्व आणि पश्चिम दिशांना आहेत. या प्रवेशमार्गांना पायऱ्या आहेत. पण हा मंडप सममितीत बांधलेला नव्हता हे गर्भगृहाजवळील मंडपाच्या भागात वामनभिंती नाहीत यावरून स्पष्ट होते. गर्भगृहाच्या अंतर्भागाचे नीट निरीक्षण केले असता हा मंडप अशाच तऱ्हेने बांधणे आवश्यक होते असे लक्षात येते. गर्भगृह आणि मंडप यांच्यामध्ये सुस्पष्ट अंतराल नाही, मात्र चार स्तंभांची ओळ आहे. गाभाऱ्याच्या द्वाराच्या प्रत्येक बाजूस स्तंभांची एक जोडी आहे. अर्धखुला मंडप चार मुख्य स्तंभ, काही गौण स्तंभ आणि वामनभिंतीवर असलेल्या वामनस्तंभावर उभा आहे. महाकाली मंदिरावरील छाद्य भागही आजमितीस अस्तित्वात नाही. त्यामुळे या गर्भगृहावर आणि मंडपावर कोणत्या प्रकारचे शिखर होते याचा अंदाज बांधता येत नाही.

खुद्द महाकालीच्या गर्भगृहात मुख्य गर्भगृहाप्रमाणेच विमानाच्या आतच प्रदक्षिणापथ आहे.ही विमानाची वास्तू चार कोपऱ्यात असलेल्या नऊ स्तंभांचा एक अशा चार गटांवर उभारलेली आहे. ध्या छत्तीस स्तंभांपैकी गाभाऱ्यासमोरील दोन स्तंभजोड्यांचा अपवाद वगळता बाकीचे सर्व स्तंभ भित्तिसंगत आहेत. इतर बत्तीस स्तंभांपैकी आंतरिक वास्तूच्या प्रत्येक कोपऱ्यातील चार स्तंभ गाभाऱ्याच्या तीन भिंती जोडणारे वासे बनले आहेत, तर उरलेले सोळा स्तंभ गर्भगृहाच्या बाह्य भिंतीच्या आतील बाजूस असलेले अर्धस्तंभ बनले आहेत. गाभाऱ्याच्या तलविन्यासाची बाह्य रेपा रथयुक्त नसून चौकोनी आहे हे येथे मुद्दाम नमूद केले पाहिजे.

आज महालक्ष्मीचे मंदिर जीर्णोद्धार आणि पुनर्बांधणी झालेल्या स्थितीत आहे. या दोन प्राचीन मंदिरांच्या (महालक्ष्मी व महाकाली) मुखमंडपांवर, मंडपांवर आणि गर्भगृहांवर कोणत्या प्रकारची शिखरे होती याची कोणतीही कल्पना येत नाही. त्याचप्रमाणे निदान सुरुवातीला तरी ही मंदिरे एकाच मंदिराचे दोन भाग म्हणून नक्कीच बांधली गेली नव्हती. एका मंदिराला नंतर त्याच्या शेजारी नवे मंदिर बांधून ते जोडण्यात आले. ही नव्या मंदिराची जोड किंवा भर प्रदीर्घ काळाने घातली गेली नसून हे सर्व बांधकाम साधारणपणे एका पिढीतच झाले असावे. असे असले तरी या दोन्ही मंदिरांची शिखरे एकाच प्रकारची होती असे मानण्याचे

कारण नाही. इतरत्र आढळलेल्या द्विगर्भ आणि त्रिदल मंदिरांवरून एरव्ही देखील मुख्य आणि दुय्यम गर्भगृहांवर वेगवेगळी शिखरे असत, किंवहुना देवकोष्ठांवर असलेल्या नागर आणि वेसर शिखरांवरून या दोन मंदिरांवर वेगवेगळी शिखरे असावीत असाच तर्क निघतो. परंतु दोन्ही गर्भगृहांमध्ये प्रदक्षिणापथ अंतर्भागातच असल्यामुळे, म्हणजेच निराळ्या शव्दात ही गर्भगृहे सांधार पद्धतीची असल्यामुळे या दोन्ही गर्भगृहांवर नागर प्रकारचीच शिखरे असावीत.

एकच गर्भगृह असलेल्या मंदिराचे त्रिदल मंदिरात रूपांतर होऊ शकते हे "तलविन्यासातील वैविध्य" या प्रकरणात नाशिक जिल्ह्यातील झोडगे येथील माणकेश्वर मंदिराच्या विवेचनात दिले आहे. माणकेश्वर मंदिराच्या उदाहरणात मंडपाच्या वाजूच्या दोन अर्धमंडपांचे गर्भगृहात रूपांतर करण्यात आले होते, पण महालक्ष्मी मंदिराच्या वावतीत मात्र प्रथम महाकालीचे मंदिर बांधण्यात आले आणि नंतर त्यात महालक्ष्मी आणि महासरस्वती मंदिरांची भर पडली. खिद्रापूर येथील कोप्पेश्वर मंदिराशी साधर्म्य असणारे या मंदिराचे वास्तूघटक, दोन गर्भगृहाच्या मंडोवरावरील सुंदर शिल्पाकृती आणि इ. स. ११ व्या शतकातील शैलीची महालक्ष्मीची मूर्ती या सर्व वावी लक्षात घेता ही दोन मंदिरे इ. स. च्या ११ व्या शतकाच्या अखेरीस आणि इ. स. च्या १२ व्या शतकाच्या सुरुवातीस बांधली गेली असावीत असे दिसते.

**क) ओंकारेश्वर मंदिर :** कोल्हापूर शहरातील मंगळवार पेठेत एक मंदिर-संकुल असून त्यात एक लहान आणि तीन मोठी मंदिरे आहेत. सध्या विठ्ठलाचे म्हणून ओळखले जाणारे मंदिर, विष्णू मंदिर आणि ओंकारेश्वर मंदिर ही या संकुलातील मोठी मंदिरे असून ती एकमेकांना लागून आहेत. त्याच परिसरात नरसिंहाचे छोटे मंदिर आहे. नरसिंह मंदिरातील नरसिंहाच्या मूर्तीखालील कट्टा, ओंकारेश्वर मंदिराच्या मुखमंडपाच्या चार स्तंभावरील तुलापट्टावर असलेली उभ्या तीर्थंकरांची शिल्पे, त्याच मुखमंडपाच्या घुमटाकार छताच्या पायालगतच्या भागात आढळणारे जैन शिल्पपट्ट, मंडपाच्या मंडोवरावर असलेल्या जैन यक्ष आणि यक्षींच्या शिल्पाकृती या सर्व वावी ही दोन्ही मंदिरे मुळात जैन मंदिरे असल्याची साक्ष देतात. नरसिंह मंदिराची दक्षिणाभिमुखता तर ते मंदिर जैन असल्याचा पक्का निर्वाळा देते.

ओंकारेश्वर मंदिर उत्तराभिमुख असून अर्धखुला मुखमंडप, अंतराल आणि गर्भगृह असा त्याचा तलविन्यास आहे. अर्धखुल्या मंडपाला वामनभिंती असून त्यांच्या वेदिकाभागावर सिमेंटच्या वांधकामाचा थर आहे (हे वांधकाम अर्थातच

आधुनिक काळातील आहे). मुखमंडपात जाण्यासाठी तीन प्रवेशमार्ग आहेत. वामनभिंतींवर कक्षासने होती हे दाखविण्याइतपत पुरावा देणारे अवशेष शिल्लक आहेत. मुखमंडपाच्या मध्यभागी चतुष्की असून या चतुष्कीच्या स्तंभांवर वरच्या घुमटाकार छताला आधार देणारे नागबंध हस्त आहेत. तुलापट्टाच्या चारही अंतर्भागात अर्धउठावाहून अधिक उठावात असलेले कथापरपट्ट आहेत. हे पटही जैन धर्माशी संबंधित आहेत. तसेच पट तुलापट्टाच्या बाह्यांगावरही आहेत. घुमटाच्या अलंकृत पट्टामध्ये उभे तीर्थंकर दाखविले आहेत. त्यावर उत्तरोत्तर कमी आकार होत जाणारे वर्तुळाकार थर येतात. त्यातील दोन थरांवर गजतालू प्रयोजने येतात. छताच्या वरच्या भागाच्या शिलेवर तारकाकृती नक्षी असून खाली आलेली कमलकलिकेची नक्षी आहे.

मंडपाचे द्वार सहा शाखांचे असून त्यावर अनुक्रमे १) व्यालावर स्वार झालेले योद्धे, २) वादक, ३) पद्मपट ४) स्तंभांची नक्षी, ५) वादक व ६) लोलकांनी युक्त असलेला रत्नपट अशी शिल्पे आहेत. ही शाखांवरील प्रयोजने द्वारपाल ज्या पातळीवर येतात त्या पातळीतून उद्भवल्यासारखी येतात. द्वारस्तंभाच्या खालच्या भागावर ती वरून उद्भवल्यासारखी दाखविली आहेत. दरवाजाच्या वरच्या भागातील आडव्या तुळईवर ही प्रयोजने ललाटबिंबातून बाहेर येऊन दोन विरुद्ध दिशांना जात आहेत असे दाखविले आहे. या अशा रचनेमुळे ललाटबिंबावर मूर्तीकरीता जागा राहिली आहे आणि या सर्व नक्षीत वज्राची बाह्यआकृति किंवा रेखाचित्र कोरले आहे. आधीच नमूद केल्याप्रमाणे शिलाहारांच्या राज्यातील मंदिरांमध्ये हे वैशिष्ट्यपूर्ण प्रयोजन आढळते. एरव्ही प्रशस्त पण अंधारलेल्या मंडपात उजेड यावा याकरीता मुखमंडपाच्या मागील भिंतीत जालवातायने आहेत. मंडपाच्या मध्यभागी ऐसपैस रंगशिला असून तिच्या चारही कोपऱ्यांमध्ये प्रत्येकी एक चतुष्की आहे. या चतुष्क्यांची रचनाच अशी आहे की, प्रत्येक चतुष्कीतील मंडपाच्या सर्वाधिक मधल्या भागातील स्तंभ रंगशिलेवरील घुमटाकार छत पेलतील. चतुष्कींच्या बाकीच्या स्तंभांवर सपाट किंवा कललेले छत आहे. अंतरालाच्या मागील भिंतीत गर्भगृहात जाण्याचे द्वार मंडपाच्या प्रवेशद्वाराच्या तुलनेत कमी अलंकृत आहे. या द्वारालाही सहाच शाखा आहेत. पण या शाखांच्या खालच्या भागात प्रतिहार दाखविलेले आहेत. स्तंभशाखांवरील प्रतिहार सोडले तर बाकीच्या सर्व प्रतिहारांच्या डोक्यावर नागफणे आहेत. स्तंभशाखांवरील मूर्तींच्या हातात गदा आहे आणि त्यामुळेच या मूर्ती द्वारपालांच्या आहेत हे ओळखता येते. इतर शाखांवरील प्रतिहारांच्या हातात कमळे आहेत, तर द्वारपालांच्या हातात मात्र म्हाळुंगाची फळे आहेत. पुढच्या दरवाजाप्रमाणेच याही दरवाजावरील

मूळचे ललाटबिंब काढून त्याजागी गणेश कोरला आहे. उत्तरांगावरील रथिकांम
एकेकाळी मूर्ती होत्या, पण त्या खरवडून टाकण्यात आल्या आहेत. या प
रथिकांपैकी मधल्या तीन रथिकांवर नागर प्रकारची, तर टोकाच्या दोन रथिकां
वेसर प्रकारची शिखरे आहेत. रथिकांच्या शिखरांच्या मधील भागात कीर्तिमुख
अलंकरण आहे.

गर्भगृहाचा तलविन्यास सप्तरथ, तर मंडपाचा तलविन्यास पंचरथ प्रकार
आहे. गर्भगृहाच्या तीन आणि मंडपाच्या दोन भद्रांना नंदिका आहेत. हे
बऱ्यापैकी बाहेर आलेले असून त्यात खोल देवकोष्ठे आहेत. गर्भगृहावर
देवकोष्ठे आज रिकामी आहेत. मंडपावरील एका देवकोष्ठात सर्वानुभूती
आहे. जंघा पातळीवरील इतर अंगांवर यक्षी आणि सुरसुंदरींच्या मूर्ती आल
पालटून येतात. त्यातील एका यक्षीच्या हातात वैष्णव लांच्छने आहे
गर्भगृह आणि अंतरालाच्या सलिलांतर भागामध्ये मंजरी दाखविल्या आहे
म्हणूनच या जंघा प्रकारचे वर्णन लाटी आणि द्राविड जंघा प्रकारांचे मिश्रण
करता येईल.

या मंदिराची वास्तुशास्त्रीय वैशिष्ट्ये आणि शिल्पशैली लक्षात घेता हे मं
इ. स. च्या १२ व्या शतकाच्या सुरुवातीला बांधले गेले असावे. मंदिराच्या
भागातील भिंतींवर एक शिलालेख आहे. त्याचे अजून वाचन झालेले न
त्यामुळे त्याचा निश्चित काळही सांगता येत नाही.

**ड) मानस्तंभ पार्श्वनाथ बसति** : कोल्हापूर शहरातील शुक्रवार पेठेत हे म
आहे. मंडपाच्याच रुंदीचा मुखमंडप, मंडप, अंतराल आणि गर्भगृह
त्याचा तलविन्यास आहे. मंदिर दक्षिणाभिमुख आहे. सध्याचे शिखर
आणि चुन्यामध्ये बांधले गेले आहे. हे शिखर बहुधा मध्ययुगीन काळात ब
गेले आहे. मंदिर उंच जगतीवर उभे असून त्यावर खुर, जाडंब आणि छा
थर आहेत.

विमानाचा तलविन्यास सप्तरथ प्रकारचा आहे, पण "तारकाकृती" हे
अधिक अचूक वर्णन ठरेल. अर्धस्फुट जाडंब, त्यावर कुंभ, कलश
कपोत असे जंघा भागाखालील थर आहेत. त्यानंतर साधा सपाट जंघ
असून त्यावर उद्गम, कलश, भरणी, शिरावटी व त्याच्याही वर छाद्य असे
येतात. विमानाचे भद्र भाग पूर्णपणे सपाट असून त्यात देवकोष्ठे नाहीत. ग
अंतराल आणि मंडप यांच्या बाह्यांगावर आढळून येणारे एकमेव अलं
म्हणजे मंजरींचे होय. त्यात अर्धस्तंभांवर नागर शिखरे आहेत.

मुखमंडपाच्या मुखभागात वामनभिंत आणि कक्षासने असून दोन स्तंभ आणि कोपऱ्यातील दोन अर्धस्तंभ यांवर मुखमंडपाचे छत पेललेले आहे. मंडपाचे व गर्भगृहाचे द्वार पंचशाख पद्धतीचे असून त्यावर कोणतेही अलंकरण नाही. उत्तरांगावरील रथिकांवर वेसर शिखरे आहेत. बाहेरच्या द्वारावरील ललाटबिंबावर तीर्थंकराची शिल्पाकृती असावी. आतील द्वारावर वसलेल्या तीर्थंकराची केशउठावातील आकृती आजही दिसून येते.

उत्तरांगाच्या वरच्या आणि खालच्या भागात खास शिलाहार शैलीचे वैशिष्ट्य असलेले वज्राचे अलंकरण आहे. स्तंभ आणि अर्धस्तंभही शिलाहार शैलीतील असून कुंभी, चौरस खांव, कुंभ, अष्टकोनी घटक, अष्टकोनी घटकांच्या मध्ये वर्तुळाकृती कणी, त्यांच्यावर चौरसाकृती ठोकळ्यासारखा घटक, त्याच्याही वर अष्टकोनी घटक, त्यावर वर्तुळाकृती खांव व त्यावर कलश, भरणी आणि शिरावटी असा त्यांचा घटकक्रम आहे.

हे मंदिर इ. स. ११३६ मध्ये वांधण्यात आले. त्याला खुद्द शिलाहार नृपति गंडरादित्याचा राजाश्रय होता. त्यामुळे या मंदिराच्या स्थापत्यशैलीचे बारकावे लक्षात घेऊन शैलीपरत्वे इतर मंदिरांचा कालक्रम ठरविण्यात या मंदिराची खूप मदत झाली आहे.

**पाटणे येथील महेश्वर मंदिर** (ता. चाळीसगाव, जि. जळगाव) : पाटणे येथील हे मंदिर जगतीवर उभे असून मुखमंडप, अर्धखुला मंडप, अंतराल आणि गर्भगृह असा त्याचा तलविन्यास आहे. गर्भगृहाचा तलविन्यास पंचरथ प्रकारचा असून तारकाकृती आहे. अर्धखुला मंडप अनेक थर असलेल्या पीठावर असून पीठाच्या सगळ्यात वरच्या भागावर गजथर आहे. अर्धखुल्या मंडपाला तिन्ही बाजूंनी वामनभिंती असून त्याच्या राजसेनकाचे स्वरूप कीर्तिमुखांचा पट्ट असे आहे. या पट्टावर कक्षासनयुक्त वेदिका आहे. कक्षासनाचे उल्लेखनीय वैशिष्ट्य म्हणजे त्यावरील आकृतिशिल्प होय. गर्भगृहाच्या भद्र भागांमधील देवकोष्ठांमधील महिषासुरमर्दिनी आणि भैरव या मूर्तींचा अपवाद वगळता गर्भगृहाच्या बाह्यांगावर मूर्ती नाहीत.

पीठावर अनुक्रमे खुर, जाडंव, कुंभ, आणि कपोत असे थर आहेत. कपोतावर गजथर आहे. मंडोवराच्या तळभागात जाडंव, कुंभ, कलश आणि कपोत असे थर आहेत. त्यावर जंघाभाग असून तो स्तंभकूटांनी अलंकृत केलेला आहे. गर्भगृहाच्या द्वाराला सहा शाखा असून त्यावर अनुक्रमे १) पद्मपट्ट २) वादक, ३) स्तंभ, ४) व्याल, ५) कमळाच्या पाकळ्या व ६) चौकटची आणि

गोलकांची नक्षी असे अलंकरण आहे. ललाटबिंबावर गणेश असून उत्तरांगातील रथिकांमध्ये सप्तमातृकांपैकी तीन मातृका आणि गणेश व भैरव आहेत. या मंदिराची वास्तुशैली, द्वार, स्तंभघटकक्रम आणि मंडोवर लक्षात घेता हे मंदिर इ. स. च्या बाराव्या शतकाच्या अखेरीस बांधले गेले असे अनुमान काढता येते.

निकुंभ घराण्यातील बंधूंनी चांगदेव नामक ज्योतिर्विदाच्या अधिपत्याखाली असलेल्या ज्योतिष विद्यालयाला शके ११२८ मध्ये (इ. स. १२०६) दान दिल्याचा उल्लेख असलेला शिलालेख मंदिराच्या अंतरालाच्या भिंतीत आहे. या शिलालेखाची तारीखही वरील अनुमानास दुजोरा देते.

**वाघळी येथील मुधईदेवी मंदिर** (ता. चाळीसगाव, जि. जळगाव) : हे मंदिर नदीकाठी असून काहीसे गावाबाहेर आहे. ते जगतीवर उभे असून त्याला एकेकाळी दुय्यम गर्भगृहे असावीत असा अंदाज आहे. मुखमंडप, मंडप, अंतराल आणि गर्भगृह असे त्याचे सध्याचे स्वरूप आहे. गर्भगृहाचा तलविन्यास तारकाकृती[८८] आहे. मंडपाचे बाह्यांग शिल्पविरहीत आहे. फक्त गर्भगृहाच्या बाह्यांगावर तीन मुख्य दिशांना असलेल्या देवकोष्ठांमध्ये मूर्ती आहेत. उत्तरेकडील देवकोष्ठात महाकालीची, दक्षिणेकडील देवकोष्ठात गणपतीची आणि मागील बाजूतील देवकोष्ठात सूर्याची मूर्ती आहे. मंदिराच्या बाह्यांगावर खालच्या बाजूस असलेल्या चौकटच्या नक्षीचा थर आणि वरच्या बाजूस असलेले उद्‌गम एवढेच काय ते अलंकरण आहे. या मंदिराच्या परिसरात सापडलेल्या शिल्पाकृती आणि गणेशाची शिल्पाकृती असलेल्या ललाटबिंबावर दाखविलेला सूर्य यावरून हेइ. स. च्या बाराव्या शतकातील सूर्यमंदिर असावे असे अनुमान काढता येते.

मंडपाचे छत चौरसाकृती तलविन्यासाच्या चार स्तंभावर पेलले आहे. उत्तरोत्तर निमुळत्या होत जाणाऱ्या चौरसांवर गजतालू प्रयोजने आहेत. छतामधून खालच्या दिशेने पाच कमलाकार भाग पुढे आले आहेत. शिल्पग्रंथांच्या भाषेत अशा छताला, "क्षिप्तोत्क्षिप्त वितान" असे नामाभिधान आहे. मुखमंडपाचे आणि अंतरालाचे छतही अशाच प्रकारचे आहे. मात्र अंतरालाच्या छतावर एकच पुढे आलेला कमलाकार घटक आहे.

**वाघळी येथील सिद्धेश्वर मंदिर** : सध्या महानुभाव संप्रदायाचे असलेले हे मंदिर कदाचित महाराष्ट्रातील सर्वाधिक प्राचीन मंदिरांपैकी एक आहे. मंडपाच्या भिंतीवरील शिलालेखही याचा पुरावा देतो. हे मंदिर सिद्धेश्वर मंदिर म्हणून ओळखले जाते. महामंडलेश्वर सेऊणाचा मांडलिक गोविंद याने हे मंदिर शके ९९०

(इ. स. १०६९) मध्ये बांधले असा शिलालेखात उल्लेख आहे. मंदिराची बरीच पडझड झालेली असल्यामुळे मंदिराचा मंडप सोडला तर बाकीच्या भागांच्या तलविन्यासांची आज कल्पना करता येणार नाही. पण बहुधा मंडपाच्या पुढच्या भागात मुखमंडप आणि मागील भागात गर्भगृह असावे. नागशीर्ष आणि कीचकहस्त असलेल्या अर्धस्तंभांवर उभ्या असणाऱ्या या साध्या मंडपाचे उल्लेखनीय वैशिष्ट्य म्हणजे त्याच्या काहीशा घुमटाकार छतावर सर्वात वरच्या वर्तुळाकृती भागात असलेले कृष्ण आणि गोपींचे शिल्प होय.

**मुखेड येथील शिवमंदिर** (ता. मुखेड. जि. नांदेड ) : मुखेड येथे हे शिवमंदिर असून एक मुखमंडप आणि दोन अर्धमंडप असलेला मंडप, अंतराल आणि गर्भगृह असा त्याचा तलविन्यास आहे. मंदिर जगतीवर उभे आहे. जगतीचा बराच भाग मातीच्या ढिगाऱ्याखाली गाडला गेला आहे. अलिकडील काही वर्षांत या मंदिराची दुरुस्ती करण्यात आली. या दुरुस्तीत मधल्या काळात या मंदिराची जी हानी अथवा पडझड झाली ती झाकण्याचा प्रयत्न झाला. परिणामतः मंडपाच्या दोन बाजूंना असलेले एकूण दोन अर्धमंडप आज अस्तित्वात नाहीत. मंदिर उत्तराभिमुख असून मंदिराच्या गर्भगृहात एक मीटर उंचीच्या भद्रपीठावर शिवलिंग आहे. भद्रपीठयुक्त शिवलिंगाची मूळ मंदिरात नंतरच्या काळात भर पडली असावी. आज अर्धमंडप, मुखमंडप, मंडप आणि गर्भगृह यांवरील शिखरे अस्तित्वात नाहीत.

जगतीवरील थर स्पष्ट नाहीत. पीठावर खुर, जाडंब आणि कलश हे थर आहेत. डॉ. देगलूरकर यांनी कुमुद आणि पद्म (cyma reversa) यासारख्या आणखी काही थरांचे तपशील[८९] दिले आहेत. या थरांची पुनरावृत्ती झालेली आढळते. सामान्यपणे अशी पुनरावृत्ती आढळून येत नाही. मंडोवरावरील जंघाभाग मूर्तिशल्पांनी समृद्ध आहे. त्यातील प्रासादाच्या मंडोवरावरील सप्तमातृकांच्या मूर्ती उल्लेखनीय आहेत. मंदिराच्या अंतर्भागात मंडपाच्या मधोमध अंकण असून त्यावर प्रत्येक स्तरावरील चार तुळ्या एकमेकींना छेदतील अशा प्रकारचे छत पेलणारे चार स्तंभ आहेत. एकमेकांना छेदणाऱ्या चौरसातील तुळ्यांच्या जमिनीशी काटकोनात असलेल्या भागावर आणि नवरंग मंडपाच्या तुलापट्टावर कथापरपट्ट आहेत. स्तंभ, द्वारशाखा आणि अर्धस्तंभ यांचा घटकक्रम एकच आहे. सामान्यपणे चौरस तळखडा, खांब, त्यावर अष्टकोनी आणि वतुर्ळाकृती घटक, शिल्पपट्ट, त्याच्यावर नेहमीचे थर, त्यावर शीर्ष आणि कीचकहस्त असा स्तंभ घटकक्रम आहे. एक दोन स्तंभ याला अपवादात्मक असून त्यांचा घटकक्रम किंचित निराळा आहे.

मूर्तिशिल्पांनी समृद्ध असलेला जंघाभाग, स्तंभघटकक्रम आणि मंदिराची द्वारे लक्षात घेता हे मंदिर इ. स. च्या ११ व्या शतकात बांधले गेले असावे.

**मेथी येथील लक्ष्मी आणि नारायणाची मंदिरे** (ता. सिंदखेड, जि. धुळे) : मेथी या गावी ही लक्ष्मी आणि नारायणाची मंदिरे आहेत. ही दोन्ही मंदिरे अनेक अर्थांनी अव्दितीय आहेत. ही मंदिरे एका शेजारी एक अशी असून १.८२ मीटर उंच अशा जगतीवर उभी आहेत. मंदिरात जाण्यासाठी दोन्ही मंदिरांच्या समोर पायऱ्या आहेत. नारायण मंदिरासमोर गरुड असलेला मंडप होता हे दाखविण्याइतपत अवशेष आजही दिसतात. या मंदिरांपैकी लक्ष्मी मंदिर काहीसे लहान असून त्याचा मंडपही जरा वेगळ्या प्रकारचा आहे. दोन्ही मंदिरांचा तलविन्यास मुखमंडप, मंडप, अंतराल आणि गर्भगृह असा आहे. लक्ष्मी मंदिराच्या मंडपाला पूर्ण भिंती आहेत तर नारायण मंदिराचा मंडप अर्धखुला आहे. नारायण मंदिराच्या वाह्यांगावर वैष्णवमूर्ती आहेत, पण मंदिरासाठी वापरलेला प्रस्तर निकृष्ट प्रतीचा असल्यामुळे या मूर्तींची कमालीची झीज होऊन त्यांचे मूर्तीशास्त्रीय तपशील नाहीसे झाले आहेत. लक्ष्मी मंदिरातील देवीची मूर्ती आणि तिच्या प्रभावळीभोवती दाखविलेल्या नऊ दुर्गावरून ही मूर्ती कोल्हापूरच्या महालक्ष्मीसारखी असावी हे स्पष्ट होते. या मंदिराच्या शैलीवरून हे मंदिर इ. स. च्या बाराव्या शतकात बांधले गेले असावे.

**धर्मापुरी येथील केदारेश्वर मंदिर** (ता. आंबजोगाई, जि. बीड) : धर्मापूरी गावी असलेल्या या मंदिराचे उल्लेखनीय वैशिष्ट्य म्हणजे त्याच्या बाह्यांगावर असलेल्या सुंदर शिल्पाकृती.[१०] धर्मापुरी गावात सुट्या मूर्ती मोठ्या प्रमाणावर आढळतात.

मंदिर पश्चिमाभिमुख असून एक मुखमंडप आणि दोन बाजूस असलेले दोन अर्धमंडप यांनी युक्त असलेला अर्धखुला मंडप, र्भगृहाइतकेच रुंद अंतराल आणि गर्भगृह असा त्याचा तलविन्यास आहे. गर्भगृहात शिवलिंग आहे. या मंदिराची बरीच वैशिष्ट्ये पानगाव येथील विठ्ठल मंदिर आणि होट्टल येथील सिद्धेश्वर मंदिर या दोन मंदिरांच्या वैशिष्ट्यांशी मिळतीजुळती आहेत.

गर्भगृहाचा तलविन्यास नवरथ आहे. गर्भगृहाच्या तीन भद्रांवर प्रत्येकी एक रथिका आहे. या रथिकांमध्ये केशव, वासुदेव आणि नरसिंहाच्या मूर्ती आहेत. या मंदिरावर शिव, भैरव, पार्वती आणि काली यासारख्या शैव संप्रदायातील देवता दाखविल्या असल्या तरी बहुसंख्य देवमूर्ती वैष्णव आहेत. विशेषतः केशव, नारायण, गोविंद,त्रिविक्रम, वासुदेव, जनार्दन यासारखी विष्णूची रूपे दाखविली आहेत.

बाह्यांगामध्ये पीठावर जाडंबासारखे काही थर असून त्यावर मंची आहे. मंचीच्या वर मंडोवराला सुरुवात होते. ९.१४ चौरस मीटर आकाराच्या मंडपाला अलिकडेच झालेल्या जीर्णोद्धारात पूर्ण भिंती बांधल्या गेल्या असल्या तरी मुळात हा मंडप अर्धखुला असून त्याच्या तिन्ही बाजूने वेदिका होती हे दाखवून देणारे पुरावे आहेत. पीठाचे नेहमीचे थर संपल्यावर त्याच्या वरच्या भागात नजरेत भरेल असा गजथर आहे. त्यावर राजसेनक, वेदिका आणि आसनपट्ट आहेत. या मंदिरावरील राजसेनकाचे स्वरूप दोन कपोतालींच्या मध्ये असलेल्या अर्धस्तंभांच्या ओळीत दोन अर्धस्तंभांच्या मधील भागात दाखविलेल्या चौकटचे आकार आणि मनुष्याकृती यांचा पट्ट असे आहे. वेदिकेवर नेहमीप्रमाणे अर्धस्तंभांमुळे निर्माण झालेल्या देवकोष्ठांमध्ये नृत्यांगना आणि वादक दाखविले आहेत. मंडपाचा अंतर्भाग नऊ पादांचा असून त्याचे छत कोपऱ्यांमध्ये आणि टोकाजवळ काहीसे तिरपे पण सपाट आहे. छताच्या तिरप्या प्रस्तरभागावर कीर्तिमुखे कोरलेली आहेत. मंडपाच्या मध्यभागी रंगशिला आहे.

मंडपातील मागच्या भिंतीत अंतरालाच्या द्वाराच्या दोन्ही बाजूस प्रत्येकी एक अशी एकूण दोन देवकोष्ठे आहेत. अंतरालाचा आकार (१.०४ मीटर x १.०४ मीटर) गर्भगृहाइतकाच आहे. गर्भगृहाचे द्वार पंचशाख प्रकारचे असून या द्वारशाखांवर आतील बाजूकडून अनुक्रमे पुष्पपट्ट, भक्त दाम्पत्य, अर्धस्तंभ, व्याल आणि गोलकांची किंवा भोवऱ्यांची नक्षी आहे. द्वारशाखांवर खालच्या भागात अनुक्रमे गंगा व यमुना, चौरीधारक, वैष्णव द्वारपाल आणि निधी दाखविले आहेत.

गर्भगृहाच्या द्वारावरील वैष्णव द्वारपाल, भद्रांवरील देवकोष्ठामधील मूर्ती आणि मोठ्या संख्येने आढळणाऱ्या वैष्णव शिल्पाकृतींवरून हे मंदिर मुळात विष्णूचे असल्याचे निःसंदिग्धपणे स्पष्ट होते. मंदिराची वास्तुशास्त्रीय वैशिष्ट्ये आणि शिल्पशैली लक्षात घेता हे मंदिर इ.स. च्या बाराव्या शतकाच्या सुरुवातीला बांधले गेले असावे.

**पेडगाव येथील लक्ष्मीनारायण मंदिर** (ता. श्रीगोंदा, जि. अहमदनगर) : श्रीगोंदा तालुक्याच्या ठिकाणापासून १५ कि. मी. अंतरावर असलेल्या पेडगावमध्ये सरस्वती आणि भीमा नदीच्या संगमावर पाच मंदिरांनी बनलेले एक मंदिर संकुल आहे. लक्ष्मीनारायण मंदिर हे त्यापैकी एक होय.

मुखमंडप आणि दोन अर्धमंडप असलेला बिनखांबी (astyler) मंडप, अंतराल आणि गर्भगृह असा मंदिराचा तलविन्यास आहे. मंडपांपैकी दोन्ही अर्धमंडपांची

कमालीची पडझड झाली आहे. अर्धमंडपांवरील शिखरांवर आणि गर्भगृहावरील शिखरावर कोणतीही व्यवच्छेदक लक्षणे उरलेली नाहीत. गर्भगृहावर विटांनी बांधलेले शिखर आहे. या मंदिराचे उल्लेखनीय वैशिष्ट्य म्हणजे मंडपाचे बाह्यांग होय. पीठ भागावर मंडपाच्या तिन्ही बाजूंनी वामनभिंती आहेत, पण या वामनभिंतींवर कक्षासनाऐवजी जालभित्ती (जालवातायनाला असतात तशा जाळी खोदलेल्या प्रस्तराने बांधलेल्या भिंती) आहेत.

गर्भगृहाचा तलविन्यास पंचरथ असून त्याच्या भद्रांना नंदिका आहेत. पीठ भागावर अलंकरणात्मक नक्षी असलेले खुर, त्यावर गजथर आणि त्याच्याही वर अश्वथर असे थर आहेत. अश्वथरावर कुंभ, कलश आणि मंची, त्यावर मंडोवरावरील रथिका आणि त्याहीवर उद्गम, भरणी आणि शिरावटी आणि सगळ्यात वर छाद्य येते. नेहमी जेथे देवमूर्ती दाखविल्या जातात त्या तवंगांच्या मधील जागेत असलेला नरथर हे या मंदिराचे आणखी एक वैशिष्ट्य. जंघा-पातळीवर विष्णूची चोवीस रुपे, वराह अवतार आणि परिवार देवताही दाखविल्या आहेत. या परिवारदेवतांमध्ये हनुमानाचाही समावेश आहे.

मंडपाच्या अंतर्भागात रंगशिलेवरील चार स्तंभ सोडले तर इतर कोणतेही स्तंभ नाहीत. अंतरालाचे द्वार दोन भित्तिसंगत स्तंभांनी बनले आहे. मंदिराच्या अंतर्भागात एकूण चार देवकोष्ठे आहेत. दोन देवकोष्ठे मंडपातील मागच्या भिंतीत आहेत, तर बाकीची दोन अंतरालातील बाजूच्या भिंतींमध्ये आहेत. मंडपातील स्तंभांचा घटकक्रम भद्रप्रकारचा म्हणजे खाली तळखडा, त्यावर कुंभी, त्यावर चौरसाकृती खांब, तोच खांब पुढे अष्टकोनी बनतो व त्यावर पूर्णकलश, त्यावर आणखी दोन घटक आणि त्याच्याही वर उद्गम, भरणी आणि कीचकहस्तयुक्त शिरावटी असा आहे. हा स्तंभ घटकक्रम अंबरनाथ मंदिराच्या स्तंभांशी मिळताजुळता आहे. पण यातील दोन घटक अंबरनाथ मंदिरातील स्तंभांपेक्षा निराळे आहेत. उद्गमाखाली असलेला पूर्णघट-घटक आणि भरणीच्या तळाशी असलेला आमलकपट्ट हे ते दोन घटक होत.

त्याचप्रमाणे गर्भगृहाचे द्वारही उल्लेखनीय आहे. हे द्वार पंचशाख पद्धतीचे असून या शाखांवर आतल्या बाजूने सुरुवात केली असता अनुक्रमे कल्पलता, गंधर्व, स्तंभ, पद्मलता आणि व्याल आहेत. द्वारशाखांवर खालच्या भागात गंगा आणि यमुना यांच्याप्रमाणेच चौरीधारक आणि वैष्णव द्वारपाल दाखविले आहेत. द्वारावर आकृतिशिल्पांचे आणि अलंकरणाचे प्राचुर्य असले तरी उत्तरांगावरील रथिकांमध्ये मात्र देवमूर्तीऐवजी चौकटचे आकार कोरले आहेत.

या मंदिराचे वास्तुशास्त्रीय तपशील आणि शिल्पशैली लक्षात घेता हे मंदिर इ. स. च्या १२ व्या शतकाच्या सुरुवातीला बांधले गेले असावे.

**बीड येथील कंकालेश्वर मंदिर** (ता. जि. बीड) : बीड येथील कंकालेश्वर मंदिर नेहमी आढळणाऱ्या मंदिरांपेक्षा आगळेवेगळे असून ते ८४.७९ मीटर x ८४.७९ मीटर आकाराच्या तलावाच्या मध्यभागी आहे. मंदिरात जाण्यासाठी तलावाच्या पश्चिमेकडून मार्ग आहे. तलावाच्या मधोमध एक मोठ्या आकाराचा कट्टा आहे. या कट्ट्यावर १.५२ मीटर उंचीच्या जगतीवर मंदिर उभे आहे. पण आज केवळ मंदिराच्या मागील भागाकडील जगतीचा भागच दिसून येतो. जगतीचा बाकीचा भाग मंदिराच्या चारही बाजूंना मध्ययुगीन काळात जे मंडपासारखे भाग उभारण्यात आले त्यावेळी विस्कळीत झाला असावा.

मंदिर पश्चिमाभिमुख असून मुखमंडप, त्याच्यामागे अर्धखुला मंडप आणि या मंडपाला जोडून तीन बाजूंना अंतरालयुक्त गर्भगृहे असा त्याचा तलविन्यास आहे. सर्व म्हणजे तीनही गर्भगृहे सारख्याच आकाराची असून त्यांचा तलविन्यास तारकाकृती आहे. आधीच नमूद केल्याप्रमाणे मंडप अर्धखुला असून अष्टकोनी आकाराचा आहे. मंडपाच्या चार मुख्य दिशांना आणि चार कोपऱ्यांमध्ये प्रत्येकी दोन स्तंभ किंवा एक स्तंभ-जोडी आहे. या सोळा स्तंभांवर घुमटाकार छत पेललेले आहे. हे घुमटाकार छत उत्तरोत्तर लहान होत जाणाऱ्या वर्तुळाकृती वलयांनी बनले आहे. या छतावर मण्यांची नक्षी, पद्मलता आणि फुलांची नक्षी यांचे अलंकरण आहे. छताच्या मध्यभागी आणि सर्वात वर असलेला प्रस्तर तारकाकृती असून त्यावर क्षिप्त कमळ आहे. मंडप आणि गर्भगृहामधील स्तंभ चौरस तलविन्यासाचे असून चौरस तळखडा आणि वर काही अंतरावर अनुक्रमे अष्टकोनी, चौरस आणि वर्तुळाकार बनणारा चौरस खांब आणि खांबाच्या वर्तुळाकृती भागावर कीचकहस्त असा या स्तंभांचा घटकक्रम आहे.

मंदिराच्या बाह्यांगामध्ये पीठ भागावर विविध थर असून सगळ्यात खालचा थर चौकटच्या नक्षीने, तर सगळ्यात वरचा थर कीर्तिमुखांनी अलंकृत केला आहे. भद्र भागातील देवकोष्ठांमध्ये शक्ती, ब्रह्मदेव आणि शिव संप्रदायातील देवदेवता आहेत, तर मंडोवरावरील जंघाभागात विष्णूचे दहा अवतार आणि अष्टदिक्पाल दाखविले आहेत.

गर्भगृहांची द्वारे पंचशाख प्रकारची असून त्यावर कमलदल, पुष्प आणि व्याल यासारखी प्रयोजने आहेत. मध्यशाखा अर्धस्तंभांच्या स्वरुपात आहेत. द्वारशाखांवर खालच्या भागात कुंभ आणि चौरी धारण करणाऱ्या दासी आणि निधी दाखविले

आहेत. बहुसंख्य मुख्य प्रतिहारांच्या हाती शैव आयुधे आहेत. मुख्य गर्भगृहाच्या ललाटावर गणेशमूर्ती आहे. इतर दोन उपगर्भगृहांच्या ललाटावरील मूर्ती खरवडून टाकण्यात आल्या आहेत आणि द्वारावरच्या उत्तरांगावरील रथिकांमध्ये फक्त चौकटचे आकार कोरलेले आहेत. त्यामुळे या दोन उपगर्भगृहांमध्ये नक्की कोणती दैवते होती याचा बोध होऊ शकत नाही.

या मंदिराचे स्थापत्य आणि शिल्पशैली लक्षात घेता हे मंदिर इ. स. च्या बाराव्या शतकात बांधले गेले असे दिसते.

**औंढ्या येथील नागनाथ मंदिर** (ता. औंढा, जि. हिंगोली) : प्राकार असलेल्या मंदिर-संकुलातील नागनाथाचे मंदिर बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक आहे. या संकुलात जाण्यासाठी पश्चिम आणि उत्तर या दोन्ही दिशांनी प्रवेशमार्ग आहेत. या मंदिर-संकुलामध्ये दुय्यम लहान मंदिरे, सीमाभिंतीतच आतल्या बाजूस यात्रेकरुंकरीता ओवऱ्या आणि पाण्याची टाकी इत्यादी मोठ्या मंदिर-संकुलाची वैशिष्ट्ये म्हणता येतील असे घटक आहेत. मंदिर पश्चिमाभिमुख असून मंदिरासमोर आज उभा असलेला नंदीमंडप मध्ययुगात बांधलेला आहे.

मंदिर पंचरथ प्रकारचे असून मुखमंडप, दोन बाजूंना अर्धमंडप असलेला मंडप, अंतराल आणि गर्भगृह असा त्याचा तलविन्यास आहे. मंदिर अनेक थर असलेल्या उंच पीठावर उभे आहे. या थरांमध्ये कीर्तिमुखाचा थर, गजथर, अश्वथर आणि नरथराचा समावेश आहे. तिन्ही मंडपात जाण्यासाठी पायऱ्यांची योजना आहे. मंदिराचे वास्तुघटक अवाढव्य आकाराचे आहेत (उदा. मंडप आतल्या बाजूने १२.२० मीटर x १२.२० मीटर आकाराचा आहे) आणि भिंतीही अधिक उंच आहेत. भिंतींवर एकावर एक असे दोन जंघाभाग आहेत. मंदिराचे गर्भगृह, मंडप, अंतराल आणि अर्धमंडप यांच्यावरील आज दिसणारी शिखरे जरी मध्ययुगात बांधलेली असली आणि ती बाकीच्या मंदिरांशी सुसंगत असली तरीही ते तत्कालिन मंदिरांत सर्वाधिक भव्य आणि सुंदर मंदिर होते हे सहजपणे लक्षात येते.

गर्भगृहाच्या उत्सेधावरील महापीठ भागावर अनेक थर आहेत आणि मंडोवरावर एकावर एक अशा दोन जंघा आहेत. महापीठावर जमिनीपासून अनुक्रमे १) खुर, २) जाडंब, ३) कणी, ४) अर्धस्फुट कपोत, ५) ग्रासपट्टी, ६) गजथर, ७) अश्वथर आणि ८) नरथर असे थर आहेत. त्यावर मंडोवराला सुरुवात होते. मंडोवराचे थर खालून अनुक्रमे १) जाडंब, २) मंची, ३) कलश, ४) कपोत,

५) मंची, ६) जंघा, ७) मंची, ८) भरणी, ९) कपोत, १०) जंघा, ११) मंची, १२) भरणी व १३) शिरावटी (हा शिरावटीचा थर केवळ अंतरालाच्या दक्षिणेकडील भिंतीच्या बाह्यांगावर आहे) असे आहेत. या प्रकारचे महापीठ आणि दोन जंघा असलेले मंडोवर इत्यादी वैशिष्ट्यांमुळे औंढ्या येथील हे नागनाथ मंदिर पश्चिम भारतीय शिल्पग्रंथांनी ज्याला "मेरुमंडोवर" असे संबोधले आहे त्या प्रकारचे आहे असे म्हणता येईल.

आधीच नमूद केल्याप्रमाणे प्रासादाचे मंडोवर मूर्तिशिल्पांनी समृद्ध आहे. यासंदर्भात आणखी एक महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे मंदिरावर अष्टदिक्पालांचे दोन संच आहेत. एक संच गर्भगृहाच्या आणि अंतरालाच्या बाह्यांगावर,तर दुसरा संच मंडपाच्या चार कोपऱ्यांवर आहे. स्थपतीच्या अनवधानामुळे गर्भगृहाचे काही वास्तुशास्त्रीय घटक चुकीच्या तऱ्हेने कोरण्यात आले आहेत. त्यामुळे गर्भगृहावरील अष्टदिक्पालांच्या स्थानांची अदलाबदल झाली आहे. इंद्राच्या जागी अग्नी, तर अग्नीच्या जागी इंद्र आला आहे. यम आणि निर्ऋती असलेला प्रस्तरखंड पश्चिमेकडे बसविण्यात आल्याने तो वरूण आणि वायूच्या जागी, तर वरुण आणि वायू, यम आणि निर्ऋतीच्या जागी आले आहेत.

पाताललिंग गर्भगृहाप्रमाणे गर्भगृहाच्या जमिनीची बऱ्यापैकी खाली असलेली पातळी, मध्यभागी चतुष्की असलेला एकूण वीस स्तंभांनी युक्त असलेला विशाल मंडप, भव्य अष्टकोनी स्तंभांनी बनलेले दणकट अर्धमंडप ही या मंदिराची खास वास्तुशास्त्रीय वैशिष्ट्ये आहेत. सध्या गर्भगृहाला दोन मजले असून त्यातील वरचा मजला मंडपाच्या जमिनीच्या पातळीवर आहे. या मजल्यावरील स्तंभांचा घटकक्रम मराठा शैलीचा आहे. यामुळे मुसलमान आक्रमकांकडून या मंदिराचे पावित्र्य नष्ट होऊ नये याकरीता "वरचा मजला" ही मराठा काळातील निर्मिती असावी असा निष्कर्ष निघतो. थोडक्यात, मूळ गर्भगृहात पातालिंग होते आणि आज ते सध्याच्या गर्भगृहातील खालच्या भूमीवर आहे. मंडप आणि अर्धमंडपामधील स्तंभ अष्टकोनी असून त्यावर पश्चिम भारतात, विशेषतः गुजरात आणि राजस्थानात आढळतात तशी प्रयोजने आहेत. अष्टकोनी स्तंभांच्या आठ कोपऱ्यांवर एकाखाली एक अशी शिखरांची उत्सेधात्मक रांग दाखविली आहे. मधल्या सपाट भागात अलंकरणात्मक नक्षी आणि आकारशिल्पे, तर स्तंभाच्या वरच्या भागातील चार भागांवर हस्तफलकांवरील मूर्तीकरीता पदस्थले आहेत. मंडप आणि गर्भगृहाची प्रवेशद्वारे अलंकरणाने समृद्ध असून इतर मंदिरांमधील अशा प्रवेशद्वारांपेक्षा निश्चितपणे वेगळी आहेत.

गर्भगृहाच्या प्रवेशद्वाराला सहा शाखा असून या शाखांवर आतल्या बाजूने अनुक्रमे १) व्याल २) व्याल, ३) भक्त, ४) स्तंभशाखअर्धस्तंभ, ५) विद्याधर व ६) पद्मलता आहेत. उत्तरांगावरील रथिकांमध्ये गणेश,पार्वती आणि इतर शैव देवता आहेत.

गर्भगृहाच्या तीन बाजूंच्या तीन भद्रांवर नेहमी ज्या जागी देवकोष्ठे येतात ती जागा आणि देवकोष्ठांच्या पातळीच्या खाली या मंदिरावर देवदेवता दाखविणारा जो शिल्पपट्ट आहे त्याचा तसेच भद्रावरील मधला भाग झाकून टाकणाऱ्या भव्य ध्यानस्थ मनुष्याकृतींचा इथे आवर्जून उल्लेख केला पाहिजे. या भव्य मूर्ती खूप नंतरच्या काळात बसविण्यात आल्या आहेत हे अगदी सहजपणे लक्षात येते. भद्रांवर देवकोष्ठे होती किंवा नाही, नसल्यास मूळात त्या देवकोष्ठांच्या जागी काय होते हे आज सांगता येणे कठीण आहे. हा सर्व भाग आज या भव्य मूर्तींनी झाकला आहे. सध्याच्या उपलब्ध ज्ञानाच्या सहाय्याने या मूर्ती इथे बसविण्याचा हेतू आणि त्यांचे महत्त्व विशद करता येणार नाही. हे मंदिर शैव पंथातील आमर्दक संप्रदायाचे आहे. या संप्रदायाच्या नावावरूनच या गावाला औंढ्या हे नाव पडले. या संप्रदायाशी संबंधित असलेल्या निवृत्तिवादी शैव तत्त्वज्ञानाचा आणि त्यातील सांप्रदायिक चालीरितींचा विशेष अभ्यास झाल्यानंतरच या भव्य मूर्तींच्या महत्त्वावर आणि त्या येथे स्थापित करण्याच्या हेतूवर अधिक प्रकाश टाकता येईल.

आगळीवेगळी शिल्पशैली आणि महापीठ या वैशिष्ट्यांमुळे या मंदिर निर्मितीला इ. स. ११ व्या शतकात सुरुवात झाली, पण मंडोवराचे बांधकाम मात्र उत्तर मध्ययुगीन काळात झाले असावे अशा निष्कर्षाप्रत डॉ. देगलूरकर आले आहेत. वर चर्चिलेल्या भव्य ध्यानस्थ मूर्तींमुळे देगलूरकरांनी मंडोवराचा हा कालनिर्णय केला असावा. अर्थात या भव्य मूर्ती त्याच काळातील म्हणजे उत्तर मध्ययुगातील आहेत यात शंका नाही. सद्यःस्थितीत एवढेच म्हणता येते की, इ. स. च्या १२ व्या शतकाच्या अखेरीस कुमारपालाने बांधलेले सोमनाथ मंदिर डोळ्यापुढे ठेवून १२ व्या शतकाच्या अखेरीस किंवा तेराव्या शतकाच्या सुरुवातीला या मंदिराची निर्मिती झाली असावी.

**देवळाणे येथील जोगेश्वर मंदिर** (ता. जि. नाशिक ) : देवळाणे येथे हे त्रिदल मंदिर असून ते उंच जगतीवर उभे आहे. मंदिराच्या मुख्य गर्भगृहाचा तलविन्यास पंचरथ, तर दुय्यम गर्भगृहांचे तलविन्यास त्रिरथ प्रकारचे आहेत. सर्व गर्भगृहांची बाह्यांगे साधीसपाट असून शिल्पविरहित आहेत. पीठाच्या वरच्या भागात आणि

जंघाभागात काही थर आहेत, पण हे सर्वच थर वैशिष्ट्यांनी युक्त नाहीत. अंतरपत्रांच्या ( string courses ) सहाय्याने हे थर वेगळे दाखविले आहेत. जे थर ओळखता येतात ते म्हणजे तळाशी असलेले हंसथर आणि कीर्तिमुखाचा थर, मधल्या थरांपैकी उद्‌गमाचा थर आणि वरच्या थरांपैकी भरणी आणि शिरावटीचे थर हे होत. अलंकरणाच्या या दुर्भिक्षाची अर्धखुल्या मंडपाच्या बाह्यांगावर, मुखमंडपावर आणि अर्धखुल्या मंडपातील वामन आणि पूर्ण स्तंभावर भरपाई करण्यात आली आहे.

तीन गर्भगृहांना समायिक असलेल्या अर्धखुल्या विनखांबी (astyler) मंडपाचा तलविन्यास वैशिष्ट्यपूर्ण आहे. म्हणजे असे की, हा अर्धखुला मंडप फक्त मागच्या बाजूने झाकलेला आहे. भित्तिसंगत स्तंभ एकतर रुचक किंवा भद्रज प्रकारचे आहेत. चौरस तळखडा, कमानी, व्याल आणि कीर्तिमुख या प्रयोजनांनी अलंकृत केलेला खांब व त्यावर उद्‌गम, भरणी, शिरावटी व कीचकहस्त असा त्यांचा घटकक्रम आहे. तुलापट्टांवर अलंकरणात्मक प्रयोजनांबरोबरच कथापरपट्टही आहेत. वामनस्तंभही काहीसे असेच असले तरी त्यात अधिक पट्ट आहेत आणि उद्‌गमाखाली पूर्णघट हा वाढीव घटक आहे.

वामनस्तंभ आणि भित्तिसंगत स्तंभ असलेल्या अर्धखुल्या मंडपाला उत्तरोत्तर लहान होत जाणाऱ्या वर्तुळाकृती वलयांनी बनलेले घुमटाकार छत आहे. या घुमटाच्या मधोमध आणि सर्वात वर असणाऱ्या प्रस्तरावर गोपी आणि कृष्ण कोरले आहेत. वामनभिंतींचा तळभाग अलंकरणाने समृद्ध आहे. या भागावर हंसथर आणि त्याच्या वरच्या भागात आलटूनपालटून येणारे अर्धस्तंभ आणि देवकोष्ठांची रांग असलेली वेदिका आहे. या देवकोष्ठांमध्ये नर्तक आणि वादकांची शिल्पे[११] आहेत.

मुखमंडपाच्या प्रवेशमार्गाच्या दुतर्फा एकूण दोन मोठी देवकोष्ठे आहेत. प्रत्येक देवकोष्ठामध्ये द्वारपालाची मूर्ती आहे. आधीच नमूद केल्याप्रमाणे आसनपट्टांच्या पातळीवर शिखरांच्या प्रतिकृती दाखविल्या आहेत. त्यावर कक्षासने असून त्यावर अर्धस्तंभ आणि देवकोष्ठांचा पट्ट आहे. या देवकोष्ठांमध्ये देवमूर्ती, नर्तक आणि अन्य मूर्तिशिल्पे आहेत. अर्धखुला मंडप आणि मुख्य गर्भगृह यांच्यामध्ये अंतराल आहे. मुख्य गर्भगृह आणि त्याचे अंतराल, दुय्यम गर्भगृहे आणि त्यांच्या अंतरालांपेक्षा आकाराने मोठे आहे. या मंदिराचे आणखी एक उल्लेखनीय वैशिष्ट्य म्हणजे त्याचा अर्धखुला मंडप होय. या मंडपातील मागील भागात प्रत्येक कोपऱ्यात दोन अशी एकूण चार देवकोष्ठे आहेत, तर गर्भगृहातील मागील भिंतीत एकूण तीन देवकोष्ठे आहेत.

झोडगे येथील शिवमंदिराच्या दुय्यम गर्भगृहाप्रमाणेच या मंदिराची दुय्यम गर्भगृ
नंतरच्या काळात जोडलेली असल्यामुळेच त्यांची बाह्यांगे साधी सपाट अ
अलंकरणरहित आहेत असे डॉ. देगलूरकरांचे मत आहे. त्यामुळे हे म
इ. स. च्या १२व्या शतकाच्या अखेरीस बांधले गेले असावे असे मानतात. त
मंदिराच्या वास्तुशास्त्रीय घटकांवरून हे मंदिर इ. स. च्या १३ व्या शतक
सुरुवातीस बांधले गेले असे दिसते.

**औंढ्या येथील नागेंद्र मंदिर :** औंढ्या येथील सुप्रसिद्ध ज्योतिर्लिंग
(नागनाथ मंदिराच्या) उत्तरेस सुमारे एक फर्लांग अंतरावर नागेंद्र मंदिर अ
हे मंदिर इतर हेमाडपंती मंदिरांपेक्षा निराळे असून ते दगडांप्रमाणेच विटां
बांधण्यात आले आहे. यादव-शिलाहार काळातील शिखर विटांचे आणि
मंदिर दगडाचे अशा मिश्र पध्दतीची अनेक मंदिरे आहेत. तथापि या मंदिरा
किंवा मंदिराच्या वास्तूतील भारवाहू घटक सोडले तर बाकी सर्व बांधकाम विट
आहे. या मंदिराचे पीठ, कोपऱ्यांमधील वास्तूघटक, स्तंभ, तुळ्या, छत आणि
दगडाची आहेत.

सकृत्‌दर्शनी मंदिराचा तलविन्यास पंचरथ वाटला तरी प्रत्यक्षात तो तारका
आहे. हे मंदिर जगतीवर उभे आहे. जगती अनेक थरांची बनलेली असून
थरांमध्ये तीन खुर आणि सर्वात वर असलेले छाद्य यांचा समावेश होतो. पी
असलेल्या वेदीबंधावर खालून वर या क्रमाने कुंभ, जाडंब, अंतरपत्र, कल
कपोत असे थर येतात. त्यावर मंडोवर असून मंडोवराच्या छाद्याच्या
वरच्या भागात विटांचे भूमिज शिखर आहे.

शिखराची झालेली पडझड आणि त्यावर उगवलेल्या वनस्पती (हे शिखर
व मातीने बांधण्यात आले आहे) यामुळे शिखराचा हा नक्की कोणता प्रकार
हे झटकन ओळखता येत नाही.

मंदिर उत्तराभिमुख असून पुढे मुखमंडप, त्यामागे अर्धखुला मंडप, त्
अंतराल व त्याच्याही मागे गर्भगृह असा या मंदिराचा तलविन्यास आहे.
मंडपाच्या आणि मुखमंडपाच्या आकाराचा अंदाज शिल्लक राहिलेल्या
बाह्यरेषेनुसारच घ्यावा लागतो. अंतरालाच्या भिंती आजही उभ्या अ
तरी त्यावरील छप्पर पडून गेले आहे. गर्भगृहाच्या द्वाराला साध्या सपाट
असून ललाटावरील गणेशाचे शिल्प सोडले तर द्वारावर कोणतेही अल
नाही. गर्भगृहात पीठ असून त्यावर एकेकाळी मूर्ती असावी. या पीठ
नेहमी ज्या जागी वाहन असते त्या जागी हात जोडून उभी अस
मनुष्याकृती आहे.

या मंदिराची शैली लक्षात घेता हे मंदिर तेराव्या शतकाच्या अखेरीस बांधले गेले असावे.

**लोणार येथील दैत्यसूदन मंदिर** (ता. मेहकर, जि. बुलढाणा) : लोणार येथील मंदिर-संकुलात दैत्यसूदन मंदिर हे मुख्य मंदिर असून त्याच्या दक्षिणेकडील भागात आणखी एक मंदिर आहे. या दक्षिणेकडील मंदिरात ब्रह्मा, विष्णू आणि महेश होते. या मंदिराचे स्वरूप केवळ मंडप असे आहे. संकुलातील मुख्य मंदिर दैत्यसूदनाचे आहे. या मुख्य मंदिराची मध्ययुगीन काळात विटांच्या बांधकामाने काही प्रमाणात दुरुस्ती झाली आहे. मंदिरासमोर गरुडमंडप आहे. विष्णूचे वाहन असलेल्या गरुडाने लवणासुराचा वध केला, तेथील खारे तळे (लवणागार) हे लवणासुराचे घर होते अशी आख्यायिका आहे.

आधी उल्लेख केलेले ब्रह्मा, विष्णू व महेशाचे मंदिर नेहमी आढळणाऱ्या मंदिरांपेक्षा खूपच निराळे आहे. या मंदिराला स्वतंत्र गर्भगृह नाही. मंडपाचा गर्भगृहासारखा उपयोग करून घेतला आहे. मंडपाच्या पुढे मंडपाच्याच रुंदीचा मुखमंडप आहे. मंडपातील मागच्या भिंतीत एक देवकोष्ठ असून देवकोष्ठत ब्रह्मा, विष्णू आणि महेशाच्या मूर्ती होत्या. या मूर्ती ज्या पीठावर होत्या त्या पीठावर प्रत्येक देवमूर्तीखाली संबंधित देवाचे वाहन कोरले आहे. आज या देवकोष्ठत ब्रह्मा, विष्णू आणि गरुड अशा मूर्ती आहेत. तथापि गरुडाखाली असलेल्या पीठ भागावर नंदी कोरला आहे. त्यावरून मुळात तेथे महेशमूर्ती होती यात काही शंका नाही.

मुख्य मंदिर दैत्यसूदन विष्णूचे असून ते पूर्वाभिमुख आहे. मुखमंडप आणि दोन अर्धमंडप असलेला गूढमंडप, अंतराल आणि गर्भगृह असा या मंदिराचा तलविन्यास आहे. मंदिराचा मुखमंडप आज शिल्लक नाही. उरलेल्या मंदिराच्या कोणत्याही घटकावर छत अथवा छप्पर नाही. थोडक्यात या मंदिराच्या गर्भगृहाच्या आणि मंडपाच्या फक्त भिंतीच उभ्या आहेत. मंदिराच्या या अशा स्वरूपामुळेच काही विद्वान या मंदिराचे बांधकाम कधीच पूर्ण झाले नाही किंवा या मंदिराचे बांधकाम अपूर्णावस्थेतच सोडून देण्यात आले या निष्कर्षाप्रत आले आहेत.

बाह्यांगामध्ये प्रासाद सप्तरथ असला तरी त्याचा तलविन्यास तारकाकृती आहे. खाली पीठ आणि त्यावर मंडोवर असा गर्भगृह आणि मंडपाच्या बाह्यांगाचा उत्सेध आहे. पीठाला अनेक थर असून ते खालून अनुक्रमे १) भौमितिक नक्षीने अलंकृत केलेला खुरभाग, २) पद्मलतायुक्त जाडंव, ३) कणी, ४) हंसथर, ५) पद्मलता व ६) ग्रासपट्टी असे आहेत. त्यावर वेदीबंध येतो. वेदीबंधावर

खालून अनुक्रमे १) कुंभ, २) कलश, ३) मंची, ४) कपोत असे थर आहेत. त्यावर सुरसुंदरी आणि दिक्पाल यांच्या मूर्ती असलेला जंघा- भाग आहे. त्याच्या वरच्या भागात चौकटच्या नक्षीचा पट्ट असून त्यावर उद्गम, भरणी, शिरावटी आणि छाद्य येतात. हे सर्व घटक म्हणजे पीठ आणि मंडोवरावरील थर अलंकरणाने समृद्ध असून त्यावर वेगवेगळी भौमितिक आणि मुक्तहस्त नक्षी आहे. मध्ययुगातील गुजरातच्या पश्चिम भारतीय स्थापत्यशैलीच्या मंदिराप्रमाणे याही मंदिराचे भद्र भाग ठळकपणे बाहेर आलेले आहेत. या पुढे आलेल्या भद्रांवर व मंडोवराच्या जंघाभागावर देवकोष्ठांऐवजी रथिका आहेत. रथिकांवर संवरणा प्रकारची शिखरे आहेत.

मंदिराचे बाह्यांग, सविस्तर पीठ, अलंकरणाने समृद्ध असलेले मंडोवर, लाटी, जंघा,गर्भगृहाची बाह्यरेषाही ओलांडून ठळकपणे पुढे येणारा भद्र भाग या बाबी आपल्यासमोर पश्चिम भारतीय मंदिर स्थापत्याचे अत्यंत अलंकृत आणि विकसित स्वरूप साकार करतात. या मंदिराची स्थापत्यशैली लक्षात घेता हे मंदिर इ. स. च्या १३ व्या शतकाच्या मध्यात बांधले गेले असावे.

**संगमेश्वर येथील महादेव मंदिर** (ता. संगमनेर, जि. अहमदनगर ) : संगमेश्वर येथे हे मंदिर आहे. मंदिर उंच पीठावर उभे असून अनेक तऱ्हेने आगळेवेगळे आहे. मुख्य प्रवेशाकरीता पायऱ्या, पायऱ्या संपल्यावर काहीसा लांबट मुखमंडप, सप्तरथ तलविन्यासाचा बिनखांबी ( astyler ) मंडप आणि सगळ्यात मागे पंचरथ तलविन्यासाचा प्रासाद असा संपूर्ण मंदिराचा तलविन्यास आहे.

मंदिराच्या निरनिराळ्या भागांवर कोणत्या प्रकारची छपरे अथवा शिखरे होती याबाबतची कल्पना देणारे कोणतेही अवशेष आज शिल्लक नाहीत. त्यामुळे मंदिराच्या कोणत्याही घटकावरील शिखर प्रकाराबाबत काहीही सांगता येणार नाही.

मंदिराचे बहुतांशी बाह्यांग शिल्पविरहित असले तरी त्यावर विविध थर आणि अलंकरणात्मक नक्षी आहे. सलिलांतरांमध्ये स्तंभकूट आहेत. यावरून स्थपतीला द्राविडी जंघा अभिप्रेत होती असे दिसते. अंतरपत्राने विभक्त केलेले दोन जाडंब, त्यावर कुंभ, कलश आणि मंची असे पीठाचे थर आहेत. त्यावर जंघा-भागाला सुरुवात होते. उद्गमाच्या खालच्या भागावर कमानी आणि चौकटच्या नक्षीचे अलंकरण आहे. त्यावर भरणी, शिरावटी आणि छाद्य येतात.

येथील स्तंभांचा घटकक्रम फारसा उल्लेखनीय नाही. तळखडा, चौरस खांब, वर्तुळाकार उद्गम, त्यावर भरणी आणि त्याहीवर एकतर साधी सपाट किंवा

नागशीर्षयुक्त शिरावटी असा त्यांचा घटकक्रम आहे. या मंदिराचा एक उल्लेखनीय घटक म्हणजे गर्भगृहाचे द्वार. हे द्वार खानदेश आणि नाशिक भागातील प्राचीन मंदिरांच्याच शैलीतील असले, त्यावर शिल्पे असली तरीही हे द्वार जवळपास चौरसाकृती आणि ओबडधोबड आहे. मंडपाचा सलिलांतर भाग साधा सपाट आहे. गर्भगृहातील मागील भिंतीत देवकोष्ठ आहे.

या मंदिराचे वास्तुशास्त्रीय घटक लक्षात घेता हे मंदिर इ. स. च्या बाराव्या शतकाच्या अखेरीस किंवा इ. स. च्या तेराव्या शतकाच्या सुरुवातीस बांधले गेले असावे.

**चांगदेव येथील मंदिर** (ता. एदलाबाद, जि. जळगाव) : चांगदेव गावात पूर्णा आणि तापी या नद्यांच्या संगमावर हे मंदिर आहे. सध्या मंदिर कमालीच्या दुरावस्थेत आहे. अंदाजे २९.५६ मीटर लांबीच्या या भव्य मंदिराच्या सभामंडपाच्या मूळ भिंती, सभामंडप, अंतराल आणि गर्भगृहावरील मूळ शिखर आज शिल्लक नाही. या सर्व घटकांची मध्ययुगीन काळात चुना आणि विटांच्या सहाय्याने पुनर्बांधणी करण्यात आली आहे. फक्त मंडपाच्या पीठाचे काही भाग आणि वरच्या काही घटकांसह छाद्य भागापर्यंतचे काही भाग अजूनही मूळ स्थितीत आहेत. मंदिर सप्तरथ असून मंडप, अंतराल आणि गर्भगृह असा त्याचा तलविन्यास आहे. मंडपाला तीन बाजूंनी प्रवेशमार्ग असून प्रत्येक कोपऱ्यात चतुष्की आहे. म्हणजेच मंडपात एकूण सोळा स्तंभ आहेत. रंगमंडपाच्या मध्यभागी रंगशिला असून त्यावर प्रत्येक चतुष्कीतील मंडपाच्या सर्वाधिक अंतर्भागात येणारे एकूण चार स्तंभ आहेत.

गर्भगृहाच्या बाह्यांगावरील जंघा पातळीवर अप्सरांच्या आणि विष्णूच्या अवतार-मूर्ती आहेत. सुरुवातीस खाली उत्तरोत्तर कमी आकार होत जाणारे खुर असून त्यावर चौकटची आणि वेलवुट्टीची नक्षी आहे. त्यावर वामनजाडंव येते. त्यावर कुंभ, कलश, मंची आणि जंघा हे भाग येतात. जंघा भागाच्या वर उद्‌गम, भरणी, शिरावटी आणि त्यावर कीचकहस्त आहेत. त्यावर दगडी छाद्य आणि मंची आहेत. त्यावर विटांनी बांधलेले शिखर असावे. या मंदिराचे एक उल्लेखनीय वैशिष्ट्य म्हणजे सपाट जंघाभाग. गर्भगृहाची बाह्यरेपा ओलांडून पुढे येणाऱ्या भद्र भागांवरील जंघाभागात रथिका नाहीत. शिवाय आकृतीशिल्पांनी युक्त असलेला जंघाभाग आणि उद्‌गम यांच्यामध्ये कीर्तिमुखांचा पट्ट आहे. दोन स्तंभ आणि दोन अर्धस्तंभ यांच्यामधून प्रवेशमार्ग असलेल्या अंतरालावर घुमटाकार छत आहे. गर्भगृहातील मागच्या भिंतीत असणाऱ्या पीठावर आज शिवलिंग असले तरी मुळात

तेथे देवमूर्ती होती. बाह्यांगावर दाखविलेल्या देवमूर्ती लक्षात घेता गर्भगृ
विष्णूची मूर्ती असावी.

मंदिराचे वास्तुशास्त्रीय तपशील, शिल्पशैली आणि स्तंभघटकक्रम लक्षात
हे मंदिर इ. स. च्या तेराव्या शतकात बांधले गेले असावे.

**लिंपणगाव येथील सिद्धेश्वर मंदिर** (ता. श्रीगोंदा, जि. अहमदनगर) : श्रीगोंद्याप
८ कि. मी. अंतरावरील लिंपणगाव येथे हे सिद्धेश्वर मंदिर आहे. मुखमंडप, मं
अंतराल आणि गर्भगृह असा मंदिराचा तलविन्यास आहे. मंदिर पूर्वाभिमुख अ
मंदिरासमोर नंदीमंडप आहे. नंदीमंडपाला एक मंदिराभिमुख आणि एक माग
बाजूने असे दोन प्रवेशमार्ग आहेत. नंदीमंडपाला चार स्तंभ असून या स्तंभ
चौकोनी शंक्वाकृती शिखर पेललेले आहे. प्रवेशमार्गाव्यतिरिक्तच्या दोन बा
स्तंभांच्या चौरस तळखड्याच्या पातळीपर्यंत वामनभिंती आहेत.

मुखमंडप, मंडप, आणि गर्भगृहावरील शिखरे पूर्णपणे अस्तित्वात नाह
मंदिराच्या दोन बाजूच्या आणि मागच्या बाह्यांगावरील बारीक कलाकुस
पट्ट सोडले तर मंदिरावर कोणतेही अलंकरण नाही. मंदिराच्या बाह्यांगावर कोण
प्रवेश अथवा निर्गम नाहीत हे या मंदिराचे उल्लेखनीय वैशिष्ट्य आहे;
मंदिराला सलिलांतरे आहेत. त्यामुळे तांत्रिकदृष्ट्या हे मंदिर पंचरथ आहे
म्हणता येईल. मंदिरात जाताना प्रथम लागतो तो मुखमंडप. या मुखमंडप
चार स्तंभ आणि दोन अर्धस्तंभ असून त्याच्या प्रवेशमार्गाव्यतिरिक्तच्या बा
वामनभिंती आहेत. मुखमंडप संपला की मंडपाचे द्वार लागते. द्वाराच्या दो
बाजूस जालवातायने आहेत. या जालवातायनावर अनेक अलंकरणात
प्रयोजने आहेत. जालवातायनाच्या मागे म्हणजे मंडपाच्या आत वामनभिंती
आसनपट आहेत. या वामनभिंतीतून दरवाज्याच्या दुतर्फा प्रत्येकी एक असे
स्तंभ आहेत. मंडपाच्या मध्यभागी अंकण असून त्यावर चार स्तंभ (चतुष्
आहेत. या चार स्तंभांवर मंडपाचे सपाट छत (समतल वितान) पेललेले अ
एरव्ही साध्या असलेल्या या मंडपाचे आणि अंतरालाचे एकमेव उल्लेख
वैशिष्ट्य म्हणजे मंडपाच्या आत प्रत्येक बाजूस तीन या प्रमाणे एकूण सहा,
अंतरालात प्रत्येक बाजूस एक अशी एकूण दोन देवकोष्ठे आहेत. किंचित खाल
पातळीवर असलेले गर्भगृहाचे द्वार पंचशाख प्रकारचे असून या शाखांवर आत
बाजूकडून अनुक्रमे कल्पलता, वादक, स्तंभ, आणि व्याल आहेत. ललाटबिंब
गणेश असून उत्तरांगावरील पाच रथिकांमध्ये देवमूर्तीऐवजी चौकटचा आ
कोरला आहे.[९२]

मंदिराच्या बाह्यांगावर आकृतीशिल्पांचा आणि पीठ व मंडोवर भागावर थरांचा अभाव, अत्यंत साधा स्तंभघटकक्रम आणि उत्तरांगावर देवमूर्तींचा पूर्ण अभाव यासारख्या वास्तुशास्त्रीय शैली-वैशिष्ट्यांवरून हे मंदिर इ. स. च्या चौदाव्या शतकात बांधले गेले असावे. या वैशिष्ट्यांमुळे कझिन्स या अशा मंदिरनिर्मितीच्या कालखंडाला शुद्ध "हेमाडपंती अवस्थेचा कालखंड"[१३] असे संबोधतो.

**कातरखटाव येथील कात्रेश्वर मंदिर** (ता. खटाव, जि. सातारा) : कातरखटाव गावी हे मंदिर आहे. मुळात या मंदिराभोवती सीमाभिंत होती. मंदिरासमोर पुष्करिणी आहे. मंदिराच्या आवारात अनेक वीरगळ आणि शिवलिंग आणून टाकले आहे. मंदिर पूर्वाभिमुख आहे.

विमान आणि मंडप या दोहोंचाही तलविन्यास पंचरथ आहे. विमानावरील प्रत्येक भद्राला दोन जादा नंदिका आहेत. प्रत्येक भद्रावर देवकोष्ठ असून देवकोष्ठवर वेसर प्रकारचे शिखर आहे. देवकोष्ठांमध्ये सध्या असलेल्या मूर्ती चुन्याच्या आहेत. त्यामुळे या मूर्ती नंतरच्या काळात, म्हणजे जेव्हा मंदिराचे विटांनी बांधलेले मूळ छप्पर कोसळले आणि त्याची दुरुस्ती झाली तेव्हा वसविलेल्या असाव्यात हे उघड आहे. मूर्तिशास्त्रदृष्ट्या ह्या मूर्ती विविध प्रकारच्या आणि विशिष्ट संप्रदायाच्या (शैव आणि वैष्णव) आहेत. विमान आणि मंडप यांच्यावरील सध्या असलेले छप्पर मध्ययुगीन काळात कधीतरी बांधण्यात आले आहे. पण विमानाच्या दक्षिणेकडील लतेच्या खालच्या भागात जे शूरसेनक शिल्लक आहे त्यावरून मंदिराचे मूळ शिखर भूमिज असावे असा अंदाज बांधता येतो. शूरसेनकाच्या आतील भागात अर्धउठावात वेसर शिखराची बाह्यरेषा दाखविली आहे. हे सर्व काम विटांनी केलेले असून त्यावर चुन्याचा गिलावा आहे. मंडपाच्या बाजूच्या दोन भिंती मुखभागात पुढे आलेल्या आहेत. मुख-भागावर वेदिका आहे.या मंदिराचे एक उल्लेखनीय वैशिष्ट्य म्हणजे वेदिकेतच सामावलेले स्तंभ आणि अर्धस्तंभ. बहुधा वेदिकेवर वामनस्तंभ असतात. पण इथे मात्र कक्षासनाच्या पाठ टेकण्याच्या भागामध्ये पूर्णस्तंभ आहेत. बाहेरून पाहिल्यास या स्तंभांचा खालचा अर्धा भाग झाकलेला दिसतो. प्रवेशद्वाराच्या दोन्ही बाजूस वेदिकेवरील कक्षासन भागावर प्रतिहार आहेत. राजसेनाच्या थरावर मिथुनशिल्पांचा पट्ट आहे. खुद्द वेदिका भागावर आधीच्या काळातील मंदिरांवर आढळतात तसे कूटस्तंभ नाहीत तर फक्त स्तंभच आहेत. त्याचप्रमाणे दोन स्तंभांच्या मधील भागात सुरसुंदरी दाखविण्याऐवजी फक्त चौकटची नक्षी दाखविली आहे.

खुद्द मंडपात बाजूच्या आणि मागच्या भिंतीत एकूण चार देवकोष्ठे आहेत. त्यातील बाजूच्या भिंतीतील एक देवकोष्ठ इतर देवकोष्ठांपेक्षा आकाराने मोठे असून त्यात खटाव येथील नागेश्वर मंदिराप्रमाणेच सप्त मातृकांचा शिलापट्ट आहे. या शिलापट्टात गणेश आणि भैरवाचाही समावेश आहे. इतर देवकोष्ठांपैकी दोन देवकोष्ठांमध्ये गणेश आणि उमामहेश्वर मूर्ती आहेत. सर्व देवकोष्ठांवर वेसर शिखरे आहेत. मंडपाच्या मधोमध अंकण असून त्यावरील चतुष्कीवर क्षिप्तोत्क्षिप्त प्रकारचे घुमटाकार छत पेललेले आहे. या छतात अष्टबिंदू तारकाकृती तीन थर असून सर्वात वरून व मधून खाली आलेले कमळ दाखविले आहे.

अंतरालाच्या बाजूच्या दोन्ही भिंतीत प्रत्येकी एक देवकोष्ठ आहे. गर्भगृहाचे द्वार चतुःशाख पद्धतीचे असून त्याची स्तंभशाखा अगदी ठळक आणि नजरेत भरणारी आहे. द्वारशाखांवर खालच्या भागात प्रतिहारांच्या मूर्ती नाहीत की उंबऱ्यावर कीर्तिमुख नाही. ललाटबिंबावर गणेश आहे आणि उत्तरांगावर वेसर शिखरांच्या प्रतिकृती आहेत. या प्रतिकृतींच्या मधील भागात केश-उठावात व्याल दाखविले आहेत.

---

# प्रकरण ३ - महाराष्ट्रातील शिल्प व चित्रकला

**प्रास्ताविक :** आतापर्यंतच्या प्रकरणांमध्ये घेतलेल्या वास्तूंच्या आढाव्यावरून महाराष्ट्रातील वास्तू आणि वास्तुनिर्मिती तंत्रामध्ये असलेले वैविध्य लक्षात येते. आतापर्यंत आपण ज्या स्थापत्याचा विचार केला ते प्रामुख्याने धार्मिक स्थापत्य होते व त्याची सुरुवात इ. स. पूर्व दुसऱ्या शतकात झाली. सुरुवातीच्या काळात फक्त बौद्ध स्थापत्यच आढळते. काही तुरळक ठिकाणी चुना आणि मातीत विटांनी बांधलेल्या वास्तूंचे अवशेष आढळले असले तरी या काळातील बौद्ध स्थापत्य प्रामुख्याने शैलगृहांच्या स्वरूपातच आढळते. कार्ले आणि भाजे या लेण्यांमधील काही लाकडी वास्तूशास्त्रीय घटक आजही टिकून असले तरीही त्यात लाकडी शिल्पे प्राप्त झालेली नाहीत. या काळातील शिल्पाकृती प्रामुख्याने दगडी आणि मातीच्या ( terracotta ) असून काही थोड्या प्रमाणात हस्तिदंती, ब्राँझ आणि हाडांमध्ये कोरलेली शिल्पेही आढळतात. यानंतरच्या कालखंडामध्येही थोड्याफार फरकाने हेच चित्र दिसून येते; मात्र फरक इतकाच की, नंतरच्या कालखंडामध्ये हस्तिदंती, हाडात कोरलेल्या आणि मातीच्या मूर्ती किंवा शिल्पे आढळून येत नाहीत. सातवाहन-वाकाटक काळातील मृद्शिल्पे तर या एकाच स्थळी खूप मोठ्या संख्येने आढळतात. या नंतरच्या काळात मृद्मूर्ती क्वचितच आढळतात. चित्रकलेच्या किंवा रंगचित्रांच्या बाबतीत मात्र काहीशी विचित्र स्थिती आहे. सर्व शैलगृहांमध्ये रंगचित्रे होती असे मानले, तर ती अतिशयोक्ती ठरणार नाही. तथापि आज फक्त अजिंठा, वेरूळ आणि पितळखोरे येथील रंगचित्रेच आपल्या अभ्यासासाठी उपलब्ध आहेत. शिल्पांच्या बाबतीत शैलगृह असो किंवा बांधीव मंदिर असो, बहुतेक शिल्पे दगडाचीच आहेत. निरनिराळ्या कालखंडातील ही लौकिक व धार्मिक मूर्तिशिल्पे महाराष्ट्रातील शिल्पकलेचे अभ्यास विषय आहेत. निरनिराळ्या धार्मिक किंवा पौराणिक कथा शिल्पांच्या माध्यमातून अभिव्यक्त करणाऱ्या कथापरपट्टांचा येथे आवर्जून उल्लेख केला पाहिजे. अजिंठा, औरंगाबाद आणि लोणाड येथे बौद्ध कथापरशिल्पांचे चांगले नमुने आहेत. तथापि जोगेश्वरी, घारापुरी, वेरूळ, भोकरधन आणि शिवूर येथील शैव आणि वैष्णव कथापरपट्ट वैशिष्ट्यपूर्ण असून त्याची भव्यता थक्क करून सोडते. कैलास लेण्याच्या बाह्यांगावरील रामायण आणि महाभारतातील कथा दाखविणारे कथापरपट्ट प्रसिद्धच आहेत. अशाच प्रकारचे कथापरपट्ट नंतरच्या काळात मार्कंडी व धाराशिव येथे दाखविले आहेत. अजिंठा येथील कथापर रंगचित्रांचे मूळ सांचीसारख्या शिल्पकलेच्या केंद्रामध्ये आहे.

दगडी शिल्पांचे आणखी एक महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे या कलेत आढळणारे सातत्य माती आणि धातूंच्या माध्यमात बनविलेल्या शिल्पांमध्ये आढळून येत नाही. दगडी शिल्पांची संख्या इतर माध्यमातील शिल्पांपेक्षा खूपच अधिक आहे. एकाश्मक माध्यमाला त्याचे स्वतःचे असे फायदे आणि मर्यादा असल्यामुळे त्यानुसार विशिष्ट वास्तुशास्त्रीय विकासाचा कालानुक्रम ठरविणे कठीण जाते असे निराळ्या संदर्भात या आधीच नमूद करण्यात आले आहे. बांधीव मंदिरस्थापत्यातील स्तंभ, मंदिराचे एकूण दृश्य आणि तलविन्यास यांची लयनस्थापत्यातील त्याच प्रकारच्या घटकांशी तुलना करता येत नाही हेही यापूर्वी नमूद केलेले आहे. अजिंठा येथील रंगचित्रांतून व्यक्त होणाऱ्या वास्तूशास्त्रीय नमुन्यांचे प्रत्यक्ष लेण्यांशी असलेले साम्य अत्यंत मर्यादित आहे. एकाश्मक वास्तू खोदतांना स्थपतीला मिळणारे स्वातंत्र्य आणि त्यातून उद्‌भवणारे सौंदर्याचे निराळे संकेत हे त्याचे मुख्य कारण असावे. तथापि, या स्वातंत्र्यामुळे शिल्पांमध्ये मात्र फारसा फरक पडला नाही. निराळ्या शब्दात सांगायचे तर, बांधीव मंदिरातील शिल्पे आणि लेण्यातील शिल्पे यामध्ये फारसा फरक पडला नाही. एकाच काळातील लेणी व बांधीव मंदिरे अभ्यासल्यास ही बाब विशेषत्वाने जाणवते. म्हणूनच आपण अभ्यासार्थ निवडलेल्या कालखंडात अश्मशिल्पांमध्ये अखंड सातत्य किंवा शैलीच्या विकासातील सलगता आढळते.

नाशिक, कोल्हापूर, नेवासे, पैठण, भोकरधन, तेर, आडम आणि पवनार ह्या पूर्वेतिहासिक स्थळी आढळणाऱ्या मृण्मूर्ती उल्लेखनीय आहेत. या मोजक्याच स्थळी सातवाहनकालीन मृण्मूर्ती मोठ्या संख्येने आढळतात. नंतरच्या काळात उल्लेखनीय मृण्मूर्ती फारशा आढळत नाहीत. याला अपवाद असलेल्या तेर या एकमेव ठिकाणी अक्षरशः हजारोंनी मृण्मूर्ती आढळल्या आहेत. अशा प्रकारे प्राचीन महाराष्ट्रातील कलेचा थोडक्यात आढावा घेता येतो. शिल्पांचा कालखंडपरत्वे तपशील पुढीलप्रमाणे आहे.

## इतिहासपूर्व काळ

दायमाबाद या ताम्रपाषाण संस्कृतीचे अवशेष असलेल्या स्थळी आढळलेली ब्रॉंझ मूर्तिशिल्पे ही गेल्या पंचवीस वर्षातील शोधांपैकी एक आश्चर्य असून या मूर्तिशिल्पांची उंची २० ते २५ सें. मी. व वजन ८ ते २० कि. ग्रॅ. आहे. त्यांच्या आकार आणि वजनांमुळे त्या केवळ समकालीनच नाही, तर नंतरच्या काळातीलही

ब्रॉंझ मूर्तीपेक्षा वेगळ्या ठरल्या आहेत. या सर्व ओतीव भरीव मूर्ती असून त्यात तीन प्राण्यांच्या आणि एका सारथ्याच्या मूर्तीचा समावेश आहे. हे तीन प्राणी म्हणजे हत्ती, गेंडा आणि वशिंड नसलेला बैल होत. रथालाही बैल जोडले आहेत. या सर्व मूर्तींची पूजा होत असे. तीन मूर्तींची चाके आजही टिकून आहेत, तर चौथ्या मूर्तीला एकेकाळी चाके असल्याचे स्पष्ट पुरावे आहेत. रथाच्या पुढच्या अंगाला सारथ्याला उभे राहण्यास जागा आहे. या रथाची धुरा वाजवीपेक्षा अधिक लांब असून तिला बैल बांधण्यासाठी जू आहे. या धुरेच्या स्थानाजवळील भागावर एक कुत्रा उभा आहे. सारथ्याची मूर्ती ओबडधोबड पण विलक्षण आहे. ही मूर्ती धार्मिक स्वरूपाची असावी, कारण हा सारथी ऊर्ध्वलिंगी आहे. या मूर्तीच्या रासायनिक विश्लेषणात सोमल ( arsenic ) आढळून आले आहे. त्याचप्रमाणे या मूर्तीचे तंत्र लक्षात घेता या मूर्ती सिंधू-सरस्वतीच्या खोऱ्यातील मूर्तींच्या परंपरेतील आहेत असे म्हणता येईल.

विदर्भातील महापाषाणयुगीन लोकांच्या (इ. स. पूर्व ८ वे शतक ते इ. स. पूर्व २ रे शतक) उच्च प्रतीच्या धातुकामाची नोंद घेणे आवश्यक आहे. तथापि त्यात मूर्तिशिल्पे या स्वरूपात माणसाच्या किंवा प्राण्यांच्या मूर्ती आढळत नाहीत. सापडलेल्या वस्तूंपैकी जनावरांच्या गळ्यातील घंटा, घोड्यांचे अलंकार आणि धातूचे डबे लोकांच्या सौंदर्यदृष्टीचे द्योतक आहेत. यात फक्त हरिणाच्या मूर्ती आढळतात. त्या धातूच्या डब्यांच्या झाकणांवर बसविलेल्या आहेत.

प्रागैतिहासिक मृण्मूर्तींमध्ये इनामगाव येथे सापडलेल्या बैलावर बसलेल्या मातृदेवतेचा खास उल्लेख केला पाहिजे. ही मातृदेवतेची मूर्ती कच्च्या मातीची असून ती एका मोठ्या घराच्या खोलीत सापडली. ही मूर्ती बहुधा बाळंतिणीकरिता असावी. त्या काळातील बहुप्रसवत्वाच्या कल्पनांच्या संदर्भात या मूर्तीला खूप महत्त्व आहे. महाराष्ट्रातील ताम्रपाषाणयुगीन स्थळी झालेल्या उत्खननांमध्ये पशूंच्या काही मूर्ती सापडल्या आहेत. उदा. धुळे जिल्ह्यात वारसूस येथे गेंड्याची मृण्मूर्ती सापडली आहे. तथापि,पुणे जिल्ह्यात चांडोली येथे सापडलेली वाघाप्रमाणे रंगविलेली बैलाची मूर्ती अधिक उल्लेखनीय आहे. आज ह्या मूर्तीचे डोके शिल्लक नाही. डोक्याचा भाग स्वतंत्रपणे बनवून तो तारेने खाचेत बसवून जोडलेला असावा असे दिसते. ही मृण्मूर्ती मुळात लाल रंगाची असून त्यावर काळ्या रंगात रंगविले आहे. जोर्वे आणि माळवा संस्कृतीच्या काळातील मृद्‌वस्तूंच्या अवलोकनावरून मातीची मडकी आणि भांडी व त्यावर कमी उठावात आकृती

कोरण्याच्या आरेखनाची (graffitti) कला किती उत्तम दर्जाची होती याची कल्पना येते. किंबहुना विशिष्ट भौमितिक आणि इतर जोर्वे कालखंडातील तांबड्यावर काळ्या रंगात रंगविलेल्या प्रयोजनांनी युक्त असलेली मृद्‌भांडी इतर मृद्‌भांड्यांपेक्षा व्यवच्छेदकपणे वेगळी ओळखता येतात. या संदर्भात दायमाबादला माळवा टप्प्यात (Malva Phase) सापडलेल्या कुंभाचा आवर्जून उल्लेख केला पाहिजे. या कुंभावर एकमेकांच्या हातात हात घेऊन वर्तुळ तयार करणाऱ्या मनुष्याकृती व वाघाची एक आकृती रंगविली आहे.

**पूर्वेतिहासिक काळ** (इ. स. पूर्व २ रे शतक ते इ. स. ३ रे शतक)

या काळात महाराष्ट्रातील निरनिराळ्या भागातील डोंगरांमध्ये बौद्ध भिक्षूंकरिता शैलगृहे खोदण्यात आली. याआधीच आढावा घेतल्याप्रमाणे भाजे, कोंडाणे, औरंगाबाद, पितळखोरे, नाशिक, कार्ले, बेडसे, महाकाली आणि कान्हेरी ही या सुरुवातीच्या टप्प्यातील प्रमुख केंद्रे होती. अगदी अलीकडेच नागपूर परिसरात चंढाळ्याच्या जंगलात सुरुवातीच्या टप्प्यातील शैलगृहे सापडली आहेत. भंडारा जिल्ह्यातील पवनी येथे याच काळातील एक बांधीव स्तूप सापडला आहे. या सुरुवातीच्या टप्प्यातील शैलगृहांमध्ये मोठ्या संख्येने नसली, तरी शिल्पे आढळतात. गौतमीपुत्र सातकर्णीच्या काळानंतर, म्हणजेच इ. स. १०० नंतर माणसांची आणि प्राण्यांची मूर्तिशिल्पे मोठ्या संख्येने आढळतात. म्हणून शिल्पांच्या दृष्टिकोनातून फक्त कोंडाणे, पितळखोरे, कार्ले, आणि पवनी एवढ्याच स्थळांचा विचार करणे क्रमप्राप्त ठरते. या दोनशे वर्षांच्या कालखंडात चैत्यगृहाच्या आणि विहाराच्या स्थापत्यात खूपच विकास झाला तरी शिल्पकलेत मात्र फारसा विकास झाला नाही हे विद्या दहेजिया यांचे निरीक्षण अगदी योग्यच आहे. या कालखंडात शिल्पांचे एवढे दुर्भिक्ष आहे की, शिल्पांची अत्यल्पता हे या टप्प्याचे एक वैशिष्ट्यच बनून गेले आहे.

या काळात आढळणाऱ्या मूर्तिशिल्पांमध्ये मुखभागावर कोरलेल्या भक्तांच्या मूर्ती, स्तंभशीर्षांना अलंकृत करणारी व्यालशिल्पे, यक्षमूर्ती आणि दंपतीशिल्पे यांचा समावेश होतो. पवनी स्तूपावरील शिल्पांमध्ये स्तूपाभोवतीच्या कठड्याच्या उभ्या खांबांवर कोरलेले भक्तगण आणि कठड्याच्या उष्णीषावरील अलंकरणात्मक शिल्प यांचा समावेश होतो.

भाजे लेण्याच्या मुखभागावर अनेक मजली वास्तूचा आभास निर्माण करण्यासाठी जे अनेक मजले दाखविले आहेत त्यात भक्तजन दाखविलेले असल्यामुळे

भक्तजनांची शिल्पे आकाराने लहान आहेत. तौलनिकदृष्ट्या नृत्यात मग्न असलेल्या मिथुनमूर्ती आणि योद्ध्यांच्या मूर्ती थोडीफार हालचाल दाखवितात, सांची येथील मूर्तिशिल्पाच्या पवित्र्यापासून थोडे दूर राहण्याकडे थोडा कल दाखवितात. पितळखोरे येथे आढळलेल्या यक्षमूर्ती आणि मिथुनमूर्ती उल्लेखनीय आहेत. पितळखोरे येथे झालेल्या साफसफाईत लेणे क्र. ३ व ४ च्या पुढ्यात शैलगृहाच्या तळभागाला पेलणारी हत्तींची ओळ आणि लेण्यात जाणारा पायऱ्यांचा मार्ग उजेडात आला आहे. या पायऱ्यांच्या मार्गाच्या द्वार स्तंभांवर कमलपट्ट आणि ललाटावर लक्ष्मीला हत्ती आंघोळ घालत असल्याचे दृश्य कोरले आहे. द्वाराच्या दुतर्फा द्वारपाल यक्ष कोरले आहेत. उत्खननामध्ये डोक्यावर शराव घेतलेल्या गिड्ड्या यक्षाची मूर्ती आढळली आहे. अमरावती येथे कोरलेल्या काही दृश्यांवरून बहुधा अशा मूर्ती स्तूपाच्या प्रवेशद्वारापाशी ठेवण्यात येत असत आणि या शरावामध्ये पुष्पमाला ठेवण्यात येत असत असे दिसते. सध्या प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियममध्ये ठेवलेली, दुतर्फा हत्ती असलेली लक्ष्मीची मूर्ती म्हणजे पूर्ण उमललेल्या कमळात बसलेल्या आणि दोन हातात कमळे धारण केलेल्या लक्ष्मीचे जिवंत चित्रण आहे. दुतर्फा असलेले हत्तीही तशाच प्रकारच्या कमळावर उभे असून ते देवीच्या अंगावर कुंभातून अभिषेक करीत आहेत. दोन द्वारपाल यक्ष प्रत्यक्षाकारापेक्षा मोठे असून ते एक हात वर करून ताठ उभे आहेत. त्यांचे पोषाख थोडे विचित्र असून चेहऱ्यावर स्मित आहे. वरचे वस्त्र छोट्या अंगरख्यासारखे (कुपासक) असून त्यावरील चुण्यांवर पानांची नक्षी आहे. गळ्याजवळील भाग आकर्षक असून त्यावर गाठ आहे. त्यांनी अगदी साधे, परंतु जड अलंकार धारण केले आहेत. या अलंकारांमध्ये दंडातील वाक्या, हातातील कडे, गळसरीसारखी कंठी आणि वजनदार कर्णभूषणांचा समावेश होतो. हे महाकाय यक्ष द्वारपाल दणकट शरीरयष्टी आणि चिलखतासारखे अंगरखे असूनही स्मितवदनी असल्याने सौम्य वाटतात. याच ठिकाणी वजनदार अलंकार व दंड धारण केलेल्या आणखी एका यक्षमूर्तीवर हीच वैशिष्ट्ये दिसतात. मोठे डोळे असलेल्या आणि हातात दंड असलेल्या या डौलदार मूर्तीच्या चेहऱ्यावर तशाच प्रकारचे स्मित आहे. संपूर्ण शिल्पकाम जरी ढोबळ ( primitive ) असले तरी निऱ्यांच्या चुण्या, गळसरी, जड कडे आणि अंगरख्याच्या तपशिलाकडे जास्त लक्ष पुरविलेले आढळते. विजारीच्या घड्यांचे आणि अंगरख्याचे शुंगकाळातील तशाच मूर्तिशिल्पांशी, विशेषतः सांची येथील शिल्पांशी खूपच साधर्म्य आहे. मूर्तिकाराचे नाव असलेला शिलालेख धारण करणारी मूर्ती दर्शकावर पटकन प्रभाव पाडणारी बुटकी यक्षमूर्ती असून

ती या काळातील शिल्पकलेचे जिवंत उदाहरण आहे. स्थूल शरीर असलेल्या स्मितवदनी यक्षाची, पोट सुटलेले, नाक बसके, गोल चेहरा, डोळ्यातूनही व्यक्त होणारे स्मित आदि वैशिष्ट्ये असलेली ही मूर्ती पूर्व-सातवाहन कलेचा उत्कृष्ट नमुना आहे. ह्या शिल्पकाराचे नाव कण्हदास असून तो सोनार (हेरंकार) होता ही बाब महत्त्वाची आहे. येथे करण्यात आलेल्या साफसफाईच्या कामात आणखी चार सुटी मूर्तिशिल्पे आढळली असून ती येथील कलेचे व्यवच्छेदक नमुने आहेत. त्यातील एक मूर्तिशिल्प सिद्धार्थाचा सर्वसंगपरित्याग किंवा महाभिनिष्क्रमण दाखविते. ह्या शिल्पाची थोडीशी झीज झाली आहे. या शिल्पात राजाचा अश्व शहराच्या द्वाराबाहेर जाताना दाखविला आहे. घोड्याजवळ हातात छत्र घेतलेला सेवक दाखविला आहे. अशाप्रकारे भगवान बुद्ध प्रत्यक्ष दाखविला नसला तरी त्याची उपस्थिती या छत्राद्वारे सूचित करण्यात आली आहे. या घटनेमुळे आनंदित झालेले देवदूत आकाशात उडताना दाखविले आहेत. उरलेली तिन्ही मूर्तिशिल्पे दांपत्यांची असून प्रत्येक शिल्पात ती निराळ्या स्थितीत म्हणजे उभ्या, बसलेल्या आणि रेललेल्या स्थितीत आहेत. ह्या शिल्पांमध्ये मानवी रूपे आणि वस्त्रे, विशिष्ट हावभाव, त्यांची उभी राहण्याची आणि बसण्याची पद्धती त्याचप्रमाणे कानातील अलंकार दाखविताना विशिष्ट शिल्पशैली वापरलेली दिसून येते. ही सर्व शिल्पे, मग ती मर्त्य मानवांची असोत, यक्षांची असोत की देवदूतांची, ती आनंदाने भरलेली आहेत. हा आनंद त्यांच्या चेहऱ्यावरील स्मिताद्वारे अभिव्यक्त झाला आहे.

कोंडाणे येथील लेण्याच्या मुखभागावर दाखविलेला यक्ष बारीकसारीक तपशील दाखविण्याऱ्या पितळखोऱ्याच्या परंपरेतील आहे. या मूर्तीच्या चेहऱ्याची खूपच झीज झाली असल्यामुळे तिच्या चेहऱ्यावर स्मित होते की नाही हे कळण्यास मार्ग नाही, तथापि हे कोरीव काम कण्हदासाचा शिष्य बालकाचे आहे. म. न. देशपांडे यांच्या मते हा कण्हदास घट धारण केलेली यक्षमूर्ती कोरणारा सोनारच आहे. पितळखोरे येथील स्तंभशीर्षांवर दाखविलेल्या पंखयुक्त प्राण्यांचे भारहूत येथील शीर्षांवर बसलेल्या व्यालमूर्तींशी कमालीचे साधर्म्य आहे.

कार्ले येथील सूर्यमूर्ती आणि तथाकथित मांधात्याची मूर्ती ह्या या टप्प्याचे उत्कृष्ट प्रतिनिधित्व करतात. ह्या मूर्ती नुकत्याच वर्णिलेल्या मूर्तींच्या एक पिढी आधीच्या आहेत. बाह्य आणि आतील भिंतीवर असलेल्या द्वारपालांच्या मूर्तिशिल्पांमध्ये एकंदरीत आकृती, पोशाख आणि आभूषणे यांमध्ये शैलीची तीच

वैशिष्ट्ये आणि त्याच प्रकारची शरीररचना आणि हावभाव आढळतात. रथात बसलेला सूर्यदेव आणि हत्तीवर बसून नंदनवनात फिरणारा मांधाता ही मूर्तिशिल्पे अद्वितीय आहेत. सूर्यदेवाच्या रथाच्या दोन घोड्यांच्या टापांखाली अंधःकाराच्या दैत्यमूर्ती चिरडल्या जात आहेत हे दृश्य खूप प्रभावी असून ते सभापर्वातील तशाच प्रसंगाच्या वर्णनाची आठवण करून देते. हातात हातोडे घेऊन हवेत तरंगणारे, अंधःकाराचे चित्रविचित्र दैत्य सूर्याच्या रथाच्या घोड्यांच्या टापांखाली चिरडले जात आहेत. या शिल्पातील कपडे दाखविण्याची शैली आणि कमालीच्या बुद्धिकौशल्याने केलेली ही कथापरशिल्पपटाची मांडणी भारहूत येथील कथापर शिल्पांशी साधर्म्य दर्शविते. फरक फक्त हालचालींमधील मुक्तपणाचा आहे. येथील शिल्पे अधिक प्रगमनशील आहेत.

पवनी येथील स्तूपाच्या कठड्याच्या स्तंभांवरील शिल्पांचा विचार केल्याखेरीज सातवाहन शिल्पाच्या किंवा पूर्वेतिहासिक कलेच्या या टप्प्याच्या विवेचनाची सांगता होणार नाही. पश्चिम भारतातील लेण्यांप्रमाणेच येथेही पशुपक्ष्यांनी युक्त अशा उभ्या कमलपट्टांची प्रयोजने आहेत. येथे कोरण्यात आलेल्या मानवाकृती, त्यांचे पोशाख आणि अलंकार यांची धाटणी आधी वर्णिलेल्या शिल्पाकृतींसारखीच आहे; फक्त कधीकधी चेहऱ्याची ठेवण थोडी निराळी आढळते. ही ठेवण काहीशी लाकडी मुखवट्यासारखी किंवा आदिवासींच्या उठावशिल्पांसारखी आहे. नेमक्या याच विशिष्ट बाबींमुळे विदर्भातील शिल्प पश्चिम भारतातील नागरी शिल्पांपेक्षा निराळे आहे. या संदर्भात श्री. एस. के. सरस्वती यांनी केलेल्या निरीक्षणांची नोंद घेणे उचित ठरेल. त्यांच्या मते अगदी पश्चिम भारतीय लेण्यांमधील शिल्पांमध्येही काही स्थानिक घटक आढळतात व या घटकांमुळे त्यांच्या समकालीन असलेल्या सांची आणि भारहूत येथील शुंग आणि शुंगोत्तर शिल्पांपेक्षा ती निराळी ओळखू येतात. उत्तर भारतात भरीव नागरीकरणाला सुरुवात झाली. ही प्रक्रिया महाराष्ट्रात येऊन थांबली किंवा पुढे या प्रक्रियेची तीव्रता फारशी टिकली नाही. ही नागरीकरणाची किंवा शहरीकरणाची प्रक्रिया अगदी लाटा याव्यात तशी झाली. उत्तरोत्तर येणाऱ्या शहरीकरणाच्या लाटा अधिकाधिक अंतर्भागापर्यंत पोहचल्या व त्यांनी संस्कृतीच्या विविध अंगातील स्थानिक घटक सामावून घेतले. शिल्पकला हे संस्कृतीचे अशाच प्रकारचे अंग आहे. हे अंग निरनिराळ्या कालखंडातील शहरीकरणाच विविध टप्पे आणि तीव्रता स्पष्टपणे दाखविते.

सातवाहन काळाच्या दुसऱ्या टप्प्यात गौतमीपुत्र सातकर्णीच्या नंतरच्या काळातील लेण्यामधील शिल्प या टप्प्याचे प्रतिनिधित्व करते. या काळातील लेण्यांमध्ये माणसांची आणि प्राण्यांची शिल्पे अधिक ठळकपणे आणि मोठ्या संख्येने आढळतात. नाशिक येथील लेणे क्र. ३ व कार्ले येथील चैत्यगृहामध्ये लेण्याच्या तळभागाच्या तुळ्या पेलणारे कीचक (atlantes) दाखविले आहेत. स्तंभशीर्षांवर व्याल आणि स्फिंक्ससारख्या प्राण्यांवर बसलेली भक्ती-दांपत्ये दाखविली आहेत. नाशिक येथील लेणे क्र. ३ मध्ये एक कमान असून कमानीच्या द्वारांच्या खांबांवर उभ्या पट्टांमध्ये मिथुन-दृश्ये, तर द्वाराच्या दोन्ही बाजूस यक्षमूर्ती दाखविल्या आहेत. कार्ले येथे वरच्या भागात निरनिराळ्या मजल्यांवर, उडणारी गंधर्वयुगुले दाखविली आहेत, तर खाली लेण्याच्या बाह्यभागात मुख्य भागाशी काटकोनात असलेल्या एकमेकांसमोरील भिंतींवर हत्तींचे पट्ट असून द्वाराच्या दुतर्फा देणगीदार दांपत्ये कोरलेली आहेत. नाशिक येथील लेणे क्र. ३ चे स्वरूप विहार असे असल्याने त्यात कक्षांची एक रांग असून मागील भिंतीतील कक्षाच्या दोन द्वारांच्या मधल्या जागेत एक स्तूप कोरला आहे. याउलट कार्ले येथील चैत्यगृहात स्तूपाच्या प्रत्येक बाजूस एक अशा दोन स्तंभरांगांनी पाख मध्यायतापासून अलग केले आहेत. या स्तंभांच्या शीर्षांवरही विलक्षण अशा प्राण्यांवर बसलेल्या दांपत्यांचे प्रयोजन आहे. पुनरुक्ती-बरोबरच सूक्ष्म वैविध्य असलेल्या या प्रयोजनांमुळे मध्यभागी असलेल्या स्तूपाच्या पूजनासाठी जाणाऱ्या भक्तांच्या दोन रांगा जाणवतात. स्थापत्यशास्त्रीय आणि शिल्पशास्त्रीय दृष्ट्या लेण्याच्या भव्य अंतरंगाला सखोलता प्राप्त करून देणारे हे एक सुंदर प्रयोजन आहे. नाशिक येथील लेणे क्र.३ च्या मागील भिंतीत स्तूपाला वंदन करणारे व फुले वाहणारे भक्तगण दाखविले आहेत. या भक्तांच्या मूर्ती, विशेषतः कार्ले येथील प्रत्यक्षाकाराहूनही मोठ्या असून त्या सातवाहन काळाच्या दुसऱ्या टप्प्यातील शिल्पकलेचा उत्कृष्ट नमुना आहेत असे म्हणता येईल. येथील यक्षाच्या आणि मानवाच्या मूर्तीत वरकरणी साधर्म्य दिसून येत असले तरी कुषाणकालीन मूर्तींपेक्षा या मूर्ती व्यवच्छेदकपणे निराळ्या आहेत. उठावात प्रगट झालेल्या स्त्री व पुरूषांच्या मूर्ती मोजक्याच दागिन्यांनी नटलेल्या असून त्या शिल्पकाराचा आत्मविश्वास व्यक्त करतात. मूर्तींच्या अंगावर रेषेने दाखविण्यात येणाऱ्या पारदर्शक वस्त्रांना त्यांच्या चुण्या व कोपरे दाखविण्यास सुरुवात झाल्यानंतरच आकार आला. अवाढव्य असलेल्या आकृती सहजपणे आकाशातून उडत आहेत असे दाखविण्यासाठी या शिल्पाकृती कमानींच्या बाह्यरेषेलगत कोरण्यात येत असत.

बहुधा याच काळात मानवी शिल्पाकृती अतुल सौंदर्याप्रत पोचल्या. या काळातील भक्तांनी आणि शिल्पकारांनी भगवान बुद्धाला मानवी स्वरूपात पाहणे पसंत केले. अजूनही स्तूपाचे मुख्य पूजावस्तू म्हणून महत्त्व होतेच. चैत्यगृहातील मध्यायताच्या मागे असलेले त्याचे महत्त्वपूर्ण स्थान अबाधित राहिले. इ. स. च्या तिसऱ्या शतकाच्या पहिल्या दशकांमध्ये कान्हेरी येथील चैत्यगृहाच्या प्रांगणातील स्तंभाच्या पायावर आणि शीर्षावर बुद्धमूर्ती आहे. त्यातील एक बुद्धमूर्ती उभी असून एक बसलेली आहे. अमरावतीला बुद्धमूर्ती घडविण्यात आल्या. त्यापासून प्रेरणा घेऊन येथे या मूर्ती कोरल्या गेल्या असाव्यात. स्तंभावर नेहमी आढळणाऱ्या कमलपट्टाव्यतिरिक्त आढळून येणारे नवे वैशिष्ट्य म्हणजे स्तूपाभोवतालच्या कठड्याच्या साहचर्यात आढळणारे प्राण्यांचे व गुराख्यांचे पट्ट होय. हे वैशिष्ट्य गौतमीपुत्रोत्तर सर्व लेण्यांमध्ये, म्हणजे नाशिक, कुडा व कान्हेरी येथे आढळते. स्तूपाची पूजा करणारे आणि त्यापुढे नतमस्तक झालेले भक्तजन दाखविणाऱ्या, त्याचप्रमाणे बैल, सिंह, हत्ती आणि अगदी उंटही दाखविणाऱ्या पट्टांचे पश्चिम भारतातील लेण्यांमधील शिल्पांशी आणि अमरावती येथील शिल्पकलेशीही साधर्म्य आहे.

तेर येथील स्तूपाच्या कठड्यावरील किंवा वेदिकेवरील दगडी शिल्पे अमरावती या प्रसिद्ध सातवाहन स्थळी आढणाऱ्या शिल्पशैलीची प्रकर्षाने आठवण करून देतात. तेरणा नदीच्या पलीकडे स्तूपाचे काही अवशेष आढळले आणि त्याठिकाणी मो. गं. दीक्षित यांनी उत्खनन केले; त्याची माहिती याआधीच देण्यात आली आहे. त्याचप्रमाणे याठिकाणी वरंडीच्या दगडाचे (coping stone), कठड्याच्या स्तंभाचे, कमलपट्ट असलेल्या कठड्याच्या आडव्या सूची आणि स्तूप दाखविलेल्या आयागपट्टांचे दगडी अवशेष सापडल्याचा उल्लेखही याआधी येऊन गेलेला आहे. या अवशेषांचे अमरावती येथील शिल्पांशी असलेले शैलीतील साधर्म्य शिल्पांसाठी वापरण्यात आलेल्या एकाच प्रकारच्या चुनखडीच्या दगडामुळे अधिक बळकट झाले आहे. वास्तव्यस्थळी आढळलेल्या चुनखडीच्या दगडात घडविलेल्या अशाच प्रकारच्या वस्तू (उदा. शिल्पफलक फरशा (Plaque) आणि मानव मूर्तिशिल्प) मूर्तिशिल्प बनविण्याकरीता या भागात चुनखडीचा दगड लोकप्रिय असल्याची साक्ष देतात. या ठिकाणी शैव मंदिराशी संबंधित असलेला एक स्तंभ आढळला असून या स्तंभावर वासिष्ठीपुत्र पुळुमावीच्या काळातील शिलालेख आहे. हा स्तंभही चुनखडीच्या दगडातच कोरलेला आहे. ही वस्तुस्थिती लक्षात घेता अशा प्रकारच्या कलावशेषांचा काळ फार मागे नसला तरी किमान इ. स. च्या दुसऱ्या शतकाच्या

उत्तरार्धातील असावा. अशा उल्लेखनीय कलावस्तूंमध्ये एकावर एक अशा चार छत्र्या असलेल्या स्तूपाची पूजा व वंदन करणारे नाग दाखविणारा फलक, आतआत जाणाऱ्या वर्तुळांमध्ये कमळे आणि हंस दाखविणारी कमळाची वेल मगर बाहेर टाकत आहे असे दृश्य असलेला फलक आणि लंबगोलामध्ये दाखविलेला दाढीवाल्या माणसाचा चेहरा इत्यादी कलावस्तूंचा समावेश होतो. डोळयाची बुब्बुळे आणि डोळे अगदी नाजुकपणे कोरलेल्या लंबगोलाकार चेहऱ्यामध्ये अमरावती शैलीची सर्व वैशिष्ट्ये आहेत. हे डोके किंवा चेहरा राजघराण्यातील व्यक्तीचा असावा. डोक्याच्या केसांना बांधलेल्या चूडामणीवरून हे अनुमान निघते. या काळातील लज्जागौरींचे अनेक फलक आढळले आहेत. जड कर्णवलये आणि मेखला एवढीच आभूषणे आणि डोके कमळाच्या स्वरुपात दाखविण्याची पद्धती या दोन बाबी हे फलक उत्तरसातवाहनकालीन असल्याचे सूचित करतात.

या ठिकाणच्या शिल्पकलेमध्ये येथील मृदुशिल्पांना अनन्यसाधारण महत्व आहे. बारीक नक्षीकाम असलेली भांडी, विविध प्रयोजने असलेली पदके [Medallions], मातीचे दिवे, मकरिका, पशुमूर्ती, घोडे, हत्ती, मातृदेवता आणि कुमारासारखे देव यांची मूर्तिशिल्पे लक्षात घेता सातवाहन काळातील नंतरच्या टप्प्यात दुहेरी साच्याच्या पद्धतीचा अंगिकार करण्यात आलेला दिसतो. पदकांमध्ये प्रामुख्याने आढळून येणारे प्रयोजन म्हणजे गजलक्ष्मी. त्यात रोमन बैलाच्या प्रतिकृतीही आढळतात. पुनरुक्ती झालेल्या शिल्पाचे उदाहरण म्हणजे मातृदेवतेची मूर्ती. तिच्या उजव्या हातात आंब्याची डहाळी असून डाव्या हातात पक्षी पकडला आहे. अशीच प्रयोजने असलेल्या आणि पाय फाकविलेल्या स्थितीत असलेल्या बालकांच्या मूर्तीही आढळल्या आहेत. या मूर्ती घोड्यावरील स्वार म्हणून बनविल्या असून घोड्याच्या मृण्मूर्ती स्वतंत्रपणे बनवून नंतर त्या एकत्र जोडण्यात येत असाव्यात या निष्कर्षप्रत विद्वान आले आहेत.

यातील बऱ्याचशा मातृदेवतेच्या आणि बालकांच्या मूर्ती आतून पोकळ असून त्यांची मोठी संख्या लक्षात घेता ह्या मूर्ती नवसाच्या म्हणजेच लहान मुलांना होणारी रोगराई टाळण्यासाठी अर्पित केल्या जाणाऱ्या असाव्यात. काही मूर्तींवर, विशेषतः पणतीचे अलंकरण करणाऱ्या मूर्तीवर परकीय प्रभाव दिसून येतो. डोक्याचे स्वरूप दिलेल्या अशा एका पणतीवर सिथियन वैशिष्ट्ये आणि कुल्हा प्रकाराची टोपी आढळते. दुसऱ्या एका नमुन्यात डोक्याच्या भागावर ग्रीकोद्भव वैशिष्ट्ये आढळतात. या शिल्पात वापरण्यात आलेले प्रगत तंत्र, मानवी मूर्तीची वेगळी

वैशिष्ट्ये आणि या पुरावस्तूंचे आगळेवेगळे स्वरूप इत्यादी बाबींवरून येथील लोकांचा ग्रीक प्रभाव असलेल्या कलाकारांशी थेट संपर्क होता असे म्हणता येईल.

हस्तिदंती, हाडाच्या आणि शिंपल्याच्या वस्तूंचे विवरण केल्याखेरीज सातवाहन शिल्पांचे सर्वेक्षण पूर्ण होणार नाही. या वस्तूंमध्ये आरशाचा दांडा, केसाचे चिमटे (hair pins) आणि कंगव्यांचा समावेश होतो. हस्तिदंती आणि हाडाच्या शिल्पाकृती सर्वाधिक उल्लेखनीय आहेत. विशेषतः आरसा धरण्याचा दांडा बनविण्यासाठी हस्तिदंताचा वापर केला जात असे. तेरमधील एक प्रसिद्ध हस्तिदंती शिल्प म्हणजे एका वर्तुळात दाखविलेली उभी स्त्री होय. या अंडाकार चेहऱ्याच्या सडपातळ स्त्रीने काहीशी झिरझिरीत वस्त्रे घातलेली असून ती कमरेला अगदी गच्च बांधलेली आहेत. तिची केशरचना अगदी व्यवस्थित असून तिने कपाळावरही दागिना घातला आहे. डोक्यावर पुष्पमाला घातली असून ती पुढे वेणीत अडकवली आहे, कर्णकुंडले, गळसरी, कडे इत्यादी दागिनेही तिच्या अंगावर दाखविले आहेत. या नाजूक शिल्पाकृतीचे कोरीवकाम आणि सुंदर अंडाकृती चेहऱ्यावरील बसके नाक शिल्पकाराच्या कौशल्याचा आणि कलेचा प्रत्यय देतात. ही शिल्पाकृती पॉम्पी येथील उत्खननात सापडलेल्या तशाच प्रकारच्या कलाकृतीशी साधर्म्य दाखविते. या शिल्पाकृतीपेक्षा भोकरधन येथील उत्खननात सापडलेली हस्तिदंती मूर्ती अधिक साधर्म्य दाखवणारी आहे. याउलट तेर येथील मूर्ती अधिक नाजूक आहे. तिच्या पायाजवळ भोकरधनमधील शिल्पात दाखविल्याप्रमाणे दोन छोट्या शिल्पाकृती नाहीत. भोकरधन येथील शिल्प अखंड नाही. त्यात कमरेच्या वरचा भाग तुटून गेलेला आहे. तथापि या शिल्पात तीच शरीररचना आणि तीच सुदृढता आहे. पॉम्पी आणि भोकरधन येथील शिल्पाकृती कार्ले येथील शिल्पाकृतींच्या वळणातील असून त्यांचा अंतर्भाव याच कालखंडातील कलाकृतींमध्ये होतो.

तेर येथे सापडलेल्या हाडाच्या आणि हस्तिदंती कंगव्याचा आवर्जून उल्लेख केला पाहिजे. हाडातील नमुना हस्तिदंती कंगव्यापेक्षा थोडा ओबडधोबड किंवा अपरिपक्व असून तो तेरमधील कुंडाच्या उत्खननात सापडला आहे. दोन्ही कंगव्यांवर केस विंचरणारी स्त्री कोरली आहे. हस्तिदंती कंगव्यावर मागच्या बाजूस लक्ष्मीला हत्ती अभिषेक करत असल्याचे दृश्य कोरले आहे. हा कंगवा हस्तिदंती कोरीवकामाचा उत्कृष्ट नमुना आहे. तेर येथे हस्तिदंती कोरीवकाम करणाऱ्यांची श्रेणी (संघटना) होती. हंसाचा आकार असलेला केसांचा आकडा या वस्तूचाही आवर्जून उल्लेख केला पाहिजे. मौल्यवान खडे, नाण्यांचे साचे, विविध प्रकारच्या

माळा व ताईत इत्यादी अवशेष तेर हे कलाकौशल्याचे समृद्ध केंद्र असावे हेच दाखवून देतात.

## वाकाटक शिल्प

सातवाहनांच्या अस्तानंतर दख्खनवर राज्य करणारे महत्त्वाचे राजघराणे म्हणजे वाकाटक. वाकाटक नृपति हरिषेण (इ. स. ४६५-४९०) व त्याचा मंत्री वराहदेव यांचे शिलालेख वाकाटकांचा प्रभाव संपूर्ण दख्खनवर, म्हणजे अरबी समद्रापासून बंगालच्या उपसागरापर्यंतच्या प्रदेशावर असल्याची साक्ष देतात. काही वाकाटक नृपति हे गुप्त सम्राटांचे समकालीन असले तरी वाकाटक राजघराणे गुप्त साम्राज्याच्या उदयाच्या अर्ध्या शतकापूर्वीच महत्त्वाची राजसत्ता म्हणून प्रस्थापित झालेले होते. विशेष म्हणजे ते इ. स. च्या पाचव्या शतकाच्या मध्यात गुप्तांचा ऱ्हास झाल्यानंतरही महत्त्वाची सत्ता म्हणून टिकून राहिले होते. वाकाटकांची स्थापत्य, शिल्प आणि चित्रकलेच्या क्षेत्रातील अजिंठा येथील निर्मिती विचारात घेता वास्तुशास्त्र किंवा स्थापत्य व दृक्‌कलेचे (visual arts) आश्रयदाते म्हणून त्यांचे असलेले महत्त्व लक्षात येते. एके काळी वाकाटकांचा काळ इ.स. चे आठवे शतक मानला जात असे आणि त्यामुळे अजिंठा येथील चित्रकला व शिल्पकलेचे परस्परपूरक अद्वितीयत्त्वाकडे (singular nature) दुर्लक्ष होत असे. परिणामी भारताच्या वैभवशाली काळातील किंवा अभिजात युगातील (classical age) कलेची चर्चा करताना त्यात अजिंठा येथील कलेचा विचार केला जात नसे. तरीसुद्धा सौंदर्यशास्त्रीय निकष लावून या भूमिकेचे समर्थन करण्याचेही प्रयत्न झाले. तथापि गेल्या पन्नास वर्षात पुराभिलेखविद्या, राजकीय आणि कलेचा इतिहास या क्षेत्रात झालेल्या महत्त्वपूर्व संशोधनामुळे भारतातील अभिजात कलेचे वर्णन नुसते "गुप्त कला" असे न करता "गुप्त-वाकाटक कला" असे केले पाहिजे हे आता सर्वमान्य झाले आहे; किंबहुना अजिंठा येथील रंगचित्रे जर उजेडात आली नसती तर प्राचीन भारतीय चित्रकलेचे आणि अभिजातयुगातील चित्रकलेच्या भारतात आणि भारताबाहेर पडलेल्या प्रभावाचे आकलन अपूर्ण राहिले असते.

अजिंठा येथील प्रामुख्याने बौद्ध असलेली शिल्पे सारनाथच्या अभिजात शिल्पांपेक्षा वेगळी आहेत. सारनाथ येथील ध्यानमग्न उभा किंवा बसलेला बुद्ध, त्याचे अर्धोन्मीलित डोळे, शरीराला टेकलेल्या वस्त्रांच्या चुण्यांवरूनच त्याच्या शरीरयष्टीचा येणारा अंदाज इत्यादी वैशिष्ट्ये असलेली शिल्पे म्हणजे सौंदर्याचे

आगळेवेगळे स्वरूप आहे. शाक्य बुद्धाच्या अशा तऱ्हेच्या मूर्ती भौतिक शरीर दाखवित असल्या तरी ते उच्च दर्जाच्या आकाशमय विश्वातून अवतरीत होत असल्यासारखे भासते. अजिंठा येथील बुद्धमूर्तीमध्ये तत्कालीन कलेची सौंदर्यशास्त्रीय वैशिष्ट्ये, शरीराच्या प्रमाणाचे संकेत आणि महापुरुषाची उष्णीषादि लक्षणे इत्यादि बाबी दिसून येत असल्या तरी या मूर्ती अधिक भौतिक आणि भरीव वाटतात. भक्तांना तारण्यासाठी अवलोकितेश्वराचे स्वर्गातून होणारे अवतरण, बुद्धाचा परितोष, परिनिर्वाण, स्वतःची पत्नी व पुत्र यांच्यासमोर भिक्षा मागण्यासाठी उभा असलेला बुद्ध, दीपंकर जातक असे धार्मिक विषय अजिंठा येथे चित्रित करण्यात आले आहेत. ही शिल्पे केवळ कथाविवरणशैलीमुळे नव्हे, तर मूर्ती कोरण्याकरिता वापरलेली पद्धती आणि त्याहीपेक्षा महत्त्वाचे म्हणजे निरनिराळ्या भावना आणि वृत्तींचा सुंदर आविष्कार या गुणांमुळे उल्लेखनीय ठरली आहेत. दुय्यम शिल्पांमध्ये राजेशाही नाग-युगुल, लेण्याच्या कळसावरील शिल्प (standar bearer), यक्ष द्वारपाल आणि त्यांचे अनुचर, जलदेवता आणि त्यांचे गबाळ अनुचर व टेंगू लवाजमा हे सारे प्रेक्षकास निराळ्या असणाऱ्या दिव्य विश्वात घेऊन जातात. हे विश्व परलोकातील किंवा श्रेष्ठ लोकातील असले तरी ते मानवी भावनांनी ओतप्रोत भरलेले असल्यामुळे मानवीच भासते.

गेल्या तीस वर्षात पूर्व विदर्भात उजेडात आलेला कलेच्या इतिहासातील पुरावा विचारात घेतल्याखेरीज वाकाटक शिल्पाचा आढावा पूर्ण होणार नाही. वाकाटक राजघराण्याच्या दोन शाखा होत्या. अजिंठा येथील कलेला वत्सगुल्म (सध्याचे वाशीम) येथील शाखेचा राजाश्रय होता तर दुसरी शाखा (बहुधा ही शाखा अधिक प्राचीन होती) प्रथम नंदीवर्धन (सध्याचे नगरधन) येथून आणि नंतर प्रवरपूर येथून राज्य करीत होती. या प्रवरपुराचा नेमका ठावठिकाणा अद्यापही गवसलेला नाही. गेल्या तीन दशकात झालेल्या गवेषणांनी वाकाटककालीन कलेतिहासिक अवशेष असलेली अनेक स्थळे उजेडात आणली आहेत. रामटेक (प्राचीन रामगिरी) जवळील नगरधन परिसरातील नांदपूर, हमलापुरी आणि मन्सर, पारशिवनी परिसरातील पेंच नदीच्या तीरावरील नांदपूर, वर्धा जिल्ह्यातील धाम नदीच्या तीरावर वसलेले पवनार (पद्मनगर), नागपूर जिल्ह्यातील मांढळ, गोगाव ( जिल्हा भंडारा) आणि मूळचेरा (जिल्हा गडचिरोली) व भंडारा जिल्ह्यातील पवनी आणि नागरा ही त्यातील उल्लेखनीय स्थळे होत. अगदी गेल्या दशकापर्यंत वाशीममध्ये कलेइतिहासातील अवशेष सापडले नव्हते. पण गवेषणामुळे आणि उत्खननामुळे याच गावात काही

शिल्पे, मूर्ती आणि विटांनी बांधलेल्या मंदिरांचे अवशेष उजेडात आले आहेत. या सर्व स्थळांमध्ये रामटेकला अनन्यसाधारण महत्त्व आहे. या ठिकाणी झालेल्या गवेषणामुळे आणि जतन कामामुळे वाकाटककालीन शिलालेख असलेले सहा मंदिरे आणि प्रा. मिराशी यांनी अभ्यासिलेल्या शिल्प व मूर्तीव्यतिरिक्त आणखी काही शिल्पे व मूर्ती उजेडात आल्या आहेत.

ह्या मूर्ती आणि शिल्पे शैलीच्या दृष्टिकोनातून सांची येथील सुरुवातीच्या शिल्पांशी साधर्म्य दाखविणाऱ्या पवनीसारख्या पूर्वीपासूनच ज्ञात असलेल्या स्थळी आढळणाऱ्या मूर्ती आणि शिल्पांपेक्षा निश्चितच निराळी आहेत. त्यांच्यामध्ये गंगेच्या खोऱ्यातील अभिजात शिल्पकलेची काही वैशिष्ट्ये स्पष्टपणे दिसून येतात. ही वैशिष्ट्ये फक्त वेषभूषा, दागिने, कपडे किंवा ते शिल्पाकृतीत कसे दाखवावेत याबाबतचे संकेत एवढ्यापुरतीच मर्यादित नाहीत. या वैशिष्ट्यामध्ये ज्येष्ठ देव आणि कनिष्ठ देव यांच्यातील फरक कसा स्पष्ट करावा, त्यांची उंची व इतर प्रमाणे, त्यांचे चेहरे, नाक, कान, डोळे, बोटे, टाचा यांसारखे अवयव कसे असावेत याबाबतच्या संकेतांचाही समावेश होतो. शिवाय बसण्याच्या व उभे राहाण्याच्या पद्धती, त्यात शिल्पकाराला मिळणारे स्वातंत्र्य, त्याचप्रमाणे हावभाव आणि चेहऱ्यावरील भाव-भावना इत्यादी बाबीही विंध्य पर्वतापलिकडे उत्क्रांत झालेल्या अभिजात शिल्पशैलीशी मिळत्याजुळत्या आहेत.

वाकाटक शिल्पाचे उत्कृष्ट नमुने मांढळ येथे सापडले आहेत. नागपूर जिल्ह्यात नागपूर शहरापासून ७५ कि. मी. अंतरावर मांढळ हे ठिकाण आहे. या ठिकाणी टेकडीच्या उतारावर वृक्षारोपणाचे काम चालू असता चार मूर्ती सापडल्या. ह्या मूर्तींचे महत्त्व लक्षात घेऊन तेथे उत्खनन करण्यात आले तेव्हा अनेक शैव व वैष्णव मूर्ती उजेडात आल्या. त्यामध्ये ब्रह्मा, दुर्गा, विष्णू, नरसिंह, अष्टमुखी आणि द्वादशमुखी शिव, अनेक प्रमथ आणि काही आयुधपुरुष इत्यादी सुंदर मूर्तिशिल्पांचा समावेश आहे. ही मूर्तिशिल्पे या भागातील हिंदू संप्रदायाची सर्वाधिक प्राचीन शिल्पे असण्याची दाट शक्यता आहे. ह्या शिल्पाकृती घडविणाऱ्या शिल्पीने गंगेच्या खोऱ्यात उत्क्रांत होत असलेल्या अभिजात कलेचे संकेत निश्चितच पाळले आहेत, पण त्याचवेळी त्याने स्वतःच्या कल्पना आणि देवत्वाची संकल्पना त्यात साकार करण्याचे स्वातंत्र्य घेतले आहे. शिल्पकाराने त्याच्या कल्पनाशक्तीला पूर्ण मोकळीक दिली आणि त्यामुळेच अशा चार, आठ किंवा बारा तोंडांच्या शिवमूर्ती बनविण्याची आणि अनेकमुखी देवतांची मुखे अशाप्रकारे दाखविण्याची पद्धत जी

नंतरच्या काळात वापरण्यात आली नाही. अशाच कल्पनेच्या उर्मीतून उद्‌भवलेल्या शिवाच्या विलक्षण मूर्तीचे रायपूर जिल्ह्यातील जेठाणी मंदिरातील मूर्तीशी खूपच साम्य आहे.

मांढळ येथील मूर्तीचे वैशिष्ट्य म्हणजे त्या टेंगण्या किंवा यक्षाच्या मूर्तीप्रमाणे कोरलेल्या आहेत. या संदर्भात मांढळ येथे आढळलेल्या धेनुक दैत्याच्या वध करणाऱ्या बलरामाच्या मूर्तीचे उदाहरण देता येईल. विष्णूच्या मूर्तीचा फक्त डोक्याचाच भाग शिल्लक असला तरी मुखभागावरील नाक, कान, भुवया इत्यादींची ठेवण किंवा रचना आणि त्यांची परस्परांशी असलेली प्रमाणे ही मूर्ती गिड्डी असल्याचे सूचित करतात. त्यामुळेच विद्वानानी काही प्रमथ-सदृश मूर्ती शिवाच्या असाव्यात असा अंदाज बांधला आहे. या सर्व मूर्तींची शैली, पुरातत्त्वीय व परिस्थितिजन्य पुरावा इत्यादी बाबी लक्षात घेता त्यांचा काळ ढोबळ मानाने इ. स. ३५०–४०० असावा असे दिसते. मांढळ येथे सापडलेल्या मूर्तीप्रमाणेच अकोला जिल्ह्यातील पातूर येथील तपस्या करणाऱ्या पार्वतीची मूर्ती, भांदक येथील लेण्यातील विष्णूमूर्ती आणि चंद्रपूर जिल्ह्यातील भटाळा येथील नरसिंहमूर्ती याच काळातील आहेत.

यानंतरच्या विकासाच्या टप्प्यात रामटेक आणि त्याच्या परिसरातील मूर्तींचा समावेश होतो. बऱ्यापैकी झीज झालेली त्रिविक्रमाची अष्टभुज मूर्ती वाकाटककालीन असल्याची माहिती डॉ. वा. वि. मिराशींच्या लिखाणामुळे अगोदरच उजेडात आली होती. पण रामटेक येथे केलेल्या जतनकामात केवलनरसिंह आणि रुद्रनरसिंहाच्या मूर्तीचे मूळ स्वरूप उजेडात आले. साफसफाईचे काम चालू असता दोन महाकाय द्वारपालांचा शोध लागला. त्रिविक्रमाच्या मूर्तीची खूपच झीज झाली असल्याने तिच्या मूर्तिशैलीच्या वैशिष्ट्यांचा शोध घेण्यासाठी खूप बारकाईने निरीक्षण करावे लागले. तथापि येथील वराह आणि दोन नरसिंह मूर्तींवरील शेंदूर आणि तेलाचे थर काढून टाकल्यानंतर त्यांच्या शैलीची वैशिष्टये आता स्पष्ट झाली आहेत. हे केवलनरसिंहाचे स्वरूप वाकाटकांच्या राज्यात खूपच लोकप्रिय असावे असे दिसते. या अशा तऱ्हेच्या मूर्ती नंतरच्या काळात देवगड (मध्य प्रदेश) येथे दिसून येतात. अशाच धाटणीचे केवलनरसिंह असलेले पट (plaques) नागपूर जिल्ह्यात नगरधन आणि नांदपूर व वर्धा जिल्ह्यातील पवनार येथे आढळले आहेत. या मूर्तीवर फारसे श्रीमंती दागदागिने किंवा वस्तू नाहीत. हा सिंहमुखी केवलनरसिंह राजासारखा बसला आहे. भक्तांच्या मनात त्याच्याबद्दल आदर आणि दबदबा निर्माण

करण्यासाठी शिल्पकाराला या मूर्तीला आणखी हात देण्याची आवश्यकता भासली नाही. केवलनरसिंहाने पायाचा एक गुडघा किंचित उंचावला असून त्यावर त्याचा चक्रधारी हात विसावला आहे, तर दुसरा हात दुमडलेल्या पायाजवळ भक्कमपणे विसावला आहे. एक कंठी आणि पाठीवर रूळणारे केस बांधणारी रत्नमाला हे दोन दागिने सोडले तर मूर्तीवर अन्य कोणतेही दागिने नाहीत. या दोन नरसिंहमूर्ती भारतातील अभिजात शिल्पकलेच्या उच्चतम अभिव्यक्ती आहेत. त्याच टेकडीवर पाच आमलक आणि कलशाने युक्त अशा साध्या मंडपात राजेशाही थाटात उभ्या असलेल्या वराहाची मूर्ती आहे. ही मूर्ती वाकाटक शिल्पींची एक श्रेष्ठ कलाकृती आहे. ही महाकाय वराहमूर्ती बेसॉल्टच्या दगडात खोदलेली असून नितळ कोरीव अवयवांद्वारे तिचे ऐश्वर्य दिसून येते. या मूर्तीवर अलंकरणात्मक प्रयोजने नाहीत किंवा त्यातील पशुशरीराचे तपशील काटेकोरपणे दाखविण्याची काळजी घेतलेली नाही. हा देवाचा अनावृत अवतार खोल पाण्यातील नागाच्या वेटोळ्यावर उभा असून त्याने स्वतःच्या नाकाडावर मानवी रुपातील पृथ्वीला पेलले आहे. या तीन मूर्ती, त्याचप्रमाणे रामटेक येथील त्रिविक्रम, पवनार येथील बुद्ध व रुद्रनरसिंह मंदिरात सापडलेले महाकाय द्वारपाल या मूर्ती पूर्वेकडील वाकाटक कलेच्या उच्चतम अभिव्यक्ती आहेत. प्रस्तरलेखांच्या आणि कलात्मक पुराव्यावरून या मूर्ती इ. स. च्या पाचव्या शतकाच्या पहिल्या चतुर्थकातील आहेत असे म्हणता येईल.

यापुढील टप्प्यातील उत्कृष्ट नमुन्यांकरीता फार दूर जाण्याची आवश्यकता नाही. हमलापुरी आणि मन्सर येथे काही शिल्पाकृती सापडल्या असून त्या नाजुकता आणि परिपूर्णता दाखवितात. हमलापुरी येथील शेतात सापडलेल्या दोन गणांच्या मूर्ती याचे उत्तम उदाहरण आहेत. यापैकी कुंभोदर असलेली बसकी मूर्ती ही देवाच्या बागडणाऱ्या परिचरांची वास्तववादी शिल्पाकृती असून ती त्यांचे यथातथ्य प्रतिनिधित्व करते. एका गणाला जणू हर्षाच्या उकळ्या फुटत आहेत तर दुसरा राजासारखा ऐसपैस बसला आहे. मन्सरला सापडलेली मूर्ती शिवाच्या रौद्र-सौम्य (arnbivalent) स्वरूपाची असून या प्रकारच्या देवमूर्तींमध्ये ती उत्कृष्ट आहे. राजेशाही थाटात (महाराज लीलासन) बसलेली देवाची ही ठेंगू आणि गुबगुबीत मूर्ती पूर्वेकडील वाकाटकांच्या सुबक कलेची द्योतक आहे. नाजुक कोरीवकाम, चेहऱ्याचे बारकावे, केसांच्या जटा, जटांमध्ये माळलेली आणि हातात धरलेली फुले ही त्याची उदाहरणे आहेत. या मूर्तीकरीता वालुकाश्म (fine grained sandstone) वापरल्यामुळे आकाराचा साधेपणा आणि तपशीलातील नाजूकपणा याचा मिलाफ प्रभावीपणे अभिव्यक्त झाला आहे. विनोबाजींच्या आश्रमाजवळील कथापरशिल्पपट

आणि गंगा, पवनारच्या जवळील एका मंदिरात सापडलेला नारायणाचा शिल्पपट, वाशीम (जि. अकोला) येथील उमामहेश्वर आणि निधिपुरुषांच्या मूर्ती हे या टप्प्यातील आणखी काही नमुने आहेत. मगरीवर उभी असलेली, प्रत्यक्षाकारापेक्षा किंचित छोटी गंगाभगवतीची मूर्ती या टप्प्यातील एक सुंदर कलाकृती आहे. ही मूर्ती अगदी कृपाळूपणे उभी असून तिच्या अंगावरील झिरझिरीत वस्त्रांना चुण्या दाखविल्या आहेत. अंगावर काही अलंकारही आहेत. गंगेची मूर्ती पवित्र स्त्रीत्वाच्या तुरीय अभिव्यक्तीमुळे नजरेत भरते तर कंसवधासारखे कथापरपट तालयुक्त आणि चातुर्यपूर्ण मांडणी व त्यात दाखविलेल्या व्यक्तिमत्वांपैकी विशेषतः श्रीकृष्ण व बलरामाच्या हालचालींमधील जोम व उत्साह इत्यादी बाबींमुळे उल्लेखनीय ठरले आहेत.

नगरधनच्या परिसरात (प्राचीन नंदीवर्धन) हमलापुरी येथे अगदी अलीकडेच सापडलेल्या ब्राँझमूर्तींमुळे दख्खनमधील ब्राँझशिल्पांबाबतच्या ज्ञानात भर पडली आहे. यापूर्वी केवळ फोफनार (जि. निमाड, मध्य प्रदेश) येथे सापडलेल्या ब्राँझमूर्तीच वाकाटक कलेचे प्रतिनिधित्व करतात असे मानले जात असे. फोफनार येथील ब्राँझमूर्ती बाघ येथे सापडलेल्या धार्मिक शिल्पाकृतींशी प्रचंड साधर्म्य दाखवितात. बाघ हे ठिकाण अजिंठा येथील शिल्प व रंगचित्रांच्याच परंपरेतील असून ते फोफनारपासून फारसे दूर नाही. काही विद्वान सकृतदर्शनी बाघ येथील कलेचा उगम वाकाटक कलेत आहे असे मानतात. या ब्राँझमूर्तींमध्ये तीन उभ्या बुद्धमूर्तींचा समावेश होतो. यातील काही मूर्तींच्या प्रभावळी व अन्य भाग सुटे करता येतील असे आहेत. यातील मोठ्या शिल्पाकृतीचे उत्तर प्रदेशातील धनेसर-खेडा येथील शिल्पाकृतीशी खूपच साधर्म्य असल्याने ती मथुरा कलाघराण्याच्या परंपरेतील असण्याची शक्यता आहे. उरलेल्या दोन्ही मूर्ती एतद्देशीय कलेचा नमुना आहेत. त्यापैकी एका शिल्पाकृतीला पदस्थल नाही. या उभ्या मूर्ती एकीकडे आंध्र प्रदेशातील बुद्धगयेतील प्रसिद्ध बुद्धमूर्तीशी साधर्म्य दाखवितात तर दुसरीकडे अजिंठा येथील महाकाय बुद्धमूर्तीशी साम्य दाखवितात.

## इ. स. च्या सहाव्या शतकातील शिल्प (अपरान्त)

वाकाटक साम्राज्याचा अस्त हा इतिहासाच्या व त्याचप्रमाणे कलेतिहासाच्या अभ्यासकांचा स्वारस्यपूर्ण चर्चेचा विषय आहे. अजिंठा, औरंगाबाद आणि वेरूळ येथील महायान व वज्रयान लेण्यांचा व त्याचप्रमाणे वेरूळ, लोणाड, जोगेश्वरी,

घारापुरी, मंडपेश्वर, अंकाई-टंकाई आणि माहूर येथे नवीन कोरण्यात आलेल्या ब्राह्मणी लेण्यांचा कालानुक्रम हे या संदर्भातील महत्त्वाचे प्रश्न आहेत. प्रा. स्पिंक यांच्या मते अजिंठा येथील लयननिर्मिती इ. स. ४७५ लाच किंवा फार तर इ. स. ४८० ला थांबली. वाकाटकांच्या प्रभावाखाली त्यांच्या कलापरंपरेचा किंवा कलाघराण्याचा सर्व दिशांनी विस्तार झाला. हीनयान शैलगृहांच्या केंद्रांमध्ये (उदा. पितळखोरे, नाशिक, कान्हेरी, महाकाली इत्यादी) आढळून येणारी आगंतुक शिल्पे वाकाटकांच्या राजवटीच्या शेवटच्या वर्षांमधील दूरवर पसरलेल्या प्रभावाचे पुरावे आहेत. प्रा. स्पिंक यांच्या मते वाकाटक कलेचा प्रभाव प्रथम बाघ येथे व नंतर जोगेश्वरी, घारापुरी व मंडपेश्वर येथील पाशुपत लेण्यांमध्ये आणि अंकाई-टंकाई, माहूर आणि वेरूळ येथील शैलगृहांमध्ये दिसून येतो. प्रा. स्पिंक यांच्या मते कलचुरी कलाघराणे (kalachuri school) म्हणून ओळखला जाणारा वाकाटक कलेच्या सलगतेत असलेला हा टप्पा पश्चिमी चालुक्य कलेला जोडणारा सेतू आहे. यापूर्वीच नमूद केल्याप्रमाणे अशा तऱ्हेची नामाभिधाने देण्यास विद्वानांचा विरोध आहे. ते अपरान्त भागातील इ. स. च्या सहाव्या शतकातील कलेला मौर्य कलाघराणे किंवा मौर्यकला तर वेरूळ, तेर, माहूर यासारख्या इतर केंद्रातील कलेला इ. स. च्या सहाव्या शतकातील मूलक आणि अश्मक कला संबोधतात. म्हणूनच या अशा प्रकारची राजवंशवाचक नामाभिधाने सोडून देऊन भौगोलिक विभागवाचक नामाभिधानांचा अंगिकार केला पाहिजे. या दृष्टिकोनातून या कलेला इ. स. च्या सहाव्या शतकातील अपरान्त कला असे म्हणता येईल.

इ. स. च्या सहाव्या शतकातील बौद्ध आणि ब्राह्मणी या दोन्ही संप्रदायातील कलेचे व्यवच्छेदक लक्षण म्हणजे महाकाय देवमूर्ती आणि लेण्यांच्या संदर्भात महाकाय द्वारपाल होत. हे वैशिष्ट्य आधी उल्लेखिलेल्या सर्व केंद्रांमध्ये दिसून येते. घारापुरी, मंडपेश्वर व वेरूळ येथील लेणे क्र. २१ व २९ या पाशुपत लेण्यांमधील भिंतीवर शिवाच्या उग्र आणि कृपाळू स्वरूपांशी संबंधित असलेल्या महत्त्वाच्या घटना अथवा कथा दाखविणारे कथापरपट आहेत. घारापुरी येथील लेणे क्र. १ मध्ये लकुलीशाची तपश्चर्या, पार्वतीबरोबर द्यूतक्रिडा, रावणाला अनुग्रह देणारा शिव, अर्धनारी शिव, डोक्यावर गंगा धारण करणारा गंगाधर शिव, शिव-पार्वती विवाह, गजासुराचा व अंधकासुराचा वध करणारा शिव दाखविणारे भव्य पट आहेत. हे पट पवनार येथील वाकाटक कथापरपटांपेक्षा किंवा सहाव्या शतकातील वेरूळ आणि औरंगाबाद येथील बौद्ध लेण्यांमधील कथापरपटांपेक्षा खूपच भव्य व विस्तृत आहेत. या भव्यतेव्यतिरिक्त ह्या कथापरपटांचे शैलीच्या

दृष्टिकोनातून आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे या पटांमध्ये असलेले विविध उठाव होय. शिल्पकारांनी कथापरपटातील सर्वच मूर्तिशिल्पे एकाच पृष्ठभागावर किंवा पृष्ठभागाच्या एकाच पातळीवर घेतलेली नाहीत. परिणामतः दुय्यम दैवते किंवा व्यक्तिमत्वे कधीकधी आकाशात विहार करताना दाखविली आहेत. ही व्यक्तिमत्वे केवळ लहान मानवी मितीत (तलमान) आहेत; इतकेच नव्हे तर ती पटाच्या अधिक पुढच्या पृष्ठभागावर असून अर्धउठावात कोरली आहेत (उदा. मंडपेश्वर येथील लकुलीशपट किंवा वेरूळ येथील लेणे क्र. २९ मधील पट). याउलट मुख्य मूर्ती, विशेषतः घारापुरीच्या लेण्यातील मुख्य मूर्ती जवळपास पूर्ण उठावात कोरलेली आहे. आकाशात दाखविलेल्या विष्णू, ब्रह्मदेव, इंद्र किंवा दिक्पाल यासारख्या दुय्यम देवतांना पटावर अशा तऱ्हेने दाखविले आहे की, जेणेकरून संपूर्ण पटालाच खोली (depth) प्राप्त व्हावी. कथापरपटांमधील शिल्पांची रचना दोन टोकांच्या बाजूंचा समतोल साधेल अशाप्रकारे रचना सूचित करणारी आहे. हे वैशिष्ट्य पवनार येथील कथापरपटांपेक्षा एक पायरी वरचे आहे. कथापरपटांचा भाग म्हणून आलेल्या किंवा स्वतंत्रपणे असलेल्या महाकाय मूर्तींचा येथे आवर्जून उल्लेख केला पाहिजे. कान्हेरी येथील सातकर्णीच्या लेण्यातील उभा बुद्ध, मंडपेश्वर येथील नृत्य करणारा शिव आणि घारापुरी येथील लेणे क्र. १ मधील कथापरपटांमधील सर्व महाकाय मूर्ती अशाच वैशिष्टपूर्ण आहेत. या मूर्तीप्रकारातील एक असामान्य मूर्ती म्हणून अर्थातच तथाकथित त्रिमूर्तीचा किंवा महेशमूर्तीचा उल्लेख केला पाहिजे. तीन मुखे असलेल्या या अर्धपुतळ्याच्या केवळ भव्यतेमुळे आणि खोलीमुळेच नव्हे, तर या एकाच मूर्तीच्या तीन तोंडांवर दाखविलेली दैवी स्वरुपाची शांती, भयानक उग्रपणा आणि प्रेम या तीन अगदी वेगवेगळ्या भावांमुळे हे मूर्तिशिल्प अद्वितीय बनले आहे. या लेण्याचा नेमका काळ, ते कुणी खोदले, त्याचा आश्रयदाता कोण किंवा कोणाचा राजाश्रय होता याबाबत विद्वानांची मते काहीही असोत, पण त्यातील कथापरपट निव्वळ कथापरपट म्हणूनही अप्रतिम आणि श्रेष्ठच आहेत. विश्वामधील उत्कृष्ट आणि अभूतपूर्व शिल्पाकृतींमध्ये त्यांना स्थान आहे. अर्थातच या शिल्पाकृती भारताच्या अभिजात शिल्पकलेचे प्रतिनिधित्व करतात.

या काळातील अत्यंत आश्चर्यकारकपणे टिकून राहिलेली अपवादात्मक पुरावस्तू म्हणून तेर येथील उत्तरेश्वर मंदिराच्या दाराच्या लाकडी चौकटीचा येथे उल्लेख केलाच पाहिजे. ही चौकटही महाराष्ट्रातील सहाव्या शतकातील कलेचा अभिजातपणा अभिव्यक्त करते. नंतरच्या काळात प्रस्थापित झालेल्या शिल्पशास्त्रातील

संकेतांचा कोणताही प्रभाव नसलेल्या या चौकटीवर संपूर्ण पट असून त्यात आपल्या अनुचरांसमवेत असलेले देव दाखविले आहेत. या देवांमध्ये ब्रह्मा, विष्णू आणि महेशाची त्रिमूर्ती, लकुलीश आणि नागाच्या फण्याखाली असलेला योगी यांचा समावेश आहे. विविध ढंगाने बसलेल्या देवमूर्ती आणि नृत्य करणारे व वाद्ये वाजविणारे त्यांचे अनुचर यामुळे हा पट शिल्पकलेचा एक असामान्य नमुना बनला आहे.

## राष्ट्रकूट शिल्प

दुसऱ्या पुलकेशीने तो महाराष्ट्राच्या तीन भागांचा (कुंतल, अश्मक आणि विदर्भ) अधिपती असल्याचा दावा केला होता. त्याच्या पूर्वजांचे आणि वंशजांचेही ताम्रपट सापडले आहेत. या ताम्रपटांमध्ये जरी संपूर्ण दख्खनवर नाही तरी सध्याच्या महाराष्ट्राच्या काही भागांवर त्याचे राज्य असल्याचा उल्लेख आहे. या सर्व बाबी लक्षात घेता महाराष्ट्राच्या कलेतिहासात "चालुक्य" संबोधता येईल असा एक टप्पा असावा अशी आधीच्या विद्वानांची धारणा होती. वेरूळ आणि वेरूळच्या परिसरातील महत्त्वाच्या लेण्यांचे वर्गीकरण 'चालुक्य' ह्या सदरात करण्यात आले. किंबहुना त्याही पुढे जाऊन सौंदरराजन यांनी वेरूळ आणि त्या नजीकच्या परिसरातील लेण्यांबरोबरच घारापुरीची लेणीही चालुक्यांच्याच राजाश्रयाखाली खोदली गेली असा दावा केला आहे. अजिंठा येथील नंतरच्या काळातील लेणी आणि अगदी रंगचित्रेही चालुक्य काळातील आहेत अशी एकेकाळी विद्वानांची प्रामाणिक धारणा होती. तथापि महाराष्ट्राच्या मुख्य भूमीवर सकृतदर्शनी चालुक्यकालीन बांधीव वास्तूंचे कोणतेही अवशेष आढळून येत नाहीत. शिवाय चालुक्यांचे मांडलिकत्व स्वीकारण्यापूर्वीही वेरूळ येथील राष्ट्रकूट चांगलेच प्रस्थापित होते असे मानण्यास जागा आहे. राष्ट्रकूट वंशाच्या अन्य शाखा विदर्भ आणि दक्षिण महाराष्ट्रातही (कुंतल प्रांतात) होत्या. म्हणूनच इ. स. चे ७ वे शतक ते इ. स. चे १० वे शतक या कालखंडास "राष्ट्रकूट काळ" संबोधता येतो.

या प्रकरणाच्या प्रारंभी घेतलेल्या स्मारकांच्या (monuments) आढाव्यानुसार राष्ट्रकूट काळातील बांधीव वास्तूंचे अवशेष अगदीच नगण्य असून या काळातील बहुतांशी वास्तू लेण्याच्या स्वरूपातील आहेत. त्यामुळे केवळ वेरूळ येथील राष्ट्रकूट शिल्पांचाच आणि विशेषत्वाने दशावतार, कैलास आणि इंद्रसभा या लेण्यांमधील शिल्पांचा विचार करणेच क्रमप्राप्त आहे.

वेरूळ येथील लेणे क्र. १५ मधील एका पाखात दाखविलेल्या विष्णूच्या काही अवतारांमुळे ते दशावतार लेणे म्हणून प्रसिद्ध आहे. सुरुवातीला हे लेणे क्रमांक १२ व १३ च्या लेण्यांप्रमाणे बौद्ध मानले गेले होते. हे लेणे येथील ज्ञात राष्ट्रकूट वास्तूमध्ये सर्वाधिक प्राचीन असण्याची शक्यता आहे. या लेण्याच्या वरच्या मजल्यावरील वैशिष्ट्यपूर्ण रचनेमुळे बऱ्यापैकी मोठ्या आकाराच्या शिल्पपटांना वाव मिळाला असून उपलब्ध पृष्ठभागावर शैव आणि वैष्णव कथापरपट खोदण्यात आले आहेत. यातील सर्वात प्रभावी शिल्प यान-नरसिंहाचे असून या शिल्पात नरसिंह आणि हिरण्यार्कशिपूचे युद्ध दाखविण्यात आले आहे. हा विषय यापूर्वीही बांधीव चालुक्य मंदिरांमध्ये हाताळण्यात आला आहे. दशावतार लेण्यात नरसिंह आणि हिरण्यकशिपू यांचे द्वंद्वयुद्ध दाखविताना एकाचा उजवा तर दुसऱ्याचा डावा पाय एकमेकात गुंतलेल्या स्थितीत युद्ध करताना दाखविले आहे. हे गुंतलेले पाय कमळावर किंवा कमलरूपी पदस्थलावर दाखविण्यात आले आहेत. अत्यंत उग्र भाव असलेला आणि शंख, चक्र, गदा ही आयुधे धारण करणारा नरसिंह अर्थातच वरचढ आहे. तो इतक्या प्रचंड आवेशात पुढे सरकला आहे की, हिरण्यकशिपूला स्वतःचा बचाव करत मागे झुकावे लागले आहे. या शिल्पात शिल्पकाराने हिरण्यकशिपूचा तलवार घेतलेला हात नरसिंहाने धरलेला दाखवून व दुसरा हात दैत्याच्या दंडावर दाखवून हिरण्यकशिपूचा पराभव सूचित केला आहे. हिरण्यकशिपूने बचावात्मक पवित्रा घेतल्याने त्याच्या उजव्या हातातील ढालीचा आतील भाग स्पष्टपणे दिसून येतो. ही ढाल प्रभावळीसारखी शोभते. देखाव्याची एकंदरीत खोली, एकमेकात गुंतलेल्या दोन दोन अंतर्वक्रांप्रमाणे असलेली नरसिंह व हिरण्यकशिपूची शरीरे, कमलपदस्थलाची योजना आणि दोघांचे एकमेकांत गुंतलेले पाय या बाबी शिल्पकाराची उच्च कल्पनाशक्ती आणि कसब दाखवून देतात. या सर्व गुणांमुळेच या शिल्पाची गणना महाराष्ट्रातील उत्कृष्ट शिल्पांमध्ये होते.

काहीशा यानंतरच्या काळातील शिल्पकला कैलास आणि त्याच्या परिसरात दृष्टीस येत असून येथे विविध प्रकारची आणि अनेक वैशिष्ट्ये असलेली शिल्पे आढळतात. तीन बाजूंच्या तीन मार्गिकांमध्ये दशावताराचे पट आहेत. मंडपाच्या बाजूच्या भिंतीमध्ये नांगरटीच्या (boustro phedon)* रचनेत रामायणातील

---

*पहिल्या ओळीत डावीकडून उजवीकडे तर त्याखालील ओळीत उजवीकडून डावीकडे अशा प्रकारे केलेल्या लिखाणाला बाउस्ट्रो फेडॉन रचना म्हणतात. उपरोक्त संदर्भात शिल्पपटांचा क्रम अशा प्रकारचा आहे.

दृश्ये कोरण्यात आली आहेत. मंदिराच्या बाह्यांगावर आणि प्राकारभिंतींच्या आतील भागावर कथापरशिल्पपट आहेत. या मंदिराच्या आवारात देवाचा ध्वज, त्रिशूळ व वर्तुळाकारात कोरलेले हत्ती असे एकाश्मक घटकही आहेत. वेदीभागावर शृंगारिक दृश्याचे पट आहे. स्वतंत्र शिल्प आणि शिल्पाकृतींचा समूह यज्ञशाळेप्रमाणेच तीन नद्यांच्या मंदिरातही आढळतो. ज्या शिल्पकाराने किंवा शिल्पकारांच्या गटाने कैलास लेणे इतक्या वैविध्यपूर्ण शिल्पाकृतींनी अलंकृत केले ते शिल्पकार खरोखरच भारतातील उत्कृष्ट शिल्पकार असले पाहिजेत. लक्ष्मी, महिषासुरमर्दिनी, सप्तमातृका, दक्षिणामूर्ती शिव, गजासुरसंहार शिव या मूर्ती व जटायु-रावण युद्धाचा कथापरपट इत्यादी शिल्पे व शिल्पपट राष्ट्रकूट कलेचे उत्तम नमुने म्हणून गणता येतील. कथापरपटांमधील सर्वाधिक उल्लेखनीय पट म्हणजे कैलास लयनसंकुलातील बाजूच्या मंडपाखाली असलेला रावणानुग्रहमूर्ती पट. या पटाच्या खोलीमुळे या पटातील प्रधान किंवा मुख्य व्यक्तिरेखा जवळपास पूर्ण उठावात, तर त्याहून कमी महत्त्व असलेल्या व्यक्तिरेखा त्यांच्या महत्त्वानुसार अर्धउठावात किंवा त्याहूनही कमी उठावात किंवा क्वचितप्रसंगी केवळ बाह्यरेषेच्या स्वरूपात दाखविल्या आहेत. या शिल्पपटात वीस हात असलेला बलशाली रावण कैलास पर्वत उपटून टाकण्याचा प्रयत्न करताना दाखविला आहे. ज्याच्या मार्गात या पर्वताचा अडथळा आल्यामुळे रावण या उद्योगाला लागला ते त्याचे विमान वरच्या अर्ध्या भागात दाखविले आहे. या विमानासमोरच शिवाची शांत प्रतिमा दाखविली आहे. पटाचा खोल गेलेला पृष्ठभाग संपून अधिक पुढे आलेल्या पृष्ठभागाला सुरुवात होते त्या भागात गंधर्व, दिक्पाल आणि ऋषी अर्धउठावात दाखविले आहेत. ज्यांवर हे स्वर्गीय विद्याधर गंधर्व घोंगावत आहेत ते शिवानजीकचे प्रतिहारही चांगल्याच ठळक उठावात कोरले असल्यामुळे दर्शकाचे लक्ष पटाच्या मध्यभागाकडे वेधते. शिव आणि रावण यांच्यामध्ये घाबरलेले प्रमथ दाखविले आहेत. हे प्रमथ धोका टाळण्यासाठी डोंगरउतारावरील शिळा रावणावर फेकत आहेत. डाव्या बाजूला असलेली माकडे इतकी भयभीत झाली आहेत की, ती मगरीवर जाऊन बसली आहेत. भयभीत झालेल्या पार्वतीने शिवाला आलिंगन दिले आहे, तर पार्वतीच्या दासीने आपल्या मालकिणीची सेवा करण्याऐवजी तेथून पळून जाणे पसंत केले आहे. एकंदरीत शिल्पपटातील देखाव्याची मांडणी, त्यातील भूमिसमांतर आणि पटाच्या निरनिराळ्या खोलीनुसार पडलेले पृष्ठभागाचे स्तर यामुळे हा कथापरपट दर्शकाच्या मनावर इतका खोलवर ठसा उमटवून जातो की, लगेच त्याला अनुग्रहमूर्तींची सुभाषिते आठवतात. शिवाने रावणावर जो अनुग्रह केला तो रावणाचा हात

कैलासाखाली सापडल्यावर त्याने केलेल्या स्तुतीमुळे नव्हे, तर कैलास हलवण्याच्या रावणाच्या कृतीचा अनुषंगिक परिणाम म्हणून पार्वतीने शिवाला जी मिठी मारली त्यामुळे केला असेच जणू या शिल्पकाराला सुचवायचे आहे. संस्कृत साहित्यातील काव्यशास्त्राचा व सौंदर्यशास्त्राचा जो उत्तरोत्तर विकास झाला तोही या कथापरपटात प्रतिबिंबित होतो. एखादी साहित्यकृती केवळ चांगल्या विषयाच्या निवडीमुळे किंवा समर्पक शब्दयोजनेमुळे (गुण आणि अलंकारामुळे किंवा त्यातील काव्याच्या ध्वनीमुळे) श्रेष्ठ ठरत नाही, तर भावनोत्कटतेची संतुलित रचना करून त्यातील मुख्य रस दर्दी रसिकापर्यंत हळुवारपणे पोहोचविण्याच्या कौशल्यामुळे ठरते. या शिल्पपटात एकीकडे शिवाच्या मनाची निश्चलता आणि सामर्थ्य, तर दुसरीकडे रावणाच्या कैलास हलविण्यामुळे प्राणिजगतात आणि शिवगणांमध्ये उडालेल्या कोलाहलामुळे जास्तच उठावदार झालेला रावणाचा उद्धटपणा, रग आणि आडदांडपणा, वैश्विक कर्तव्ये पार पाडणारे द्विक्पाल आणि शिवभक्त यांच्या मनात शिवाच्या थोरवीमुळे उत्पन्न झालेला त्याच्याबद्दलचा भक्तिभाव इत्यादी बाबींमुळे संस्कृत काव्यशास्त्रानुसार या शिल्पपटात 'नर्म शृंगार' निर्माण झाला आहे.

शिल्पविकासाचे यापुढील टप्प्याचे नमुने वेरूळ येथील जैन लेण्यांमध्ये आढळतात. वेरूळ येथील काहीशा नंतरच्या काळातील शिल्पांमध्ये मानवी रूप दाखविण्याची एक वेगळीच धाटणी उदयाला येताना आढळते. लेण्यांच्या पहिल्या मजल्यावरील कथापरपट आणि नद्यांच्या मंदिरातील तीन नद्यांच्या मूर्ती, वैशिष्ट्यपूर्ण आहेत. यातील यमुनेची मूर्ती आज जरी धूप झालेल्या आणि मोडतोड झालेल्या स्थितीत असली तरी ती तत्कालीन स्त्रीसौंदर्याचा आदर्श अभिव्यक्त करणाऱ्या सर्वोत्कृष्ट मूर्तींपैकी एक आहे. ही स्त्रीरूपातील यमुना पूर्ण उमललेल्या कमळात त्रिभंग स्थितीत हात कमरेवर ठेऊन उभी आहे. ही मूर्ती एका देवकोष्ठात आहे. या देवकोष्ठाला बारीक किंवा सडपातळ अर्धस्तंभ असून त्यावर मकर असे दाखविले आहेत की, जणू त्यांच्या मुखातून रत्नांची कमानच बाहेर पडली आहे. ही देवी कटीवर हात ठेवून उभी असून तिच्या हातात कमळाची वेल आहे. ह्या वेलीच्या वळणांमुळे एकात एक वर्तुळांसारखी पार्श्वभूमी ह्या देवकोष्ठाला प्राप्त झाली आहे. या देवतेने अर्धे-वस्त्र नेसलेले असून तिने मुकुट, वैकक्षक कंठी, पैंजण आणि मेखला इत्यादी दागिने धारण केलेले आहेत. येथे शिल्पकाराने मानवी स्वरूपावर अधिक भर दिला आहे. या मूर्तीच्या समोच्च रेषा अगदी प्रभावीपणे वरखाली झाल्या असल्यामुळे त्यात सडपातळ स्त्रीस्वरूपाचा टवटवीतपणा आणि दृढता अभिव्यक्त झाली आहे.

अशाच स्वरूपाची अभिव्यक्ती आज जी मूर्ती इंद्राणी या नावाने ओळखली जाते त्या अंबिकेच्या मूर्तीतही आढळते. ही मूर्ती त्याच लेण्यात वरच्या मजल्यावरील व्हरांड्यात आहे. ही देवी तिच्या वाहनावर म्हणजे सिंहावर बसली असून तिच्यासमवेत स्त्री-पुरुष अनुचर व आंब्याच्या झाडाखाली छत्र धारण करणार पुरोहित आहे.ही मूर्ती जणू स्त्रीच्या पावित्र्याचे आणि आकर्षकतेचे प्रतीक आहे ह्या देवीच्या अंगावरही यमुनेप्रमाणेच अगदी थोडे दागिने आहेत. तिचे खालचे वस्त्र मेखलेत बांधले गेले असून मेखलेवर जाल अलंकरण आहे. वरचे वस्त्रही कमरेला बांधण्यात आले आहे. या देवीने मुकुट घातला असून मुकुटाच्या ललाटावर बसलेला तीर्थंकर दाखविला आहे. तिच्या अंगावर कर्णभूषणे, कंठी, वाक्या, वैकक्षक आणि पैंजण असे दागिने आहेत. येथे वडाच्या झाडाखाली हत्तीवर बसलेल्या सर्वानुभूती यक्षाची मूर्ती आहे. या मूर्तीवर तीर्थंकरांच्या आणि विशेषतः पार्श्वनाथ व बाहुबलीच्या शरीरावर जी जैन परंपरेतील महापुरुष लक्षणे आढळतात ती दाखविलेली असली तरीही ही मूर्ती आदर्श पुरुषमूर्ती म्हणता येणार नाही. तथापि ही यक्षमूर्तीमधील एक उत्कृष्ट मूर्ती आहे. तीर्थंकरांच्या उभ्या आणि बसलेल्या मूर्ती नग्नावस्थेत असल्या तरी त्यातील अंतर्मुखतेमुळे आणि तुरीयतेमुळे वेरूळ येथे आढळणाऱ्या आणि एकंदरीतच जैन मूर्तीमधील सर्वोत्कृष्ट मूर्ती आहेत असे म्हणता येईल. या उंच सडपातळ मूर्तींची भरदार छाती, शक्तिशाली बाहू, आणि वैयक्तिक अवयव दाखविताना वास्तवाशी घेतलेली फारकत, म्हणजेच निराळ्या शब्दात, मानवी स्वरूप आदर्शवादी पद्धतीने अभिव्यक्त करण्याची पद्धती यामुळे या मूर्ती खूप प्रभावी आणि मनोवेधक बनल्या आहेत.

## इ. स. ११ ते १४ व्या शतकाच्या पूर्वकाळातील शिल्पे :

इ. स. चे ६ वे शतक ते इ. स. चे ११ वे शतक या काळातील आज शिल्लक असलेल्या स्थापत्यात प्रामुख्याने लयनस्थापत्यच आढळते. तथापि या भागात ज्या कालखंडातील स्थापत्याचा आढावा घ्यावयाचा आहे त्यांत लयनस्थापत्य आणि बांधीव मंदिरस्थापत्य या दोन प्रकारच्या स्थापत्यांचा अंतर्भाव होतो. शैलगृह स्थापत्य बांधीव स्थापत्याची नक्कल असली तरी त्यास स्वतःचे असे सौंदर्यशास्त्र असल्याने ते समकालीन बांधीव स्थापत्यापेक्षा निराळे बनले आणि त्याचा स्वतंत्र विकास आणि उत्क्रांती घडून आली असे यापूर्वी निराळया संदर्भात वर्णन केले आहे. तथापि असे असूनही शैलगृहस्थापत्यातील शिल्पांचा मात्र कोणताही स्वतंत्र विकास आणि उत्क्रांती घडून आली नाही. लयनस्थापत्यातील शिल्पे समकालीन बांधीव

थापत्यातील शिल्पांसारखीच राहिली. कंधारमध्ये आढळलेल्या राष्ट्रकूट शिल्पांनी नाणि विशेषतः कंधारप्रमाणेच अमडापूर (तालुका मलकापूर, जिल्हा बुलढाणा) नाणि इतर ठिकाणी आढळलेल्या क्षेत्रपालांच्या अवाढव्य मूर्त्यांनी ही बाब सिद्ध केली नाहे. क्षेत्रपालांच्या या मूर्ती खुल्या वातावरणात उताण्या ठेवण्यासाठीच ही शेल्पशैली निर्माण केली असण्याची शक्यता आहे. या मूर्तीची शिल्पशैली कंधार रथे आढळलेल्या सुट्या मूर्तीप्रमाणेच बुद्ध, तीर्थंकर आणि महिषासुरमर्दिनीची रूर्ती) वेरूळ येथील उत्तर राष्ट्रकूट शिल्पशैलीसारखीच आहे.

इ. स. चे ११ वे शतक ते इ. स. च्या १४ व्या शतकाचा सुरुवातीचा काळ या कालखंडातील शिल्पांची स्थिती निराळी आहे. या काळातील खानदेश, नाशिक आणि पश्चिम विदर्भ या भागातील शिल्पे पूर्व विदर्भातील (यादवकाळातील नाडीमंडळ) शिल्पांपेक्षा भिन्न आहेत. त्याचप्रमाणे सर्वसाधारणपणे मराठवाड्यातील आणि विशेषतः लातूर आणि नांदेड येथील आणि दक्षिण महाराष्ट्रातील, विशेषतः नध्याच्या सांगली, सातारा आणि कोल्हापूर येथील (प्राचीन कुंतलातील) शिल्पे आधी वर्णिलेल्या प्रांतापेक्षा निराळी आहेत. खुद्द कोकणामध्ये (प्राचीन अपरान्तामध्ये) दक्षिण कोकणातील शिल्पे उत्तर कोकणातील शिल्पांपेक्षा, विशेषतः ठाणे परिसरातील शिल्पांपेक्षा निराळी आहेत. विविध प्रांतातील स्थपतींची स्वतःची अशी शिल्पशैली असलेल्या स्थापत्यप्रकाराची आवड हेच या भिन्नतेचे कारण आहे. आपण आधीच पहिल्याप्रमाणे उत्तर कोकण, नाशिक, खानदेश वऱ्हाड या भागातील स्थापत्य व शिल्पांचे दक्षिण गुजरात (लाट प्रांत) आणि माळवा भागात विकसित झालेल्या स्थापत्य व शिल्पाशी साधर्म्य आहे. त्याचप्रमाणे पूर्व विदर्भातील मंदिर शैलीचे त्यानजीक असलेल्या मध्यप्रदेशातील मंदिरशैलीशी साधर्म्य आहे. तर दक्षिण मराठवाड्यातील मंदिरांचे तत्कालीन कर्नाटकातील मंदिरांशी साधर्म्य आहे. सांगली सातारा आणि कोल्हापूर जिल्ह्यातील शिल्पांचे थोड्याफार फरकाने का होईना, पण कर्नाटकातील लगतच्या भागातील शिल्पांशी साधर्म्य आहे. निराळ्या शब्दात सांगायचे तर, यादवांच्या ताब्यातील विशाल भूप्रदेशातील शिल्प सोळंकी, कलचुरी आणि उत्तरचालुक्य शिल्पशैलीशी साधर्म्य दाखविते. उत्तर महाराष्ट्रातील शिलाहार शिल्पशैलीचे सोळंकींच्या राज्यातील शिल्पशैलीशी साधर्म्य आहे, तर दक्षिणेतील शिलाहारांच्या अमलाखाली असलेल्या कोल्हापूर वगैरे भागातील शिल्पशैलीचे उत्तरचालुक्य आणि होयसळ शैलीशी साधर्म्य आहे.

वर वर्णन केलेल्या साधर्म्यांमुळे या वेगवेगळया भूप्रदेशात अलंकरणात्मक शिल्पांमध्ये निरनिराळया संकल्पना आढळतात. उदा. दक्षिण गुजरातमधील मंदिरांशी साधर्म्य दाखविणाऱ्या उत्तर कोकण व खानदेश प्रांतातील या मंदिरांच्या पीठावर, जंघेवर, छतांवर आणि द्वारांवर वैशिष्ट्यपूर्ण थर आणि शिल्पप्रकार आढळतात. अशाच शिल्पप्रकारांमध्ये नेहमीच्या थरांव्यतिरिक्त नरथर, गजथर, अश्वथर आणि ग्रासपटी हे थर अलंकरणात्मक पटाप्रमाणे आलेले आढळतात. त्याचप्रमाणे कक्षासनावर कठड्याची नक्षी आणि चौकटीतील मूर्तिशिल्पे (empanelled figures) आढळतात. त्याखाली असलेल्या वामन भिंतीवर म्हणजेच वेदिकेवर सुरसुंदरींची शिल्प असून ही शिल्पे आणि कूटस्तंभ अथवा मंजरी आलटून पालटून येतात. हे कूटस्तंभ किंवा मंजरीचे प्रयोजन गर्भगृहाच्या आणि मंडपाच्या जंघेवरही अलंकरणात्मक प्रयोजन म्हणून येते. किंबहुना प्रासादमंडनासारख्या नंतरच्या शिल्पसंहितेमध्ये जंघांचे नागर, द्राविडी, लाटी आणि वाराटी असे चार प्रकार वर्णिलेले आहेत. द्राविडी जंघेवर मंजरी येतात, लाटी जंघेवर निर्गमांच्या दोन बाजूंवर स्त्रीमूर्ती (नारीयुग्मे) येतात, तर वाराटी जंघेवर पानांची नक्षी (पत्रबहुला) येते. वर कमानसदृश अलंकरण किंवा शिखरे असलेल्या देवकोष्ठांमध्ये देवदेवतांच्या मूर्ती दाखविणे ही तर सर्वसामान्य संकल्पना होती. या देवकोष्ठांवरील कमानी प्रतीकात्मक शिखरे होत्या व त्या देवकोष्टांप्रमाणेच बाह्यांगाच्या जंघा पातळीवर नक्षीच्या स्वरूपातही आढळतात. ह्या कमानी (किंवा प्रतीकात्मक शिखरे) कुंभ थरावर तवंगांच्या स्वरूपात, उत्तरांगावर रथिकेच्या स्वरूपात आणि अगदी सुस्पष्टपणे आणि तपशीलवारपणे शुकनासेवर आणि शुकनासांच्या दोन बाजूंवर येऊ शकतात. विविध प्रकारची अलंकरणात्मक प्रयोजने आढळण्याचे दुसरे ठिकाण म्हणजे द्वारे. कमळाच्या पाकळया, मरकतमाणिक्य, पद्मकलिका, पद्मलता, व्याल, वादक, उडणारे गंधर्व आणि कधीकधी योद्धे अशी अनेक अलंकरणे आढळतात. या सर्व प्रयोजनांना प्रतीकात्मक महत्त्व असल्यामुळे ती बहुधा द्वारशाखांवर आढळतात. स्थपतीला काही नवीन प्रयोजने उपयोगात आणण्याचे स्वातंत्र्य होते. याचा उत्तम पुरावा म्हणजे आंबेजोगाई येथील खोलेश्वर मंदिर. हे मंदिर एका विख्यात योद्धयाच्या स्मृतिप्रीत्यर्थ बांधण्यात आले होते. यातील एका द्वारशाखेवर योद्धयांचा पट आहे. या प्रकारात द्वाराच्या उंबरठ्यावर बहुधा कीर्तिमुख व त्यासमोर चंद्रशिला असते. कधीकधी हे उंबरठे तपशीलवार कोरलेले असून त्यावर शंख आणि पूर्ण उमललेली कमळे दाखविलेली असतात. छतांचेही विविध प्रकार आहेत. हे प्रकार अर्थातच लाकडी छतांची नक्कल आहेत.

तथापि या छतांवर विविध प्रकारची अर्ध-उठावातील, खोलीतील, किंवा छतातून पुन्हा खाली आलेल्या घटकांची अलंकरणे आहेत. यांना अनुक्रमे क्षिप्त, उत्क्षिप्त (छताच्या पातळीपेक्षाही अधिक वर गेलेला पृष्ठभाग) आणि असे दोन्ही प्रकार ज्या एकाच छतात सामावले आहेत ते "क्षिप्तोत्क्षिप्त" अशा संज्ञा आहेत. पश्चिम भारतातील मंदिरांमध्ये अत्यंत गुंतागुंतीची अलंकृत घुमटाकार छते आढळतात. या छतांमध्ये उत्तरोत्तर परीघ कमी होत जाणाऱ्या भूमिसमांतर थरांमध्ये निरनिराळे अलंकरणाचे प्रकार आढळतात. हे प्रकार बहुधा लाटेप्रमाणे वर खाली होणाऱ्या पाकळयांची नक्षी (कर्णदर्दरिका) या स्वरूपाचे होते. कधीकधी त्यात गजतालू प्रयोजने तर कधी कीर्तिमुखे आढळतात. या उत्तरोत्तर परीघ कमी होत जाणाऱ्या वर्तुळाकार स्तरांच्या सर्वात वर छतातून किंचित खाली आलेली कमलकलिका आणि घुमटाच्या मध्यातून बाहेर पडल्यासारख्या वाटणाऱ्या वादकांच्या मूर्ती आढळतात. काही सपाट छतांवर (समतलवितान) पूर्ण उमललेल्या कमळाचे अलंकरण, तर देवळाणे किंवा वाघळी येथील मंदिरांप्रमाणे नागांबरोबर किंवा गोपींबरोबर असलेला कृष्ण दाखविण्यात आला आहे.

कधीकधी गूढमंडपाच्या बाह्यांगावर जालवातायनाचे किंवा जालकर्माचे अलंकरण आढळते. तथापि अगदी सर्वसामान्यपणे आढळणारे, विशेषत: नंतरच्या काळातील मंदिरांवर आढळणारे प्रयोजन म्हणजे ग्रासपट्टी किंवा माणिक्यपट. हे पट उभे किंवा भूमिसमांतर अशा दोन्ही प्रकारे आढळतात. कधीकधी अशा भूमिसमांतर पटाला लागून मरकतमाणिक्यपट आढळतो.

**उत्तरचालुक्य शिल्प** : सिन्नरचे आयेश्वर मंदिर उत्तरचालुक्य शिल्पाचा उत्तम नमुना असून त्यातील गर्भगृहाच्या द्वाराच्या उत्तरांगावर मूर्तिशिल्प आढळते.

अंतराळाच्या छतावर अष्टदिक्पाल दाखविले आहेत. मंडपाच्या बहुकोनी स्तंभांच्या खालच्या भागावर नर्तकांची मूर्तिशिल्पे आहेत. अंतराळाचा प्रवेशमार्ग असलेल्या मधल्या दोन स्तंभांवरील कमान सर्वाधिक उल्लेखनीय असून तिच्या मधल्या अर्धवर्तुळात नृत्य करीत असलेला शिव, त्याच्यासोबत पार्वती व वादक दाखविलेले आहेत. या मूर्तींची झीज झालेली असली तरीही शिल्पीचे कौशल्य आणि एकंदरीत रचना (composition) सहजगत्या लक्षात येऊ शकेल इतपत अवशेष शिल्लक आहेत. मुख्य शिवाचे शिल्प आणि त्यासोबत असलेली शिल्पे एकमेकांशी समांतर आहेत. नृत्य करणाऱ्या शिवाचा आकार ढोबळमानाने स्वस्तिकासारखा

असून त्याचे डावीकडे कललेले शरीर किंवा शरीराचा वरचा भाग, तोल सावरण्यासाठी त्याचे डावीकडेच कललेले डोके, अनेक हातांच्या बाह्यरेषांमुळे अग्निज्वाळांसारखा भासणारा त्याचा एकंदरीत आकार, त्याच्या नृत्याला प्रतिसाद देणारा डावीकडील ढोलवादक व उजवीकडील पार्वती या सर्व बाबींमुळे अर्धवर्तुळाकृती देवकोष्टात आणखी एक अर्धवर्तुळ तयार झाले आहे. या अर्धवर्तुळाकृती भागाभोवती मगरींच्या तोंडातून बाहेर पडलेला हारांसारखा भाग आहे. यात तीन पट आहेत. यातील सर्वात आतील पटात वर्तुळाकृती कोंदणात किन्नर आणि गंधर्व दाखविले आहेत. दुसऱ्या पटात एकमेकांच्या हातात हात गुंफून नाचणाऱ्या गणांची ओळ आहे. तिसरा पट अधिक अलंकरणात्मक असून त्यात कमळावर किंवा कमलदलावर बसलेले हंस आणि मगरींच्या तोंडातून बाहेर पडणारी रत्नांची माळ दाखविली आहे. हे शेवटचे प्रयोजन अगदी वाकाटक कालापासून उपयोजलेले आढळते. रचनात्मकदृष्ट्या (compositionwise) हे शिल्प अद्वितीय आहे. मगरींच्या तोंडातून बाहेर पडणारे अर्धवर्तुळाकृती पट ज्वाळांसारख्या पण अगदी नाजुकपणे कोरलेल्या मगरींच्या शेपटांच्या बाह्यरेषांमध्ये मिसळले गेले आहेत. जसजसे मधल्या भागाकडे जावे तसतसे अधिकाधिक खोल उठावात कोरलेला हा लोभस पट प्रेक्षकाचे लक्ष मधल्या भागाकडे म्हणजे नृत्य करणाऱ्या शंकराच्या अर्धवर्तुळाकृती देवकोष्ठसदृश उपपटाकडे खेचून घेतो.

उत्तरचालुक्य कलेचे इ. स. च्या ११ व्या शतकातील टप्पे नांदेड, लातूर व उस्मानाबाद या दक्षिण मराठवाड्यातीत जिल्ह्यांमध्ये दिसून येतात. या भागातील मंदिरे स्थापत्यदृष्ट्या उत्तर कर्नाटकातील मंदिरांशी मिळतीजुळती आहेत. त्यातील आकृतिशिल्पे स्तंभाच्या खांबांवर आणि मंडोवरावर, वास्तवाकाराहूनही मोठ्या असलेल्या महाकाय प्रतिहारमूर्ती गर्भगृहाच्या द्वाराच्या दुतर्फा आणि मूर्तिशिल्पे मंडपाच्या किंवा गर्भगृहाच्या बाह्यांगाच्या जंघा भागावर आढळतात. तुलापट व खांब यांना जोडणारी मूर्तिशिल्पेही (strut figures) या मंदिरांमध्ये आढळतात.

या कलापरंपरेतील मनुष्याकृतिशिल्पे चांगलीच गुबगुबीत आणि मांसल आहेत. शरीरावयवांचा गुबगुबीतपणा इतका भरीव आहे की, शरीराचा सांगाडा सूचित करणारे अस्थिसंगत स्नायू आणि हाडांचा भाग या मांसल भागाखाली पुरेपुर झाकला गेला आहे. परिणामतः गुडघ्याचा भागही किंचित निमुळत्या फुगवट्याद्वारे दाखविण्यात आला आहे. गोलाकार आणि हनुवटी पुढे आलेल्या चेहऱ्यावरील डोळे, नाक आणि तोंडाचीही तीच गत आहे. फक्त बाहेर आलेले ओठ, नाकाचा शेंडा

आणि भरगच्च भुवयांखाली असलेले डोळेच काय ते दिसतात. स्त्रियांच्या बाबतीत त्यांचे स्तन व नितंबभाग फुगीर झालेला आढळतो. हस्तावरील मूर्तीमध्ये शालभंजिकांचा आणि आम्रभंजिकांचा समावेश होतो. या मूर्ती होयसळ मूर्तिशिल्पांशी साधर्म्य दाखवित असल्या तरी त्या होयसळ मूर्तिशिल्पांइतक्या मोहक नाहीत. मंदिराच्या बाह्यांगावरील जंघा भागावर दाखविलेल्या अप्सरा आणि नायिका होयसळ काळातील मदनिकांशी साधर्म्य दाखवितात. या मूर्तींमध्ये वाद्य वाजविणारी स्त्री, पक्षी व माकडांबरोबर खेळणाऱ्या स्त्रिया, प्रेमपत्र लिहिणारी स्त्री इत्यादी मूर्तिशिल्पांचा समावेश होतो. या संदर्भात आणखी एक निरीक्षण येथे नमूद करणे आवशिक आहे की, देव-देवतांच्या मूर्ती अर्धस्तंभसदृश निर्गमांवर येतात, तर कमी महत्त्वाच्या देवता, नायिका आणि मदनिका सलिलांतरावर येतात.

धर्मपुरी येथील केदारेश्वर मंदिरातील वामन आणि बली, राक्षसाला मारणारा विष्णू हे कथापरपट आणि मिथुनादि शिल्पे उत्तरचालुक्य शिल्पशैलीचे व्यवच्छेदक नमुने आहेत.

## शिलाहार शिल्प

शिलाहार राजवंशाच्या एकूण तीन शाखा होत्या व त्यांनी कोकणपटी, दक्षिण महाराष्ट्रातील सातारा, सांगली, कोल्हापूर, सोलापूर हे जिल्हे आणि उत्तर कर्नाटकातील सध्याचा बेळगाव जिल्हा या भूभागावर राज्य केले. बांधीव मंदिरांचा आणि पन्हाळेकाझी येथील लेण्यांचा विचार करता ठाण्याहून राज्य करणाऱ्या उत्तरेकडील शिलाहारांचे स्थापत्य आणि दक्षिण कोकणात बलिपटणहून (सध्याचे खारेपाटण) राज्य करणाऱ्या शिलाहारांचे स्थापत्य दक्षिण गुजरातमधील स्थापत्याशी मिळतेजुळते आहे, तर पन्हाळ्याहून (जि. कोल्हापूर) राज्य करणाऱ्या शिलाहारांचे स्थापत्य उत्तरचालुक्यांच्या आणि होयसळांच्या स्थापत्याशी मिळतेजुळते आहे. अगदी सोदाहरण स्पष्ट करायचे, तर अंबरनाथ येथील मंदिर आणि पन्हाळेकाझी येथील काही लेणी यादव आणि सोळंकी स्थापत्याशी साधर्म्य दाखवितात. कोल्हापूर येथील टाऊन हॉल वस्तुसंग्रहालयात वेसर प्रकारची दोन छोटी शिखरे प्रदर्शित करण्यात आली आहेत. कोकणातील शिल्पांचे दक्षिण गुजरातमधील शिल्पांशी साधर्म्य आहे, तर दक्षिण महाराष्ट्रातील शिलाहार शिल्पांचे उत्तर कर्नाटकातील म्हणजेच उत्तरचालुक्य व होयसळ शिल्पांशी साधर्म्य आहे. कोकणपटीतील शिलाहार शिल्पांचे उत्तर महाराष्ट्रातील आणि दक्षिण गुजरातमधील शिल्पांशी प्रचंड साधर्म्य असल्यामुळे त्यांचे निराळे विवेचन करण्याची आवश्यकता नाही.

याचा अर्थ असा नाही की, या भागात शिलाहार शिल्पशैलीचा स्वतःचा असा स्वतंत्र विकास झालाच नाही. यातीलही काही शिल्पांमध्ये काही स्वतंत्र वैशिष्ट्ये विकसित झालेली आढळतात. उत्तर कोकणातील शिलाहारकालीन शिल्पांचे उत्तम नमुने म्हणजे ठाणे जिल्ह्यात सापडलेल्या ब्रह्मदेवाच्या दोन मूर्ती. यातील एक मूर्ती सोपाऱ्याजवळील निर्मल येथे आढळली तर दुसरी मूर्ती खुद्द ठाणे शहरातील मासुंदा तलावात गाळ उपसण्याचे काम चालू असताना सापडली. पहिली मूर्ती वास्तवाकाराहूनही मोठी म्हणजे महाकाय स्वरूपाची असून ती सरळ उभी (समपाद स्थितीत) आहे. तिच्यासमवेत दोन लहान आकाराच्या शक्ती दाखविल्या आहेत. ब्रह्मदेवाच्या पायाशी दोन हंस दाखविले आहेत. ही मूर्ती आणि नजिकच्या गावामध्ये आढळलेल्या दोन लहान आकाराच्या ब्रह्मदेवाच्या मूर्ती (या मूर्ती आधी वर्णिलेल्या महाकाय मूर्तीच्या तुलनेत लहान असल्या तरी याही वास्तवाकारच आहेत) १२ व्या शतकातील पश्चिम भारतीय शिल्पांचे उत्तम नमुने आहेत. ब्रह्मदेवाच्या या तिन्ही मूर्ती बसाल्टच्या आहेत. मात्र ठाणे शहरातील मासुंदा तलावात आढळलेली मूर्ती अग्निजन्य किंवा ज्वालामुखीच्या दगडात घडविलेली आहे. हा दगड अग्निजन्य असला तरी हिरवट निळया रंगाचा व मऊ आहे. ही काहीशी वास्तवाकार ब्रह्मदेवाची मूर्ती इतर मूर्तीपेक्षा वेगळी, म्हणजे पूर्णतः सुटी व पूर्ण उठावातील आहे. ब्रह्माचे मागच्या बाजूचे तोंड भक्तांसमोर किंवा प्रेक्षकांसमोर येत नसल्यामुळे काहीसे ओबडधोबड व अपरिपक्व आहे. या शिल्पाची वस्त्रे व आभूषणेच इतर शिल्पांहून वेगळी आहेत असे नाही तर त्यात घडविलेले मानवी स्वरूपही वेगळे आहे. या खडकाचा मऊपणा आणि शिल्पकाराचे कौशल्य या कारणांमुळे शरीराच्या विविध भागांचे व अवयवांचे पृष्ठभाग अगदी नितळ असून त्याच्या बाह्यरेषा किंवा पृष्ठभाग एकमेकात अगदी बेमालूमपणे विलिन झाला आहे. तथापि या मूर्तीचे अलंकार मात्र व्यवच्छेदकपणे नक्षीदार आहेत.

दक्षिण शिलाहार कलेची अनेक केंद्रे आहेत. कोल्हापूर आणि खिद्रापूर ही त्यातील महत्त्वाची केंद्रे होत. कोल्हापूरमध्ये शिलाहार स्थापत्यशैलीची सुमारे बारा ते तेरा मंदिरे असून त्यापैकी महालक्ष्मी मंदिर, मंगळवार पेठेतील महादेव मंदिर आणि मानस्तंभ बसती ही मंदिरे अत्यंत उल्लेखनीय आहेत. खिद्रापूरमधील दोन मंदिरेही याच प्रकारात मोडतात. तथापि सोयीकरीता आपण आपले विवेचन कोल्हापूर येथील महालक्ष्मी मंदिर संकुल आणि खिद्रापूर येथील कोप्पेश्वर मंदिर एवढ्यापुरतेच

सीमित ठेवणार आहोत. महालक्ष्मी मंदिराच्या बाह्यांगावरील शिल्पांची एकेकाळी फारच हिंसकपणे तोडफोड झाली होती. गर्भगृहाच्या बाह्यांगाच्या तीन बाजूंवरील तडा गेलेल्या सुरसुंदरींच्या मूर्ती सध्या चुन्याने सांधण्यात आल्या आहेत. गर्भगृहाच्या बाह्यांगावरील काही सुरसुंदरींच्या मूर्ती बऱ्यापैकी शाबूत असून शिलाहार शिल्पांमध्ये त्यांची गणना करता येईल. महालक्ष्मीच्या मुख्य मूर्तीची हेतुपुरस्सर मोडतोड झालेली नाही.तथापि मूर्तीची अभिषेकादि पूजा-अर्चा खूप मोठ्या प्रमाणावर झाल्यामुळे बऱ्यापैकी झीज झाली आहे. ही मूर्ती पेशवाईच्या काळातच दुरुस्त करावी लागली होती. पंचामृताच्या वारंवार होणाऱ्या अभिषेकामुळे वज्रलेपही करावा लागला होता. ही मूर्ती पूर्व-शिलाहार शिल्पकलेची सुंदर अभिव्यक्ती असून ती बहुधा उत्तम प्रकारच्या बसाल्टच्या दगडात घडविली गेली असावी. ही मूर्ती उभ्या स्थितीत असून तिच्या हातात नेहमीची लांच्छने म्हणजे पानपत्र, खेट ढाल आणि फळ आहे. चेहरा पुन्हा कोरल्यासारखा वाटतो पण काही अवयव, विशेषतः धडाचा भाग आणि पानपात्र व फळ धारण करणारा हात या मूर्तीची मोहकता दाखवितात. अत्यंत कौशल्याने दाखविलेली हाताची नाजूक बोटे शिल्पकाराचे कौशल्य दाखवून देतात. महाकालीच्या द्वारालगत असलेल्या द्वारपालांच्या छोट्या मूर्ती आणि कोल्हापूर येथील टाऊन हॉल वस्तुसंग्रहालयात प्रदर्शित करण्यात आलेली मदनाची मूर्ती या मूर्तिशिल्पांमध्ये सम काळातील शिल्पांमधील नाजुकपणा आणि मोहकता दिसून येते. एक-दोन सुरसुंदरींची मूर्तिशिल्पे, जरी ती नेमकी महालक्ष्मी मंदिरातीलच आहेत असे सांगता येत नसले, तरी महालक्ष्मी मंदिराच्या बाह्यांगावर कशा तऱ्हेच्या सुरसुंदरी असाव्यात याची कल्पना देतात. या प्रकारच्या कलेचे उत्तम नमुने कोप्पेश्वर मंदिराच्या मंडोवरावर आजही टिकून आहेत. त्यातल्या त्यात चांगल्या तऱ्हेने टिकून राहिलेले मूर्तिशिल्पांचे नमुने म्हणजे महालक्ष्मी मंदिर संकुलातील शेषशायी मंदिराच्या तुळईवर कोरलेली तीर्थंकरांची रांग आणि नवग्रह मंदिराच्या छतावर कोरलेले अष्टदिक्पाल. नवग्रह मंडपातील दिक्पाल त्यांच्या वाहनावर आरूढ स्थितीत दाखविले असून ते मधोमध असलेल्या जैन दैवताबद्दल आदरभाव दाखवित आहेत. अशा तऱ्हेने अंतराळाच्या किंवा मंडपाच्या छतावर दिक्पाल दाखविण्याची पद्धत दाक्षिणात्य स्थापत्य परंपरेशी मिळतीजुळती आहे. बामणी येथील शिवमंदिरामध्ये अशाच प्रकारे छतावर अष्टदिक्पाल दाखविले आहेत. खिद्रापूर येथील कोप्पेश्वर मंदिराच्या स्वर्गमंडपात, स्तंभशीर्षांवर आणि छताच्या किंचित खालच्या पातळीवर वर्तुळाकार तुळईवर अर्धउठावात नव्हे, तर

पूर्णाकारात अष्टदिक्पाल दाखविले आहेत. महालक्ष्मी मंदिर संकुलातील तथाकथित नवग्रह मंडपाच्या छतावरील अष्टदिक्पालांचे शिल्पांकन प्रभावी आहे. तथापि या मंडपाच्या जमिनीवर पूर्ण उताणे झोपल्याखरीज ही शिल्पे पूर्णतः दिसत नाहीत. हे शिल्पांकन मनाची एवढी पकड घेणारे आणि त्याची उठावपूर्ण रचना इतकी सुंदर आहे की, प्रेक्षकास हे दिक्पाल आकाशातून मधल्या दैवताभोवती फिरत आहेत असे वाटते.

खिद्रापूर येथील शिल्पांनी समृद्ध असलेल्या कोप्पेश्वर मंदिराची दखल घेतल्याखेरीज शिलाहार शिल्पांचा आढावा पूर्ण होणार नाही. येथे आकृती आणि नक्षीचे अलंकरणशिल्प मंदिराच्या वास्तूत कसे बेमालूमपणे मिसळून जाते ते पाहावयास मिळते.

मंदिराच्या पुढच्या भागातील स्तंभांमध्ये सुंदर घटक असून त्यावर अनेक अलंकरणात्मक प्रयोजने आहेत. या प्रयोजनांमध्ये मंदिर शिखरांचाही समावेश होतो. ही सर्व अलंकरणात्मक प्रयोजने तत्कालीन स्थपतींचे कौशल्य दाखवितात. खिडक्यांवरील जालकर्म, विविध पातळीवर आणि भिंतींच्या भूमिसमांतर थरांवर वेली आणि फुलांसमवेत असलेली निरनिराळ्या प्रकारची नक्षी स्थपतीकडे कल्पनांचे आणि नक्षीप्रकारांचे महाभांडारच असल्याची साक्ष देते.

या मंदिरावर मूर्तिशिल्पांची तीन प्रमाणे आणि स्वरूपे असल्यामुळे मूर्तिशिल्पांच्या योजनेतही वैविध्य आढळते. मंदिराच्या अंतराळातील प्रतिहार महालक्ष्मी मंदिरातील प्रतिहारांइतके मोठे नसले तरी महाकाय प्रकारातच मोडतात. यानंतर मंदिरातील मुख्य दैवताच्या (इथे शिव हे मुख्य दैवत आहे) परिवारातील गणेश, चंडिका, महिषासुरमर्दिनी यासारख्या उपदेवतांचे किंवा शिवाच्या भैरवासारख्या इतर स्वरूपाचे शिल्पपट आहेत. या मूर्तीही बऱ्यापैकी मोठ्या असून झटकन नजरेत भरतात. ह्या मंदिराला पीठाचा एक थर म्हणून हत्तींची रांग आहे. हा भाग गजथर म्हणून ओळखला जातो. स्थपतीने हा थर इतर थरांपेक्षा एवढा मोठा आणि ठळक बनविला आहे की, या थरातील ९६ हत्तींनी मंदिर अक्षरशः पेलले आहे किंवा निराळ्या शब्दात हे मंदिर ९६ हत्तींवर उभे आहे असे वाटते. या हत्तींवर स्वारही दाखविले आहेत. या अशा शिल्पांमुळे स्थपतीला मूर्तिस्थलयोजन अधिक प्रभावीपणे करता येणे शक्य झाले आहे. बाह्यांगावरील देवतामूर्तींच्या मोकळ्या भागात दाखविलेल्या सुरसुंदरींची घडण, रचना आणि त्यातील नाजुकपणा

होयसळांच्या मदनिकांची आठवण करून देणारा आहे. या सुरसुंदरींच्या आणि परिवार देवतांच्या वरच्या पातळीवर, भद्रांवरील देवकोष्ठांच्या शिखरावर लहान आकारातील अष्टदिक्पाल आणि त्यांच्या शक्ती दाखविल्या आहेत. नरथरावर याच आकाराच्या आणि प्रमाणाच्या शिल्पाकृती आहेत. या पटावरील शिल्पाकृती धर्मनिरपेक्ष असून त्यावर रामायण व महाभारतातील घटना कोरल्या आहेत. विविध भूमिसमांतर पातळयांवर येणारी निर्गम, सलिलांतर आणि पुन्हा निर्गम अशी धावणारी ही विविध आकारातील आणि विविध प्रमाणातील (तालमान) शिल्पे ऐहिक आणि पारलौकिक जगाचे सुंदर चित्र सादर करतात.

## महाराष्ट्रातील रंगचित्रकला

रंगचित्रकला हा मानवाला त्याच्या खूप नंतरच्या सांस्कृतिक टप्प्यात लागलेला शोध नाही हे आपण याआधीच पाहिले आहे. त्याने प्रागैतिहासिक काळात ज्याप्रमाणे नैसर्गिक गुंफांच्या भिंतींवर प्राण्याची रंगचित्रे चितारली त्याचप्रमाणे मृद्‌भांडीही कलात्मकपणे रंगवली. या रंगाकरिता त्याने नैसर्गिक रंगद्रव्यांचा (natural pigments) उपयोग केला. पूर्वेतिहासिक काळात जेव्हा नागरीकरणाला सुरूवात झाली तेव्हाच रंगचित्रे सुसंस्कृत माणसाची अभिव्यक्ती बनली. महालांच्या आणि घरांच्या भिंतींवर रंगचित्रे चितारण्यात येत. भारतातील कला मुख्यत्वेकरून धार्मिक संदर्भातच वापरली जात असल्याने मृत्यूनंतरच्या जीवनाची आणि 'जरा' व 'हारितीची' रंगचित्रे अगदी कुडाच्या झोपड्यांच्या भिंतींवरही रंगविण्यात येत. तथापि ही सर्व मातीच्या भिंतींवर किंवा मातीच्या भिंतींवरील चुन्याच्या गिलाव्यावर किंवा लाकूड, कापड यासारख्या नाशिवंत गोष्टींवर चितारली गेल्यामुळे काळाच्या ओघात टिकली नाहीत. म्हणूनच महाराष्ट्रात टिकून राहिलेली इतिहासकाळातील रंगचित्रे हा एक सुदैवी योगायोग किंवा अनेक पर्यावरणात्मक घटक एकत्र येऊन त्यातून बनलेल्या अनुकूल परिस्थितीची परिणतीच समजली पाहिजे. इ. स. पू. दुसरे शतक ते इ. स. चे १० वे शतक या काळात रंगचित्रांनी सजविण्यात आलेल्या लेण्यांमध्ये रंगचित्रांचे अवशेष आढळतात. ही अशी रंगचित्रे अजिंठा (इ. स. पू. २ रे शतक ते इ. स. चे ५वे शतक) आणि पितळखोरे (इ. स. चे ५ वे शतक) येथील बौद्ध लेण्यांमध्ये आणि वेरूळ (इ. स. चे आठवे ते दहावे शतक) येथील ब्राह्मणी आणि जैन लेण्यांमध्ये आढळतात.

भारतामध्ये याहूनही पूर्वीच्या काळातील लेणी असली, आणि या भागातील सर्वच लेण्यांमध्ये एके काळी धार्मिक रंगचित्रे असावीत अशी विद्वानांची धारणा

असली तरीही खुद्द अजिंठा येथील इतर लेण्यांमध्येही या रंगचित्रांशी तुलना करता येईल अशी रंगचित्रे आढळत नाहीत. अजिंठा येथील क्रमांक १०, ९, ६, १६, १७, १ व २ या लेण्यामध्येच रंगचित्रे मोठ्या प्रमाणावर शिल्लक आहेत. या लेण्यांमध्ये आजही टिकून राहिलेली रंगचित्रे हे एक मोठे आश्चर्यच आहे. उत्पातपूर्ण राजकीय घटनांमुळे अचानकपणे या लेण्यांचा वापर बंद झाला आणि लेण्यांमधील लोकांचा वावर पूर्णतः थंडावल्यामुळे ही रंगचित्रे १५०० वर्षांपूर्वी जशी होती तितक्याच ताजेपणे आज टिकून आहेत. अशी या रंगचित्रांची आश्चर्यकारकपणे टिकून राहण्याची कारणमीमांसा देण्यात येते. आजमितीस शिल्लक नसली तरी इतरही लेण्यांमध्ये एकेकाळी रंगचित्रे असण्याची शक्यता आहे. या लेण्यांचा गैरवापर झाल्यामुळे, म्हणजेच काही काळ येथे थांबलेल्या वाटसरू मंडळींनी येथे स्वयंपाक केल्यामुळे, शेकोटी व पलिते पेटविल्यामुळे येथे खूपच धूर तयार झाला आणि या धुराच्या काजळीत ही भिंती व छतांवरील रंगचित्रे लोप पावली असण्याची शक्यता आहे. असे जरी असले तरी, अजिंठा येथील रंगचित्रांच्या शोधामुळे भारतीय रंगचित्रकलेच्या पाच ते सहा शतकांच्या इतिहासाचा मागोवा बऱ्यापैकी समाधानकारकपणे घेता येतो. अजिंठा लेणी दोन टप्प्यात खोदली गेली हे सर्वज्ञातच आहे. चैत्यगृहे असे स्वरूप असलेली लेणी क्र. १९ व २६ आणि विहार असे स्वरूप असलेली लेणी क्र. १, २, ४, ६, ७, १५ ते १७ आणि २० ते २४ या लेण्यांचा समावेश दुसऱ्या टप्प्यात होतो. याव्यतिरिक्तची लेणी एकतर अपूर्ण आहेत किंवा कोणत्या संप्रदायाची (हीनयान की महायान) आहेत याचा बोध न होणारी आहेत. आधीच उल्लेख केल्याप्रमाणे १०, ९, ६, १६, १७, १ व २ या क्रमांकांच्या लेण्यांच्या भिंतींवर आणि छतांवर आजमितीसही मोठ्या संख्येने रंगचित्रे आहेत. या आधी नमूद केल्याप्रमाणे लेणी क्र. १० व ९ पहिल्या टप्प्यातील चैत्यगृहे आहेत. यातील क्र. १० च्या लेण्यातच तत्कालिन (म्हणजे लेणे ज्या काळात खोदले गेले त्याच काळातील) रंगचित्रे आहेत. क्र. ९ च्या लेण्यातही रंगचित्रे आहेत पण ती नंतरच्या काळातील आहेत. जर या लेण्यामध्ये आधीच्या काळातील रंगचित्रे असतील आणि त्यावरच नंतरच्या काळातील रंगचित्रे रंगविण्यात आली असतील तर त्याचा केवळ कल्पनेनेच अंदाज करावा लागतो. या सुरुवातीच्या रंगचित्रांचे विषय तत्कालीन धार्मिक प्रथांशी सुसंगत असून त्यात काही कथापर रंगचित्रेही आहेत. ही रंगचित्रे सांची व भारहूत येथील स्तूपांवर आढळणाऱ्या शिल्पांशी खूपच मिळतीजुळती आहेत. यातील अगदी सहजगत्या ओळखता येतील अशी रंगचित्रे म्हणजे बोधि वृक्षाची पूजा आणि राजघराण्यातील एका व्यक्तीने बांधलेला स्तूप

व त्याजवळ असलेले त्याचे सेवक. इतर कथापर रंगचित्रांमध्ये छद्‌दंत जातक आणि साम जातकामधील प्रसंग दाखविण्यात आले आहेत. या दोन्ही जातककथांमधील विषय दुसऱ्या टप्प्यातील रंगचित्रांमध्येही हाताळण्यात आले आहेत.

छद्‌दंत जातकामध्ये एका शक्तिशाली आणि असामान्य हत्तीची कथा आहे. ह्या हत्तीला सहा सुळे असून तो त्याच्या दोन राण्यांसह अरण्यात सुखाने राहत होता. त्यातील धाकट्या राणीला मोठ्या राणीबद्‌दल प्रचंड मत्सर होता. या मत्सराग्नीतच पुढचा जन्म काशीच्या राणीचा मिळावा या तीव्र इच्छेत तिचे निधन झाले. इच्छेप्रमाणे ती पुढच्या जन्मी बनारसची राणी बनली. पण तिला या जन्मीही गतजन्माची स्मृती होती. तिने शिकाऱ्यांना सहा सुळे असलेला हत्ती शोधून त्याचे सुळे कापून आणायला सांगितले. ते कापून आणलेले सुळे पाहताच राणीला पश्चात्ताप झाला व पश्चात्तापाच्या धगीत तिचा मृत्यू झाला. या कथापर रंगचित्रांच्या शिल्लक भागात हे सुळे पाहून राणीला मूर्च्छा आल्याचे दाखविले आहे. आपल्या पतीबरोबर म्हणजे बनारसच्या राजाबरोबर आणि सेवकवर्गासमवेत असताना मूर्च्छा येऊन पडणाऱ्या राणीचे हे हृदयद्रावक दृश्य त्यातील भाव-भावना अगदी यथार्थपणे अभिव्यक्त करणारे असून हे चित्र निश्चितपणे भारतीय कलेच्या उत्कृष्ट नमुन्यांपैकी एक आहे.

यानंतरच्या टप्प्यातील बहुसंख्य रंगचित्रे लेणे क्र. १६, १७, १ व२ मध्ये असून त्यांचा काळ इ. स. चे पाचवे शतक आहे. म्हणजेच ही रंगचित्रे वाकाटक नृपति हरिषेणाच्या कारकिर्दीतील आहेत. क्र. १६ चे लेणे त्याचा मंत्री वराहदेव याने खोदवून घेतले, तर क्र. १७ चे लेणे हरिषेणाचा मांडलिक असलेल्या ऋषीक जनपदाच्या म्हणजेच खानदेशावर राज्य करणाऱ्या राजाने खोदवून घेतले आहे. लेणे क्र. १ व २ मध्ये कलात्मकदृष्ट्या नंतरचा काळात झालेला विकास आढळतो. त्यामुळे ह्या लेण्यांचा काळ नंतरच्या (कधीकधी तर इ. स. ५५०) मानला जातो. या चारही लेण्यांमध्ये इतर बौद्ध विषयांबरोबरच जातक आणि अवदान कथांमधील प्रसंग दाखविणारी कथापर रंगचित्रे आहेत. यात प्रामुख्याने जातक कथांमधील विश्वंतर जातक, सिंहल अवदान, हंस जातक (या सर्वांमधील प्रसंग लेणे क्र. १७ मध्ये दाखविले आहेत.), विधुरपंडित जातक (लेणे क्र. २), महाजनक जातक, शंखपाल जातक, सिबि जातक, चांपेय जातक आणि उमरग्येयी जातक (लेणे क्र.१), नंदाची कथा, हस्ति जातक, सुतसोम जातक (लेणे क्र.१६,) इत्यादी जातक व अवदानांचा समावेश आहे.[१४]

चित्रकाराने बुद्धाच्या जीवनातील आणि त्याच्या गतजन्मातील कथांच्या सहाय्याने असे विश्व निर्माण केले आहे, जे वास्तववादी तर आहेच पण त्याचबरोबर पारलौकिकही आहे. कारण जातक आणि अवदान कथांमध्ये फक्त मानवी जीवनाचेच सर्व पैलू आहेत. असे नाही, तर पशुपक्ष्यांच्या जीवनातीलही सर्व पैलू आहेत. त्यामुळे चित्रकाराला त्याची कला व कल्पकता दाखविण्यास खूपच वाव मिळाला आहे. या रंगचित्रांमध्ये हे ऐहिक जीवन सात्त्विक बौद्धांच्या दृष्टिकोनातून आहे, दु:खी आणि शोकपूर्ण आहे. पण त्याच वेळी उदात्तही आहे. त्यात विश्वातील सत्य कळण्याची आणि त्याचा साक्षात्कार होण्याची संधी आहे. म्हणून अजिंठा येथील रंगचित्रे ऐहिक जीवनाच्या दृष्टिकोनातून म्हणजे घरे, राजवाडे, त्यातील लाकूडसामान व नित्योपयोगी वस्तू, वस्त्रे व दागिने या दृष्टिकोनातून तर समृद्ध आहेतच पण त्याहूनही अधिक प्रमाणात तत्कालीन लोकांच्या संपन्न जीवनाची झलक दाखविणाऱ्या सामाजिक चालीरीती आणि वागण्याच्या पद्धती या दृष्टिकोनातून ती याहूनही अधिक संपन्न आहेत. सी. शिवराममूर्तींना अजिंठा येथील चित्रकलेमध्ये भारतीय चित्रकलेच्या सहा आदर्शांची परिपूर्णता जाणवली नसती तरच नवल. चित्रकलाशास्त्रानुसार हे आदर्श पुढीलप्रमाणे आहेत.

१) रुपांची विविधता (रूपभेदा,)

२) शरीराची व शरीरावयवांची विविध आदर्श प्रमाणे (प्रमाणानि),

३) निरनिराळया भावांची अभिव्यक्ती (भावयोजनं),

४) सौंदर्य व डौल (लावण्ययोजनं),

५) वास्तवतेशी साधर्म्य असणे (सादृश्यम्) आणि

६) रंग आणि छटांमधील वैविध्य (वर्णिकाभंग)

गुप्त आणि वाकाटक काळात विकसित झालेल्या सौंदर्याच्या आदर्शांच्या खोलात जाण्याची आपल्याला आवश्यकता नाही. परंतु अजिंठा येथील शिल्पकारांप्रमाणे चित्रकारांनीही मानवी सौंदर्याचे आदर्श विकसित करण्यासाठी निराळे संकेत विकसित केले होते हे येथे नमूद केले पाहिजे. भाव-भावनांची अभिव्यक्ती, प्रतिकृती (models) आणि आकारनिर्मितीसाठी त्यांनी विकसित केलेली काही तंत्रे हे अजिंठा येथील चित्रकारांचे यश उल्लेखनीय आहे. शिवी जातक, विश्वंतर जातक, नंदाची कथा, छद्दंत जातक यासारखी उदात्त कथासूत्रे चितारताना शृंगार, वीर, भय, करुण इत्यादी रस किंवा भाव अगदी समर्थपणे हाताळण्यात आले आहेत. ऐहिक,

स्वर्गीय आणि दैवी जगताबद्दलच्या श्रद्धा आणि संकेतांमुळे मानव, वीरपुरुष, नाग, विद्याधर, गंधर्व, यक्ष, राक्षस आणि किन्नर यांचे आकार वेगवेगळे आहेत. त्याचप्रमाणे चित्रात दाखविलेल्या स्त्रियांविषयी आणि त्यांच्या सौंदर्याविषयी काही निरीक्षणे नोंदविता येतील. बौद्ध तत्वज्ञानात ऐहिक जीवन खोटे मानल्यामुळे त्यांच्या जीवनात स्त्रीसुखाला, स्त्रीच्या लावण्याला आणि सौंदर्याला कोणतेही स्थान नव्हते. तथापि काळाच्या ओघात आणि विशेषत: महायान संप्रदायातील नवीन सिद्धांतांमुळे अजिंठा येथील रंगचित्रांमध्ये स्त्रीला महत्त्वाचे स्थान मिळालेले आढळते. या चित्रांमध्ये स्त्रीविषयीचा " ती नवऱ्याच्या धार्मिक आणि सामाजिक कर्तव्यांमध्ये भाग घेणारी,ऐहिक जीवनात नवऱ्याच्या सुख-दुःखात संतुलित मनाने सहभागी होणारी, वंशसातत्य ठेवणारी आणि लक्ष्मीचे प्रतीक असलेली सहधर्मचारिणी व आदर्श माता" हा पारंपारिक भारतीय दृष्टिकोन स्वीकारलेला आढळतो. अजिंठा येथील रंगचित्रांमध्ये केवळ ही अशी मानवी स्त्रीच नाही तर स्वर्गातील सुरसुंदरीही येतात.

अजिंठा येथील रंगचित्रकलेच्या तंत्रामध्ये लेण्यांच्या खोदीव पृष्ठभागावर प्रथम कापलेले वाळलेले गवत, वस्त्रगाळ माती व अन्य वनस्पती यांच्या मिश्रणातून बनविलेले एकावर एक असे दोन गिलावे असत. पहिला गिलावा जाड व ओबडधोबड असे. त्यावरील दुसरा गिलावा सुबक, सपाट व २ ते ३ मि. मी. जाडीचा असून त्यावर चुन्याचा किंवा पातळ चिनी मातीचा हात दिला जात असे. हा चुन्याचा हात व त्यावरील रंगचित्राचा रंग यांची एकत्रित जाडी १ मि. मी. आहे.

काही ठिकाणी गिलाव्याच्या दुसऱ्या किंवा वरच्या थरात कापडाचेही तुकडे मिसळण्यात आले असल्याचे दिसून आले आहे. रासायनिक विश्लेषणात चुन्याच्या थरात मिसळलेली रंगद्रव्ये आढळून आलेली नाहीत. याचाच अर्थ असा की, चुन्याचा हात ओला असतानाच त्यावर रंगकाम करण्यात आलेले नाही. म्हणजेच निराळ्या शब्दात ही रंगचित्रे "फ्रेस्को" प्रकारची नसून "टेंपरा" प्रकारची आहेत.

रंगचित्रांचा पृष्ठभाग असे स्वरूप असलेल्या गिलाव्याच्या कच्च्या मालाच्या आणि त्याच्या निर्माणतंत्राच्या तपशिलाबरोबरच खुद्द रंगचित्रकलेच्या तंत्राचे विवेचनही आवश्यक आहे. काही रंगचित्रांमध्ये रंगरेषांचा वापर ठळकपणे केलेला आढळतो. उदा. बुद्धाची पूजा करणाऱ्या भक्ताचे चित्र. या चित्रामध्ये शरीराच्या आणि नाक, कान, भुवया इत्यादी चेहऱ्याच्या घटकांच्या बाह्यरेषा अगदी बारीक

पण ठळक रंगरेषांनी दाखविलेल्या आढळतात, तर शरीराची गोलाई दाखविण्याकरीता कुंचल्याचा कौशल्याने उपयोग केलेला आढळतो. अशा प्रकारची उत्कृष्ट उदाहरणे म्हणजे कमळाच्या वेलीवर चढणारा बुटका यक्ष (लेणे क्र. १), नंदकथेतील सेविकातील जनपद कल्याणी, अवलोकितेश्वर आणि विधुरपंडित जातकातील पात्रे यांची व्यक्तिचित्रे ही होत. कोणत्याही आकाराचा उत्सेध (elevation) दाखविण्यासाठी तीव्रप्रकाश (high light) पद्धतीचाही अवलंब केलेला आढळतो.

या रंगचित्रामधील यथादर्शन (perspective) संकल्पनेचेही विवरण होणे अगत्याचे आहे. या चित्रांमध्ये प्रथम विशाल आकारांकडे नजर जाऊन मागील आकार अधिकाधिक लहान होत जातील असा निश्चित यथादर्शन केंद्रबिंदू (focal point) नाही की, जेथे दृष्टीला अंतिमदूरचा विलयबिंदू भासेल असे खोलीचे (deapth) यथादर्शन नाही. किंबहुना या रंगचित्रांमध्ये घटकांची मांडणी अशा तऱ्हेने केली आहे की, हे घटक वेगवेगळया ठिकाणाहून पाहिले जात आहेत असे भासावे आणि इन्ग्रिडआल म्हणते त्याप्रमाणे ''यात असे बहुगुणित यथादर्शन (multiple perspective) आहे की, ज्यात चित्रघटक चित्राच्या आत उभे राहून पाहिल्याप्रमाणे दिसतात.'' हे असे बहुगुणित यथादर्शन चित्रकाराने जाणीवपूर्वक योजले असण्याची दाट शक्यता आहे. प्रेक्षकास आपण या चित्राचाच एक भाग आहोत असे वाटावे हा त्यामागील हेतू असावा. काही लांब कथापर चित्रांमधून या चित्रांमधील विवरणतंत्रही लक्षात येते. शिल्पामध्ये किंवा रंगचित्रांमध्ये वेगवेगळे प्रसंग सूचित करण्यासाठी खरे तर मधून मधून खंड असले पाहिजेत. तसेच घटना ज्या क्रमाने घडल्या त्याच क्रमाने दाखविल्या गेल्या पाहिजेत. अनेकदा कथेतील प्रसंग विभक्त करण्यासाठी शिल्पामध्ये अर्धस्तंभांची आणि रंगचित्रांमध्ये खंडांची योजना केली जाते. एकाच कथानकामधील विविध घटना चित्रित करावयाच्या असतील तर त्यात काही पात्रे पुनःपुन्हा येणेही अपरिहार्य असते. अशा तऱ्हेच्या विवरणाला आनुक्रमिक (linear) विवरण म्हणतात. पण अजिंठा येथील रंगचित्रांमध्ये असे आनुक्रमिक विवरण आढळून येत नाही. येथील चित्रकाराने अगदी साधी पण आमूलाग्रपणे निराळी पद्धती वापरली आहे. या पद्धतीत भिंतीच्या खालच्या व वरच्या भागात अनेक वेगवेगळ्या कथानकामधील प्रसंग एकत्रित दाखविले आहेत आणि असे प्रसंगसंच इतर प्रसंगसंचांपासून विभक्त करण्यासाठी गिरी किंवा वनस्पती प्रयोजनांचा अवलंब केला आहे. विश्वंतर जातकातील प्रसंग दाखविणाऱ्या रंगचित्रांवरून हा मुद्दा अधिक स्पष्ट होईल. यात या जातककथेतील

जे प्रसंग अरण्यात घडले ते एकत्र दाखविले आहेत तर जे प्रसंग नगरात घडले ते प्रसंगही एकत्रित दाखविले आहेत. हे प्रसंग किंवा घटना क्रमनिरपेक्षपणे दाखविल्या आहेत. ज्या प्रेक्षकाला या जातककथा आधीच तपशीलवार माहीत आहेत तोच यातील वेगवेगळे प्रसंग ओळखू शकेल. हे अशा तऱ्हेचे विवरणतंत्र यापूर्वी सांची येथील तोरणांवर वापरलेले आढळते. म्हणूनच या तंत्राचा उगम आणि त्याचा अचानकपणे अजिंठा येथे झालेला उद्‌भव याबाबत संशोधन होणे आवश्यक आहे.

# प्रकरण ४ : लौकिक स्थापत्य *

लयन आणि मंदिर स्थापत्याच्या बरोबर महाराष्ट्रामध्ये मोठया प्रमाणामध्ये ज्या स्थापत्याची निर्मिती झाली त्याचा समावेश रुढ अर्थानं लौकिक स्थापत्य या सदरात करता येईल. या स्थापत्याला संकीर्ण वास्तू असेही म्हणता येईल. त्याची तोंडओळख प्राचीन स्थापत्य व कला या विषयांतर्गत या प्रकरणात करून देण्यात येत आहे. वस्तूतः महाराष्ट्राच्या कलेतिहासामध्ये अशा अनेक लहानसहान बाबींचे स्वतःचे असे स्थान आहे.

## नगररचना

कौटिलीय अर्थशास्त्रामध्ये जनपद वसविण्याच्या बाबतीमध्ये स्पष्ट असे निर्देश दिले आहेत की, जाणीवपूर्वक वसाहती निर्माण कराव्यात, एक वसाहत १०० ते ५०० कुटुंबाची असावी, अशा स्थानांची सरहद्द निश्चित करताना नदी, जंगल, डोंगर यासारख्या निसर्गदत्त उपलब्ध स्थानांचा उपयोग करावा, वसाहतविषयक वाढता क्रम देताना दहा गावांचे मिळून एक "संग्रहण", दोनशे गावांसाठी मिळून एक "कार्वटिक", चारशे गावांचे मिळून एक "द्रोणमुख" व आठशे गावांचे मिळून एक "स्थानीय" अशा लहानमोठ्या आकाराची शहरे असावीत,[६५] नगरांसाठी त्यांनी विविध आकार सुचविले आहेत. मौर्यांच्या राजधानीचे सुंदर वर्णन मेगॅस्थिनेसच्या **इंडिका** या ग्रंथात आले आहे. सातवाहनांच्या राज्यात तटबंदी असलेली तीस शहरे होती असे प्लिनी याने सांगितले आहे.[६६] **समराङ्गणसुत्रधार** (अकरावे शतक) व **अपराजितपृच्छा** (बारावे शतक) यामध्ये नगररचनेच्या नोंदी मिळतात. विशेषतः समराङ्गणसुत्रधार या ग्रंथात "पुरनिवेश" म्हणजे शहर वसवणे यावर चर्चा केली असून अशा वसाहतीसाठी निवडावयाचा भूभाग, नगराचा होणारा विस्तार यांचा तपशील नोंदविला आहे. वसाहतीच्या आधारे त्यांची वैशिष्ट्यपूर्ण नावे दिली आहेत. या ग्रांथिक नोंदीबरोबर प्रत्यक्ष अभिलेखीय पुरावेही उपलब्ध होतात. अशा नोंदी कमी असल्या तरी लक्षणीय आहेत. महाराष्ट्रात प्रारंभिक ऐतिहासिक काळापासून, विशेषतः सातवाहन काळापासून वसाहती झाल्याचे दिसते, किंबहुना महाराष्ट्राच्या नागरीकरणाची सुरुवात खऱ्या अर्थाने याच काळात झाली. या काळात "तगर" (तेर), "प्रतिष्ठान" (पैठण), "भोगवर्धन" (भोकरदन), "ब्रह्मपुरी" (कोल्हापूर),

---

* या प्रकरणाचे लेखन डॉ. अरुणचंद्र शं. पाठक, कार्यकारी संपादक व सचिव, दर्शनिका विभाग, यांनी केले आहे.

"निधिनिवास" (नेवासे) अशा स्थानांचा मोठ्या प्रमाणामध्ये विकास झाला. पूर, नगर, कटक याबरोबरच विषय, भुक्ती, पथ, देश ही स्वतंत्र प्रशासकीय केंद्रे म्हणून विविध राजवटीत विकसित झाली. वाकाटक काळामध्ये द्वितीय पृथ्वीसेनाच्या माहुरझरी ताम्रपटामध्ये तत्कालीन ग्रामप्रशासन व्यवस्थेचे आदर्श चित्र रेखाटले आहे, तर "वाशीम" (जिल्हा वाशीम), "रामटेक" (जिल्हा नागपूर) हे वाकाटककालीन वसाहतीचे पुरावे होत. राष्ट्रकूट कृष्ण तिसरा यांच्या काळात कंधार (जिल्हा नांदेड) येथील शिलालेखात नगर किती जाणीवपूर्वक वसविले जात होते, त्याचा विकास कशा पध्दतीने करण्यात येई याची अत्यंत तपशीलात नोंद दिली आहे. डॉ. शोभना गोखले यांनी काही प्रमाणामध्ये या शिलालेखाधारे राष्ट्रकूटकालीन कंधारचा शोध घेण्याचा प्रयत्न केला आहे.[१७] राष्ट्रकूट राजांनी मण्यार नदीच्या काठावर सर्व बाजूने निसर्गतः संरक्षण लाभलेल्या भूभागावर आपली राजधानी वसविली. "काळमेघ" या व्यक्तीने दिलेल्या दानाच्या प्रसंगी येथील अभिलेख खोदण्यात आला. त्यातील नोंदीवरून हे स्पष्ट होते की, राष्ट्रकूट राजा कृष्ण तिसरा याने या नगरात अनेक सोयी उपलब्ध करून दिल्या होत्या. हे शहर म्हणजे तत्कालीन नगररचनेचा एक वास्तूपाठ ठरावा. राष्ट्रकूट काळामध्ये लातूर, धारुर, वेरूळ लगतचा प्रदेश, मान्यखेट येथे निश्चितपणे नागरी वसाहतीचा विकास झाला होता. पैठण व तेरसारख्या स्थानांना तर सातवाहनांपासून थेट शिलाहार-यादव काळापर्यंत वसाहतीचे सातत्य लाभले होते या विषयीचा पुरावा तत्कालीन अभिलेख व उपलब्ध पुरातत्वीय वास्तूअवशेष देतात. अशाचप्रकारे वसाहतरचनेचा एक पुरावा चालुक्यकालीन धर्मापुरी (जिल्हा बीड) येथील शिलालेख व वास्तूअवशेषांमुळे उपलब्ध आहे. दिनांक २३ जुलै ११३४ रोजी दिलेल्या दानलेखात तत्कालीन स्थानाचे वर्णन आले आहे ते असे- "भूलोकमल्लसोमेश्वर या चालुक्य राजाच्या काळात जगप्रसिध्द अशी धर्मापुरी नावाची नगरी होती. ही नगरी म्हणजे पृथ्वीच्या कपाळावरील तिलकच होय. अनेक उंच प्रासाद येथे असून त्यावर मयूर विराजमान असत. गावात सुंदर बाजारपेठा असून त्यावरील रस्त्यावरून रथ धावत असत. रस्ते लोकांनी गजबजलेले असत. प्रासादाच्या गच्चीवर नृत्यगान चालत असे. चालुक्यांची ही नगरी इंद्रनगरीशी स्पर्धा करणारी होती." हे वर्णन काव्यमय असले तरी प्रत्यक्ष स्थानावर सर्वेक्षण केले तेव्हा येथील उपलब्ध वास्तू आणि शिल्पावशेष तसेच शिलालेख (सहा शिलालेख) यातून या स्थानाच्या संपन्नतेची व विस्ताराची कल्पना येते.[१८] याप्रकारे लोणार (जिल्हा बुलढाणा), अंबाजोगाई (जिल्हा बीड), सगरोळी व अर्धापूर (जिल्हा नांदेड) येथे उपलब्ध झालेल्या अभिलेखीय

नोंदी यादव, कल्याणीचे चालुक्य यांच्या काळातील विकसित झालेल्या वसाहतीची साक्ष देतात. तसेच चारठाणा (जिल्हा परभणी) आणि कोल्हापूर येथे असलेल्या मंदिर वास्तूअवशेषांचा अभ्यास करताना यादव व शिलाहार काळात येथे झालेल्या वसाहतीची व नागरीकरणाची कल्पना येते. विविध अभिलेखीय नोंदी व ग्रंथातील वर्णनावरून असे स्पष्ट होते की, नगराच्या विकासात आज प्रमाण मानलेल्या अनेक बाबी तेव्हाही विचारात घेतल्या जात होत्या. कंधार, धर्मापुरी, अंबाजोगाई या व अशा स्थानांवरील उपलब्ध शिलालेख पाहताना पुढील बाबींची नोंद मिळते. नगराला प्राकार असत, भव्य राजप्रासाद असे, याबरोबरच आराम स्थल (बागा), धर्मशाळा, पुण्यस्थळ, मठ, मंदिरे उभारली जात. जलाशयांची निर्मिती होई. तसेच विविध बाजारपेठा व मंडपीकांची उभारणी करत. शहराच्या विविध भागात उन्हाळ्यामध्ये पाणीपुरवठा करणाऱ्यां "प्रप्पा" (पाट) असत, तर हिवाळ्यात सर्वसामान्यांना उब मिळावी म्हणून आंगठ्या (अग्निष्ठिका)ची सोय असे. याशिवाय गाई व जनावरांना चारा मिळावा (गोग्रास) याची काळजी घेतली जाई. राजविलासीनी पाटण अशी स्वतंत्र वसाहत असे.

## दुर्ग

कौटिल्याच्या अर्थशास्त्रामध्ये दुर्गरचना व त्यांचे विविध प्रकार दिले आहेत. तसेच 'मनुस्मृति' आणि 'महाभारत' यामध्येही दुर्गाचे उल्लेख आहेत. **अभिलाषितार्थ चिंतामणीचा** कर्ता सोमेश्वरदेव याने दुर्गाचे विविध प्रकार सांगितले आहेत. हा ग्रंथ अकराव्या शतकाच्या उत्तरार्धात निर्माण झाला. महाराष्ट्राच्या संदर्भात विचार करता यादवांची राजधानी ही प्रारंभी चंद्रादित्यपूर व नंतर देवगिरी या दुर्गावर होती. कोल्हापूरच्या शिलाहारांचे वास्तव्य पन्हाळा किल्ल्यावर होते. महाराष्ट्रामध्ये किल्ल्यांची निर्मिती राष्ट्रकूट-चालुक्य काळापासूनच निश्चितपणे होत असावी. दुसऱ्या तैल चालुक्याने अठ्ठयाऐंशी किल्ले घेतले असे मानगोळी येथील लेखात म्हटले आहे. सातारा परिसरात असलेले सामनगड, वैराटगड, वसंतगड,भूदरगड,पांडवगड,बावडा, चंदन-वंदन, खेळणा, रांगणा, नांदगिरी,पन्हाळा इत्यादी किल्ले दुसरा भोजराजा याने बांधल्याची नोंद आहे. मयूरखंडासारखे इतर कित्येक डोंगरी किल्ले तेराव्या शतकाच्या पूर्वीचेच असावेत, यासारखी नोंद मु.ग.पानसे आपल्या ग्रंथात करतात.[११]

## जलाशय

नगर वसवताना ज्याठिकाणी निश्चित व कायम स्वरूपाचा पाणी पुरवठा उपलब्ध होईल अशा ठिकाणचा शोध घेऊन जलाशयाची निर्मिती केली गेली.

महाराष्ट्रामध्ये कान्हेरी लेण्यांच्या परिसरात विविध पातळीवर कुंडांची निर्मिती करून जलप्रवाहाचे सुयोग्य नियोजन केल्याचे स्पष्ट होते. यासंदर्भात अनेक शिलालेखात नोंदी उपलब्ध आहेत. वाकाटक काळात मन्सर, मांढळ (जिल्हा नागपूर) ही स्थळे जलाशयाच्या काठावर विकसित झाली. वाकाटक राजा देवसेन याच्या हिस्सेबोराळ शिलालेखात म्हटल्याप्रमाणे वत्सगुल्म (वाशीम) लगत चंद्रसरोवराची निर्मिती करण्यात आली त्याचे नाव "सुदर्शन" असेच ठेवले होते, [१००] तर वाकाटक राजा द्वितीय पृथिवीषेण याने माहुरझरी येथे "पृथिवीसमुद्र" या जलाशयाची निर्मिती केली. राष्ट्रकूट राजा कृष्ण तिसरा याने कंधारपूर (कंधार, जिल्हा नांदेड) येथे "जगत्तुंगसमुद्र" या जलाशयाची निमिर्ती केली, तर चालुक्य राजा विक्रमादित्य सहावा याच्या गणेशवाडी (तालुका निलंगा, जिल्हा लातूर) येथील शिलालेखात म्हटल्याप्रमाणे "भीमसमुद्र" या सरोवराची निर्मिती केली.[१०१] तसेच या काळात "कल्लुंवर" या ठिकाणी अन्य एका जलाशयाची निर्मिती करण्यात आली. चालुक्य, यादवकाळात महाराष्ट्रामध्ये अर्धापूर, सगरोळी, माहूर (जिल्हा नांदेड) या स्थानावर जलाशय निर्माण करण्यात आले होते. शिलालेखातील नोंदी आणि प्रत्यक्ष पुरातत्वीय सर्वेक्षण यांच्या आधारे हे स्पष्ट होते की, महाराष्ट्रात जाणीवपूर्वक जलाशय निर्माण करणे व त्याचा योग्य उपयोग करून घेण्याची परंपरा असून एक सातत्य याबाबत लाभले आहे. प्राचीन जलसिंचन व शेतीच्या दृष्टीने ही बाब विशेष उल्लेखनीय ठरते. जलाशयावरोवर सभोवताली जाणीवपूर्वक बारवांचीही निर्मिती होत होती. या काळामध्ये मंदिराव्यतिरिक्त अन्य कितीतरी वास्तुंची निर्मिती मोठ्या प्रमाणात झाली. त्यांची नोंद आपण त्या त्या स्थानावर बारकाईने सर्वेक्षण केल्यास मिळू शकते. उदा. भद्रावती (तालुका वडोदरा, जिल्हा चंद्रपूर) या ठिकाणी निर्माण करण्यात आलेला नवव्या शतकाच्या उत्तरार्धातील पूल हा ४० x २.३० मीटरचा असून पूल निर्मितीचे हे एक आदर्श उदाहरण मानावे लागते. माहूर (जिल्हा नांदेड) येथील भोजंता तलावाजवळ असाच एक पूल यादव काळात बांधलेला आहे, तर पैठण येथे असलेल्या लहान-मोठ्या पूलांचे उल्लेख खांडी (काजवे) म्हणून आले आहेत. याबाबत महानुभावीय साहित्यात नोंद आढळते.

## मानस्तंभ

तत्कालीन स्थापत्याचा आणखी एक उल्लेखनिय प्रकार म्हणजे मानस्तंभ किंवा किर्तिस्तंभ होय. चारठाणा (जि. परभणी) येथील जैन मंदिराच्या परिसरात उभारलेला मानस्तंभ उत्कृष्ट असून यादव काळातील किर्तिस्तंभ (ता. पैठण, जि. औरंगाबाद) येथे उभा आहे. अशाच प्रकारचा पण तुलनेत अत्यंत

साधा असणारा मानस्तंभ परळी (जिल्हा सातारा) येथे आहे. याशिवाय तत्कालीन काळात मोठ्या प्रमाणात आढळणाऱ्या कथापटांचाही उल्लेख समाजजीवन समजून घेण्यासाठी आपणाला करता येतो. असे कथापट एखाद्या वास्तूच्या अंगावर खोदलेले शिल्पपट असत. त्याची उत्कृष्ट उदाहरणे पवनार येथील वाकाटककालीन शिल्पपट, वेरूळच्या कैलास मंदिरात असलेले महाभारत व रामायणाचे कथापट ही आहेत, तर औंढा-नागनाथ येथील मंदिरावरील कथापट तसेच माणकेश्वर (जि. उस्मानाबाद) या मंदिराच्या पादपीठावर असलेले शिल्पपट हे उत्कृष्ट कथापटाचेच उदाहरण आहे. सुट्या स्वरूपामध्येही काही ठिकाणी असे शिल्प आढळते.

## स्मारकशिळा (वीरगळ)

सातवाहन काळात नाणेघाट येथे प्रतिमागृहाची निर्मिती झाली. येथे एकूण आठ प्रतिमा असून त्यात सिमुख सातवाहन, नागनिका, श्रीसातकर्णि इत्यादी नावे आढळतात. असे प्रतिमागृह कुषाण सम्राट कनिष्क यांच्या काळात मथुरेजवळ माट या जागी निर्माण करण्यात आले होते.[१०२] भासाच्या **प्रतिमा** नाटकावरून स्पष्ट दिसते की, व्यक्तीच्या निधनानंतर अशाप्रकारची स्मारके उभारण्याची प्रथा होती. प्रतिमालेख नागार्जुनकोंडा येथेही मिळाले आहेत. भंडारा जिल्ह्यात पवनी येथे रुपीअम्माचा छायास्तंभ उपलब्ध झाला असून तो नागपूर येथील मध्यवर्ती संग्रहालयात हलविण्यात आला आहे. वसिष्ठपुत्र पुळुमावी याने आपल्या पट्टराणीच्या स्मरणार्थ छायास्तंभ उभारला होता. अशा छायास्तंभावर संबंधित व्यक्तीची प्रतिकृतीही कोरली जात असे. अशा प्रकारच्या स्मृतिस्तंभाना 'यष्टि' असेही म्हणत. 'मनुस्मृती'मध्ये यष्टिचा नाश केल्यास त्याला दण्डाची शिक्षा सुचविली आहे. श्रीधरवर्मन याचा मध्यप्रदेशातील सागर जिल्ह्यात एरण येथील स्तंभलेख हा स्मृतिलेख असून श्रीधरवर्मन याचा सेनापती सत्यनाग याने एरण येथे धारातीर्थी पडलेल्या सेनेच्या स्मरणार्थ हा स्तंभलेख उभारला.[१०३] महाराष्ट्रामध्ये दिसणाऱ्या वीरगळाची मूळ प्रेरणा ही सातवाहनकाळ इतकी मागे जाऊ शकेल. तरीही वीरगळ हे नाव मूलतः कन्नड भाषिक आहे. पूर्वज किंवा मृत योध्दयांच्या स्मारकशिळा उभारण्याची पध्दत भारतात सर्वत्र आढळते. असे असले तरी पश्चिम भारतात व त्यातही राजपुताना, गुजरात, माळवा या भागात ती मोठ्या प्रमाणात रूढ होती. गाईचे रक्षण करताना मरण पावलेल्या योध्दयांच्या स्मरणार्थ उभारलेल्या स्मारकशिळांना पश्चिम भारतामध्ये 'गोवर्धन' या नावाने, तर पूर्वजांच्या स्मृतिप्रीत्यर्थ उभालेल्या स्मारकशिळांना 'पालिया' या नावाने संबोधतात.

महाराष्ट्र व कर्नाटकमध्ये अशा स्मारकशिळांना वीरगळ अथवा कांदळ म्हटले जाते. कांदळ याविषयी कै. राजवाडे यांचे विवेचन उल्लेखनीय आहे.[१०४] अशा वीरयोध्द्याबरोबर सहगमन करणाऱ्या सतीच्या स्मरणार्थ सतीशिळाही उभारत. यावर सतीचा हात व क्वचित जागी तिची प्रतिमा कोरलेली असते. कोल्हापूर, सोलापूर, उस्मानाबाद, सातारा या जिल्ह्यात मोठ्या प्रमाणामध्ये वीरगळ उभारल्याचे आढळते. सागरी युध्दात मरण पावलेल्या नाविक योध्द्यांच्या स्मरणार्थ बोरिवलीजवळ एक्सर येथे वीरगळ आहेत. काही वेळा अध्यात्मिक कारणासाठी मृत्यूला सामोरे जाणाऱ्या व्यक्तीच्या स्मरणार्थही स्मारकशिळा उभारीत. सोपाऱ्याजवळील निर्मल येथे बौध्द व शैव साधुंच्या स्मरणार्थ शिळा उभारल्या आहेत. शं. गो. तुळपुळे यांनी संपादित केलेल्या "प्राचीन मराठी कोरीव लेख", या ग्रंथात वेळापूर (जिल्हा सोलापूर), राणेबेन्नूर (जिल्हा धारवाड) आणि मठगाव (जिल्हा सिंधुदूर्ग) येथील वीरगळांचा उल्लेख केला असून यावर लेख आहेत. आळंदी (जिल्हा पुणे) येथे एका दाम्पत्याचा स्मारकलेख आहे, तर फुलंबरी (जिल्हा औरंगाबाद) येथील स्मारकलेख हा माधवकुमार नावाच्या योगी पुरुषाशी संबंधित आहे.[१०५] असाच वीरगळावरील लेख सावरगाव (जिल्हा परभणी) येथेही आहे. वीरगळावरील कोरीवकाम करण्याची सर्वसाधारण एक ठरलेली पध्दत दिसते. चौकानी स्तंभाच्या आकाराच्या वीरगळावर मृताशी संबंधित देवदेवतांची शिल्पेही कोरलेली असत, तर सपाट शिळांच्यावर एखादी इष्टदेवता कोरण्याची पध्दत दिसते. वीरगळ शिळेवरील प्रसंग अनुक्रमे साधारणपणे तीन किंवा चार चौकोनात विभागलेला असतो. तळाच्या चौकोनातील वर्णविषय म्हणजे वीरांचे युध्द व त्याचा मृत्यू, मधील चौकटीत त्याचे स्वर्गारोहण व वरील चौकटीमध्ये वीर स्वर्गात करीत असलेली ईशपूजा याप्रमाणे एकूण दृष्ये चित्रित केलेली असत. थोडक्यात, वीरगळ म्हणजे वीर पुरुषांचा एक संक्षिप्त चित्रपट असतो. यातून विशिष्ट घटनेची स्मृति जतन करण्याचा प्रयत्न असतो. अनेक गावात आढळणारे वीरगळ हे गोरक्षण करणे किंवा संकटसमयी मंदिरासारख्या एखाद्या वास्तूचे संरक्षण करणे, प्रसंगी ग्रामरक्षण करणे अशा अनेकविध हेतूने हौतात्म्य प्राप्त झालेल्या घटनेशी संबंधित असतात.

## मठ

अमरकोशातील व्याख्येनुसार 'मठ' म्हणजे छात्र वगैरेचे निवासस्थान. सामान्यतः संन्यस्त वृत्तीने राहणारे उदा. ब्रह्मचारी, भिक्षूक, साधु, स्त्री-पुरुष यांचे वास्तव्य मठात असे. वेगवेगळ्या सांप्रदायाचे स्वतंत्र मठ असत. केवळ अध्यात्मिक केंद्र म्हणूनच नव्हे, तर एक विद्यालय, न्यायपीठ, विश्वासाने ठेव ठेवण्याची जागा

नीतिदर्शक केंद्र म्हणून याला महत्त्व प्राप्त झाले. महाराष्ट्रात अगदी प्राचीन काळापासून गुरुकुल परंपरा अस्तित्वात असली तरी एक संस्था म्हणून तिचा विकास उत्तर काळात झाला. साधारण दहाव्या ते तेराव्या शतकामध्ये सार्वत्रिकपणे अशा मठांची उभारणी झाली असे दिसते. मध्ययुगाचा काळ हा राजकीयदृष्ट्या सामंतशाही आणि धार्मिकदृष्ट्या सिध्दसाधकांचे युग होते. याचा परिणाम म्हणून एकछत्री साम्राज्याच्या लयाबरोबर सुरू झालेली विघटन प्रक्रिया व लहानमोठ्या सामंतांचा विकास होय. सामंतांच्या सिध्दसाधकांचा वरदहस्त मिळविण्यासाठी असलेल्या मानसिकतेतून या मठस्थापत्याचा विकास होत गेला. मध्ययुगीन मठाचा उल्लेख महानुभाव साहित्यात आढळतो. हे मठ प्रारंभिक मठाप्रमाणे गिरीकपारी, निसर्गाच्या सान्निध्यात नसून ते गावाच्या मध्यवस्तीत उभारले जात. मठाच्या स्थापत्य प्रकारावरून तसेच उपयुक्ततेवरून पाषाणमठ, काष्टमठ, शास्त्रमठ, राजमठ अशा संज्ञा स्थानपोथीतून आल्या आहेत. महाराष्ट्रामध्ये बाराव्या-तेराव्या शतकात उभारण्यात आलेल्या अशा वास्तूंचा उल्लेख तत्कालीन शिलालेखात सुध्दा मिळतो. मंदिराशिवाय कीर्तन, मठ, मढी, प्रासाद, गृह, धर्मस्थळ, पुण्यस्थळ, घटिकास्थान अशासारखे शब्द प्राचीन मराठी कोरीव लेखातून आले आहेत. ह्या सर्व संज्ञा मंदिरासाठी उपयोगात येत नव्हत्या. कलचुरी काळातील **मत्तमयुरी** हा शैवपंथीयांचा मठ आठव्या शतकातील असावा. याची चर्चा वा. वि. मिराशी यांनी आपल्या ग्रंथात केली आहे.[१०६] कल्याणीचा चालुक्य राजा सोमेश्वर तृतीय याच्या काळातील **मुरारी मठ** हा धर्मापुरी (जिल्हा बीड) येथे आहे.[१०७] याच वास्तूचा उल्लेख देमरस हा दुसरा चालुक्य अधिकारी **महाग्रहार** (वेदाध्ययन केंद्र) असा करतो. शिलाहार काळातील **कौतुकमठी**ची नोंद मिळते.[१०८] या मठास जोडून पाठशाळा व अन्नछत्र असे. यादव नृपति सिंघण याचा पाटण येथील लेख यादृष्टिने उल्लेखनीय आहे. यात भास्कराचार्यांच्या विद्यालयाचा उल्लेख आहे, तर पैठण येथील सोमेश्वरदेवाच्या काळातील लेखात पैठणच्या **सस्त्रमठाची** (शास्त्रमठ) नोंद आहे.

मंदिरापेक्षा वेगळ्या असलेल्या वास्तूविधानांचा विचार करता याची तीन गटात वर्गवारी करता येते. प्रथम गटामध्ये असलेल्या वास्तू केवळ एक मंडप व त्यास असलेले मुखमंडप या स्वरूपाच्या आहेत. एखाद्या मंदिराच्या प्राकारांतर्गत असलेल्या किंवा स्वतंत्र अस्तित्व असलेल्या या वास्तू आहेत. देवगाव (जिल्हा औरंगाबाद) येथील चावडी ही वास्तू, टाकळीभान (जिल्हा अहमदनगर) येथील विठ्ठल मंदिराची वास्तू, डोमेगाव (जिल्हा अहमदनगर) येथील उंचमठ म्हणून ओळखली जाणारी वास्तू तसेच गंगाखेड (जिल्हा परभणी) येथील लक्ष्मीनारायण मंदिर म्हणून ओळखली जाणारी वास्तू, घोटण (जिल्हा अहमदनगर) येथील

मल्लिकार्जुन मंदिरातील बळीराजा मंदिराची वास्तू व लोणार (जिल्हा बुलढाणा) येथील दैत्य सूदन मंदिर प्राकारातील वास्तूची, या गटात वर्गवारी करता येते. यांचा उपयोग प्रामुख्याने विशेष प्रकाराच्या उपासना, ध्यानधारणा, अध्ययन व अध्यापन केंद्र, वेदपठण, अनुष्ठाने यासाठी होत असावा. गटातील दुस-या वास्तू ह्या मंदिराच्या परिसरातील दुय्यम वास्तू नाहीत, तर मोठे सभागृह, मंडप त्याचा मुखमंडप आणि परिसरात एखादे लहान मंदिर अशा स्वतंत्र अस्तित्व असलेल्या वास्तू आहेत. या स्वरूपाच्या वास्तूत धर्मापुरी (जिल्हा बीड ) येथील तुकाईदेवी मंदिराचा विशेषत्वाने उल्लेख करावा लागेल. चालुक्यकालीन अभिलेखात 'मुरारी मठ' म्हणून या वास्तुचा उल्लेख आढळतो. या मठासाठी म्हणून विशेष प्रकारची दाने व वृत्ती विविध व्यापारी श्रेणींच्या वतीने दिल्याची नोंद अभिलेखात आहे. यावरून तत्कालीन वेदाध्ययन केंद्र 'महाग्रहार' असेच याला म्हणता येईल. यात एक भव्य असा वंदिस्त मंडप, समोर लहानसे गर्भगृह, त्यात महिषासूरमर्दिनीची मूर्ती आणि बाहेरील बाजूस आयाताकार अर्धमंडप व त्याच्या दोन्ही बाजूला लहान उपगृह आहेत. या वास्तूच्या लगत एक लहान आकाराचे पण त्याच काळात बांधलेले स्वतंत्र छोटे मंदिरही आहे. अशा वास्तू शुष्कसांधी वास्तू प्रकारात मोडतात. याचे वितान हे समतल वितान आहे. मानूर (जिल्हा बीड) येथे या गटातील वास्तू उल्लेखनीय आहे.

तिसऱ्या गटामध्ये प्रामुख्याने निवास व्यवस्थाही आढळते हे विशेष. एका अर्थाने या वास्तू म्हणजे तत्कालीन गृहरचनेचे एक विकसित स्वरूप आहे. अशा वास्तू परभणी जिल्ह्यातील परभणी व वालूर या ठिकाणी आहेत. विहामांडवा (जिल्हा औरंगाबाद) आणि चकलांबा (जिल्हा बीड) या ठिकाणी आढळलेली वास्तू ही मठस्थापत्य या प्रकारातील सर्वाधिक विकसित झालेली वास्तू असून ती तेराव्या शतकातील आहे. चकलांबा येथील वास्तूचे स्वरूप पाहता या मठाची असलेली तत्कालीन प्रतिष्ठा स्पष्ट होते. गावाच्या मध्यवस्तीमध्ये तयार केलेल्या एका उंचवट्यावर (जोत्यावर) ही वास्तू असून मध्यभागी मोठे मैदान राखून त्याच्या तिन्ही बाजूला सलग असे मंडप उभारले आहेत. समोरील भागात एक मोठा हॉल (भांडारगृह), त्यानंतर एक लहानसे पण पूर्ण विकसित मंदिर, त्यालगत मुख्य मठाधिपतीची नेहमी बसण्याची खोली आणि त्यानंतर पुन्हा एक प्रशस्त असा हॉल व या सर्वांना सांधणारा मोठा आयताकार मुखमंडप असे या वास्तूचे स्वरूप असून, वास्तूत असलेल्या मुख्य मैदानातच एक आड आहे. ही वास्तू उभारताना मध्यभागी पूर्व-पश्चिम १० मीटर व उत्तर-दक्षिण २५ मीटर असे खूले मैदान राखून ठेवले आहे. यावरून या वास्तूच्या भव्यतेची कल्पना यावी.

राजसत्तेचे प्रतिक म्हणून या वास्तूच्या चारही कोपऱ्यात बाहेरील बाजूने चार बुरूज उभारण्यात आलेले होते.[१०९] जवळ असलेल्या अंबाजोगाई येथील यादव सेनापती खोलेश्वर याच्या काळातच या वास्तूचा विकास झाला असावा. यासारख्या वास्तू निश्चितपणे रूढ अर्थाने मंदिरस्थापत्यापेक्षा काहीशा वेगळ्या आहेत.

## बारव स्थापत्य

महाराष्ट्राच्या जलव्यवस्थापनात असाधारण महत्त्व असलेल्या पायविहीर, बारव स्थापत्य यांचा अभ्यास फारसा झालेला नाही. एका विशिष्ट कालखंडामध्ये मंदिरांची उभारणी आपल्याकडे फार मोठ्या प्रमाणात झाली. सामान्यपणे यादवशैलीची (हेमाडपंती) म्हणून अशी मंदिरे ओळखली जातात. याच काळात बारव स्थापत्याची निर्मितीही मोठ्या प्रमाणात होत होती.[११०] डॉ. ए. व्ही. नाईक यांनी आपल्या प्रबंधात या विषयीची काहीशी नोंद घेतली आहे. असे असले तरी प्राचीन साहित्य आद्य मराठी वाङ्मय आणि रूढ मराठी बोली भाषेत जलाशयाला अनेक पर्यायी शब्द रूढ आहेत. अगदी प्रारंभिक काळात लयननिर्मितीबरोबरच 'पाणीयपोढी' किंवा 'पाणपोढी' म्हणजे पिण्याचे पाणी साठविण्याची टाकी आणि 'न्हानकोढी' म्हणजे स्नानासाठी व अन्य उपयोगासाठी लागणाऱ्या पाण्याचा साठा करण्यासाठी विविध आकाराच्या टाक्या खोदण्यात आल्या. किल्ल्याची निर्मिती होत असताना सर्वप्रथम निश्चित जलस्रोताचा शोध घेऊन आवश्यक त्या ठिकाणी टाक्या व कूप तयार केल्याचे दिसतात. गोदावरी, कृष्णा, मांजरा, चंद्रभागा अशा नद्यांच्या परिसरात ज्याठिकाणी वसाहती निर्माण झाल्या तेथे प्रामुख्याने घाट बांधण्यात आले. निसर्गतः उपलब्ध नदीच्या काठाचा योग्य उपयोग करून घेण्याच्या दृष्टीने अशा वैशिष्ट्यपूर्ण घाटांची निर्मिती सातवाहन काळापासून होत असावी. अन्य स्थानांवर नगरे वसवताना मात्र भूगर्भातील जलाशयाचा शोध घेऊन विविध प्रकारचे आड, विहिरी, बारव व पोखरणी यांची निर्मिती करण्यात आली. दक्षिण भारतामध्ये रामेश्वर सारख्या जंबू द्विपावर जाणीवपूर्वक अनेक तीर्थे व पुष्करणी यांची निर्मिती झाली. केवळ रामेश्वर मंदिरामध्ये २२ बावी खोदण्यात आल्या. महाराष्ट्रामध्ये लोणार (जिल्हा बुलढाणा) येथे उल्कापातातून निर्माण झालेल्या विवराच्या परिसरात अनेक बारवांची निर्मिती करण्यात आली. विविध राजवटीतील प्रमुख स्थाने व तीर्थक्षेत्रे उदा. त्र्यंबकेश्वर, परळी-वैजनाथ,औंढा-नागनाथ, माहूर, तुळजापूर, कोल्हापूर अशा ठिकाणी अनेक कुंड, कल्लोळ यांची निर्मिती झाली. या स्थानांवरील जनसमुहाची पाण्याची गरज भागविण्याच्या दृष्टीने अशा वास्तूंची निर्मिती होत असतानाच पुण्यप्राप्तीविषयक संकल्पनाही जनमाणसात रुजविली गेली. यातून

लोणार, चारठाणा, ईडोळी, सिंदखेडराजा, पिंगळी इ. ठिकाणी प्रशस्त बारवांची निर्मिती झाली. एका मोठ्या बारवेच्या बांधकामासाठी घ्यावे लागणारे परिश्रम हे एका मंदिर संकुलाची उभारणी करता येईल एवढे असत. बारवेच्या संदर्भामध्ये त्यांचे पावित्र्य जपण्याच्या दृष्टीने अनेक लोककथा रूढ झाल्याचे विविध स्थल महात्म्यातून दिसते व पौराणिक संदर्भही याला पुष्टी देतात. बारव निर्मितीचे तंत्र आणि त्यांचे आकार-प्रकार याविषयी प्राचीन ग्रंथातून उल्लेख आढळतात. श्री. भुवनदेव यांनी लिहिलेल्या **अपराजितपृच्छा** (सन ११७५ ते १२५०) या ग्रंथात "वापीकूपतडागादिनिर्णयो नाम" या मथळ्याचे प्रकरण आहे. यात म्हटल्याप्रमाणे नगराच्या बाहेर व आत निरनिराळ्या प्रकारचे जलाशय असावेत. विहीर, वापी हे कूपाचे प्रकार होत. कुंड म्हणजे तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी स्नानासाठी बांधलेले मोठ्या आकाराचे पण उथळ हौद होत. कूपाचे दहा, वापीचे चार, कुंडाचे चार व तडागाचे सहा प्रकार या ग्रंथात दिले आहेत. **नंदा** म्हणजे एक मुख व तीन कूट असलेली वापी. मुख म्हणजे विहिरीच्या पाण्याच्या पातळीपर्यंत जाण्यासाठी विहिरीस असलेला प्रवेश मार्ग, तर कूट म्हणजे चौरस खोली, मंडप किंवा माड होय. हे आकाराने चौरस किंवा आयताकृती असतात. नंदाच्या नंतर **भद्रा** (दोन मुख व सहा कूट), **जया** (तीन मुख व नऊ कूट), **विजया** (चार मुख व बारा कूट) असे प्रकार दिले आहेत. याज्ञवल्क्य, कात्यायन यांनी वापी, कूप तडाग यांच्या व्याख्या दिल्या आहेत.

नगररचनेचा विचार करता बारवेला स्वतंत्र असे स्थान होते. **बृहत्कल्पसूत्रभाष्य** या ग्रंथात या विषयी नोंद आढळते. ज्या गावात मध्यभाग सखल व इतर भाग उंच आहे, ज्या गावात मध्यभागी बारव आहे आणि तेथील घरांची रचना वर्तुळाकार आहे अशा वस्तीला 'उत्तन मल्लकाकार' असे संबोधले जाई. बारव निर्मितीची प्रेरणा स्मृतीग्रंथ व पुराणांनी सतत दिली आहे. बारव स्थापत्याच्या विकासाबरोबरच त्यातील देवताविषयक संकल्पनाही स्पष्ट होत गेल्या. कंधार येथील राष्ट्रकूटकालीन विहिरीमध्ये देवता ठेवण्यासाठी रिक्त जागा मुद्दाम ठेवली असली तरी देवकोष्ठ बांधलेले नाही. सप्तमातृका किंवा नागदेवता यांची विहिरीलगत स्थापना करणे येथपासून अष्टदिक्पाल तसेच विष्णूच्या चोवीस रूपांची स्थापना बारवेत करणे यासारख्या बाबींचा विकास झाला. जागजी (जिल्हा उस्मानाबाद), पिंगळी (जिल्हा परभणी) याठिकाणी अशा मूर्तींची स्थापना झाली. ईडोळी (जिल्हा जालना) येथे एकादशरुद्रमूर्तींची स्थापना करण्यात आली, तर लोणार येथील बारवेत आज मूर्ती नसल्या तरी तेथे असलेल्या देवकोष्ठावरून एकूण एकतीस देवतांची स्थापना झाली असावी असे दिसते.

मध्ययुगीन बारवेंच्या संदर्भामध्ये शेषशाही विष्णूमूर्ती ही प्रमुख देवता असल्याचे स्पष्ट होते. गुजरातमधील अनहिलवाह-पाटण जवळील '**राणीकी बाव**' याठिकाणी एकूण सात मजली विहीर साळुंकी वंशाने निर्माण केली, ज्यात २५० पेक्षा अधिक देवतामूर्ती होत्या. एवढी मोठी बारव महाराष्ट्रात आढळत नाही. असे असले तरी सिंदखेडराजा येथील पुतळा बारव किंवा त्र्यंबकेश्वर येथील अठराव्या शतकातील कुशावर्त हे तीर्थ तीन कूट व एक प्रवेश असलेले उल्लेखनीय कुंड आहे.

महाराष्ट्रातील बारवांची वर्गवारी अनेकप्रकारे केली जाऊ शकते. उदा. त्यांचे रूढ नाव, त्यांचे विधान, त्यांचा उपयोग, त्यातील देवकूलीकांची संख्या इ. बारवांचे स्थापत्यशास्त्रीय वैशिष्ट्य, त्यांचे विधान व प्रवेश (मुख) विचारात घेता त्यांची पुढील प्रमाणे वर्गवारी करता येईल.

**कुंड** : कुंड म्हणजे तीर्थस्थानाच्या ठिकाणी स्नानासाठी बांधलेला मोठ्या आकाराचा उथळ हौद. यांचा आकार साधारणत: २ ते २.५ मीटर खोल व १० मीटर चौरस रुंद असा आढळतो. तेर (जिल्हा उस्मानाबाद) येथे राज्य पुरातत्व विभागाने केलेल्या साफसफाईच्या वेळी आढळलेले कुंड हे महाराष्ट्रातील सर्वात प्राचीन कुंड असून ते विटानी बांधलेले आहे. ८.३० चौ. मी. आकाराच्या या कुंडाची तळापासून उंची २.७० मी. आहे व ९० सें. मी. चा एक टप्पा असे तीन टप्पे यात आहेत. इ. स. च्या पहिल्या शतकातील सातवाहन काळातील हे कुंड आहे, तर विदर्भातील मांढळ (जिल्हा नागपूर) येथे चौथ्या शतकातील विटांनी बांधलेले कुंड उपलब्ध झाले आहे. हे वाकाटककालीन असून वाकाटक राजा दुसरा प्रवरसेन व दुसरा पृथिवीषेण यांचे ताम्रपट येथे मिळाले आहेत. कुंड या प्रकारात येणाऱ्या वास्तूंची उदाहरणे होट्टल, मुखेड, माहूर (जिल्हा नांदेड), पाली (जिल्हा बीड), त्र्यंबकेश्वर (जिल्हा नाशिक) इ. ठिकाणी आहेत. मुद्दाम तयार केलेल्या जलाशयालगतसुध्दा प्रसंगी कुंडांची निर्मिती करण्यात येई.

**विहीर** : एक प्रवेश असलेली वापी म्हणजे विहीर. याला पायविहीर असेही म्हणतात. यामध्ये वर्तुळ, अष्टकोन व चौरस असे आकार आढळतात. बहाद्दरपूरा, (तालुका कंधार, जिल्हा नांदेड) येथे राष्ट्रकूटकालीन पुरातत्व क्षेत्र असलेल्या भागात सन १९९५ मध्ये रस्त्याचे काम चालू असताना चौरस आकाराची एक पायविहीर उघडकीस आली. तळणी (तालुका हदगाव, जिल्हा नांदेड) येथे असलेली विहीर विटांनी बांधलेली असून प्रवेशासाठीच्या पायऱ्या दगडी चिऱ्यांच्या आहेत. यामध्ये दोन देवकोष्ठ आहेत. वर्तुळाकार विहिरींची उदाहरणे आपणाला कंधार (जिल्हा नांदेड), चकलांबा (जिल्हा बीड), पानगाव (जिल्हा लातूर)

याठिकाणी मिळतात. अष्टकोनी आकाराची विहीर धर्मापुरी (जिल्हा बीड) व लासूर (जिल्हा औरंगाबाद) याठिकाणी आहे.

**आड** : द्वारहीन जलाचा संग्रह म्हणजे कूप. यालाच आड असे म्हणता येईल. ही केवळ मर्यादित उपयोगासाठी बांधलेली वास्तू असून याला प्रवेश मार्ग नसतो. आडाचा आकार साधारणपणे एक मीटरपेक्षा कमी व्यासाचा असतो. यामध्ये प्रामुख्याने चौरस, अष्टकोनी आकार आढळतात. कंधार येथे अष्टकोनी आकारातील आड असून त्याची रचना वैशिष्ट्यपूर्ण आहे. एखादी टोपली विणावी त्याप्रमाणे दगडी शिळांची रचना असलेला हा आड खालील बाजूस निमुळता होत जातो. मुखेड (जिल्हा नांदेड) येथील चालुक्यकालीन दाशरथेश्वर मंदिराजवळील चौरस आड ९० x ९० सें. मी. चा आहे. अर्धापूर, माहूर, मुगूट (जिल्हा नांदेड) या यादवकालीन स्थानांवर असे आड आहेत.

**कल्लोळ** : कुंड या वास्तू प्रकारचे थोडे विकसित स्वरूप म्हणजे कल्लोळ. हे प्रामुख्याने मंदिराच्या समोर किंवा प्राकारात बांधलेले असतात. याला बारवेसारखे प्रवेशमार्ग व टप्पे असतात, पण बारवेच्या तुलनेत आकार व विस्तार लहान असतो. हतनूर (जिल्हा परभणी) येथील कल्लोळ हे यादवकालीन असून शके १२२३ (सन १३०१) मध्ये या स्थानाचा जीर्णोध्दार केल्याचा लेख उपलब्ध आहे.

**बारव** : कुंड हा मुळात या वास्तुप्रकाराचा आधारभूत घटक ठरतो. या कुंडाच्या वर विशिष्ट पायऱ्या ठेऊन एक पटांगण-सोपान (टप्पा) ठेवतात. त्यानंतर दुसरा व तिसरा सोपान ठेऊन झालेला विस्तार बारव स्थापत्यात पहावयास मिळतो. थोडक्यात, एकात एक लहान होत जाणारे कुंड असे याचे स्वरूप असते.[१११] बारवेत विविध देवतांची स्थापना केली जाते. त्यासाठी असलेली देवकोष्ठे सर्वात वरच्या सोपानावर स्वतंत्र अशी किंवा अगदी संरक्षक भिंतीत आणि प्रवेश मार्गाच्या दोन्ही बाजूंना ठेवतात. बारवेत प्रामुख्याने चौरस आकार आढळतो. आयत व क्वचित् अष्टकोनी आकार पहावयास मिळतात. बारवेस एक ते चार मुख-प्रवेश असतात. एक प्रवेश व चौरस आकार असलेल्या एरगी (तालुका देगलूर, जिल्हा नांदेड) येथील बारवेत तीन टप्पे आहेत. आयत आकाराची बारव मुखेड (जिल्हा नांदेड) येथे असून १६ x १०.५० मी. आकाराची ही एक वैशिष्ट्यपूर्ण बारव आहे. बारवेच्या प्रवेशावर असलेला सज्जा आज अस्तित्वात नाही. विविध सोपानांवरून खाली उतरण्यासाठी असलेल्या पायऱ्या व एकूण रचना पाहता कर्नाटकातील हंपी (जिल्हा बेल्लारी) येथील उत्खननात मिळालेल्या बारवेशी हिचे साम्य आढळते. या परिसरातील शिलालेख

व अन्य वास्तू पाहता ही बारव चालुक्यकालीन असून ती बाराव्या शतकातील आहे असे म्हणता येते. एक प्रवेश असलेली व अष्टकोनी आकाराची बारव मरळक (खु.) (जिल्हा नांदेड) येथे असून या बारवेलगत दगडी हौद आहे. बारवेतील पाणी रहाटाद्वारे उपसून ते प्रणालाद्वारे हौदात जमा केले जाई. मोटेची व्यवस्था असलेली उत्कृष्ट अशी चौरसाकार बारव येवती (तालुका बिलोली, जिल्हा नांदेड) येथे आहे. मंचर (जिल्हा पुणे) या ठिकाणी शिलालेख असलेली चौरसाकार बारव आहे, तर दोन प्रवेश असलेल्या बारवेमध्ये सिल्लोड (जिल्हा औरंगाबाद), गुरसाळे (जिल्हा सातारा), पुरंदर (जिल्हा पुणे) येथील बारवा उल्लेखनीय असून या प्रकारातील सर्वात चांगली बारव जागजी (जिल्हा उस्मानाबाद) येथे आहे. २४ चौ. मी. आकाराची ही बारव एकूण पाच टप्प्यात पूर्ण केलेली आहे. प्रथम सोपान आहे त्याच ठिकाणी भिंतीलगत चारही बाजूस मिळून एकूण २४ देवकोष्ठांची निर्मिती करण्यात आली आहे. यात विष्णूमूर्ती असून देवकोष्ठांचे शिखर द्राविड व भूमीज शैलीतील आहे.

**तीन प्रवेशयुक्त बारव** : वस्तुतः बारव या स्थापत्य प्रकारामध्ये चार प्रवेश हा सर्वसामान्य प्रकार आढळतो. पण काही वेळा उपलब्ध क्षेत्र व स्थानिक काही कारणांमुळे तसेच पाण्याच्या कमीअधिक उंचीवरील उपलब्धतेमुळे मूळ आराखड्यात काही बदल केल्याचे दिसतात व यातूनच तीन प्रवेशयुक्त बारवांची निर्मिती झाली असावी. अशा बारवा एरगी (तालुका देगलूर, जिल्हा नांदेड), एरंडेश्वर, (जिल्हा परभणी), जालना (जिल्हा जालना), तोंडापूर (जिल्हा जळगाव), कातरखटाव (जिल्हा सातारा), मानूर (जिल्हा बीड), वेळापूर (जिल्हा सोलापूर) येथे आहेत.

**चार प्रवेशयुक्त बारव** : बारव स्थापत्यात सर्वत्र रूढ असलेला हा प्रकार असून माहूर (जिल्हा नांदेड), अंबड (जिल्हा जालना), वालूर व गौर (जिल्हा परभणी) येथे अशा बारवा आहेत. या स्थापत्य प्रकारातील चांगली बारव पिंगळी (जिल्हा परभणी) येथे असून २५.६० चौ. मी. आकाराची ही चौरस बारव आहे. सहा पायऱ्यानंतर प्रथम सोपान लागतो. यात एकूण पाच सोपान असून प्रथम सोपान ९५ सें. मी. रुंद आहे. दुसरा व तिसरा सोपान ८८ सें. मी. रुंदीचा आहे. बारवेस असलेल्या संरक्षक भिंतीनंतर सुरू होणाऱ्या प्रथम सोपानावर प्रत्येक बाजूस दोन असे एकूण आठ देवकोष्ठ बांधलेले आहेत. बारवेलगत त्रिदल पध्दतीचे मंदिर असून या बारवेच्या निर्मितीस नाथपंथीय तंत्रसाधकांचे प्रोत्साहन असावे असे येथील शिल्पपट व "मकरध्वज जोगी ७०००" या लेखावरून वाटते. शाक्त पंथियांच्या पंचमकार साधनेत मैथुनाचीही नोंद आहे. "जलकेणी" जलक्रीडा यासाठीसुध्दा कदाचित बारवेचा उपयोग होत असावा. तंत्रदृष्ट्या ही

बारव अतिशय प्रमाणबध्द व रेखीव आहे. याच प्रकारातील सिंदखेडराजा (जिल्हा बुलढाणा) येथील बारव उल्लेखनीय आहे. बारवेवरील विपुल शिल्पांकनामुळे ही 'पुतळा बारव' या नावानेही ओळखली जाते. अलंकरणाच्या दृष्टीने पाहता महाराष्ट्रातील बारवेची ही स्वामीनी ठरते. १५.७० चौ. मी. आकारातील ही बारव एकूण सात टप्प्यात पूर्ण केली आहे. मधोमध असलेले कुंड व त्यावर विकसित होत जाणारे टप्पे, मुख्य सोपानानंतर असलेली संरक्षक भिंत व चारही बाजूंनी असलेला प्रवेश अशी याची रचना आहे. संरक्षक भिंत उभारताना एक सलग गजथर उभारून त्यावर विविध देवदेवतांसाठी स्वतंत्र अशी २४ देवकोष्ठे निर्माण केली आहेत. याशिवाय विविध देवता, देवांगना, देवानुचर, देवता परिवार व असूर यांचे शिल्पांकन येथे आहे. विविध प्रकारची भौमित्तीक नक्षी, अश्वारूढ योध्दे, त्यांच्या कवायती, याशिवाय हंसथर व नृत्यांगना येथे पहावयास मिळतात. बारवेची एक बाजू निखळलेली आहे. देवकोष्ठ उभारतांना विकसित मंदिराची लहान प्रतिकृतीच साकार करण्याचा प्रयत्न केला आहे. ही तंत्रदृष्ट्या एक परिपूर्ण बारव असून, बारवेच्या रचनेत भद्र, प्रतिभद्र, सुभद्र यांचा उपयोग केला आहे. या बारवेची निर्मिती साधारणपणे बाराव्या शतकाच्या उत्तरार्धात झाली असावी.

ईडोळी (तालुका परतूर, जिल्हा जालना) येथील बारव ३१ चौ. मी. आकाराची आहे. चार प्रवेश व पाच सोपान असलेली ही बारव असून मुख्य सोपानावर असलेली संरक्षक भिंत २.५० मी. उंचीची आहे. या भिंतीमध्ये अनेक देवळ्यांची निर्मिती केली आहे. देवतांसाठी बांधलेली ही लहान मंदिरे असून गर्भगृह (१.३० चौ. मी.) व त्यापुढे मुखमंडप (१.५० चौ. मी. ) आहे. या मंदिरांच्या समोर प्रशस्त सोपान (पटांगण) आहे. एकूण १६ मंदिरे व १० देवकोष्ठ या बारवेत आहेत. बारवेतील मंदिरांच्यावर विटात बांधलेले शिखर होते हे विशेष. बारवेच्या एकूण बांधकामाची उंची नऊ मीटर आहे. बारव स्थापत्याच्या दृष्टीने बारवेची रचना उत्कृष्ट आहे, तथापि काही स्थानिक अडचणींमुळे सगळ्यात शेवटच्या टप्प्यातील कुंड तंत्रदृष्ट्या परिपूर्ण वाटत नाही. या कुंडाची रचना करताना दगडी दट्टे, तोडशिळा तसेच गळबंध यांचा पुरेसा उपयोग योग्य जागी न केल्यामुळे येथील काही भाग निखळला आहे.

## मंडपयुक्त बारव-जलमांडवी

बारव स्थापत्यामध्ये विविध आकार व प्रकार आढळतात. तसेच बारवेत कूट किंवा मंडप पण दिसतात. लोकभाषेत अशा बारवांना 'माड' म्हणतात.

वेची पुढील विकसित अवस्था म्हणजे कूट, भिट्ट, सज्जायुक्त मंडप होय. हे प आकारातील व बहुतांश आयताकार असतात. बारवेत जसे एक ते चार ा आढळतात तसेच एका बाजूपासून सर्व बाजूने विकसित झालेला मंडप ळतो. महानुभाव साहित्यात अशा बारवांना "जलमांडवी" म्हटले आहे. ान्य बारवेच्या बांधकामापेक्षा हे काम जास्त खर्चिक असते. बारव निर्मितीची व या स्थापत्याची उपयुक्तताच यातून स्पष्ट होते.

**ृकमंडपयुक्त बारव** : अशा बारवा महाकाळा (जिल्हा जालना), मुदखेड ल्हा नांदेड), उपळा (जिल्हा उस्मानाबाद) याठिकाणी आहेत. लोणी भापकर नुका बारामती, जिल्हा पुणे) येथे या प्रकारातील एक चांगली बारव आहे. या वेत एक मंडप असून २८ देवकोष्ठ आहेत. मंडपाच्या स्तंभावरील व ऱ्यावरील अलंकरण लक्षणीय आहे.

**ोन मंडपयुक्त बारव** : या प्रकारातील उल्लेखनीय बारव अंवड (जिल्हा ना) येथे आहे ती कावंदी या नावाने ओळखली जाते. बारवेचा आकार पूर्व-म २३.४० मी. व उत्तर-दक्षिण १९.८० मी. आहे. या बारवेस तीन टप्पे त. उत्तर-दक्षिण बाजूस दोन स्वतंत्र मंडप बांधलेले असून बारवेच्या उत्तर स असलेला मंडप हा खालील मुख्य कुंडापर्यंत पुढे आलेला आहे. दक्षिण ोतील मंडप आयताकार आहे. या रचनेचे मुख्य वैशिष्ट्य म्हणजे दोन्ही ांच्या पातळीमध्ये ८० सें. मी. चा फरक असून बारवेत वेगवेगळ्या पातळीवर ो असताना त्याचा उपयोग करणे शक्य होई. तसेच उत्तर बाजूकडील ातील अगदी शेवटच्या कुंडात असलेले पाणी उपसून घेणे शक्य होई. या वेचे जतनविषयक काम स्थानिक स्वराज्य संस्थेने केले आहे. या प्रकारातील ू भोकरदन (जिल्हा जालना), टाकळी (जिल्हा अहमदनगर), बिडकीन (जिल्हा गाबाद) या ठिकाणी पहावयास मिळतात.

**ीन मंडपयुक्त बारव** : तीन मंडपयुक्त बारवेचे आदर्श उदाहरण त्र्यंबकेश्वर ल्हा नाशिक) येथे 'कुशावर्त'च्या स्वरूपात पहावयास मिळते. मुळात यादवकालीन कोनी कुंडाची संपूर्ण पुनर्बांधणी होळकरांनी अठराव्या शतकात केली. चार युक्त बारवेमध्ये चारठाणा (तालुका जिंतूर, जिल्हा परभणी) या बारवेची करावी लागते. गोकुळेश्वर मंदिराच्या ईशान्य बाजूस ही बारव आहे. ाच्या दृष्टीने तीन मुख व मुखाच्या दोन्ही बाजूस कूट असलेली ही जलमांडवी ' या प्रकारात मोडते. २३ चौ. मीटर आकाराची ही बारव असून संरक्षक ोस लागून मंडपाची निर्मिती करण्यात आली आहे. या बारवेत एकूण २७

देवकोष्ठे असून पूर्व-पश्चिम भागास दोन मोठी गर्भगृहे ठेवली आहेत. एकात एक अशा सहा टप्प्यात पूर्ण झालेली ही बारव मंडपासाठी महत्त्वाची ठरते. या बारवेसाठी एकूण २४ पूर्ण स्तंभ व ४४ अर्धस्तंभांची निर्मिती करण्यात आली आहे. लोणार (जिल्हा बुलढाणा) या ठिकाणी लिंबी बारव ही एक महत्त्वपूर्ण बारव असून गावात अन्य कुंडही आहेत. केंद्रिय पुरातत्व विभागाने संरक्षित केलेली ही वास्तू २६ चौ. मी. आकाराची असून एकूण पाच टप्प्यात पूर्ण करण्यात आली आहे. बारवेत सर्वात शेवटी असलेल्या कुंडानंतर पाच पायऱ्या ठेऊन त्यावर एक सोपान ठेवला आहे. हा २५ सें. मी. रुंदीचा आहे. या टप्प्यावरील पायऱ्यांना कोठेही पुढे आलेला दट्टा अथवा तोंडशिळा दिसत नाही. यावरील दुसरा सोपान पाच पायऱ्यानंतर असून तो ७० सें. मी. रुंदीचा आहे. त्यानंतरचा सोपान ७३ सें. मी. रुंदीचा आहे. यावरील सोपान सर्वात रुंद असून तो २.१० मी. आहे. या सोपानावर सर्व बाजूंनी मंडप बांधलेला होता. मुळात असलेला हा मंडप आज अस्तित्वात नसून केंद्रिय पुरातत्व विभागाने केलेल्या जतनविषयक कामानंतरसुध्दा येथे दिसणाऱ्या अवशेषावरून या मंडपाची कल्पना स्पष्ट होते. मंडपातून बाहेर पडणारे प्रवेश मार्ग हे उत्तर-दक्षिण व पश्चिम बाजूस आहेत. हे तीन मुख्य प्रवेश-मुख १.९० मी. रुंदीचे असून त्यात प्रत्येकी दहा पायऱ्या आहेत. येथे योग्य जागी सोपान ठेवलेला आहे. मंडपाची उंची २.५० मीटर होती. सभोवताली असलेल्या संरक्षक भिंतीशी संलग्न असे हे मंडप असून बारवेच्या एकूण बांधकामाची उंची तळापासून १० मी. आहे. प्रत्येक पायरी २५ सें. मी. उंच व रुंद आहे. या बारवेस मंडप उभारताना एकूण ७६ अर्धस्तंभ व ५४ पूर्ण स्तंभ असे १३० स्तंभ मूलतः बसविलेले असावेत. बारवेच्या पूर्व भागास प्रवेश नाही. या बाजूस असलेल्या मंडपाच्या केंद्रभागी एक गाभारा (२१०x२१० चौ. मी.) ठेवलेला आहे. गाभाऱ्याची विभागणी गर्भगृह व अंतराळ अशी करून मंडपाच्या पुढील भागात निर्माण केलेला अर्धमंडप दिसतो. चार स्तंभावर उभा असलेला हा अर्धमंडप कक्षासनयुक्त आहे. यावर लहान स्तंभ व कूट शिखर तसेच भौमित्तीक नक्षीचे अलंकरण आहे. बारवेच्या मंडपात गर्भगृहासह अन्य तीस देवकोष्ठे आहेत. या वास्तूचे अन्य एक विशेष म्हणजे मंडपाच्या पुढे दर २.३० मी. अंतरावर म्हणजे मुळात मंडपास असलेल्या पूर्ण स्तंभांच्या पुढे मुद्दाम बसविलेल्या दगडी चौरंग ( ८२.६८ सें. मी. आकार) आहेत. येथे बसून काही विशिष्ट धार्मिक विधी पूर्ण करता येत असावेत. तसेच दिपोत्सवासारख्या उत्सवाची शोभा अवलोकन करता येई. प्रमाणबध्दता व सुनियोजित परिपूर्ण रचना यासाठी ही बारव श्रेष्ठ ठरते. स्थल माहात्म्यामध्ये

'वायुतीर्थ ' असा या स्थानाचा उल्लेख आहे. चित्रसेन राजाची कन्या नंदा हिला या ठिकाणी सूर्यनारायण प्रसन्न होऊन गतजन्मीच्या पापापासून मुक्ति मिळाली यासारखे कथानक सांगितले जाते. बारवेच्या पूर्व बाजूस असलेले भद्र व त्यातील गर्भगृहात मुख्य मूर्तीची अधिष्ठान शिळा असून (७२ x १३६ x ४० सें. मी.) त्यावर गणेशासह अष्टदिक्पाल दर्शविले आहेत. यावर कदाचित शेषशाही विष्णूची मूर्ती असावी. आज हे स्थान व अन्य देवकोष्ठे रिक्त आहेत. येथील शिल्प व स्थापत्याचा विचार करता या बारवेची निर्मिती बाराव्या शतकात झाली असावी.

**पोखरणी** : पोखरणी हा शब्द यादव काळात पुष्करणी यासाठी रूढ होता. पोखरणी हे पुष्करणीचे प्राकृत रूप होय. लीळाचरित्रातूनही ही संज्ञा येते. बारवेपेक्षा विस्तीर्ण जलाशय म्हणजे पोखरणी. याचे स्थापत्य शास्त्रीय वैशिष्ट्य म्हणजे कमी खोलीवर विस्तीर्ण असा भाग तळाशी ठेऊन बांधकाम करतात. स्वाभाविकपणे यात टप्पे असत नाहीत. बारवेच्या तुलनेत कमी रुंदीचे बांधकाम असते. पोखरणीचे ठळक वैशिष्ट्य म्हणजे समतल भाग जास्तीतजास्त मोठे ठेऊन कमीतकमी टप्प्यात पूर्ण केलेले बांधकाम होय. अशा वास्तूचे वर्णन करताना कमलवेलीनी युक्त असलेला जलाशय म्हणजे पुष्करणी असेही म्हटले जाते. याच्या मध्यभागी काही वेळा मंडप उभारतात. विशेषतः दक्षिण भारतात अशा वास्तू आढळतात. मद्रास येथील कपिलेश्वर मंदिराजवळील जलाशय, तिरूपती व मदूराई येथील जलाशय उल्लेखनीय आहेत. महाराष्ट्रामध्ये औंढा नागनाथ (जिल्हा परभणी), अंबड (जिल्हा जालना), त्र्यंबकेश्वर (जिल्हा नाशिक), होट्टल (जिल्हा नांदेड) व याच जिल्ह्यातील माहूर येथील मातृतीर्थ तसेच वाशिम (जिल्हा वाशिम) येथील कंकालेश्वर मंदिर हे एका विस्तीर्ण जलाशयात (९५.५० x ७७.२५ मी.) उभारले आहे. पोखरणीमध्ये बऱ्याचदा पाणी उपसण्यासाठी मोटेची व्यवस्था असते (याला बगाड म्हणतात). त्याठिकाणी तळाशी चौरस किंवा आयत खड्डा (कुंड) खोदलेला असतो. ही बाब अंबड (जिल्हा जालना) व होट्टल (जिल्हा नांदेड) येथील पोखरणीवरून स्पष्ट होते. बेल्हे (जिल्हा पुणे), रांजणगाव (जिल्हा अहमदनगर) येथे पुष्करणी आहेत.

**तडाग** : पोखरणीपेक्षा मोठ्या जलाशयाला तडाग-तळे किंवा तलाव म्हणतात. निसर्गतः उपलब्ध पाणलोट क्षेत्राची निवड करून योग्य ठिकाणी बंधारा बांधून निर्माण केलेला जलाशय म्हणजे तडाग. याची नोंद यापूर्वी केली आहे.

महाराष्ट्राच्या संदर्भामध्ये तेर किंवा मांढळ येथील विटातील कुंडानंतर आढळणाऱ्या बारवा या प्रामुख्याने आठव्या-नवव्या शतकापासूनच्या आहेत.

मोठ्या प्रमाणात या वास्तूंची निर्मिती अकराव्या ते तेराव्या शतकात झाली. अभिलेखीय नोंद उपलब्ध असलेल्या बहुतांश बारवा या बाराव्या शतकातील आहेत. उदा. गणेशवाडी येथील विक्रमादित्य सहावा याच्या काळातील लेख, होट्टल येथील चालुक्यकालीन शिलालेख, लातूर येथील भूतनाथ मंदिरातील लेख किंवा धर्मापुरी येथील शिलालेख. आज अस्तित्वात असलेल्या बारवांचा विचार करता त्या तंत्रदृष्ट्या उत्कृष्ट होत्या असे म्हणता येईल. तसेच त्या-त्या स्थपतीने बारव निर्मितीसाठी निवडलेले क्षेत्र व शोधलेले जलस्रोत हे अचुकपणे शोधले होते. त्यामुळे आजही अशा वास्तू कमी-अधिक प्रमाणात उपयोगात आणल्या जातात. जेथे बारव, जलमांडवी, पोखरणी आहेत त्याठिकाणी उपलब्ध शिलालेखांचा अभ्यास करताना हे स्पष्ट होते की, अशा वास्तूंची निर्मिती होत असताना केवळ कुठल्या एका विशिष्ट राजवंशाची सत्ता नव्हती; किंवहुना राष्ट्रकूट, कल्याणचे चालुक्य, शिलाहार, कलचुरी, यादव या राजवंशांची सत्ता असताना त्या त्या स्थानावरील महत्वाकांक्षी सेनानी, सामंत, श्रेष्ठी व क्वचित जागी सामान्य गणिकांनीही स्वतंत्रपणे याची निर्मिती केली आहे. स्वाभाविकपणे रूढ आराखड्यांना स्वीकारून ही निर्मिती झाली असली तरी काही स्थानिक वैशिष्ट्येही त्यातून व्यक्त झाली आहेत.

उत्तर काळात साधारणतः चौदाव्या शतकानंतर यादव शैलीतील मंदिरांची निर्मिती कमी झाली, तसेच अशा प्रकारच्या बारवांची निर्मितीही थांबली. यानंतर विहिरीत चौरस व वर्तुळाकार आणि एका बाजूने प्रवेश असलेल्या विहिरी निर्माण झाल्या. प्रामुख्याने ज्या राजवटीत प्रार्थना मंदिरांवर गोलघुमट बांधण्यात आले त्या काळात कटोरा बावडी हा प्रकार लोकप्रिय झाला. मोठ्या आकाराचे अनेक मजले व दालने असलेल्या विहिरींचीही निर्मिती झाली. यांना कुपागार म्हणणे योग्य ठरते. उत्तर काळातसुध्दा शाश्वतमुल्य असलेल्या बारवांची जपणूक झाली.

## तळटिपा

भाजे येथील चैत्यगृह सर्वाधिक प्राचीन चैत्यगृह आहे असे विद्या दहेजिया मानत नाहीत. कोंदिवटे व नाडसूर येथील चैत्यगृहे भाजे येथील चैत्यगृहाहूनही प्राचीन आहेत असे त्यांचे मत आहे. पुढे मंडप, त्यामागे दुतर्फा खिडक्या असलेले चैत्यगृहाचे द्वार व त्यामागे वर्तुळाकार चैत्यगृह असे कोंदिवटे येथील चैत्यगृहाचे स्वरूप आहे. या अशा वैशिष्ट्यपूर्ण तलविन्यासामुळेच हे चैत्यगृह बिहारमधील बराबर, सुदामा लेणी आणि भाजे येथील पुढे कोरीव लाकडी मुखभाग असलेले विकसित चैत्यगृह यामधील स्थापत्यविकासाचा टप्पा आहे अशी विद्या दहेजिया यांची धारणा होती. या लेण्यातील चैत्यगृहाच्या दरवाजानजिकच्या खिडकीच्या वरच्या भागात असलेला शिलालेख त्यांच्या मते लेणे खोदले गेले त्याच काळातला नसून नंतरच्या काळात खोदला गेला आहे. दहेजियांच्या मते नाडसूर येथील चैत्यगृह हा कोंदिवट्यानंतरचा, पण भाजे येथील चैत्यगृहाच्या आधीचा टप्पा आहे. पहा-विद्या दहेजिया, **अर्ली बुद्धिस्ट रॉक कट टेंपल्स, ए क्रॉनॉ लॉजिकल स्टडी,** थॉमस ॲण्ड हडसन, लंडन १९७२ पृ. १५२-५३.

" कण्हस अंतेवसिना बालकेन कतम् " असा हा शिलालेख आहे. यासंदर्भात पितळखोरे येथील लेणे क्र. ३ मध्ये सापडलेल्या यक्षमूर्तीवरील शिलालेखात उल्लेख असलेला कण्हदास आणि या शिलालेखातील कण्ह ही एकच व्यक्ती असावी असे डॉ. म. न. देशपांडे यांनी सूचित केले आहे. तसे असेल तर कोंढाणे येथील यक्षमूर्तीचा निर्माता असलेला "बालक" हा कण्हाचा तत्कालिन शिष्य असला, तरी तो पुढच्या पिढीतील आहे. म्हणजेच पितळखोरे येथील लेणे क्र. ३ कोंढाणे लेण्याच्या आधी खोदले गेले आहे. तथापि, कोंढाणे येथील कण्ह आणि पितळखोरे येथील कण्हदास ही एकच व्यक्ती नाही असाही युक्तिवाद करता येईल.

डॉ. विद्या दहेजिया यांच्या मते या नृत्य करणाऱ्या मूर्तीचा आकार, शिल्पशैली, त्यांचा डौल इत्यादी बाबींमुळे या मूर्ती सांची येथील तोरणा इतकाच शिल्पकलेतील विकसित टप्पा सूचित करतात. तथापि, त्यांच्या मते तेथे सापडलेली यक्षमूर्ती या लेण्याचा मुखभाग आणि पर्यायाने हे लेणे सुरुवातीच्या काळातील असल्याचा निर्विवाद पुरावा आहे.

४ एस्, नागराजू, "**बुद्धिस्ट आर्किटेक्चर ऑफ वेस्टर्न इंडिया**" दिल्ली, १९८१, पृ. २८५-८६. लाकडी रिपांऐवजी आलेल्या दगडी रिपा हे चैत्यगृह भाजे आणि कोंढाणे येथील चैत्यगृहापेक्षा अधिक विकसित असल्याचे पर्सी ब्राउन ("**इंडियन आर्किटेक्चर**, बॉम्बे, १९५९, खंड-१) यांनी दाखवून दिले आहे.

५ आयताकृती तलविन्यासातील चापाकर सभागृह ( हे नेहमीचे किंवा आतापर्यंत चालत आलेल्या चैत्यगृहासारखे चैत्यगृह नाही) व सभागृहाच्या मुखभागातील वर निमुळते झालेले स्तंभ ह्या वास्तुशास्त्रीय घटकांमुळे हे चैत्यगृह नंतरच्या काळातील असावे असे नागराजू यांचे मत आहे. चैत्यगवाक्षाचा वक्राकार हा बहुधा तत्कालिन काष्ठस्थापत्याच्या प्रभावामुळे आला असावा (पहा : नागराजू, उपरोक्त, पृ. ३१४-१५).

दहेजिया लेणे क्र. ९ ची तुलना नाशिक येथील लेणे क्र. १८ शी करतात. नाशिक येथील लेणे क्र. १८ चा मुखभागही पूर्णपणे दगडात खोदण्यात आला आहे. (पहा : दहेजिया, उपरोक्त, पृ. १५७-५८).

६ कुडा येथील लेणी दोन टप्प्यात खोदली गेली असावीत असे नागराजूंप्रमाणेच दहेजियांचेही मत आहे. दहेजिया यांनी या लेण्यांचा काळ प्रस्तरलेखीय पुराव्यांवरून ठरविला आहे. त्यांच्या मते लेणे क्र. ८ ते १४ आणि १८ ते २४ तिसऱ्या मालिकेतील म्हणजेच इ. स. ९० ते ११० या काळातील आहेत. लेणे क्र. १ ते ७ व १५ व १७ या लेण्यांमधील शिलालेख नंतरच्या मालिकेतील म्हणजे इ. स. १३८ ते १५० या काळातील आहेत. त्यांच्या मते आयताकृती तलविन्यास व सपाट छत असलेले चैत्यगृह प्रथम इ. स. ११० नंतर नाशिक येथे दिसून येत असले तरी अशा प्रकारच्या लयनस्थापत्याचा आरंभ याआधीच कुडे येथे झाला होता.

विद्या दहेजियांच्या धारणेनुसार पूर्व बौद्ध लयनस्थापत्य कान्हेरी येथील चैत्यगृहात निर्णायक अवस्थेस पोचले ही बाब यासंदर्भात उल्लेखनीय आहे. त्यांच्या मते कान्हेरी येथील चैत्यगृहाचा काळ इ. स. १८० आहे. महाड, कुडा आणि जुन्नर येथील काही लेणी जी ढवळीकर आणि नागराजूंसारखे विद्वान नंतरच्या काळातील मानतात ती विद्या दहेजियांच्या मते ढोबळमानाने १०० वर्षांच्या, म्हणजेच इ. स. ९० ते इ. स. १८० या कालखंडात खोदली गेली.

७ डॉ. सुरेश जाधव यांनी असे लक्षात आणून दिले आहे की, सध्या कमालीच्या दुरावस्थेत असलेल्या आणि पंप हाऊस म्हणून वापरण्यात येत असलेल्या अजिंठा येथील लेणे क्र. ८ चा तलविन्यास शेलारवाडी येथील लेणे क्र. ८ च्या तलविन्यासाशी मिळताजुळता आहे. म्हणजेच हे लेणेही तशाच प्रकारचे चैत्यगृह असले पाहिजे. (पहा-मधू, पृ. १). महाड, शेलारवाडी व अजिंठा येथील ह्या लेण्यांनी अजिंठा येथील स्तूपाऐवजी बुद्धाची मूर्ती असलेल्या महायान विहार लेण्यांची मुहूर्तमेढ रोवली असावी. हा असा विकास घडून आला असला तरीही चापाकार तलविन्यास, गजपृष्ठाकार छत आणि टोकाच्या अर्धवर्तुळाकृती भागाकडे स्तूप असलेल्या चैत्यगृहांची उभारणी थांबली किंवा अशा प्रकारच्या चैत्यगृहांऐवजी सरसकटपणे या विहारसदृश चैत्यगृहांची उभारणी होऊ लागली असे म्हणता येणार नाही.

८ पन्हाळे येथील हीनयान लेण्यांच्या तपशीलवार विवेचनासाठी डॉ. एम. एन. देशपांडे लिखित **''केव्हज् ॲट पन्हाळे काझी (एन्शन्ट प्रणालक), मेमॉयर्स ऑफ दि आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया''** क्र. ४४ हा ग्रंथ पहावा. पन्हाळे येथील हीनयान लेणी इ. स. च्या चौथ्या व पाचव्या शतकातही खोदली गेली असे देशपांडे यांचे मत आहे व त्याचा येथे आवर्जून उल्लेख केला पाहिजे. (पहा–उपरोक्त, पृष्ठ क्र.१२७).

९ वास्तविक विद्या दहेजिया यांनी त्यांच्या **''अर्ली बुद्धिस्ट रॉक कट टेंपल्स''** या ग्रंथात या विषयी विचार केला असला तरी त्यांनी ४००० वर्षांपूर्वीपासून चालत आलेल्या भारतीय गृह स्थापत्याचे मूळ स्वरूप असलेल्या चतु:शाल स्थापत्यात आढळणाऱ्या दोन प्रकारांचा अपवाद वगळता इतर प्रकाराकडे फारसे लक्ष वेधलेले नाही. या प्रकारच्या स्थापत्याची साधी सुरुवात मध्यभागी खुला व्हरांडा आणि त्याच्या तीन बाजूस कक्ष असे स्वरूप असलेल्या नाशिक येथील लेणे क्र. १९ पासून झाली आणि हेच स्थापत्यस्वरूप शेवटी नाशिक येथील देवीलेणे व नहपान लेणे व जुन्नर येथील लेण्याद्रि लेणे यासारख्या मोठ्या विहारांमध्ये परिणत झाले. प्रत्येकी वीस कक्ष असलेले हे मोठे विहार नाशिक येथील कृष्ण विहाराचीच सविस्तर व भव्य आवृत्ती आहेत. जर काही फरक असलाच तर तो व्हरांड्याच्या धाटणीत, स्तंभप्रकारात आणि मुखप्रकारात आहे. पहा-विद्या दहेजिया, **''अर्ली बुद्धिस्ट रॉक कट टेंपल्स,''** पृ. ९२-१३०.

१० विद्या दहेजिया, उपरोक्त, पृ. ९२, प्लेट नं. १६.

११ लयनस्थापत्यामध्ये चैत्यगृहाचे वर्णन करताना प्रचलित वास्तुशास्त्रीय परिभाषेचा वापर करण्यात आला आहे. त्यात चैत्यगृहातील स्तूपासमोरच्या मोकळ्या भागाचे मंडप असे वर्णन करण्यात आले आहे. समकालीन शिलालेखांमध्ये भोजनमंडप असा काही वास्तूंचा स्वतंत्र उल्लेख येतो. त्या दोहोंची गल्लत करणे उचित ठरणार नाही. उत्तरकालीन देवालय स्थापत्यात गर्भगृह व मुखमंडप यामधील विस्तीर्ण कक्षाला सभामंडप अशी संज्ञा आहे. तथापी या ग्रंथात अशा सभामंडपांचा उल्लेखही मंडप असाच करण्यात आला आहे. त्याचप्रमाणे चैत्यगृहातील व्हरांडा व स्तूप यामधील मोकळ्या भागाचाही मंडप असाच उल्लेख केला आहे. प्रस्तुत विवेचन शिलालेखात स्वतंत्र उल्लेख करण्यात आलेल्या मंडपांचे आहे.

१२ एस. नागराजू, **"बुद्धिस्ट आर्किटेक्चर ऑफ वेस्टर्न इंडिया"** पृ. ३२२-२३, आकृती ४

१३ कित्ता, पृ. ३२४

१४ एच. डी. सांकलिया, **प्रीहिस्टरी अॅण्ड प्रोटोहिस्टरी ऑफ इंडिया अॅण्ड पाकिस्तान,** (दुसरी आवृत्ती), पुणे १९७४

१५ एम्. एन्. देशपांडे, पूर्वोक्त.

१६ एस. नागराजू, उपरोक्त, पृ. ३२३-२४

१७ अगदी काटेकोरपणे वर्णन करावयाचे झाल्यास केवळ बुद्धमूर्ती असणे हे ते चैत्यगृह किंवा पूजास्थान महायानपंथी असल्याचे द्योतक नाही. अजूनही श्रीलंका, ब्रह्मदेश यांसारख्या हीनयान संप्रदाय प्रचलित असलेल्या देशांमध्ये बुद्धमूर्तीची पूजा केली जाते. महायान संप्रदायाचे हीनयान संप्रदायाहून असलेले निराळेपण दाखविणारे व्यवच्छेदक लक्षण बुद्धमूर्ती नसून बोधिसत्त्वांच्या मूर्ती आणि त्यांना दिलेले महत्त्व आहे. महायान संप्रदायाचा उद्‌भव हीनयान संप्रदायातूनच झाला असल्यामुळे त्यातील स्थित्यंतराच्या टप्प्यांमध्ये बौद्ध धार्मिक विधींमध्ये प्रथम बुद्धमूर्ती येणे साहजिकच आहे.

१८ एस. नागराजू, " **बुद्धिस्ट आर्किटेक्चर ऑफ वेस्टर्न इंडिया** " पृ. ३२४-२५

नागराजूंच्या मते ही लेणी इ. स. च्या तिसऱ्या शतकात खोदली गेली. हीनयान ते महायान या स्थित्यंतराबाबतचा आणखी एक उपोद्बलक पुरावा म्हणजे कार्ले, कान्हेरी, नाशिक, अजिंठा येथील प्राचीन किंवा प्रारंभीच्या लेण्यांमध्ये आढळणाऱ्या लेण्याच्या मूळ तलविन्यासाचा किंवा योजनेचा मूळ भाग नसलेल्या बुद्ध आणि बोधिसत्त्वांच्या आगंतुक मूर्ती. अजिंठा, नाशिक आणि औरंगाबाद येथे दिसून येणारी महायान पंथाची सलगताही हे नैसर्गिक स्थित्यंतर सूचित करते.

१९ एस. नागराजू, "**बुद्धिस्ट आर्किटेक्चर ऑफ वेस्टर्न इंडिया** " ए. एम. शास्त्री, "**बुद्धिस्ट टेक्स्टस फ्रॉम इन्स्क्रिप्शन्स**" आणि 'वॉल्टर स्पिंक' "**अजंठा टू एलोरा**", **मार्ग**, व्हॉल्यूम—२२, १९६७

२० या दृष्टिकोनाचे जोरदार समर्थन करणारे प्रा. एम. के. ढवळीकर यांनी त्यांच्या अलीकडेच प्रसिद्ध झालेल्या "**लेटर हीनयान केव्हज्** " ह्या पुस्तकात या प्रश्नाची चर्चा केली आहे. शिवाय पहा : नागराजू लिखित "**बुद्धिस्ट आर्किटेक्चर ऑफ वेस्टर्न इंडिया.**"

२१ **मधू** या ग्रंथातील प्रा. एम. के. ढवळीकर यांचा लेख :– "**बिगिनिंग्ज ऑफ महायान आर्किटेक्चर ॲट अजंठा**".

२२ वाकाटकांच्या नंदिवर्धन शाखेतील राजांच्या प्रदेशात हरिषेणपूर्वकाळातील लेणी आढळली आहेत. वरोरा गावाच्या परिसरात शिळेत खोदलेली शिवलिंग किंवा नृसिंहाची मूर्ती असलेली लहान एक पाषाणी मंदिरे सापडली आहेत. गौराळा लयनसमूहातील भांदक येथील लेणे पूर्ववाकाटक काळातील असावे असे दिसते. अर्थातच या बाबींचा अजिंठा येथील बौद्ध लयनस्थापत्य समजून घेण्याच्या दृष्टीने काहीही उपयोग नाही. कारण ही तर साधी हिंदू लेणी आहेत. तथाकथित बुद्धमूर्ती आणि पेटिकाशीर्ष ब्राह्मी लिपीतील शिलालेख असलेले क्रूसाकार (cruciform) लेणे " वाकाटक" असूनही त्याच्या आगळ्यावेगळ्या तलविन्यासामुळे अजिंठा येथील महायान लयनस्थापत्य समजून घेण्याच्या दृष्टिकोनातून फारसे उपयुक्त नाही.

२३ लेखकाला प्रा. स्पिंक यांच्याबरोबर सदर ठिकाणी जाण्याचा योग आला होता. लेण्यांचा सर्वसाधारण तलविन्यास आणि स्तंभाचे स्वरूप पश्चिम महाराष्ट्रातील लेण्यांशी स्पष्ट साधर्म्य दाखवितात. पातूर येथील द्विदल लेणे हे अजिंठा

येथील पहिल्या महायान लेण्यापेक्षाही किमान एक पिढी तरी आधीचे आहे असे प्रा. स्पिंक यांचे प्रथमदर्शनी मत बनले.

२४ बाघ येथे चैत्यगृह नसल्यामुळे या लेण्यांशी संबंधित असलेले लोक अधिक शुद्ध प्रकारच्या हीनयान संप्रदायचे असावेत असा बर्जेसचा कयास आहे.

२५ प्रस्तरलेखांच्या आणि काही प्रमाणात वास्तुशास्त्रीय पुराव्यावरून खुद्द हीनयान टप्प्यातूनच लयननिर्मितीच्या उपक्रमात इ. स. पू. ५० ते इ. स. ५० हा शंभर वर्षांचा खंड पडला अशी विद्वानांची धारणा झाली. परकीय आक्रमणामुळे आलेली राजकीय अस्थिरता हे हा खंड पडण्याचे कारण मानले जाते. या खंडकालात लयननिर्मिती पूर्णत : ठप्प झाली असे नाही, परंतु तिचा वेग फारच मंदावला व ती ठराविक भूप्रदेशातच सीमित राहिली. त्याचप्रमाणे सातवाहनांच्या अस्तानंतर आणि बौद्ध धर्माला खऱ्या अर्थाने आधार देणारा शेवटचा वाकाटक सम्राट हरिषेण याच्या उदयापर्यंत लयननिर्मितीत असाच खंड पडलेला आढळतो. जेव्हा बर्जेसने हा खंड प्रस्तावित केला तेव्हा त्याला यज्ञश्री सातकर्णीच्या काळाबद्दल खात्री नव्हती. यज्ञश्री सातकर्णि इ. स. च्या चौथ्या शतकाच्या सुरूवातीस होऊन गेला असावा असा बर्जेसचा कयास होता, म्हणून त्याने अजिंठा येथील महायान लयनस्थापत्याचा प्रारंभकाल इ. स. ५०० मानला आणि इ. स. ३५० ते ५०० हा लयननिर्मितीतील खंड प्रस्तावित केला. ''महायान आणि विशेषत: अजिंठा येथील लयनस्थापत्यातील वाकाटकांचा सहभाग'' या विषयावर मौलिक संशोधन केलेल्या आणि लघुकालानुक्रमाचे समर्थक असलेल्या प्रा. स्पिंक यांनी हा खंड २०० ते ३०० वर्षांचा आहे असे प्रतिपादिले आहे. स्पिंक यांचा हा दृष्टिकोन प्रा. मिराशी यांच्या संशोधनामुळे उचलून धरला जात आहे. वाकाटकांचा काळ हा बर्जेसप्रणीत वाकाटककालापेक्षा आधीचा आहे हे प्रा. मिराशी यांनी भक्कम पुराव्यानिशी सिद्ध केले आहे. त्यांच्या संशोधनानुसार हरिषेणाचा काल इ. स. ४७५ ते ५०० आणि एकंदरीत वाकाटक राजघराण्याचा काळ इ. स. २५० ते ५०० असा ठरल्यामुळे निदान वरकरणी तरी सातवाहनांचा अस्त आणि वाकाटकांचा उदय यामध्ये फारच कमी काळ राहतो. पण तरीही वाकाटकांनी सातवाहनांच्या सर्व भूप्रदेशाचा ताबा घेतला आणि लगेचच सातवाहनोत्तर सम्राट म्हणून दख्खनवर राज्य केले असा त्याचा अर्थ होत नाही. तथापि अत्यंत महत्त्वाचे कलेतिहासिक निरीक्षण असे आहे की, यज्ञश्री

सातकर्णीच्या अस्तापासून ते वाकाटक नृपति हरिषेणाच्या उदयापर्यंतच्या राजकीय पोकळीच्या किंवा अस्थैर्याच्या काळातही लयननिर्मिती जोमदारपणे नसली तरी चालूच राहिली. किंबहुना या दोन राजांच्या मधल्या काळात तथाकथित राजकीय अस्थैर्यातही तत्कालीन लोकांचे आर्थिक व सामाजिक जीवन अबाधित राहिले हे भारताच्या इतिहासातील मोठे आश्चर्य आहे. म्हणूनच विद्वानांनी प्रस्तावित केलेल्या लयननिर्मितीतील या दोन्ही खंडांचा या निरीक्षणाच्या संदर्भात फेरविचार झाला पाहिजे. राजाश्रय लाभलेली अजिंठा येथील काही लेणी वगळता बाकीच्या बौद्ध लयननिर्मितीला राजे लोकांचा नव्हे तर भाविक धनिकांचाच आश्रय लाभला होता ही बाबही यासंदर्भात नजरेआड करून चालणार नाही.

६ राखालदास बॅनर्जी, **''द एंपिरिअल गुप्ताज''** आणि शां. भा. देव, **''महाराष्ट्र व गोवे शिलालेख ताम्रपटांची वर्णनात्मक सूची''** मुंबई, १९८२

७ सी. शिवराममूर्ती, ''५००० **इयरस् ऑफ इंडियन आर्ट** ''.

८ डॉ. शोभना गोखले, **''इन्स्क्रिपशन्स ॲट कान्हेरी ''** १९९२

९ फर्ग्यूसन ॲण्ड बर्जेस, **''केव्ह टेंपल्स ऑफ इंडिया ''** लंडन, १८८०, पृ.३५५

० कित्ता, पृ. ३५८

१ बर्जेस दरबार लेण्यातील स्तंभांची मोकुंदस येथील मंदिरांच्या स्तंभांशी आणि वेरूळ येथील विश्वकर्मा लेण्याच्या स्तंभांशी तुलना करतो.

२ फर्ग्युसन ॲण्ड बर्जेस पूर्वोक्त, पृ. ३६०-६१

३ टेकडीच्या उतारावर माथ्याकडून पायथ्याकडे खोदावयाच्या (उत्सेध) लयनस्थापत्य कलेचे तंत्र थोडे निराळे असते. अशा ठिकाणी दर्शनी भागासमोरील खडक अशा तऱ्हेने काढले जातात की, तेथे दोन्ही बाजूंना नैसर्गिक भिंत असलेले आयताकार प्रांगण निर्माण होते. या स्थापत्य तंत्रात कड्याला तीव्र उतार असल्यास दर्शनी भागासमोरील भिंती उंच ठेवतात. आवारात मात्र त्यांची उंची कमी असते. आवारासमोरील भिंत ही तेथील खडक हटवून मोठ्या कौशल्याने निर्माण केलेली असते. लयन स्थापत्याच्या या पद्धतीत सर्वच शैलगृहांना आवारासमोर भिंत नसते.

३४ **ॲन्युअल रिपोर्ट ऑफ दि आर्केऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया,** खंड-९ पृ. १२१ ते १३५

३५ या शब्दाचा विग्रह गौरी + आलय असा असणे शक्य आहे.

३६ कनिंगहॅमच्या मनात ही लेणी वैष्णव असल्याची शक्यता डोकावली होती. पीठाच्या थरांवर दाखविलेल्या मत्स्य आणि कूर्मामुळे त्याला तसे वाटले. शिवाय विष्णूच्या दहा अवताराच्या दहा मूर्ती येथे असाव्यात असेही त्याला वाटते. त्याच्या मते छोट्या खुराड्याचा उपयोग भिक्षूंची खोली याव्यतिरिक्त अन्य कोणताही असणे शक्य नाही. या छोट्या लेण्यामुळे आणि टेकडीच्या पायथ्याशी असलेल्या वस्त्राच्छादित बुद्धमूर्तीमुळे हे शैलगृह बौद्ध असण्याची शक्यताही तो नाकारत नाही. आधुनिक पायऱ्यांजवळ आढळलेली वास्तवाकार विष्णुमूर्ती आणि तिच्यासोबत असलेली दुसरी मूर्ती शैलगृहातील मूळ प्रतिमासमूहातील असो वा नसो. पण बाह्यांगावर देवकोष्टात असलेल्या नरसिंहाची मूर्ती हे शैलगृह वैष्णव असल्याची साक्ष देते.

३७ उत्तरेकडील गर्भगृहात नेमकी कोणती मूर्ती असावी याबाबत बर्जेस साशंक होता. त्या ठिकाणी विष्णूची किंवा भवानीची मूर्ती असावी असा त्याचा कयास होता. तथापि, पातुर येथे सापडलेल्या पार्वतीच्या मूर्तीचा खुंटा उत्तरेकडील गर्भगृहातील पीठावरील खाचेशी मिळताजुळता आहे. त्यामुळे या शैलगृहाचा गर्भगृहाचा अर्धा भाग पार्वतीचा असणे शक्य आहे. याप्रकारे हे उमा-महेश्वरांचे शैलगृह आहे. फर्ग्युसन आणि बर्जेस. **"केव्ह टेंपल्स ऑफ इंडिया"** पृ. ४२८.

३८ बर्जेसने या लेण्याची पाहाणी केली होती आणि त्याने या लेण्याचा काळ इतर तथाकथित ब्राह्मणी शैलगृहांबरोबर इ. स. चे ६ वे शतक मानला होता.

३९ दख्खनमधील ब्राह्मणी शैलगृहांवर के. व्ही. सौंदरराजन यांनी अलीकडेच **"द केव्ह टेंपल्स ऑफ द डेक्कन"** (The cave Temples of the Deccan) हा ग्रंथ लिहिला आहे. त्यांच्या मते या गटातील बहुतांशी लेणी (पळसंब्याचे लेणे वगळून) अलीकडेच उजेडात आल्याने त्याची त्यांना माहिती नव्हती आणि घाटनांद्र्याचे लेणे वगळता गट नं. ३ मधील लेणी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे चालुक्य राजाश्रयाखाली खोदली गेली असे त्यांना वाटते. ते या लेण्याचा कालही याच विचारप्रणालीनुसार नंतरचा मानतात. खंडाळावाला आणि इतर

काही विद्वान घारापुरीच्या लेण्यांचा काळ इ. स. ५५० आणि त्यांचा राजाश्रय कोकणातील मौर्यांचा मानतात. स्पिंक हे इतर सर्व मुद्यांपेक्षा सुरुवातीचे कलचुरी राजे ''परम माहेश्वर'' होते या मुद्यावर भर देतात आणि या दुसऱ्या गटातील लेण्यांना कलचुरींचा राजाश्रय होता असे मानतात. **''आर्ट ऑफ साऊथ इंडिया/डेक्कन''**, दिल्ली, १९८०. पृ. १३५-१५१.

४० सौंदरराजन्, उपरोक्त, प्लेटस्, LX-VI, II, LX-VII

४१ सौंदरराजन्, उपरोक्त, पृ. ४४-१७१

४२ सौंदरराजन्, उपरोक्त, पृ. १२८, आकृती १५

४३ कित्ता, पृ. १५२-१५४, आकृती २०

४४ कित्ता, प्लेटस्, LXXV, LXXVI

४५ कित्ता, पृ. ४५, तळटीप आणि पृष्ठ १२२-१२५, आकृती ३०

४६ कित्ता, प्लेटस्, XXIX, आणि LXXXVII, फर्ग्युसन ॲण्ड बर्जेस लिखित '' **केव्ह टेंपल्स ऑफ इंडिया**'' पृ. ४३८-४४१.

४७ बर्जेस '' **केव्ह टेंपल्स ऑफ इंडिया**'' पृ. २४३

४८ सौंदरराजन्, उपरोक्त, पृ. ८५-८७ आकृती ८

४९ फर्ग्युसन ॲण्ड बर्जेस, पूर्वोक्त, पृ. ४३२-४३५. शिवाय पहा-सौंदर- राजन्, पूर्वोक्त, पृ. १०७-११४, आकृती १२, प्लेटस् ४७ ते ५३

५० सौंदरराजन्, पूर्वोक्त, पृ. १४७-१४९, आकृती १८

५१ कित्ता, आकृती ७२, पृ. ३९०

५२ कित्ता, पृ. २२४, आकृती ४३

५३ कित्ता, पृ. २५

५४ सौंदरराजन्, पूर्वोक्त, पृ. १९५, १९७, १९९, आकृती २७ ते २९

५५ कित्ता, पृ. २०२-२०९, आकृती ३३

५६ कित्ता, आकृती ३३

## तळटिपा

५७ किल्ता, आकृती ३४

५८ किल्ता, पृ.२०६

५९ सौंदरराजन, पूर्वोक्त, पृ. १५-२५

६० मजकुरात उल्लेखिलेल्या द्राविड स्थापत्य शैलीच्या वैशिष्ट्यानुसार स्पष्ट होते की, ऐहोळे येथील लोकमहादेवी मंदिर हे कांजीवरम येथील कैलासनाथ या शिवमंदिराची प्रतिकृती असावी.

६१ सौंदरराजन, पूर्वोक्त, पृ. १८२, आकृती २६

६२ किल्ता, प्लेटस् ९६-१०४ ए

६३ फर्ग्युसन ॲण्ड बर्जेस, पूर्वोक्त आणि **कॉर्पस इन्स्क्रिप्शनम् इंडिकेरम्**, पृ. १४५

६४ **आर्केऑलॉजिकल सर्व्हे ऑफ वेस्टर्न इंडिया**, खंड ३, पृ. ५०-५२, प्लेटस्- ३३-३४

६५ फर्ग्युसन ॲण्ड बर्जेस, पूर्वोक्त आणि **कॉर्पस इन्स्क्रिप्शनम् इंडिकेरम्** पृ. ४१७-४७४

६६ बेगलर, **ॲन्युअल रिपोर्ट ऑफ दि आर्केऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया**, खंड २९, प्लेट २२

६७ **आर्केऑलॉजिकल सर्व्हे ऑफ वेस्टर्न इंडिया**, प्लेट XL, VII आणि आकृती १, २, प्लेट XLVIII, आकृती ५

६८ **एपिग्राफिया इंडिका**, खंड ३८, भाग ४, पृ. १६७-६८

६९ वॉल्टर स्पिंक, **अजंठा टू एलोरा**

७० फर्ग्युसन ॲण्ड बर्जेस, पूर्वोक्त. बर्जेस यांचे मत प्लेट नं. XLVII वर आधारित आहे.

७१ सौंदरराजन, पूर्वोक्त, पृ. ५०४

७२ जे-२१, पृ. ११३, १५७-५९

७३ जे-परेरा, पृ. ११४, १७०-१७१

७४ प्रा. माटे यानी मराठा स्थापत्यशैलीविषयी लिहिले असून त्यांनी मराठाकालीन मंदिरांच्या शिखरांचे काही आकार हे इंडो–आर्यन म्हणून उल्लेखिलेले आहेत.

७५ याप्रकारच्या शिल्पशैलीस केंद्रगामी (centripetal) अशी संज्ञा असली तरी सौंदरराजन यांनी त्यास केंद्रोत्सारी (centrifugal) असे म्हटले आहे. महाराष्ट्राला स्थापत्य विकासासाठी आवश्यक ते सांस्कृतिक उत्तेजन आजुबाजूच्या प्रदेशातून लाभले असे काही विद्वानांचे मत आहे. (उदा. ए. व्ही. नाईक, प्रभाकर देव, जी. बी. देगलूकर इ.) डॉ. प्रभाकर देव हे चालुक्योत्तर आणि यादव शैलीतील स्थापत्यासंबंधी लिहितात की, त्यात आधीच्या स्थापत्य शैलीचा प्रभाव या शैलींवर जाणवतो. हा काकतीय शैलीचा प्रभाव असावा.

७६ पश्चिम व दक्षिण महाराष्ट्रातील जैन मंदिरांचे हे नमुनेदार वैशिष्ट्य असून ते कोल्हापूर येथील जैन मंदिरातही पहावयास मिळते. हा वैशिष्ट्यपूर्ण स्थापत्यप्रकार पंधराव्या शतकापर्यंत प्रचलित होता. याचे उत्तम उदाहरण म्हणजे नाशिक जिल्ह्यातील इगतपुरी तालुक्यात त्रिंगलवाडी येथील जैन शैलगृह. चौदाव्या शतकात या स्थापत्य प्रकारास थोडे वेगळे वळण लागून तो सर्वसाधारण प्रकारात जमा झाला असावा. याचे उदाहरण नाशिक मधीलच ओढे मंदिरात (चौदावे शतक) पहायला मिळते.

७७ मंदिर प्रकारावर कझिन्सने प्रकाश टाकला आहे. पहा– **मिडीवल टेंपल्स ऑफ दि डेक्कन**, प्लेट नं. XXXXIV

७८ कित्ता, प्लेटस् नं. XL, VIII

७९ 'वाकाटककालीन शिल्पांचे अवशेष' यावर सखोल अभ्यास करणारे डॉ. वा. वि. मिराशी हे प्रथम होत. त्यांच्या मते राम हा प्रथमपासूनच वैष्णव धर्मियांना पूज्य होता, तो कोणी साधा मर्त्य नायक नव्हता. कवींनी त्याच्या कर्तृत्वाची महती आपल्या काव्यातून व्यक्त केली आहे. वैष्णव मंदिरात त्याच्या मूर्त्या किंवा मूर्तीपटही कोरण्यात आले आहेत. कृष्णाप्रमाणेच रामाचीही जोशात आराधना होत असे हे त्यांनी स्पष्ट केले. त्यांच्या मते पवनार येथे सापडलेल्या प्राचीन अवशेषात रामाच्या जीवनातील विविध प्रसंग दर्शविणारे शिल्पपट कोरलेले आहेत. हे राम मंदिर धाम नदी किनारी उभारले

असून तेथेच विनोबाजींचा आश्रम आहे. रामगिरी येथील प्रवरसेनाच्या शिलालेखात रामगिरीचा देव असा रामाचा उल्लेख केलेला आहे. रामटेक येथील राममंदिर ५ व्या शतकात बांधले गेले. विशेष बाब म्हणजे गर्भगृहात राममूर्ती नसून पदबिंबे कोरलेली असावीत.

डॉ. शास्त्री यांनी रामास चौथ्या शतकापासूनच देवत्व प्राप्त झाल्यासंबंधीचे काही नवीन पुरावे प्रकाशात आणले आहेत असे प्रतिपादन केले आहे.

८० ढाकी, एम. ए., **इंडियन टेंपल्स फॉर्मस् इन कर्नाटक इन्स्क्रिप्शन्स ॲण्ड आर्किटेक्चर,** न्यू. दिल्ली, १९७७, पृ. ९१-९४.

८१ यापूर्वी अनेक वेळा असे लक्षात आले आहे की, दख्खनी नागर शैलीतील मंदिरे ही उत्तर चालुक्य मंदिरापेक्षा वेगळी दाखविण्यासाठी विद्वान वेगळी संज्ञा वापरतात. अशीच संज्ञा जर वेसर मंदिरे व भूमिज मंदिरे वेगळी दाखविण्यासाठी वापरली तर चालुक्योत्तर राजांच्या आश्रयाखाली बांधलेले प्रत्येक मंदिर हे कर्नाटा शैलीच्या नंतरचे किंवा वेसर मंदिर आहे असे समजणे चुकीचे ठरेल. वास्तविक या प्रदेशात बांधलेल्या मंदिरांवर वेळोवेळी यादव व चालुक्य राजवटींचे परिणाम झाल्याचे खोल संशोधनाअंती दिसून आले आहे. डॉ. देगलूकरांनी "टेंपल आर्किटेक्चर ॲण्ड स्कल्पचर ऑफ महाराष्ट्र" या पुस्तकात चालुक्य मंदिरांवर स्वतंत्रपणे लिहिले आहे. पहा-मंदिर समूह—२. या समुहात होटल, मुखेड, खिद्रापूर व अंभई येथील मंदिर तसेच सिन्नरचे आयेश्वर मंदिर यांचा समावेश केला आहे. याशिवाय त्यांनी प्रसिद्ध अशा चालुक्य मंदिरांची भेददर्शक वैशिष्ट्ये स्पष्ट केली आहेत. त्यात मंडपाची जालवातयने, सप्तमातृकांची उठावदार शिल्पे, ललाटबिंबावरील गजलक्ष्मी, गर्भगृहावर विशाल प्रतिहार मूर्ती, मंडप रचना, वैशिष्ट्यपूर्ण स्तंभ प्रकार आदींचा समावेश केला आहे. परंतु अशा प्रकारच्या मंदिरांचे समूह बनविण्याचे प्रस्तुत लेखकाने टाळले आहे. कारण भूमिज व नागर शैलीतील मंदिरामध्ये जेव्हा अशी वैशिष्ट्ये दिसून येतील तेव्हाच हा मुद्दा स्पष्ट होईल किंवा जेव्हा कोणी हे स्पष्ट करील की, खिद्रापूर येथील प्रसिद्ध चालुक्य मंदिरावर किंवा कोप्पेश्वर मंदिरावर चालुक्य शैलीतील शिखराऐवजी भूमिज शिखर आहे, तेव्हाही वरील मुद्दा स्पष्ट होईल.

८२ देव, पी. आर., **टेंपल्स् ऑफ मराठवाडा,** पृ. १२३-१६८

८३ ढाकी, एम. ए., पूर्वोक्त, पृ. ३६-३७ आणि प्लेट नं. ४६-४७

८४ देव, कृष्ण (**खजुराहो टेंपल्स्**) यांनी अशा प्रकारचे शिखर असलेल्या मंदिराचा उल्लेख "स्वर्गारोहण प्रासाद" असा केला आहे.

८५ हेन्री कझिन्स्, **मिडीवल टेंपल्स ऑफ दि डेक्कन,** प्लेट नं. २७

८६ कित्ता प्लेट नं. १२, १३

८७ देगलूरकर, पूर्वोक्त, पृ. ३२-३५

८८ हेन्री कझिन्स, उपरोक्त, प्लेट नं. २७

८९ देगलूरकर, जी. बी., **टेंपल्स ऑफ महाराष्ट्र,** पृ. १९

९० कित्ता, पृ. ३९-४१, व प्रभाकर देव, **टेंपल्स ऑफ मराठवाडा,** पृ. ३८-४०

९१ हेन्री कझिन्स, उपरोक्त प्लेट नं. LXII, LXIII

९२ देगलूरकर, उपरोक्त, पृ. १०२-१०३

९३ हेन्री कझिन्स, उपरोक्त पृ. ५८ प्लेट नं. LXXXV, LXXXVII

९४ याशिवाय इतर जातककथा व गोष्टी ज्या मजकुरात समाविष्ट आहेत त्यात रुरु जातक, पूर्ण अवदान व क्षांतिजातक (शैलगृह नं. २), षड्दंत जातक, सुतसोम जातक, महाकपि, मत्स्यजातक, मातृपोषक जातक व महिष जातक (शैलगृह नं. १७) यांचा समावेश आहे. पहा–सी. शिवराममूर्ती, **इंडियन पेन्टिंग्ज,** न्यू दिल्ली, १९६८ पृ. ३३-४५.

९५ कंगले, र. पं. (अनुवादक), **कौटिलीय अर्थशास्त्र,** प्रकरण १९, श्लोक १ ते ४, दुर्ग निर्देश, श्लोक १ ते १०. महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, १९८२

९६ "हिस्टरी ॲण्ड कल्चर ऑफ दि इंडियन पिपल," **इज ऑफ इंपिरियल युनिटी,** खंड २, पृ. २१०; देव, शां. भा., **महाराष्ट्र : एक पुरातत्त्वीय समालोचन** मुंबई, १९६८, पृ. ५३

९७ गोखले, शोभना, "कंधार थ्रु एपिग्राफ ॲण्ड आर्किऑलॉजी", **जर्नल ऑफ एपिग्राफिकल सोसायटी ऑफ इंडिया,** व्हॉ. ७, १९८०, पृ. २२-२४; **एपिग्राफिया इंडिका,** व्हॉ. ३५, पृ. १०५-११४

९८ कोलते, वि. भि., "धर्मापुरी येथील शिलालेख," **भारतीय इतिहास आणि संस्कृति,** त्रैमासिक, मुंबई, एप्रिल १९७२, पृ. ५-२९; पाठक,अ. शं., "धर्मापुरी : ए आर्किऑलॉजिकल सर्व्हे", **अनुसंधान पत्रिका,** व्हॉ. ८, आंबेजोगाई, १९९१, पृ. १६ ते २५

९९ पानसे, मु. ग., **यादवकालीन महाराष्ट्**, मुंबई, १९६३, पृ. ४९

१०० कोलते, वि. भि., "देवसेनाचा हिस्सेबोराळ शिलालेख", **महाराष्ट्रातील काही ताम्रपट व शिलालेख**, मुंबई, १९८७, पृ. २०-२१

१०१ कित्ता, गणेशवाडी शिलालेख, पृ. १५५

१०२ मिराशी, वा. वि., **सातवाहन आणि पश्चिमी क्षत्रप यांचा इतिहास व कोरीव लेख**, मुंबई, १९७९, पृ. १४५

१०३ मिराशी, वा. वि., (संपा.), **कॉर्पस् इन्स्क्रिप्शनम् इंडिकेरम्**, १९५५, व्हॉ. ४/२, पार्ट, पृ. ६१०

१०४ राजवाडे, वि. का., **संकीर्ण निबंध - लेखसंग्रह**, भाग ३, पृ. २४२

१०५ तुळपुळे, शं. गो., **प्राचीन मराठी कोरीव लेख**, पुणे, १९६०, प्रस्तावना, पृ. २५

१०६ मिराशी, वा. वि., **कलचुरी नृपति आणि त्यांचा काळ**, नागपूर, १९५६, पृ. ६८

१०७ कोलते, वि. भि., "धर्मापुरी येथील शिलालेख", पूर्वोक्त, पृ. ५-२८; **संशोधक**, वर्ष ५८, अंक ४, डिसेंबर १९९०, धुळे, पृ. ३४-४०

१०८ मिराशी, वा. वि., **शिलाहार राजवंशाचा इतिहास आणि कोरीव लेख**, नागपूर, १९७४, लेख क्र. १२, पृ. ८५

१०९ पाठक, अ. शं., "मध्ययुगीन मठ स्थापत्य", **संशोधन**, डिसेंबर १९९०, वर्ष २८, अंक ४, धुळे, पृ. ३४-४२; "चकलांबा येथील मध्ययुगीन मठ स्थापत्य : एक चिंतन", **संशोधक**, डिसेंबर १९९९, वर्ष ६७, अंक ४, धुळे, पृ. ३१ ते ३८

११० पाठक, अ. शं., बारवस्थापत्य : एक आढावा, "**डॉ. देविसिंह चौहान गौरवग्रंथ**" लातूर, १९९८, पृ. ४०१-४६८.

१११ कित्ता

# परिशिष्ट

## पारिभाषिक शब्दसूची

| | |
|---|---|
| अधिष्ठान | मंदिराच्या तळाचा भाग |
| आमलक | शिखराच्या माथ्यावर येणारे दगडी चक्र. याला रायआवळ्यासारख्या खाचा पाडलेल्या असतात. त्यामुळे ते प्रचंड आवळ्यासारखे दिसते. |
| अंड, अंडक | लहान शिखर |
| अंग | मंदिराच्या उत्सेधातील मुख्य भाग. उदा. भद्र, प्रतिरथ, कर्ण |
| अंतराळ | गाभारा व मंडप यांच्यामधील दालन. आरंभी याला छप्पर नसे. त्यामुळे त्यातून आकाश दिसत असे म्हणून त्यास हे नाव पडले असावे. |
| आंतरपट्ट | दोन नक्षीपट्टांमधील जागा |
| अपस्मारपुरुष | शिवाच्या पायदळी तुडविला जाणारा दानव |
| अर्धमंडप | मुख्य मंडपासमोरील आकाराने लहान व तीन बाजूंनी उघडा असलेला मंडप |
| भद्र | इमारतीच्या प्रवेशव्दारासमोर बांधण्यात येणारा उघडा मंडप (porch, portico) |
| भरणी | स्तंभाचा माथ्यावरील पन्हाळीयुक्त भाग |
| भूमी | १) मजला, विशेषतः द्राविड पध्दतीच्या विमानातील मजले<br>२) ज्यावर खोदकाम किंवा चित्रकाम करावयाचे तो पृष्ठभाग |
| भूमि-आमलक | मजल्यावरील कोपऱ्यातील वर्तुळाकृती दंतूर नक्षी. उत्तर भारतीय शैलीतील शिखरांवर अशी नक्षी मजल्याची निदर्शक असते. |
| चैत्य गवाक्ष | उतरत्या छपरातील खिडकी |
| चंद्रशाला | उतरत्या छपरातील खिडकी; सर्वात वरच्या मजल्यावरील मोकळे दालन |
| चंद्रशिला | प्रवेशद्वारासमोरील अर्धचंद्राकृती पायरी |
| चतुस्तल | चार मजली |

| | |
|---|---|
| छाद्य | वळचण, छज्जा |
| देवगृह | मूर्ती असलेली खोली |
| देवकोष्ठ | भिंतीवर देवमूर्ती बसविण्यासाठी केलेला कोनाडा |
| व्दारशाखा | दरवाजाच्या चौकटीवरील नक्षीपट्ट |
| गजतालू | हत्तीच्या ताळूसारखा छतावरील नक्षीयुक्त भाग (गोपूर) |
| गजथर | हत्तीमूर्तीयुक्त चौथरा, जोते |
| गूढमंडप | बंदिस्त मंडप |
| जाड्यकुंभ | पीठाचा तळातील कुंभाकृती नक्षीदार भाग |
| जगती | जोते; अधिष्ठानचा तळभाग |
| जालवातायन | जाळीदार नक्षीची खिडकी |
| जंघा | मंदिराच्या भिंतीचा मधला भाग. हा सहसा सपाट व एखाद्या रुंद पट्ट्यासारखा दिसतो. यावरच बहुतेक मूर्तीकाम केलेले आढळते. |
| कक्षासन | मंडपाच्या तीन बाजूंना बसण्यासाठी केलेले दगडी बाक |
| कळस | आमलक अथवा स्तूपीवर बसविण्यात येणारी कलशाची दगडी प्रतिकृती |
| कपिली | अर्धमंडप किंवा अंतराळातील खोलीची बाहेरील भिंत |
| कपोत | सज्जा, पागोळी. कबुतराच्या मानेप्रमाणे बाकदार आकाराचा थर |
| कपोतपाली | कंगणीदार छज्जा |
| कर्ण | तीर-खांब व त्याच्या माथ्यावरील ब्रॅकेट यांना सांधणारा भाग |
| कर्णकूट | इमारतीच्या कोनातील लघु-चौकोनी वास्तू |
| कुंभ | अर्धगोलाकार आकाराचा मंदिराच्या पीठावरील एक थर |
| कूट | चौरस विधानाची अगदी लहान वास्तू |
| कूटस्तंभ | भूमिज शिखरावरील शिखरिका |
| ललाट | व्दारांच्या माथ्याचा मध्यभाग (गणेश पट्टी) |
| ललाटबिंब (बिंब) | दरवाजाच्या चौकटीच्या वरच्या पट्टीवर मधोमध खोदविण्यात येणारी मूर्ती किंवा पूर्ण कलशासारखे चिन्ह |

| | |
|---|---|
| लाट | मुख्यत्वे सम्राट अशोकाने उभारलेले दगडी स्तंभ, यावर सिंह, वृषभ या सारखी लांछने असतात. |
| लतिन | कोरीव उत्सेधपट्ट असलेले उत्तर भारतीय शैलीतील शिखर |
| मकर-प्रणाल | मगरमुखी आकाराचे प्रणाल (पाणी जाण्याचा मार्ग) |
| मंचिका | उच्चपीठ |
| मंडोवर | जगतीवरील आणि छाद्याखालील भाग, भिंत |
| मंजरी | शिखरिका |
| मिथुनशाखा | दांपत्य शाखा (काही वेळेस शृंगारावस्थेतील) |
| मुखमंडप | भद्र किंवा अर्धमंडप |
| मूलमंजरी | मुख्य शिखर |
| नवभूम | नऊ मजली |
| निरंधार | आत प्रदक्षिणा मार्गाची सोय नसलेले मंदिर |
| पंचरथ | पाच भाग असलेला गर्भगृहाचा तलविन्यास |
| पत्रशाखा | पर्ण समूहाने सुशोभित भाग किंवा पट्ट |
| पत्रवल्ली | पाने असलेली गुंडाळीयुक्त वेल (पत्रलता) |
| फंसाकार | चौथरा पध्दतीची पिरॅमिडसारखी बांधणी |
| फांसना | चौथरा पध्दतीचा छत प्रकार |
| पीठ | इमारतीच्या खालचा चौथरा, जोते |
| राजसेन | कक्षासनास असलेली मोठी अलंकृत पट्टिका |
| रथ | गाभाऱ्याच्या बाहेरच्या भिंतीवर असणारे उभे पट्ट. हे एकापुढे एक सरकतात म्हणजेच “निर्गत” असतात. या “रथां” च्या संख्येवरून मंदिराच्या विधानाला “त्रिरथ,” “पंचरथ” अशी नावे देतात. हे रथ उंचीला कपोतापर्यंत किंवा आमलकापर्यंत असतात. |
| रथिका | व्दार चौकट असलेली देवळी |
| रत्नपट्ट, | रत्नयुक्त पट्ट |
| रत्नशाखा | अलंकारयुक्त पट्ट |
| रूचक | चौरस आकाराचा स्तंभ |

| | |
|---|---|
| सलिलांतर | दोन भिंतींमधील जागा; पाणी ओघळण्यासाठी केलेली खाच |
| सप्तभूम | सात मजली |
| सर्वतोभद्र | चार बाजूने प्रवेशद्वार असलेले मंदिर |
| स्तूप | अवशेषांवर बांधलेले स्मारक. मुख्यत्वे बौध्द स्मारकां हा शब्द वापरतात. |
| स्तंभशाखा | दाराच्या चौकटीचा स्तंभयुक्त भाग |
| शुकनास, शुकनासिका | अंतराळ या भागावर येणारे गोलाकार छप्पर. य लहान बाजूंपैकी एक शिखराला चिकटलेली असते, दुसरीत चैत्यतोरणाकार कोनाडा करून देवमूर्ती बसवि |
| शूरसेन, शूरसेनक | चैत्यगृहाच्या उतरत्या छपरातील खिडकीवरील पर्ण |
| त्रि-अंग | भद्र, रथ व कोण असलेली गाभाऱ्यातील वास्तू |
| त्रिभूम | तीन मजली |
| त्रिपुरुष | तीन गाभारे असलेले देऊळ |
| त्रिरथ | पुढे आलेले तीन भाग |
| त्रिशाखा | तीन शाखा किंवा पट्टयुक्त दाराची चौकट |
| उत्तरंग | व्दारमाथा |
| वेदिबंध | खूर, कुंभ, कळस, आंतरपट्ट व कपोतपाली असल तळभागाची भिंत |
| वेदिका | कठडा. मूळच्या लाकडी नमुन्यानुसार घडविलेले ब स्तूपांभोवती दिसणारे कठडे |
| विमान | गाभाऱ्याची वास्तू |
| विहार | बौध्द भिक्षूंच्या निवासासाठी बांधलेले किंवा खोद आश्रम, निवासस्थाने |
| व्यालशाखा | सिंह, वाघ, हत्ती अशा निरनिराळ्या प्राण्यांचे अव एकत्र करून तयार केलेला प्राणी. याचे शरीर मुख्य सिंहाचे असते. यास व्याल असे म्हणतात व असे व्य कोरलेला भाग म्हणजे व्यालशाखा. |

# संदर्भसूची

## मूलसाधने


**काश्यप शिल्पम्** : अनुवाद- डॉ. आर. पी. कुलकर्णी, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, १९८६

**प्रासादमंडन** : संपादक– जैन भगवानदासपंडित, गुजराती आवृत्ती, उदयपूर, १८६१

**समराङ्गण सूत्रधार** : संपादक-वा. श. अग्रवाल, गायकवाड ओरिएण्टल सिरीज, बडोदा


## इतर साधने


**ॲन्युअल रिपोर्ट** : **इंडियन एपिग्राफी,** १९५८-५९

**इंडियन आर्किऑलॉजी** : **ए रिव्ह्यू,** १९६२-६३

**एपिग्राफिया इंडिका** : खंड १ ते ५, आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया, न्यू दिल्ली

**कॉर्पस इन्स्क्रिप्शनम् इंडिकेरम्**

कझिन्स, हेन्री : **मिडीव्हल टेंपल्स ऑफ दि डेक्कन,** आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया, न्यू एम्पिरीअल सिरीज, खंड ६८, गव्हर्नमेंट ऑफ इंडिया, सेंट्रल पब्लिकेशन ब्रँच, कलकत्ता, १९३१

खंडालवाल, के. : "ब्रम्हपुरी", **ललितकला,** नं. ७, १९६०

गुप्ते, आर. एस. ॲण्ड महाजन, बी. डी. : **अजंठा, एलोरा ॲण्ड औरंगाबाद केव्हज,** डी. बी. तारापोरवाला सन्स ॲण्ड कं., बॉम्बे, १९६२

गोखले, शोभना : **इन्स्क्रिप्शन्स ॲट कान्हेरी,** १९९२

घोष, ए. (संपा.) : **अजंठा म्युरल्स,** ललितकला अकादमी, १९६७

ढवळीकर, एम. के. : कैलास : द टॉयलिस्टीक डेव्हलपमेंट अँड क्रोनोलॉजी, **बुलेटिन ऑफ दि डेक्कन कॉलेज रिसर्च इन्स्टिट्यूट,** खंड ४१, पृ. ३३-४५, पुणे

ढवळीकर, एम. के. : **लेट हीनयान केव्हज ऑफ वेस्टर्न इंडिया,** डेक्कन कॉलेज पोस्ट ग्रॅज्युएट ॲण्ड रिसर्च इन्स्टिट्यूट पुणे, १९८४

ढाकी, एम. ए. : **इंडियन टेंपल्स फॉमर्स् इन कर्नाटक इन्स्क्रिप्शन्स अँड आर्किटेक्चर,** न्यू दिल्ली, १९७७

२९८

सलि
सप्त
सर्वतो
स्तूप
स्तंभश
शुकना
शूरसेन
त्रि-अंग
त्रिभूम
त्रिपुरुष
त्रिरथ
त्रिशाखा
उत्तरंग
वेदिबंध
वेदिका
विमान
विहार
व्यालशाखा



## संदर्भसूची


दत्त, एस. : **बुध्दिस्ट मंकस् ॲण्ड मोनॅस्टरीज ऑफ इंडिया**, लंडन १९६२

दहेजिया, विद्या : **अर्ली बुध्दिस्ट रॉक कट टेंपल्स : ए क्रॉनॉलॉजिक स्टडी**, थॉमसन्स ॲण्ड हडसन, लंडन, १९७२

दीक्षित एम्. जी. : **दि ओरिजिनल ॲण्ड डेव्हलपमेंट ऑफ दि बुध्दिस्ट सेटलमें इन वेस्टर्न इंडिया**, पीएच.डी. प्रबंध (अप्रकाशित), मुं विद्यापीठ, मुंबई, १९४२

देगलूरकर, जी. बी. : **टेंपल, आर्किटेक्चर ॲण्ड स्कल्पचर इन महाराष्ट्र**, नाग १९७४

देव, एस. बी. : **मार्कंडी टेंपल्स**, नागपूर, १९७३

देव, कृष्ण : "दि टेंपल्स ऑफ खजूराहो इन सेंट्रल इंडिया" **एन्शंट इं** नं. १५, १९५९

देव, कृष्ण : "भूमिज टेंपल्स स्टडीज", **इंडियन टेंपल्स आर्किटेक** न्यू दिल्ली, १९७५

देव, पी. आर. : **टेंपल्स ऑफ मराठवाडा**, पब्लिकेशन स्किम, जयपूर (इं १९९३

देव, शां. भा. : **महाराष्ट्र व गोवे शिलालेख-ताम्रपटांची वर्णनात्मक सूची**, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई. १

देशपांडे, एम. एन. : **ए प्ली फॉर दि डेक्कन स्कूल ऑफ सातवाहन स्कल** सेमिनार ऑन इंडियन आर्ट हिस्टरी , १९६२

देशपांडे, एम. एन. : "केव्हज ॲट पन्हाळे-काझी (एन्शंट प्रणालक)", **म ऑफ दि आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया**, नं विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक क्र. २३, नागपूर

देशपांडे, एम्. एन. : "दि रॉक कट केव्हज ऑफ पितळखोरा इन दि डेक **एन्शंट इंडिया**, क्र. १५, १९५९

देशपांडे, एस. आर. : **यादव स्कल्पचर**, अप्रकाशित प्रबंध, पुणे वि पुणे

देशमुख, बी. : **एक्नॉग्राफी ऑफ दि हिंदू टेंपल्स ऑफ मराठवाडा**, १९८८

नाईक, ए. व्ही. : " स्ट्रक्चरल आर्किटेक्चर ऑफ दि डेक्कन, " **न्यू ॲंटिक्वरी**, खंड ९, नं. ७-१२ (जुलै-डिसेंबर) १९

नाईक, ए. व्ही. : **आर्किऑलॉजी ऑफ दि डेक्कन,** (अप्रकाशित प्रबंध, मुंबई विद्यापीठ), १९४७

नागराजू, एस. : **बुध्दिस्ट आर्किटेक्चर, ऑफ वेस्टर्न इंडिया,** आगमकला प्रकाशन, दिल्ली, १९८१

प्रमोदचंद्र : **ऑन दि स्टडी ऑफ इंडियन आट,** हार्वर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, केंब्रिज, मॅसच्युसेटस, १९८३

प्रमोदचंद्र (संपा.) : **स्टडीज इन इंडियन टेंपल्स आर्किटेक्चर,** न्यू दिल्ली, १९७५

प्रसाद, बी. आर. : **चालुक्यन आर्किटेक्चर ऑफ महबूबनगर डिस्ट्रिक्ट,** अप्रकाशित प्रबंध, डेक्कन कॉलेज रिसर्च इन्स्टिटयूट, पुणे

फर्ग्युसन अॅण्ड बर्जेस : **दि केव्ह टेंपल्स ऑफ इंडिया,** लंडन, १८८०

बर्जेस, जे. : "रिपोर्ट ऑन दि एलोरा केव्ह टेंपल्स अॅण्ड ब्राम्हणीकल अॅण्ड जैन केव्हज टेंपल्स इन वेस्टर्न," **आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ वेस्टर्न इंडिया,** खंड ५, लंडन, १८८३ आणि **आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ वेस्टर्न इंडिया, बिदर अॅण्ड औरंगाबाद,** खंड-३, इंडिया म्युझियम, लंडन, १८७८

बॅनर्जी, राखालदास : **दि एम्पिरीयल गुप्ताज**

ब्राऊन, पर्सी : **इंडियन आर्किटेक्चर (बुध्दिस्ट अॅण्ड हिंदू पिरीयड),** खंड १, बॉम्बे, १९५९

बगलर : **अॅन्युअल रिपोर्ट ऑफ दि आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया,** खंड २९

भांडारकर, आर. जी. : **दि अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन,** बॉम्बे, १९९५

माटे, म. श्री. : **प्राचीन भारतीय कला,** पुणे

मिश्रा, डी. : **बुध्दिस्ट मॉन्यूमेंटस्,** न्यू दिल्ली, १९६२

मोतीचंद्र : अॅन आयव्हरी फिगर फ्रॉम तेर, **ललितकला,** नं. ८, १९६०

याजदानी, जी. : **अजंठा,** पार्टस् नं. १-४, लंडन, १९३०-१९५३

याजदानी, जी. (संपा.) : **हिस्टरी ऑफ दि डेक्कन,** खंड १, भाग ३, फाईन आर्ट, ऑक्सफोर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, लंडन अॅण्ड बॉम्बे, १९५२

रामाराव, एम. : **अर्ली चालुक्यन टेंपल्स ऑफ आंध्र प्रदेश**, गव्हर्नमेंट ऑफ आंध्र प्रदेश, हैद्राबाद, १९६५

राय, एन. : **एज ऑफ एम्पिरीयल युनिटी** (संपा. आर. सी. मजूमदार); बॉम्बे, १९५१

लॉ, बी. सी. : **हिस्टॉरिकल जिऑग्राफी ऑफ एन्शंट इंडिया**, सोसायटी एशियाटिक डी पॅरीस, १९५४

लॉन्घर्स्ट, ए. एच. : **पल्लवा आर्किटेक्चर**, खंड २, मेमॉयर्स ऑफ दि आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया, क्र.३३, सेंट्रल पब्लिकेशन ब्रँच, कलकत्ता, १९२८

लेव्हीन, डेबोरा बी. : "औरंगाबाद : अ स्टायलिस्टिक ॲनालिसिस," **आर्टिब्यूस एशिया** २८, १९६५, पृ. १७५

वर्मा, ओ. पी. : **सर्व्हे ऑफ हेमाडपंती टेंपल्स ऑफ महाराष्ट्र**, नागपूर, १९७३

शास्त्री, ए. एम. : **"बुध्दिस्ट टेक्स्टस् फ्रॉम इन्स्क्रिप्शन्स,"** मार्ग, खंड २२, १९६७

शिवराममूर्ती, सी. : **५,००० इयर्स ऑफ इंडियन आर्ट**

सरकार, एच. : **स्टडिज इन अर्ली बुध्दिस्ट आर्किटेक्चर ऑफ इंडिया**, मुंबई, १९६६

सरस्वती, एस. के. : **ए सर्व्हे ऑफ इंडियन स्कल्पचर**, कलकत्ता, १९५७

सांकलिया, एच. डी. : **प्रिहिस्टरी ॲण्ड प्रोटोहिस्टरी ऑफ इंडिया ॲण्ड पाकिस्तान** (दुसरी आवृत्ती), डेक्कन कॉलेज, पुणे, १९७४

स्पिंक, वाल्टर, एम. : "अजंठा टू एलोरा," **मार्ग**, खंड २०, १९६७

स्पिंक, वाल्टर, एम. : **आर्ट ऑफ साऊथ इंडिया/डेक्कन** दिल्ली, १९८०

स्पिंक, वाल्टर, एम. : "ऑन दि डेव्हलपमेंट ऑफ अर्ली बुध्दिस्ट आर्ट इन इंडिया," **आर्ट बुलेटिन**, क्र. ४०, १९५०

सौंदरराजन, के. व्ही. : "दि केव्ह टेंपल्स ऑफ दि डेक्कन," **आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया**, १८८१, न्यू दिल्ली

---

**ख**



**ग**

### थ



### द



### ध



### न



### प

**फ**



**ब**

## सूची








कोंडाणे लेणे क्र. १ चैत्यगृह- तलविन्यास, ता. कर्जत, जि.-रायगड








बेडसा लेणे क्र.११. तलविन्यास, ता.- मावळ, जि.- पुणे

## चैत्यगृहातील स्तूप



१



२



३



४

१) औरंगाबाद लेणे क्र. ४ २) कान्हेरी लणे २ रे शतक
३) कोंदिवटे लेणे क्र. ९ ४) कार्ले लणे क्र. ८

## लेण्यातील स्तंभाचे प्रमुख प्रकार



















१) नाशिक लेणे क्र. १८  ३) कार्ले लणे क्र. ८  ५) जुन्नर - गणेश पहार
२) बेडसा लेणे क्र. ७  ४) नाशिक लेणे क्र.१०  ६) जुन्नर - मानमोडी १

**स्तंभाचे प्रमुख प्रकार**

१ ) अजिंठा लेणे क्र. १०,२,३
ता.- सोयेगाव, जि. औरंगाबाद

२ ) अजिंठा लेणे क्र. ९ व ४

३ ) कान्हेरी लेणे क्र. ३ व २
ता.- बोरिवली, जि. मुंबई उपनगर

























भाजे लेणे क्र. २ ते ११ व १३ ते १६ चे तलविन्यास
ता. मावळ, जि. पुणे

विहार



३




नाशिक लेणे क्र. ३ व १०, तलविन्यास - जि. नाशिक




शेलार वाडी लैणे क्र. १,३,५,६,८,१० व ११ चा तलविन्यास, ता. मावळ, जि. पुणे

## विहार प्रकार व त्यांचे तलविन्यास

अ )




ब )




अ ) एकगर्भ लेणी क्र. १ ते ७

ब ) अनेकगर्भ लेणी क्र. ८ ते १२




तलविन्यास



उत्सेध:दर्शनी भाग

घारापुरी लेणी क्र. १ ता. उरण, जि. रायगड



वेरूळ गुंफा क्र. २९ ( धुमार लेणे ) जि. औरंगाबाद




वेरुळ कैलास लेणे खालच्या भागाचा तलविन्यास
जि. औरंगाबाद

## तेर येथील मंदिरे, ता. जि.उस्मानाबाद










अ ) त्रिविक्रम मंदिर ब ) ऊत्तरेश्वर मंदिर
क ) कालेश्वर मंदिर — तलविन्यास




केवल नरसिंह मंदिर, रामटेक, जि. नागपूर




भोगराम मंदिर,रामटेक - तलविन्यास जि. नागपूर

## रामटेक येथील मंदिरांचे वेदीबंद




अ ) रुद्र नरसिंह मंदिर ब ) केवल नरसिंह मंदिर क ) भोगराम मंदिर








मार्कंड ऋषी मंदिर व नंदी मंडपाचा तलविन्यास

मार्कंड, ता. चामोरशी, जि. गडचिरोली




अंबरनाथ शिवमंदिर - तलविन्यास, जि. ठाणे




सिन्नर, गोंदेश्वर मंदिर - तलविन्यास, ता. सिन्नर, जि. नाशिक



कोपेश्वर मंदिर - तलविन्यास, ता. शिरोळ, जि. कोल्हापर




मुखेड शिवमंदिर - तलविन्यास, जि. नांदेड




बीड कंकालेश्वर मंदिर - तलविन्यास, जि. बीड




औंढा नागनाथ मंदिर - तलविन्यास, जि. परभणी



अन्वा शिवमंदिर - तलविन्यास, जि. जालणा



उमरगा शिवमंदिर - तलविन्यास, जि. उस्मानाबाद

## स्तूपांची विविधांगे




मंदिराचे पीठ
जंधा
नयथर
अश्वथर
गजथर
ग्रासपट्टी
कपोताली
अंतरपत्र
कर्णिका
जाड्याकुंभ

## मंदिराचे पीठ







मंदिराची विविधांगे
छाद्य
शिरावटी
भरणी
उद्‌गम
जंघा
मंचिका
कपोताली
अंतरपत्र
कलश
कुंभ
खूर

## नागर शिखर शेखरी प्रासाद



| | | |
|---|---|---|
| १ ) उरुश्रृंग | ४ ) श्रृंग | ७ ) ग्रीव्हा |
| २ ) प्रत्यंग | ५ ) रथिका | ८ ) आमलसार |
| ३ ) शुकनास | ६ ) तिलक | ९ ) कलश |




सातगाव येथील वैष्णव मंदिराचे उठावचित्र, ता. चिखली जि. बुलढाणा




जागजी बारव - तलविन्यास, जि. उस्मानाबाद




परभणी येथील एक वास्तू - जि. परभणी

१ ) मुख्य दालन ( मंडप )
२ ) निवासी दालन
३ ) दालन
४ ) आकाश दिसणारा चौक



भाजे विहार क्र. १८ मधील इंद्र



भाजे लेणे क्र. १२



कोंडाणे येथील चैत्य व विहार



कोंडाणे चैत्यातील मिथुन शिल्पे



औरंगाबाद लेणे क्र. ४ अ मधील बुद्ध



नाशिक लेणं क्र. १८



कोंदिवटे येथील चैत्य क्र. ९



कोंदिवटे लेणे क्र. १, २, ३, ४



जुन्नर येथील मानमोडी-भूतलेणे
क्र. १४



बेडसा लेणीचा दर्शनी भाग



बेडसा विहाराचा अंतर्भाग



कार्ले चैत्याचा दर्शनी भाग



कान्हेरी लेणे क्र. ११ (दरबार हॉल)



कान्हेरी लेणे क्र. ९० मधील शिल्प



कान्हेरी लेणे क्र. ३ मधील बुद्ध



लोणाड लेणीतील विश्वंतर जातक



जुन्नर लेणे क्र. ४० चा दर्शनी भाग



वेरूळच्या कैलास लेणीतील रामायण कथेचा शिल्पपट



अजिंठा लेणे क्र. १ मधील अलंकृत स्तंभ



पन्हाळेकाझी लेणी क्र. १९ ते २३



पन्हाळेकाझी लेणे क्र. १० मधील महाचंडरोषण



पन्हाळेकाझी लेणे क्र. १९ चा अंतर्भाग



पन्हाळेकाझी लेणे क्र. १९ चा
अंतर्भाग (दुसरे चित्र)



पन्हाळेकाझीचे नाथपंथी लेणे
क्र. १४



तेर येथील त्रिविक्रम मंदिर



तेरच्या उत्तरेश्वर मंदिराच्या प्रवेशद्वाराची लाकडी चौकट



रामटेकच्या केवलनरसिंह मंदिराची दक्षिण बाजू



केवलनरसिंह मंदिरांच्या गर्भगृहातील अलंकृत स्तंभ



रामटेकच्या त्रिविक्रम मंदिराचा सभामंडप



अंबरनाथचे शिवमंदिर



अन्वा येथील शिवमंदिर



औंढ्या नागनाथ मंदिर



औंढ्या नागनाथ मंदिराची पश्चिम बाजू



होट्टल येथील शिवमंदिर



लोहारा येथील कमलेश्वर मंदिर



लोणाड येथील दैत्यसूदन मंदिर



खिद्रापूरचे कोप्पेश्वर मंदिर



खिद्रापूरच्या कोप्पेश्वर मंदिराचा बाह्यभाग



शिखर शिंगणापूरचे अमृतेश्वर मंदिर



फलटणच्या जबरेश्वर मंदिराचा बाह्यभाग



धर्मपुरी येथील केदारेश्वर मंदिर



तेर येथील हस्तिदंती बाहुली



पातूर येथे उपलब्ध झालेली पार्वतीची (योगिनी) मूर्ती, (जि. अकोला)



एलिफंटा लेणीतील शिल्प



मनसर (ता. रामटेक, जि. नागपूर) येथील शिवमूर्ती



हमलापुरी येथील बुद्धमूर्ती



मांढळ (जि. नागपूर) येथे उपलब्ध झालेली मूर्ती



पवनार येथील वाकाटककालीन गंगेचे उत्कृष्ट शिल्प



अजिंठा लेणे क्र. १ मधील मंदिरातील बुद्ध



अजिंठा लेणे क्र. १० मधील बोधिवृक्षाची पूजा करणारा राजा व परिवार



अजिंठा लेणे क्र. १० मधील षड्दंत जातकाचे दृश्य



अ. बोधिसत्व (पद्मपाणी), अजिंठा लेणे क्र. १



ब. अजिंठा लेणे क्र. १७ मधील बुद्धासमवेत माता व बालक



अ. अप्सरा, अजिंठा लेणे क्र. १७



ब. राणी (बुध्दजन्म), अजिंठा लेणे क्र. २



अचलपूर येथील कार्तिकस्वामी मंदिरातील मुख्य मूर्ती



मुखेड येथील बारव, जि. नांदेड



मानस्तंभ, चरठाणा, जि. परभणी

## महाराष्ट्र राज्य गॅझेटिअर (इंग्रजी)

| अ. क्र. | राज्य गॅझेटिअरचे नाव | प्रकाशन वर्ष | किंमत (रुपये) |
|---|---|---|---|
| १. | बॉटनी, पार्ट-१ : मेडिसिनल प्लान्टस् | १९५३ | ९.६० |
| २. | बॉटनी, पार्ट-२ : टिंबर्स | १९५७ | ४.१९ |
| ३. | बॉटनी, पार्ट-३ : मिसलेनिअस प्लान्टस् | १९६१ | ५.२३ |
| ४. | बॉटनी अ‍ॅण्ड फ्लोरा ऑफ महाराष्ट्र | १९८७ | ७५.०० |
| ५. | फौना | १९७४ | १४.०० |
| ६. | हिस्टरी, पार्ट-१ : एन्शंट पिरीअड | १९६७ | ९.०० |
| ७. | हिस्टरी, पार्ट-२ : मेडिवल पिरीअड | १९७२ | २३.०० |
| ८. | हिस्टरी, पार्ट-३ : मराठा पिरीअड | १९६८ | ४.९६ |
| ९. | महाराष्ट्र लॅन्ड अ‍ॅण्ड इटस् पिपल | १९६८ | ८.०० |
| १०. | लॅग्वेज अ‍ॅण्ड लिटरेचर | १९७० | ९.७५ |

## महाराष्ट्र राज्य गॅझेटिअर (मराठी)

| अ. क्र. | राज्य गॅझेटिअरचे नाव | प्रकाशन वर्ष |
|---|---|---|
| १. | महाराष्ट्र : भूमी व लोक | १९९६ |
| २. | महाराष्ट्र : इतिहास–प्राचीन काळ (खंड–१, भाग-१) | २००२ |

(वाय) १७०-१०००-पुस्तके-८-२००२.

शासकीय मुद्रणालय, औरंगाबाद.